अध्याय १८



श्रीगुरु सारवरे महाराज सांप्रदायिक

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी



केसन महाराज सारवरे ब्र.भू. विनायक नारायण जोशी
( सारवरे महाराज )

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा

जयजय देव निर्मळ। निजजनाखिलमंगळ। जन्मजराजलदजाळ- । प्रभंजन ॥ १ ॥ जयजय देव प्रबळ। विदळितामंगळकुळ। निगमागमद्रुमफळ। फलप्रद ॥ २ ॥ जयजय देव सकल। विगतविषयवत्सल। कलितकाळकौतूहल। कलातीत ॥ ३ ॥ जयजय देव निश्चळ। चलितचित्तपानतुंदिल। जगदुन्मीलनाविरल। केलिप्रिय ॥ ४ ॥ जयजय देव निष्कळ। स्फुरदमंदानंदबहळ। नित्यनिरस्ताखिलमळ। मूळभूत ॥ ५ ॥ जयजय देव स्वप्रभ। जगदंबुदगर्भनभ। भुवनोद्भवारंभस्तंभ। भवध्वंस ॥ ६ ॥ जयजय देव विशुद्ध। विदुदयोद्यानद्विरद। शमदममदनमदभेद। दयार्णव ॥ ७ ॥ जयजय देवैकरूप। अतिकृतकंदर्पसर्पदर्प। भक्तभावभुवनदीप। तापापह ॥ ८ ॥ जयजय देव अद्वितीय। परिणतोपरमैकप्रिय। निजजनजित भजनीय। मायागम्य ॥ ९ ॥ जयजय देव श्रीगुरो। अकल्पनाख्यकल्पतरो। स्वसंविद्द्रुमबीजप्ररो- । हणावनी ॥ १० ॥ हें काय एकेक ऐसेसें। नानापरिभाषावशें। स्तोत्र करूं तुजोद्देशें। निर्विशेषा ॥ ११ ॥ जिहीं विशेषणीं विशेषिजे। तें दृश्य नव्हे रूप तुझें। हें जाणें मी म्हणौनि लाजें। वानणा इहीं ॥ १२ ॥ परी मर्यादेचा सागरु। हा तंवचि तया डगरु। जंव न देखे सुधाकरु। उदया आला ॥ १३ ॥ सोमकांतु निजनिर्झरीं। चंद्रा अर्घ्यादिक न करी। तें तोचि अवधारीं। करवी कीं जी ॥ १४ ॥ नेणों कैसी वसंतसंगें। अवचितिया वृक्षाचीं अंगें। फुटती तैं हे तयांही जोगें। धरणें नोहे ? ॥ १५ ॥ पद्मिनी रविकिरण। लाहे मग लाजे कवण ?। कां जळें शिवतलें लवण। आंग भुलें ॥ १६ ॥ तैसा तूतें जेथ मी स्मरें। तेथ मीपण मी विसरें। मग जाकळिला ढेकरें। तृप्तु जैसा ॥ १७ ॥ मज तुवां जी केलें तैसें। माझें मीपण दवडूनि देशें।

---

१ स्वभक्ताला सर्वथैव मंगलकारक. २ जन्मवार्धक्यादिरूपी मेघांच्या जाळ्याचा. ३ नाशकर्ता वायु. ४ विदलित—नाशिलीं आहेत अमंगलांचीं—अकल्याणांचीं कुळें ज्यानें. ५ निगम—वेद व आगम—स्मृति शास्त्रें, तद्रूप वृक्षाचें फल देणारा. ६ विगत—विषय—वैराग्यसंपन्न यांचा प्रियसखा. ७ कृतांतउत्साहनाशक. ८ चंचल चित्ताच्या प्राशनानें दोंदिल. ९ जगास प्रगट करून त्यांत निरंतर. १० क्रीडाप्रिय. ११ प्रबळ अशा अत्यानंदाला स्फुरद्रूप करणारा असा. १२ सर्व पापांचा जेथें सर्वकाळ नाश आहे असा. १३ स्वयंप्रकाश. १४ जगद्रूप मेघाच्या आकाशा. १५ जगद्रूप उत्पत्तीचा मूळ स्तंभ. १६ संसारनाशक.

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा

हे देवा ! तुम्ही अविद्यादि मलरहित असून आपल्या भक्तांना सर्वतोपरी मंगलकारक असणाऱ्या आणि जन्म व वार्धक्य एतद्रूपी मेघांचा नाश करण्याचे बाबतींत प्रबल वायुच आहात, त्या तुमचा जयजयकार असो १. देवा ! तुम्ही सर्वांत बलवान् असून अज्ञान व तत्कार्य अमंगल कुळांचा समूळ नाश करणारे आहात, वेद व शास्त्ररूपी वृक्षाचें फल असून ते फल देणारेहि तुम्हीच आहांत, अशा त्या तुमचा जयजयकार असो २. देवा ! स्वरूपतः संपूर्ण असलेल्या व ज्यानीं विषयवासनांचा त्याग केला आहे, त्या वैराग्य संपन्नावर कृपा करणाऱ्या व लीलेनें कालाच्या क्रीडेस आपण अंकित ठेवणारे व कारण असून कलातीत, अंशरहित असें पूर्ण आहात, त्या तुमचा जयजयकार असो ३. अचल असणाऱ्या श्रीगुरुदेवा ! चंचल चित्ताच्या प्राशनानें तुंदिल उदर–दोंद वाढलेल्या देवा ! वरचेवर जगदुत्पत्तिरूप अखंड क्रीडा करण्याची आवड असलेल्या देवा ! तुमचा जयजयकार असो ४. देवा ! तुमचें स्वरूप निरवयव शुद्ध असून अंतःकरणांत आनंदाला विपुल स्फूर्ति देणारे व सर्व पापांचें निरसन करणाऱ्या, तसेंच सर्व जगाला कारणीभूतहि असणाऱ्या श्रीगुरुदेवा ! तुमचा जयजयकार असो ५. हे स्वयंप्रकाश देवा ! तसेंच जगद्रूपी मेघांना पोटांत धारण करणाऱ्या आकाशा ! तसेंच जगद्रूप उत्पत्तीचें मूळ आधारस्तंभा ! संसाराचा नाश–बाध करणाऱ्या देवा ! तुमचा जयजयकार असो ६. हे, उपाधिरहित अत्यंत शुद्ध देवा ! व अविद्यारूपी बागेचा नाश करणाऱ्या हत्ती अशा आणि शमदमेंकरून काममदाचा नाश करणाऱ्या व दयेच्या समुद्रा देवा ! तुमचा जयजयकार असो ७. हे अविकार, एकच रूप असणाऱ्या देवा ! कामरूपी सर्पाच्या गर्वाचा तिरस्कार करणाऱ्या वा भाविक भक्तांचें श्रद्धापूर्ण हृदयरूपी मंदिरांतील दीपा ! संसारतापाचा नाश–बाध करणाऱ्या श्रीगुरुदेवा ! तुमचा जयजयकार असो ८. हे स्वगत–सजातीय–विजातीय भेदरहिता ! अद्वितीया ! पूर्ण नम्र व विवेक-वैराग्यादि साधनानें अधिकार संपन्न झालेल्या मनुष्यावर प्रेम करणाऱ्या व आपल्या भक्ताधीन असणाऱ्या व भजनास योग्य असलेल्या व मायेस अगम्य, मायातीता ! देवा ! तुमचा जयजयकार असो ९. हे देवा श्रीगुरुराया ! कल्पनातीत म्हणून प्रसिद्ध अशी ब्रह्मवस्तु देणारे जणुं कल्पवृक्षच असणाऱ्या व आत्मज्ञानरूप वृक्षाच्या बीजाचें उत्पत्तिस्थान असणाऱ्या देवा ! तुमचा जयजयकार असो १०. याप्रमाणें एक ना अनेक प्रकारच्या भाषापद्धतीनें विशेषणें देण्यास योग्य नाहीं; असें जें सर्वसामान्य–विशेष–भावरहित तुम्ही, त्या तुमची स्तुति तरी कशी व किती करावी ? ११. हे ज्या ज्या विशेषणांनीं तुमची स्तुति करावी; तें तें दृश्य अनात्मरूप तुमचे खरें स्वरूप नव्हे, हें मी जाणतों, म्हणूनच तुमचे शब्दांनी वर्णन करण्याची मला लाज वाटते. [ मग वर्णन कां करितां ? असें कोणी म्हणेल तर ] १२. परंतु समुद्राला मर्यादा आहे, असा जो लौकिक प्रसिद्ध आहे तो, जोपर्यंत पूर्ण चंद्र उदयाला आलेला त्यानें पाहिला नाहीं तोंपर्यंतच असतो १३. सोमकांत मणि हा आपण होऊन आपल्या स्वतःच्या उदकानें चंद्रास अर्घ्य वगैरे देत नाहीं तर चंद्रच त्या मण्याकडून ते काम करवितो १४. वसंत ऋतु सुरू झाल्याबरोबर वृक्षास एकदम अकस्मात पालवी कशी फुटते, हें समजत नाहीं, कारण, तें वृक्षाचेंहि स्वाधीन नसतें. त्याप्रमाणें माझीहि स्थिति झाली असें कां समजूं नये ? १५. सूर्यविकासिनी कमलास सूर्य किरणाचा योग झाला असतां मग लज्जेनें संकोचून कोण राहणार ? [ कमल प्रफुल्लित होतें ] किंवा मीठ पाण्यांत घातल्यावर जसें ते आपले स्वरूप विसरते–विरघळून तद्रूप होते १६. तसा जेव्हां मी तुमचें स्मरण करतों, तेव्हां मी आपले स्वरूप, मीपणाच विसरून जातों. मग भोजनापासून तृप्त झालेला मनुष्य ढेकरीनें व्यापिला गेला असतां, मग त्यानें आपली ढेकर आवरून धरण्याचा कितीही प्रयत्न केला तरी अनिच्छेनें, इच्छा नसतांहि ढेकरावर ढेकरा येतात १७. तसें, हें श्रीगुरुराया !

स्तुतिमिषेंच पां पिसें । बांधलें वाचे ॥ १८ ॥ ना एऱ्हवीं तरी औठवीं । राहोनि स्तुति जैं करावी । तैं गुणागुणिया धरावी । सरोभेरी कीं ॥ १९ ॥ तरी तूं जी एँक-रसाचें लिंग । केवीं करूं गुणागुणीं विभाग । मोतीं फोडोनि सांधितां चांग । कीं तैसेंचि भलें ॥ २० ॥ आणि बाप तूं माय । इहीं बोलीं ना स्तुति होय । डिंभोपाधिक आहे । विटाळु तेथें ॥ २१ ॥ जी जालेनि पोइकें आलें । तें गोसांवीपण केवीं बोलें ? । ऐसें उपाधी उशिटलें । काय वर्णूं ॥ २२ ॥ जरी आत्मा तूं एकसरा । हेंही म्हणतां दातारा । तरी आंतुल तूं बाहेरा । घापतासी ॥ २३ ॥ म्हणौनि सत्याचि तुजलार्गी । स्तुति न देखों जी जगीं । मौनावांचूनि लेणें आंगीं । सुसीना मा ॥ २४ ॥ स्तुती कांहीं न बोलणें । पूजा कांहीं न करणें । सन्निधी कांहीं न होणें । तुझ्या ठायीं ॥ २५ ॥ तरी जिंतिलें जैसें भुली । पिसें आलापु घाली । तैसें वानूं तें माउली । उपसाहावें तुवां ॥ २६ ॥ आतां गीतार्थाची मुक्तमुदी । लावीं माझिये वाग्वृद्धी । जे माने हे सभासदीं । सज्जनांच्या ॥ २७ ॥ तेथ म्हणितलें श्रीनिवृत्ती । नको हें पुढतपुढती । परिसीं लोहा घृष्टी किती । वेळवेळां कीजे गा ॥ २८ ॥ तंव विनवी ज्ञानदेवो । म्हणे हो कां जी पसावो । तरी अवधान देतु देवो । ग्रंथा आतां ॥ २९ ॥ जी गीतारत्नप्रासादाचा । कळसु अर्थचिंतामणीचा । सर्व गीता-दर्शनाचा । पाढाऊं जो ॥ ३० ॥ लोकीं तरी आथी ऐसें । जे दुरूनि कळसु दिसे । आणी भेटीचि हातवसे । देवतेची तिये ॥ ३१ ॥ तैसेंचि एथही आहे । जे एकेचि येणें अध्यायें । आघवाचि दृष्ट होये । गीतागमु हा ॥ ३२ ॥ मी कळसु याचि कारणें । अठरावा अध्यायो म्हणें । उवाइला बादरायणें । गीताप्रासादा ॥ ३३ ॥ नोहे कळसापरतें कांहीं । प्रासादीं काम नाहीं । तें सांगतसे गीता ही । संपलेपणें ॥ ३४ ॥ व्यासु सहजें सूत्री बळी । तेणें निगमरत्नाचळीं । उपनिषदार्थाची माळी - । माजीं खांडिली ॥ ३५ ॥ तेथ त्रिवर्गाचा अणुआरु । आडऊ निघाला जो अपारु । तो महाभारतप्राकारु । भोंवता केला ॥ ३६ ॥ माजीं आत्मज्ञानाचें एकवट । दळवाडें झाडूनि चोखट । घडिलें पार्थवैकुंठ- । संवाद कुसरी ॥ ३७ ॥ निवृत्तिसूत्र सोडवणिया । सर्व शास्त्रार्थ पुरवणिया । आवो साधिला मांडणिया । मोक्षरेखेचा ॥ ३८ ॥ ऐसेनि करितां उभारा । पंधरा अध्यायांत पंधरा । भूमी निर्वाळलिया

तशीच माझी स्थिति तुम्हीं केली, याशिवाय आपण माझा मीपणा देशांतराला दवडून म्हणजे नाहींसा करून स्तुतीच्या निमित्तानें माझ्या वाचेला वेड लावलें आहे, १८. किंवा जर मी आपल्या आठवणींनें जेव्हां शुद्धीवर राहून स्तुति करावी, तेव्हांच तुमचे गुण व अगुण यांची तुलना निवड केली असे होईल १९. तर हे प्रभो! तुमचे स्वरूप एकरसाचेंच बनलेलें आहे. मग त्या आपलें ठिकाणीं गुण व अगुणीं हा विभाग कसा बरें करूं! हें पहा! अगोदर मोती फोडून मग ते सांधणें चांगलें किंवा ते मूळचें अखंड, सबंध असलेले तसेंच ठेवणें चांगलें! २०. आणि तूं बाप व तूंच आई आहेस असें म्हटलें तर या बोलण्यानें स्तुति तर होणार नाहींच, उलट त्या बोलण्यांत "माझ्या लेंकुरपणाच्या" उपाधीचा [आपल्या ठिकाणीं भेदाचा] विटाळ मात्र लागेल २१. मी तुमचा चाकर होईन, असें म्हटलें तरी तत्सापेक्ष तुम्हांस 'धनी' असें तरी कसें म्हणूं! अशा रीतीनें, सापेक्ष उपाधीच्या योगानें उष्टें झालेल्या थोरपणाच्या रूपानें तुमचे काय वर्णन करावें! २२. हे प्रभो! तुम्ही सर्वांतर्यामी समव्याप्त असणारे जगदात्मा आहांत, असें जर एकदम तुम्हांला म्हटलें तर माझ्या अंतर्यामीं वास करणारे जें तुम्ही त्या तुम्हांला मी आपल्या बाहेर घालविल्या-काढल्यासारखे होईल २३. म्हणून खरोखर पाहूं गेलें असतां, या जगांत कोणत्याहि रीतीनें तुमची स्तुति करितां येणें शक्य नाहीं [कारण, तुमच्या यथार्थ पारमार्थिक सत्य स्वरूपाचें वर्णनार्थ लागणारीं विशेषणें जगांत मला दिसत नाहींत] आणि मौनाशिवाय तर तुमचे अंगावर इतर दागिना घालीतच नाहीं २४. तात्पर्य आपले संबंधानें कांहींहि न बोलणें हीच आपली खरी स्तुति होय. कांहीं न करणें हीच आपली खरी पूजा आणि [जिज्ञासूनें] वेगळेपणानें कांहींहि न होणे हीच तुमची खरी प्राप्ति, जवळिक होय. अशा गोष्टी तुमच्या ठिकाणीं संभवतात २५. तर, जसा भ्रमानें मुळून वेडा झालेला एखादा मनुष्य बडबड करितो, त्याच प्रकारचें माझें वर्णन आहे; तर हे श्रीगुरुमाऊली! त्वां तें सहन करावें २६. 'या व्याख्यानांत गीतेचा भावार्थ उचितपणें आला आहे.' असा माझ्या व्याख्यान–विस्तारावर संमतिदर्शक मोत्याचें आंगठीचा शिक्का मोर्तब करा म्हणजे मी सांगितलेला गीतार्थ ह्या सर्व सज्जनांचे सभेंत मान्य होईल २७. तेव्हां श्रीनिवृत्ति महाराज म्हणाले कीं, "तूं अशी वारंवार आमची विनंति करूं नकोस अरे! लोखंडाचें सुवर्ण होण्याकरितां परिसावर ते लोखंड वरचेवर असे किती वेळा घासावें लागतें!" [एकदां स्पर्श झाला तरी पुरें, म्हणून वरचेवर स्तुति करण्याचे कारण नाहीं] २८. तेव्हां श्रीज्ञानदेवांनीं प्रार्थना केली कीं, महाराज! आपली आज्ञा हाच प्रसाद आहे. तर मी जो आतां गीतेचा अर्थ सांगणार आहे, त्याकडे देवांनीं लक्ष द्यावें २९. हे गीताग्रंथरूपी रत्नखचित देवालय असून त्याचा हा जो [अठरावा अध्याय] तो अर्थरूपी चिंतामणीचा बनविलेला कळसच आहे, तोही असा कीं, ज्याचें दर्शनानें संपूर्ण गीतेचें दर्शन करविणारा हा अध्याय वाटाड्या आहे. [गीता दर्शनाचे श्रेय लाभते असा आहे.] ३०. लोकांत तरी अशीच समजूत रूढ आहे कीं, कळसाचें दुरून दर्शन घेतलें असतां त्या देवालयांतील देवतेच्या भेटीचेंच [प्रत्यक्ष दर्शनाचेंच] फल हस्तगत झालें असें होतें ३१. तसाच येथेंहि प्रकार आहे. कारण कीं, या एकाच अध्यायाचे वाचन चिंतन केले असतां सर्व गीताशास्त्राचेच दर्शन झाले [वाचल्याचें श्रेय लाभते] असे होते ३२. याच कारणास्तव मी या अठराव्या अध्यायास कळसाची उपमा दिली आहे, कारण कीं, जो हा कळस श्रीवेदव्यासांनीच गीतारूपी देवालयावर चढविला आहे ३३. देवालयावर कळस चढविल्यावर मग त्या मंदीराचें जसें कोणतेंहि काम करावयाचें उरत नाहीं तसेंच हा अठरावा अध्याय गीता संपली असेंच [दर्शवितो] सांगत आहे ३४. श्रीव्यास हे स्वभावतःच श्रेष्ठ कारागीर, सूत्रकार विशाल बुद्धीचे होते. त्यांनी मोठ्या कुशलतेनें [ब्रह्मसूत्रें रचिलीं आणि] वेदरूपी रत्नांच्या पर्वतावर, उपनिषदार्थरूपी पठारावर खणण्यास प्रारंभ केला [वेद तात्पर्य निर्णयार्थ उपनिषद् विचारास प्रारंभ केला] ३५. त्यावेळीं त्या माळ जमिनींत धर्म, अर्थ व काम हा त्रिविध पुरुषार्थरूपी भिन्नभिन्न आकाराचे पुष्कळ गडगळ, गोटे, असार बारीक चुरा निघाला. त्या धोंड्यांचा महाभारतरूपी तट गीतारूपी देवालयाचें भोंवतीं बांधला ३६. नंतर या खाणींत आत्मज्ञानरूपी एकजात अखंड उत्तम चिरा निघाला त्यास चातुर्यानें साफसुफ करून कृष्णार्जुन संवादरूपानें सुंदर घडविला ३७. मग निवृत्तिरूपी दोर–ओळंबा लावून आंखणी करून व सर्व शास्त्रांची पुरणी घालून मोक्षमर्यादेच्या मांडणीचा आव [आकार] साधला ३८. अशा रीतीनें

१ वेडगळ बोल. २ आठवणीनें. ३ निवड. ४ अखंडैकरसाची मूर्ति. ५ लेंकराच्या उपाधीचा. ६ सेवक झाल्यानें. ७ धनीपणा. ८ उष्टें झालेलें. ९ जगदात्मा. १० सरसकट. ११ भ्रांतला. १२ चिकटें, पक्कडें. १३ भ्रांतीनें.

पुरा । प्रासादु जाहला ॥ ३९ ॥ उपरि सोळावा अध्यायो । तो ग्रीवघंटेचा आवो । सप्तदशु तोचि ठावो । पडघाणिये ॥ ४० ॥ तयाहीवरी अष्टादशु । तो अपैसा मांडला कळसु । उपरि गीतादिकीं व्यासु । ध्वजें लागला ॥ ४१ ॥ म्हणौनि मागील जे अध्याये । ते चढते भूमीचे आये । तयांचें पुरें दाविताहे । आपुल्या आंगीं ॥ ४२ ॥ जाल्या कामा नाहीं चोरी । ते कळसें होय उजरी । तेवीं अष्टादशु विवरी । साद्यंत गीता ॥ ४३ ॥ ऐसा व्यासें विंदाणिये । गीताप्रासादु सोडवणिये । आणूनि राखिले प्राणिये । नानापरी ॥ ४४ ॥ एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहेरोनि करिती यया । एक ते श्रवणमिषें छाया । सेविती ययाची ॥ ४५ ॥ एक ते अवधानाचा पुरा । विडापाऊड भीतरां । घेऊनि रिघती गाभारां । अर्थज्ञानाच्या ॥ ४६ ॥ ते निजबोधें उराउरी । भेटती आत्मया श्रीहरी । परी मोक्षप्रासादीं सरी । सर्वांही आथी ॥ ४७ ॥ समर्थाचिये पंक्तिभोजनें । तळिल्या वरिल्या एकचि पक्कान्नें । तेवीं श्रवणें अर्थें पठणें । मोक्षुचि लाभे ॥ ४८ ॥ ऐसा गीता वैष्णवप्रासादु । अठरावा अध्याय कळसु विशदु । म्यां म्हणितला हा भेदु । जाणोनियां ॥ ४९ ॥ आतां सप्तदशापाठीं । अध्याय कैसेनि उठी । तो संबंधु सांगों दिठी । दिसे तैसा ॥ ५० ॥ कां गंगायमुना उदक । वोघबगें वेगळिक । दावी होऊनि एक । पाणीपणें ॥ ५१ ॥ न मोडतां दोन्ही आकार । घडिलें एक शरीर । हें अर्धनारी नटेश्वर- । रूपीं दिसे ॥ ५२ ॥ नाना वाढिली दिवसें । कळा बिंबीं पैसे । परी सिनानें लेवे जैसें । चंद्रीं नाहीं ॥ ५३ ॥ तैसीं सिनानीं चारीं पदें । श्लोक तो श्लोकावच्छेदें । अध्यावो अध्यायभेदें । गमे कीर ॥ ५४ ॥ परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी । नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी ॥ ५५ ॥ मोतियें मिळोनि बहुवें । एकावळीचा पाडु आहे । परी शोभे रूप होये । एकचि तेथ ॥ ५६ ॥ फुलांफुलसरां लेख चढे । दुतीं दुजी अंगुळी न पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥ ५७ ॥ सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख । परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥ ५८ ॥ आणि म्यांही न सांडूनि ते सोये । ग्रंथ व्यक्ती केली आहे । प्रस्तुत तेणें निर्वाहे । निरूपण आइका ॥ ५९ ॥ तरी सतरावा अध्यावो । पावतां पुरता ठावो । जे संपतां श्लोकीं देवो । बोलिले ऐसें ॥ ६० ॥

गीतारूप मंदीराच्या उभारणीची रचना करितां करितां भूमि शुद्ध करण्यापासून तों पंधरा अध्याय संपेपर्यंत एकूण पंधरा थर पुरें होऊन गीतामंदिराच्या गाभाऱ्याच्या भिंती डेऱ्यापर्यंत येऊन ठेपल्या ३९. त्या वरती सोळावा अध्याय हा गळमण्यावरील डेऱ्याचा आकार होय, आणि जो सतरावा अध्याय आहे तोच पडघाणी [ कळसाच्या बैठकीचा ओटा ] होय ४०. त्या पडघाणीवरहि अठरावा अध्याय हाच कोणी एक सहजच उत्तमरीतीनें उभारलेला कळस होय. त्यावर 'व्यासकृत गीता' [ कीर्तिरूप ] ध्वज उभारला आहे ४१. म्हणून [ पहिल्या अध्यायापासून सतराव्या अध्यायापर्यंत ] मागचे जे अध्याय आहेत ते एकावर एक चढत्या चढत्या भूमिकेचे आकार, थर असून त्यांची या अध्यायानें परिपूर्णता झाली, हें हा अठरावा अध्याय आपल्या ठिकाणीं दाखवित आहे ४२. कोणतेंहि पुरें झालेलें काम कळसाच्या योगानें चोरी [ चुकी उणीव, अपुरे ] राहिले नसून पूर्ण झालें, हें स्पष्ट दृष्टीस, पडतें, तसें अठरावा अध्याय 'साद्यंत गीतेचे वर्णन झाले' हे स्पष्ट सागत आहे ४३. याप्रमाणें कारागीर श्रीव्यासांनीं कुशलतेनें गीतारूपी देवालय 'मोक्षासाठीं' तयार करून प्राणिमात्रांचे नानाप्रकारेंकरून रक्षण केले ४४. या गीता मंदीरास कोणी गीतार्थ न समजतां बाहेरूनच नुसत्या आवर्तनरूपी प्रदक्षिणा करितात, [ गीतेचा पाठ करितात ] व कोणी श्रवणाच्या निमित्तानें या देवालयाचे भिंतीस टेकून बसून सावलीचा उपभोग घेतात ४५. कोणी पुरते अवधानरूपी विडा-पैसा घेऊन गीतारूपी देवळाच्या अर्थज्ञानरूपी गाभाऱ्यांत प्रवेश करितात ४६. ते आत्मबोधाच्या योगानें आत्म-रूप श्रीहरीची सत्वर, प्रत्यक्ष, भेट घेतात; परंतु या गीता मंदीरांत मोक्षरूपी प्रसाद लाभांत [ फलप्राप्तीच्या दृष्टीनें ] सर्वांची योग्यता सारखीच आहे ४७. जशी समर्थाचे पंक्तींत वरच्या खालच्या पानावर ज्याप्रमाणें एकसारखींच पक्वानें वाढलेली असतात [ पंक्तीभेद नसतो ] त्याप्रमाणें गीतेच्या श्रवणानें, अर्थ ज्ञानानें, पठणानें व आवर्तनानें एक मोक्षच प्राप्त होतो ४८. असा हा गीताग्रंथ विष्णूचें देवालय आहे व अठरावा अध्याय हा त्यावरील उघड कळस आहे, असा भेद मी उपरिनिर्दिष्ट वर्म जाणूनच स्पष्ट सांगितला ४९. आतां सतराव्या अध्यायानंतर या अठराव्या अध्यायाची उभारणी कशी झाली आहे अर्थात् ती अध्याय संगति वा तो संबंध दृष्टीस दिसेल तसा समजून सांगतों ५०. अथवा प्रयागास गंगा व यमुना यांचें संगमाचे ठिकाणीं पाणी जरी ओघाच्या संबंधानें दृष्टीस निरनिराळे दिसलें, तरीपण, पाणीपण, उदकत्व या भावनेनें पाहिल्यास त्या दोन्ही नद्यांचे पाणी एकच आहे, असे दिसते ५१. अर्धनारी नटेश्वराचे रूपांत शरीराचे एकत्व न बिघडतां जसें स्त्री व पुरुष असें सोंगाचें दोन आकार दिसतात त्याचे अधिष्ठान शरीर एकच एक असते ५२. किंवा शुद्ध-पक्षांत चंद्राची कला हरएक दिवसागणिक अधिकाधिक वाढलेली दिसते, परंतु चंद्राचे दृष्टीनें पाहूं गेलें असतां तो नित्य पूर्णच आहे. त्याच्यावर तितक्या निरनिराळ्या कलांचे थर दिसत नाहींत ५३. तसें या गीतेचें प्रत्येक श्लोक चार चरणांमुळें पृथक् केले तर ते परस्परांहून वेगळे वेगळें दिसतात तसेंच एक अध्याय संपून दुसरा अध्याय आरंभ केल्यामुळें तेहि वेगळे वेगळे भासतात हे खरें ५४. परंतु ग्रंथांतील प्रतिपाद्य सिद्धांताच्या वा अर्थाच्या दृष्टीनें त्यांत मुळींच भेद, अनेकत्व येत नाहीं. जशीं रत्नहारांत पुष्कळ रत्नें असलीं, तरी त्यांस धारण करणारी दोरी एकच असते ५५. पुष्कळ मोतीं मिळून एकासराची 'एकावळी' माळ तयार होते, परंतु सर्वांची कांति शोभा एकच असते ५६. माळेंतील फुलें व फुलांच्या हारांचे पदरहि मोजतां येतील, परंतु त्यांच्यांतील सुगंध मोजूं गेलें असतां संख्येकरितां एक, दोन, अशी बोटें घालतां येणार नाहींत म्हणजे एक सारखाच सुगंध असतो, त्याचप्रमाणें गीतेंतील पदें, श्लोक व अध्याय हे जरी पुष्कळ असले, तरी त्यांतील प्रतिपाद्य अर्थ एकच आहे, असेच समजावें ५७. गीतेचे श्लोक सातशे आहेत व अध्याय संख्या अठरा आहे; परंतु देवांनी संपूर्ण गीतेंत जें सांगितलें आहे तें एकच तत्त्व सांगितलें आहे, अद्वितीय ब्रह्मतत्त्वा-वांचून दुसरें कांहीं वर्णन केले नाहीं [ प्रसंगोपात्त जगदुत्पत्ति, कर्म, उपासना, ज्ञानादि साधनें इत्यादि-कांचे वर्णन केलें असलें तरी 'अद्वितीय, अखंडैकरस ब्रह्मतत्त्वाच्या प्राप्तीचें तें एक अंग म्हणून केले आहे. त्यास स्वतःस स्वतंत्र असें कांहीं एक फल नसल्यामुळें ते तात्पर्याचें विषय नाहींत. ] ५८. आणि मीहि देवांचा मार्ग व तात्पर्य संगति न सोडतां ग्रंथाचें अगदीं तसेंच स्पष्टीकरण केले आहे. आतां प्रस्तुत त्याच रीतीनें मी अठराव्या अध्यायाचें वर्णन सांगतों, ते तुम्हीहि त्याच धोरणानें ऐका ५९. [ अध्याय संगति ] तर सतरावा अध्याय संपतेवेळीं शेवटच्या श्लोकांत देव असें म्हणाले कीं, ६०. " अर्जुना !

अर्जुना ब्रह्मनामाच्याविखीं। बुद्धि सांडूनि ओंस्तिकीं। कर्में कीजती तितुकीं। अेसंतें होतीं ॥ ६१ ॥ हा ऐकोनि देवाचा बोलु। अर्जुना आला डोलु। म्हणे कर्मनिष्ठां मेळु। ठेविला देखों ॥ ६२ ॥ तो अज्ञानांधु तंव बापुडा। ईश्वररुचि न देखे एवढा। तेथ नामाचि एक पुढां। कां सुझे तया ॥ ६३ ॥ आणि रजतमें दोन्हीं। गेलियावीण श्रद्धा सांनी। ते कां लागे अभिंधानीं। ब्रह्माचिये ? ॥ ६४ ॥ मग कोतां खेंवं देणें। वार्तेवरीलें धांवणें। सांडी पडे खेळणें। नागिणीचें तें ॥ ६५ ॥ तैसीं कर्में दुंवाडें। तयां जन्मांतराची कडे। दुर्मेळांवे येवढे। कर्मामाजीं ॥ ६६ ॥ ना विपर्येयें हें उजूं होये। तरी ज्ञानाची योग्यता लाहे। एऱ्हवीं येणेंचि जाये। निरयालया ॥ ६७ ॥ कर्मीं हा ठांयवरी। आहाती बहुवा अंवसरी। आतां कर्मठां कैं वैरी। मोक्षाची हे ॥ ६८ ॥ तरी फिटो कर्माचा पांगु। कीजो अवघाचि त्यागु। आदरिजो अव्यंगु। संन्यासु हा ॥ ६९ ॥ कर्मबाधेची कहीं। जेथ भयाची गोंठी नाहीं। तें आत्मज्ञान जिहीं। स्वाधीन होय ॥ ७० ॥ ज्ञानाचें आवाहनेंमंत्र। जें ज्ञान पिकतें सुक्षेत्र। ज्ञान आकर्षितें सूत्र-। तंतु जे का ॥ ७१ ॥ ते दोनी संन्यास त्याग। अनुष्ठूनि सुटे जग। तरी हेंचि आतां चांग। व्यक्त पुसों ॥ ७२ ॥ ऐसें म्हणौनि पार्थें। त्यागसंन्यासव्यवस्थे। रूप होआवया जेथें। प्रश्नु केला ॥७३॥ तेथ प्रत्युत्तरें बोली। श्रीकृष्णें जे चांवाळिली। तया व्यक्ती जाली। अष्टादशा ॥७४॥ एवं जन्यजनकभावें। अध्यावो अध्यायातें प्रसवे। आतां ऐका बरवें। पुसिलें जें ॥ ७५ ॥ तरी पंडुकुमरें तेणें। देवाचें सरतें बोलणें। जाणोनि अंतःकरणें। कोणी घेतली ॥ ७६ ॥ एऱ्हवीं तत्त्वविषयीं भला। तो निश्चितु असे कीर जाहला। परी देवो राहे उगला। तें साहावेना ॥ ७७ ॥ वत्स धालयाही वरी। धेनू नें वचावी दुरी। अनन्य प्रीतीची परी। ऐसी आहे ॥ ७८ ॥ तेणें काजेवीणही बोलावें। तें देखिलें तरी पाहावें। भोगितां चाड दुणावे। पढियंतयांठायीं ॥ ७९ ॥ ऐसी प्रेमाची हे जाती। आणि पार्थ तंव तेचि मूर्ती। म्हणौनि करूं लाहे खंती। उगेपणाची ॥ ८० ॥ आणि संवादाचेनि मिषें। जे अव्यवहारी वस्तु असे। तेचि भोगिजे कीं जैसें। आरिसां रूप ॥ ८१ ॥ मग संवादु तोही पारुखे। तरी भोगितां भोगणें थोके। हें कां

ब्रह्मनामाविषयीं श्रद्धा सोडून देऊन जितकीं कर्में करावीत तितकीं सर्व व्यर्थ होतात" ६१. असें देवांचें बोलणें ऐकून अर्जुन मोठ्या आनंदानें डोलूं लागला आणि मनांत म्हणतो कीं, देवांनीं कर्मांवर श्रद्धापूर्वक भर ठेवणारास दोष ठेविला आहे, असें मला वाटतें ६२. पण तो कर्मठ दीन बिचारा! अज्ञानामुळें अंध झालेला असल्यामुळें सर्व जगतांत ओतप्रोत भरलेल्या एवढ्या व्यापक ईश्वरासच जाणत नाहीं; असा ईश्वर प्रत्यक्ष त्याच्यापुढें असूनहि जर त्यास दिसत नाहीं, तर मग त्यांस ब्रह्मनाम व त्या ब्रह्मनामावरील श्रद्धेचें वर्म इत्यादि गोष्टी तरी कशा कळणार! ६३. रज व तम या दोन्ही गुणांचा नाश झाल्याशिवाय जी श्रद्धा असते, ती अगदींच कमी प्रतीची, अत्यल्प असते, ती ब्रह्मनामाचें ठिकाणीं लागणाऱ्या श्रद्धेस तरी कशी बरें पात्र होईल? ६४. मग, शस्त्राला आलिंगन देणें अथवा डोंबाऱ्याच्या खेळांतील दोरीवर धांवत सुटणें किंवा नागिणीबरोबर तिला हातांत धरून खेळणें, [ या गोष्टी जशा घातक, मरणास कारण होतात ] ६५. तशी [ब्रह्मनामावरील] श्रद्धाविरहित कर्में कठीण वा घातक आहेत त्या कर्मांची प्रवृत्ति दुसरें जन्म देण्यास कारणीभूत होणारी असते, असें एवढे सर्व कुयोग, दुष्टधर्म कर्मांत असतात ६६. कदाचित् कर्में यथासांग झालीं तर तीं कर्मकर्त्यास ज्ञानप्राप्तीची योग्यता देतात व तींच कर्में यथासांग न झाली तर कर्मकर्ता नरकप्राप्तीच्या घराला जातो ६७. या इतक्या किंवा अशा पुष्कळ अडचणी कर्म करणाऱ्याला त्या कर्मांत येतात; असें जर आहे, तर मग त्या कर्मठांना मोक्षप्राप्तीची पाळी केव्हां व कशी येणार! ६८. तर कर्मांचे हे दैन्य, दारिद्र्य नाहींसे होवो व त्या सर्व कर्मांचा सर्वथैव त्याग केला जावो. अव्यंग, निर्दुष्ट असा जो कर्मसंन्यास त्याचा आदर–स्वीकार केला जावो ६९. ज्याच्या योगानें कर्मांच्या बाधेपासून होणाऱ्या भयाचे मुळीं नांवसुद्धां नसते व ज्यामुळें आत्मज्ञानहि आपल्या स्वाधीन होतें ७०. [ असें जें कर्मसंन्यास आणि कर्मत्याग हे आहेत कीं ] जें ज्ञानाला आमंत्रण करणारे मंत्र आहेत अथवा ज्ञान पिकण्याचें क्षेत्र–शेत आहेत अथवा जे ज्ञानाला आकर्षण करणाऱ्या सूत्रांचे तंतुच आहेत ७१. असें जे दोन्ही संन्यास व त्याग या दोवांचे अनुष्ठान करून जग कर्मबंधनांतून मुक्त होवो, म्हणून हेंच आतां उघड रीतीनें सांगावें, असें देवास पुसावें ७२. असें पार्थानें मनांत आणून, त्याग व संन्यास यांचें यथायोग्य, पृथक्त्वानें स्पष्टीकरण व्हावें, म्हणून जेव्हां त्यानें प्रश्न केला ७३. तेव्हां श्रीकृष्णांनीं अर्जुनास प्रत्युत्तर देण्यासाठीं म्हणून जें भाषण केलें त्यांतच हा अठरावा अध्याय व्यक्त झाला ७४. याप्रमाणें जन्यजनकभावानें एक अध्याय दुसरें अध्यायास प्रसवतो म्ह. कारणीभूत होतो. आतां अर्जुनानें जें कांहीं विचारलें तें चांगलें ऐका ७५. सतराव्या अध्यायांतील सरतेशेवटीं देवांचें जें [शेवटच्या श्लोकांतील] बोलणें ऐकले व त्याचें अंत:करणांत मनन करून अर्जुनानें अशी शंका घेतली ७६. वास्तविक पाहतां देवांनीं सांगितलेल्या सिद्धांत–तत्त्वाविषयीं खरोखर पूर्णपणें निश्चय झालेला होता; परंतु देव आतां कांहीं एक न बोलतां स्वस्थ बसले, तें त्याला सहन होईना ७७. वासराचे पोट भरून तृप्त झाल्यावरहि गाईनें आपल्यापासून दूर जावूं नये [ असें त्या वासरास वाटते ] एकनिष्ठ प्रेमाचाहि असाच लक्षण–प्रकार आहे ७८. आपल्यास जो विषय परम प्रिय असतो त्याचा वारंवार उपभोग घेण्यांत इच्छा दुप्पट बळावते. म्हणूनच आवडीमुळें प्रेमळानें कांहीं कारण नसतांनाहि आपल्याशीं बोलावेंसे वाटते व ते एकदां पाहिल्यावरहि पुनः पुनः डोळे भरून पहातच असावें वाटते, असें हे प्रीतीचें लक्षणच आहे ७९. अशी ही प्रेमाची जाति-स्वरूप आहे आणि अर्जुन तर श्रीकृष्णाच्या प्रेमाची मूर्तिच आहे. म्हणून भगवंताचें स्वस्थ बसणें अर्जुनास आवडेनासे, बरे वाटेनासे झाले ८०. आरशांत पाहिल्यावर जसें आपलें सहजीं न दिसणारें रूप स्पष्ट पाहतां येते त्याप्रमाणें अव्यवहार्य, शब्दासहि अविषय असणारी जी [ दृङ्मात्र, परब्रह्म ] वस्तु आहे, ती प्रश्न प्रतिवचनात्मक संवादाच्या निमित्तानें अनुभविता येते ८१. मग तो

१. श्रद्धाळू, भाविक. २ उपाधिवंत, नाशिवंत. ३ प्रेमा. ४ कर्मठाला. ५ दोष. ६ समजे. ७ अल्प. ८ कशी पात्र होईल. ९ नामाकडे. १० भाल्याला, शस्त्राला. ११ आलिंगन. १२ दोरीवरील. १३ मरणास कारण होतो. १४ दुर्घट, कठीण. १५ दुष्ट धर्म. १६ कदाचित्. १७ यथासांग. १८ नरकस्थानास. १९ येथपर्यंत. २० अडचणी. २१ कर्म करणाराला. २२ पाळी, वेळ. २३ दैन्य. २४ सांगोपांग, संपूर्ण. २५ गोष्ट. २६ आमंत्रण करण्याचें मंत्र. २७ उत्तम भूमि. २८ ओढणारे कळदोरे. २९ स्पष्ट. ३० स्पष्टीकरण. ३१ बोलिली, सांगितली. ३२ कार्यकारणभावानें. ३३ शेवटचें. ३४ शंका. ३५ उगा. ३६ तुष्ट झाल्यावर. ३७ न सोडावी. ३८ इच्छा. ३९ आवडत्याच्या ठायीं. ४० निमित्तानें. ४१ निष्कर्म, पारमार्थिक. ४२ राहे. ४३ थांबे.

साहोंवेल सुखें । लांचौवलेया ? ॥ ८२ ॥ यालागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेऊनि मिस । मग उंपलविलें दुसें । गीतेचें तें ॥ ८३ ॥ अठरावा अध्यावो नोहे । हे एकाध्यायी गीताचि आहे । जैं वांसरुचि गाय दुंहे । तैं वेळु कायसा ? ॥ ८४ ॥ तैसी संपतां अवसरीं । गीता आदरविली माघारीं । स्वामी भृत्याचा न करी । संवादु काइ ? ॥ ८५ ॥ परी हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे । म्हणे विनंती विश्वेशें । अवधारिजो ॥ ८६ ॥

अर्जुन उवाच :—

संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् । त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

हां जी संन्यासु आणि त्यागु । इयां दोहीं एक अर्थीं लागु । जैसा सांघातु आणि संघु । संघातेंचि बोलिजे ॥ ८७ ॥ तैसेंचि त्यागें आणि संन्यासें । त्यागुचि बोलिजतु असे । आमचेनि तंव मानसें । जाणिजे हेंचि ॥ ८८ ॥ ना कांहीं आंथी अर्थभेदु । तो देवो करोतु विशदु । तेथ म्हणती श्रीमुकुंदु । भिन्नचि पैं ॥ ८९ ॥ तरी अर्जुना तुझ्या मनीं । त्याग संन्यास दोनी । एकार्थ गमलें हें मानीं । मीही साच ॥ ९० ॥ इहीं दोहीं कीर शब्दीं । त्यागुचि बोलिजे त्रिशुद्धी । परी कारण एथ भेदीं । येतुलेंचि ॥ ९१ ॥ जें निपटूनि कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यासु म्हणिजे । आणि फलमात्र का त्यजिजे । तो त्यागु गा ॥ ९२ ॥ तरी कोणा कर्माचें फळ । सांडिजे कोण कर्म केवळ । हेंही सांगों विवळें । चित्त दे पां ॥ ९३ ॥ तरी आपैसीं दांगें डोंगर । झाडें डाळती अपार । तैसें लांबे राजागर । नुठिती ते ॥ ९४ ॥ न पेरितां सैंघ तृणें । उठती तैसें साळीचें होणें । नाहीं गा रांबाउणें । जियापरी ॥ ९५ ॥ का अंग जाहलें सहजें । परी लेणें उद्यमें कीजे । नदी आपैसी आपादिजे । विहिरी जेवीं ॥ ९६ ॥ तैसें नित्य नैमित्तिक । कर्म होय स्वाभाविक । परी नैं कामितां कामिक । न निफजे जें ॥ ९७ ॥

श्रीभगवानुवाच :—

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः । सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

का कामनेचेनि दैळवाडें । जें उभारावया घडे । अश्वमेधादिक फुडे । याग जेथ ॥ ९८ ॥ वापी कूप आराम । अग्रहारें हन महाग्राम । आणीकही नाना-संभ्रम । व्रतांचे ते ॥ ९९ ॥ ऐसें इष्टापूर्त सकळ । जया कामना एक मूळ । जें केलें

संवादच जर बंद पडला तर ब्रह्मानंदाचा अनुभव घेत असतां मध्येंच तें अनुभव घेणेंहि बंद पडेल ही गोष्ट त्या आत्मसुखानुभवास सवकलेल्या अर्जुनाला कशी बरें सहन होईल ? ८२. म्हणून त्याग व संन्यास म्हणजे काय हें पुसण्याचें निमित्त घेऊन जणुं काय तें गीतारूपी घडी केलेलें वस्त्रच अर्जुनानें पुनः उकलविले ८३. म्हणून हा अठरावा अध्याय नाहीं, तर ही एकाध्यायी गीताच आहे. पहा कीं, जेव्हां वासरूच गाईस पान्हा आणते तेव्हां गाईस पान्हा सोडण्यास कितीसा वेळ लागणार ? ८४. त्याप्रमाणें गीता संपण्याचें वेळींहि पुनः गीता व्याख्यानाच्या पूर्वपदावर परत यावयास भाग पाडलें. [ यांत आश्चर्य ते काय ? मुळींच नाहीं, कारण ] श्रीगुरु-शिष्याचा संवाद काय एक करणार नाहीं ! ८५ परंतु ही गोष्ट तूर्तास राहूं द्या; याप्रमाणें अर्जुन श्रीकृष्णाची विनंती करून विचारावयास लागला कीं, हे देवा ! विश्वेशांनी आतां माझी विनंति ऐकावी ८६.

**अन्वयार्थ**–**हे महाबाहो**–**हे** महापराक्रमी कृष्णा !–**संन्यासस्य**–संन्यास या शब्दाच्या अर्थाचें–**तत्त्वं**–तत्व–**वेदितुं**–जाणण्यास–**इच्छामि**–मी इच्छितों–**च**–आणि–**हे हृषीकेश केशिनिषूदन**–**हे** इंद्रियांच्या ईशा, **हे** केशिदैत्याला मारणाऱ्या कृष्णा !–**त्यागस्य**–[ **तत्त्वं** ] त्याग या शब्दाच्या अर्थाचें तत्त्व–**पृथक्**–अगदीं निराळें–**वेदितुं इच्छामि**–मी जाणण्यास इच्छितों १.

"अहो महाराज ! संन्यास आणि त्याग या दोन शब्दांचा एकाच अर्थाशीं संबंध आहे असे दिसते जसा 'संघात' आणि 'संघ' या दोन्ही शब्दांनीं समुदायाचाच निर्देश व तसा बोध होतो ८७. तसाच त्याग आणि संन्यास या दोन्ही शब्दांनीं त्यागाचाच बोधहि होतो, म्हणून एक त्यागच सांगितला जातो. आमच्या मनाला तर हें असेंच वाटतें ८८. अथवा जर त्या दोन शब्दांच्या या अर्थांत कांहीं भेद असेल, तर तो देवांनी स्पष्ट करून सांगावा." तेव्हां श्रीमुकुंद म्हणाले:–अरे! हे दोन्ही शब्दांचे भिन्न भिन्नच अर्थ आहेत ८९. तथापि अर्जुना ! त्याग व संन्यास हे दोन्ही शब्द एकार्थ–वाचकच आहेत, असें जें तुझ्या मनाला वाटलें, तेंहि एका दृष्टीनें बरोबरच आहे, असें मीहि खरें मानतों ९०. खरोखर त्याग व संन्यास या दोन्ही शब्दांनीं एक त्यागाचाच निर्देश होतो, हे निश्चित खरें आहे; तरीपण प्रस्तुत त्यांच्या अर्थामध्यें भेद होण्याचें कारण एवढेच आहे कीं ९१. अर्जुना ! जें मुळीं सर्वथैव कर्मच करावयाचे सोडणें, त्या कर्माच्या सोडण्याला 'संन्यास' असें म्हणावे आणि कर्में करून फक्त त्या कर्मकर्तृत्वाचा अभिमान व फल ह्यास टाकणें त्याला 'त्याग' असें म्हणावे ९२. आतां कोणत्या कर्मांचें फल मात्र टाकावे याचे व कोणते सर्वथैव कर्मच मुळीं टाकावयाचे हेंहि तुला स्पष्ट करून सांगतों, तें तूं चित्त देऊन ऐक ९३. तरी ज्याप्रमाणें अरण्यांत व डोंगरावर निरुपयोगी अशी पुष्कळ झाडें आपोआप उगवतात, त्याप्रमाणें लावीचे भात व बागेंतील चांगली झाडें आपोआप सहजीं उगवत नाहींत; ९४. जसे न पेरता गवत इतें तेवढे जिकडे तिकडे उगवते, तसेंच शेतांत राब घातल्याशिवाय, पेरल्याविना साळीचें पीक आपोआप सहजीं उगवत नाहीं ९५. अथवा शरीर, अवयव जरी सहज प्राप्त झालेलें आहेत, तरीपण दागिनें मात्र मुद्दाम प्रयत्नानें घडवून तयार करावे लागतात; किंवा नदीचें जलौघ सहजपणें प्राप्त झालेलें असतात; पण विहीर मात्र मुद्दाम खणून तयार करावी लागते ९६. त्याप्रमाणें नित्य [संध्या वंदनादि], नैमित्तिक [ श्राद्धादिक ] कर्म हें [ वेदाज्ञेनुसार ] स्वाभाविक अवश्य करणीय आहे; परंतु काम्य कर्म असते तें मात्र फलाची इच्छा न करतां उत्पन्न होत नाहीं ! ९७.

**अन्वयार्थ**–**कवयः**–**कांहीं** विद्वान्–**काम्यानां कर्मणां**–काम्य कर्मांच्या–**न्यासं**–त्यागाला–**संन्यासं**–संन्यास–**विदुः**—समजतात–**विचक्षणाः**–**कांहीं** पंडित–**सर्वकर्मफलत्यागं**–नित्य–नैमित्तिक सर्व कर्मांच्या फलाच्या त्यागाला–**त्यागं**–त्याग–**प्राहुः**–म्हणतात २.

म्हणजे जें काम्यकर्म उत्पन्न होण्याकरितां फलाच्या इच्छेच्या समुदायाचा आधार असावा लागतो व ज्या कर्मांत अश्वमेधादिक याग हे प्रसिद्ध आहेतच ९८. पुष्करिणी, बारव, विहिरी इत्यादि परोपकारार्थ बांधणें, बागा लावणें, जमिनी इनाम देणें व एखादे ठिकाणीं मोठे शहर वसविणें व याशिवाय आणखीहि पुष्कळ प्रकारच्या व्रतांचे समुदाय ९९. अशी

१ सहन करवेल. २ संवकलेल्या. ३ उघडें केलें. ४ वस्त्रांची घडी. ५ पान्हा आणिते. ६ सेवकाचा. ७ ऐकावी. ८ संबंध. ९ समुदाय. १० आहे. ११ स्पष्ट. १२ निश्चयानें. १३ सर्वथैव. १४ कर्मकर्तृत्वाचा अभिमान व फळ. १५ स्पष्ट. १६ अरण्यें. १७ पाणी घातलेलें लावीचें भात. १८ बागें-तील झाड. १९ बहुत. २० शेतांत राब घालतात त्यावांचून. २१ उद्योगानें. २२ संपादावी. २३ इच्छिता. २४ काम्य कर्म उत्पन्न होत नाहीं. २५ विस्तारानें. २६ स्पष्ट. २७ पुष्करिणी. २८ बाग. २९ इनामे, देवाला किंवा ब्राह्मणाला दिलेला गांव. ३० शहर वसविणें.

भोगवी फळ । बांधोनियां ॥ १०० ॥ देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळिया । ना म्हणों नये धनंजया । जियापरी ॥ १ ॥ का ललाटींचें लिहिलें । न मोडे गा कांहीं केलें । काळेगोरेपण धुतलें । फिटों[२] नेणें[२] ॥ २ ॥ केलें काम्य कर्म तैसें । फळ भोगावया धरणें बैसे । न फेडितां ऋण जैसें । वोसंडीना[३] ॥ ३ ॥ का कामनाही न करितां । अवसांत घडे पंडुसुता । तरी वायकांडें न झुंझतां । लागे जैसें ॥ ४ ॥ गूळ नेणतां तोंडीं । घातला देचि गोडी । आगी मानूनि राखोंडी । चेपिला पोळी[६] ॥५॥ काम्यकर्मी हें एक । सामर्थ्य आंथी स्वाभाविक । म्हणौनि नको कौतुक । मुमुक्षु एथ ॥ ६ ॥ किंबहुना पार्था ऐसें । जें काम्य कर्म गा असे । तें त्यजिजे विष जैसें । वोकूनियां ॥ ७ ॥ मग तया त्यागातें जगीं । संन्यासु ऐसया भंगीं । बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टा ॥ ८ ॥ हें काम्यकर्म सांडणें । तें कामनेतेंचि उपडणें । द्रव्यत्यागें दवंडणें । भय जैसें ॥ ९ ॥ आणि सोम-सूर्यग्रहणें । येऊनि करविती पांर्वणें । का मातापितरमरणें । अंकित जे दिवस ॥ ११० ॥ अथवा अतिथी हन पावे । हें ऐसैसें पडे जें करावें । तें तें कर्म जाणावें । नैमित्तिक गा ॥ ११ ॥ वार्षियां क्षोभे गगन । वसंतें दुणांवे वन । देहा शृंगारी यौवन- । दशा जैसी ॥ १२ ॥ का सोमंकांतु सोमें पंघळे । सूर्यें फांकती कमळें । एथ असे तेंचि पाल्हाळे । आन नये ॥१३॥ तैसें नित्य जें का कर्म । तेंचि निमित्ताचे लाहे नियम । एथ उंचावे तेणें नाम । नैमित्तिक होय ॥ १४ ॥ आणि सायंप्रातर्मध्यान्हीं । जें कां करणीय प्रतिदिनीं । परी दृष्टि जैसी लोचनीं । अधिक नोहे ॥ १५ ॥ कां नापादितां गती । चरणीं जैसी आथी । नातरी ते दीप्ती । दीपबिंबीं ॥ १६ ॥ वांसु नेदितां जैसे । चंदनीं सौरंभ्य असे । अधिकाराचे तैसें । रूपचि जें ॥ १७ ॥ नित्य कर्म ऐसें जनीं । पार्था बोलिजे तें मानीं । एवं नित्य नैमित्तिक दोन्हीं । दाविलीं तुज ॥ १८ ॥ हेंचि नित्यनैमित्तिक । अनुष्ठेय आवश्यक । म्हणौनि म्हणों पाहती एक । वांझें यातें ॥ १९ ॥ परी भोजनीं जैसें होये । तृप्ति लाहे भूक जाये । तैसे नित्य-नैमित्तिकीं आहे । सर्वांगीं फळ ॥ १२० ॥ कीड[२५] आगिठां पडे । तरी मळु तुटे वानी चढे । यया कर्मा तया सांगडें । फळ जाणावें ॥ २१ ॥ जे प्रत्यवाय तंव गळे ।

ही सर्व इष्ट व पूर्त कर्में होत ज्याला एक कामनाच मूळ कारण असतें आणि ज्या कर्माचें आचरण केलें असतां ते कर्म करणारास बद्ध करून बळेंच आपलें फल भोगावयास लावते १००. अर्जुना! जसें देहरूपी गांवास आल्यावर जन्ममृत्यूच्या सोहळ्यांना भोगण्यास 'नाहीं' म्हणतां येत नाहीं १. किंवा–भाळी–नशिबांत लिहिलेलें कांहीं केल्या केव्हांहि पुसले जात [ टळत ] नाहीं, अथवा काळेपण व गोरेपण कितीहि धुतलें तरी ते नाहींसें होत नाहीं २. किंवा ऋण फेडले नाहीं तर ज्याप्रमाणें त्यापासून सुटका होत नाहीं, त्याप्रमाणें काम्य कर्म केलें असतां तें, फळ भोगविण्याकरितां दारांत धरणें घेऊन बसतें! ३. अथवा अर्जुना! इच्छा न करितां जरी सहजच–अकस्मात् काम्यकर्म घडलें, तरी जसा केवळ करमणुकीकरितां वायबाणांनीं युद्ध करीत असतां तो बाण मर्मस्थलीं लागला तर जीव घेण्यास कमी करीत नाहीं ४. 'हा गूळ आहे' असें न समजून तो तोंडांत घातला असतां तो जसा आपल्या गोडीचीच जाणीव करून देतो किंवा अग्नीस 'ही राखोंडी आहे' असें समजून जरी त्या अग्नीवर पाय दिला तरी तो पोळतोच ५. त्याप्रमाणें, जाणून वा न जाणून केलेल्या काम्यकर्मांचे ठिकाणीं कर्म कर्त्यास फल भोगविण्याचें एक अंगभूत, स्वाभाविक सामर्थ्य आहे म्हणून मुमुक्षूनें कौतुकानेंहि त्या काम्य कर्माचें आचरण करूं नये ६. फार काय सांगावें! बा! पार्था!! जसें विष पोटांत गेलें म्हणजे ते ओकून टाकावें तसें जें काम्यकर्म आहे तें, टाकून द्यावे ७. मग त्याच त्यागाला या जगांत संन्यास असें अंतरंगी सर्व द्रष्टे लोक म्हणतात, [ असे भगवान् श्रीकृष्ण बोलले ] ८. मग म्हणतात:–ज्याप्रमाणें भयाचें मूळ कारण, अशा आपल्या जवळील द्रव्याचा त्याग करणें म्हणजे त्यापासून उत्पन्न होणाऱ्या भयास परिपूर्णतया नाहींसें करणें होय. त्याप्रमाणें ह्या काम्यकर्मांचा त्याग करणें म्हणजे प्रथम मनांतील फलविषयक वासना समूळ उपटून नाहींतशा करणें होय ९. चंद्र व सूर्य यांचीं ग्रहणें येऊन [ पर्वकाल आणून त्या पर्वणीचें दिवशीं ] तीं 'पार्वणें'–पर्वकालींची पितृ श्राद्धें करवितात किंवा माता–पितरांच्या मरणानें ठरलेलें [ श्राद्ध तिथीचे ] जे दिवस ११०. अथवा काकबलि टाकण्याचे समयास अतिथी प्राप्त झाला असतां, आदरातिथ्यासाठीं अशा वेळीं जीं जीं कर्में करावीं लागतात तीं तीं सर्व नैमित्तिक कर्में होत, असें समजावें ११. वर्षाऋतु आला असतां जसें आकाशच भरून येऊन मेघाच्या रूपानें क्षुब्ध होते, वसंत ऋतु आला म्हणजे त्या योगानें वृक्षादिकांस पालवी फुटून वनाची दुप्पट शोभा वाढते, अथवा शरीराला तारुण्यदशा जशीं सुशोभित करीत असते १२. किंवा सोमकांतमणि चंद्राच्या किरणांनीं पाझरतो व सूर्याचें किरणांनीं सूर्यविकासिनी कमलें प्रफुल्लित–विकसित होतात; या वरील सर्व दृष्टांतांत जें मूळचें असतें तेंच वाढतें, विकास पावतें निराळें कांहीं [ उत्पन्न होत किंवा बाहेरून कोठून ] येत नाहीं १३. त्याप्रमाणें जें नित्यकर्म असतें त्यालाच निमित्ताचे कांहीं नियम प्राप्त झालें कीं, तें वाढते त्यामुळें कर्मास "नैमित्तिक कर्म" असें नांव प्राप्त होते १४. आणि जें कर्म सकाळीं, दुपारीं व सायंकाळीं तेंहि दररोज करावें लागतें; परंतु ज्याप्रमाणें डोळ्यांतील दृष्टि डोळ्याला कधींहि अधिक होत नाहीं १५. अथवा गति अन्यत्र कोठून संपादन–स्वीकार न करितां ती जशी पायांत आपोआपच स्वाभाविक आहे; किंवा दिव्याच्या ज्योतीचे ठिकाणींच जसा तिचा प्रकाश सहज स्वाभाविक आहे १६. चंदनास वरून सुगंधाची पुटें न देतांच जसा अंगाचा सुगंध स्वाभाविक असतो, तसें कर्माच्या अधिकाराचें लक्षण–स्वरूप होय १७. पार्था! जगांत 'नित्यकर्म' असें जे म्हणतात ते हेंच कर्म होय, असें समज. याप्रमाणें तुला नित्य व नैमित्तिक अशी हीं दोन्ही कर्मांचीं स्वरूपें दाखविलीं १८. हेंच नित्यनैमित्तिक कर्म [ वर्णाश्रमधर्मानुसार ] अवश्य केलेंच पाहिजे, म्हणून कांहीं लोक या कर्मास हे कर्म निष्फल आहे असें म्हणूं पहातात १९. परंतु भोजनापासून जशी तृप्ति प्राप्त होऊन क्षुधा नष्ट होते, तशी हीं नित्यनैमित्तिक कर्मेंहि सर्वांगानीं फलद्रूप आहेत. [ त्यापासून सर्व प्रकारें फलप्राप्ति होते ] १२०. ज्याप्रमाणें हिणकस सोनें अग्नींत घातलें असतां त्यांतील हिणकसपणा–मळ नाहींसा होतो व कस वाढतो, त्याप्रमाणेंच हीं नित्यनैमित्तिक कर्में–[ चित्तशुद्धि विविदिषाद्वारां फलप्राप्ति ] करून देणारी आहेत, असें समजावें २१. कारण, या

१ नशिबांतील. २ नाहींसें होऊं शकत नाहीं. ३ सोडीत नाहीं. ४ अकस्मात्. ५ वायफळ बाण. ६ पोळतें. ७ आहे. ८ खुणेनें, भेदानें. ९ घालणें. १० पर्वकाळीं श्राद्ध, दान वगैरे क्रिया. ११ पर्जन्यकाळीं. १२ दुप्पट होतें. १३ चंद्रकांतमणी चंद्रकिरणाने द्रवतो. १४ विस्ताराने. १५ दुसरें. १६ सकाळीं दुपारीं व संध्याकाळीं. १७ करावयास योग्य. १८ न संपादिता. १९ आहे. २० सुवास, सुगंध. २१ सौगंध्य. २२ योग्यतेचें, पायरीचें. २३ निर्मळ. २४ हीण.

स्वाधिकार बहुवें उजळे । तेथ हातोफळिया मिळे । सद्गतीसी ॥ २२ ॥ येवढेवरी ढिसाळ । नित्यनैमित्तिकीं आहे फळ । परी तें त्यजिजे मूळ । नक्षत्रीं जैसें ॥ २३ ॥ लता पिके आघवी । तंव च्यूत बांधे पालवीं । मग हात न लावित माधवीं । सोडूनि घाली ॥ २४ ॥ तैसी नोलांडितां कर्मरेखा । चित्त दीजे नित्यनैमित्तिका । पाठीं फळा कीजे अशेखा । वांताचे वानी ॥ २५ ॥ यया कर्म फळत्यागातें । त्यागु म्हणती पैं जाणते । एवं त्याग संन्यास तूतें । परिसविले ॥ २६ ॥ हा संन्यासु जैं संभवे । तैं काम्य बाधूं न पावे । निषिद्ध तंव स्वभावें । निषेधें गेलें ॥ २७ ॥ आणि नित्यादिक जें असे । तें येणें फळत्यागें नासे । शिर लोटलिया जैसें । येर आंग ॥ २८ ॥ मग सस्य फळपाकांत । तैसें निमालिया कर्मजात । आत्मज्ञान गिंवसित । अपैसें ये ॥ २९ ॥ ऐसिया निगुती दोनी । त्याग संन्यास अनुष्ठानीं । पडले गा आत्मज्ञानीं । बांधती पाटु ॥ १३० ॥ नातरी हे निगुती चुके । मग त्यागु कीजे हाततुकें । तैं कांहीं न त्यजे आधिकें । गोंवींचि पडे ॥ ३१ ॥ जें औषध व्याधी अनोळख । तें घेतालिया परतें विख । कां अन्न न मानितां भूक । मारी ना काय ? ॥ ३२ ॥ म्हणौनि त्याज्य जें नोहे । तेथ त्यागातें न सुवावें । त्याज्यालागीं नोहावें । लोभापर ॥ ३३ ॥ चुकलिया त्यागाचें वेझें । केला सर्वत्यागुही होय वोझें । न देखती सर्वत्र दुजें । वीतराग ते ॥ ३४ ॥

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः । यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ २ ॥

एकां फळाभिलाष न ठके । ते कर्मातें म्हणती बंधकें । जैसें आपण नग्न भांडकें । जगातें म्हणे ॥ ३५ ॥ कां जिव्हालंपट रोगिया । अन्नें दूषी धनंजया । आंगा न रुसे कोढिया । मासियां कोपे ॥ ३६ ॥ तैसें फळकाम दुर्बळ । म्हणती कर्मचि किडाळ । मग निर्णयो देती केवळ । त्यजावें ऐसा ॥ ३७ ॥ एक म्हणती यागादिक । करावेंचि आवश्यक । जे यावांचूनि शोधक । आन नसे ॥ ३८ ॥ मनशुद्धीच्या मार्गीं । जैं विजयी व्हावें वेगीं । तैं कर्म सबळालागीं । आळसु न कीजे ॥ ३९ ॥ भांगार आथी शोधावें । तरी आगी जेवी नुबगावें । कां दर्पणालागीं सांचावें । अधिक रज ॥ १४० ॥ नाना वस्त्रें चोख होआवीं । ऐसें आथी जरी जीवीं । तरी संवदणी न मनावी । मलिन जैसी ॥ ४१ ॥ तैसीं

कर्मांच्या आचरणानें असलेलें दोष पार झडून जातात, आपला अधिकार, उजाळा मिळून जास्त वाढतो आणि असें झाल्यामुळें तो हातोंहात सद्गतीस प्राप्त होतो २२. नित्यनैमित्तिक कर्माला जरी एवढे मोठे फल आहे; तरीपण मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलाचा ज्याप्रमाणें त्याग करावा त्याप्रमाणें, त्याच्या फलाचाहि त्याग करावा २३. वसंतऋतूच्या योगानें जरी सर्व वेलीला फळें येतात व आम्रवृक्षास नवीन पालवी फुटते, वा फुलें आली तरीहि जसा तो वसंतऋतु त्यास हात न लावितां ते टाकून जातो २४. तसें नित्यनैमित्तिक कर्मांचें, मर्यादा न सोडतां चित्त देऊन यथाविधि आचरण करावें; पण त्यापासून निष्पन्न होणाऱ्या सर्व फलांस वांतीप्रमाणें मानून त्यांचा त्याग करावा २५. अशा रीतीनें नित्यनैमित्तिक कर्मांचें फलांचा त्याग करणें, यालाच ज्ञाते पुरुष 'त्याग' असें म्हणतात. याप्रमाणें त्याग व संन्यास, त्यांचीं हीं स्वरूपें तुला ऐकविलीं आहेत २६. असा हा संन्यास जेव्हां हातून घडतो, तेव्हां काम्यकर्मापासून बाधा होऊं शकत नाहीं आणि निषिद्ध कर्म तर शास्त्रानें केलेल्या निषेधांच्या योगें स्वभावतःच, सहजच टाकलें गेलें आहे २७. आणि ज्याप्रमाणें शिर–मस्तक तोडले असतां धड आपोआपच निर्जीव होऊन खालीं पडतें, त्याप्रमाणें नित्यनैमित्तिक जें कर्म आहे तें या आतां सांगितल्या रीतीनें कर्मफलत्याग केला असतां, नाहींसें होतें त्यापासून बाधा होत नाहीं. २८. मग धान्य पिकल्यावर जशी पिकाची वाढ खुंटते, व ते वाळून जाते तसा सर्व कर्मांचा क्षय–नाश झाला म्हणजे आत्मज्ञान आपण होऊनच अशा पुरुषास शोधीत येतें २९. अशा युक्तीनें हें दोन्ही नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठान करून त्यांच्या फलांचा त्याग व काम्यकर्मांचा संन्यास जे करतात, ते आत्मज्ञानाचे प्राप्तीला पट्टाभिषिक्त–योग्य अधिकारी होतात १३०. किंवा उपरिनिर्दिष्ट ही युक्ति जर चुकली व मग कोणी अटकळीनें, अनुमान धक्क्यानें त्याग करूं लागतील तर कर्मांचा त्याग तर होत नाहींच; पण उलट ते अधिक घोटाळ्यांत मात्र पडतात ३१. रोगाची चिकित्सा न करितां भलतेच घेतलेलें जे औषध ते [ रोग्यास बरें न करतां ] उलट विषासारखें मारक होते. अथवा भूकेच्यावेळीं अन्न सेवन केलें नाहीं तर भूक त्या मनुष्यास मारणार नाहीं काय? ३२. म्हणून ज्या गोष्टीचा त्याग करूं नये असें सांगितलें आहे, तिचा त्याग करण्यास प्रवृत्त होऊं नये व ज्या त्याज्य गोष्टींचा त्याग करावा असें सांगितलें आहे, तिचें आचरण करण्याचा लोभ धरूं नये ३३. त्याग करण्याचें युक्तिपूर्ण वर्म चुकलें असतां जो कर्मत्याग केला जातो त्या त्यागाचेंहि मनुष्यास ओझें होते, कर्मबंधांत सांपडतो, म्हणून सर्वत्र वैराग्य संपन्न जें आहेत तें केव्हांहि त्याज्य गोष्टींचें [ निषिद्ध कर्मांचें ] आचरण करण्याकडे पाहातहि–वळतहि नाहींत ३४.

**अन्वयार्थ**––**एके मनीषिणः**–कांहीं विद्वान्–**दोषवत् कर्म**–दोषांनीं युक्त असलेलें कर्म–**त्याज्यं**–टाकावें–**इति प्राहुः**–असें म्हणतात–**च अपरे**–आणि–दुसरे कांहीं पंडित–**यज्ञ दान तपः कर्म**–यज्ञ, दान व तप एतद्रूप कर्म–**न त्याज्यं**–त्याज्य नाहीं–**इति**–[ **आहुः** ] असें म्हणतात ३.

कित्येकांस तर फलाभिलाषा सोडवत नाहीं, म्हणून 'कर्म बंधकच आहे.' असें ते लोक म्हणतात. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य आपण स्वतः नग्न असून [ त्यास नग्न म्हटले वा जग हंसले असतां ] तो जगालाच भांडखोर असें म्हणतो ३५. किंवा हें धनंजया! जिव्हेच्या पूर्ण आधीन झालेला रोगी [ पाहिजे तें खातो आणि तें पचलें नाहीं म्हणजे ] अन्नासच दोष देतो, किंवा कुष्टरोगी मुख्य आपल्या शरीरावर न रुसतां त्यावर बसणाऱ्या माशांवरच रागावतो ३६. त्याप्रमाणें जे कर्मफलाची आशा त्यागाविषयीं अशक्त, असमर्थ आहेत ते लोक कर्मच वाईट आहे, असें म्हणतात आणि मग कर्मत्यागच करावा असा सिद्धांत म्हणून निर्णय देतात ३७. कित्येक असें म्हणतात कीं, यज्ञयागादिक कर्में हीं अवश्य केलीच पाहिजेत, कारण, त्यावांचून चित्तशुद्धि करणारा दुसरा उपायच नाहीं ३८. जर चित्तशुद्धीच्या मार्गांत लवकर विजयी व्हावे अशी इच्छा असेल, तर प्रबलचित्तशोधक विहित कर्मांचें आचरण करण्याचे बाबतींत आळस करूं नये ३९. सोनें शुद्ध करावयाचें असेल तर तें अग्नींत घालण्याविषयीं जसा कंटाळा करूं नये, अथवा आरशांत पहावयाचें असल्यास त्यावरील मळ काढून स्वच्छ करण्याकरितां पुष्कळ चुना, धूळ वगैरे न कंटाळता सांठवून ठेवावे लागतात १४०. अथवा जसें वस्त्रें स्वच्छ निघावींत, असावींत अशी जर मनांत इच्छा असेल, तर ती परटाच्या वस्त्रें धुण्याच्या सतेल्यांत घालण्याविषयीं त्या पात्रास घाणेरडे गलिच्छ मानूं नये ४१.

१ हातोंहात, तत्काळ. २ मोक्षाला. ३ येथवर. ४ मोठे. ५ लता–शाखा. ६ चूत–आंबा. ७ वसंतऋतूंत.

कर्मे क्लेशकारें । म्हणौनि न न्यावीं अव्हेरें । कां अन्नलाभें अरुवारें । रांधितिये उणें ॥ ४२ ॥ इहीं इहीं गा शब्दीं । एक कर्मी बांधिती बुद्धी । ऐसा त्यागु विसंवादीं । पडोनि ठेला ॥ ४३ ॥ तरी विसंवादु तो फिटे । त्यागाचा निश्चयो भेटे । तैसें बोलों गोमटें । अवधान देईं ॥ ४४ ॥

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम । त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

तरी त्यागु एथें पांडवा । त्रिविधु पैं जाणावा । तया त्रिविधाही बरवा । विभाग करूं ॥ ४५ ॥ त्यागाचे तीन्ही प्रकार । कीजती जरी गोचर । तरी तूं इत्यर्थाचें सार । इतुलें जाण ॥ ४६ ॥ मज सर्वज्ञाचिये बुद्धी । जें अलोट माने त्रिशुद्धी । निश्चयतत्त्व तें आधीं । अवधारीं पां ॥ ४७ ॥ तरी आपुलिये सोडवणें । जो मुमुक्षु जांगों म्हणे । तया सर्वस्वें करणें । हेंचि एक ॥ ४८ ॥

यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् । यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्मे आवश्यकें । तियें न सांडावीं पांथिकें । पाउलें जसीं ॥४९॥ हारपलें न देखिजे । तंव तयाचा मागु न सांडिजे । का तृप्त न होतां न लोटिजे । भाणें जेवीं ॥ १५० ॥ नाव थडी न पवतां । न खांडिजे केळी न फळतां । का ठेविलें न दिसतां । दीपु जैसा ॥५१॥ तैसी आत्मज्ञानविखीं । जंव निश्चिती नाहीं निकी । तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ॥ ५२ ॥ तरी स्वाधिकारानुरूपें । तियें यज्ञदानें तपें । अनुष्ठावींचि सांक्षेपें । अधिकेंवरें ॥ ५३ ॥ जें चालणें वेगावतें जाये । तो वेगु बैसावयाचि होये । तैसा कर्मातिशयो आहे । नैष्कर्म्यालागीं ॥५४॥ अधिकें जंव जंव औषधी । सेवनेचि मांडी बांधी । तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥ ५५ ॥ तैसीं कर्मे हांतोपातीं । जैं कीजती यथानिगुती । तैं रजतमें झडती । झाडा देऊनी ॥५६॥ का पाठोवाटीं पुटें । भांगारा खारु देणें घटे । तैं कीड झडकरी तुटे । निर्व्याजु होय ॥ ५७ ॥ तैसे निष्ठा केलें कर्म । तें झाडी करूनि रज-तम । सत्त्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ॥ ५८ ॥ म्हणौनियां धनंजया । सत्त्वशुद्धी गिंवसितया । तीर्थांचिया सावाया । आलीं कर्मे ॥ ५९ ॥ तीर्थें बाह्यमळु क्षाळे । कर्मे अभ्यंतर उजळे । एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥१६०॥ तृषार्ता मरुदेशीं । झळे अमृतें वोळलीं जैसीं । कीं अंधालागीं डोळ्यांसीं । सूर्यु आला ॥ ६१ ॥ बुडतया

किंवा उत्तम अन्न इत्रें असेल, तर ते स्वयंपाक [ कष्ट ] केल्याशिवाय प्राप्त होईल का ? त्याप्रमाणें कर्में क्लेशदायक आहेत, म्हणून त्यांचा हेळसांडीनें त्याग करूं नये ४२. अशा अशा प्रकारच्या शब्दांनी सिद्धान्त ठरवून, सांगून कोणी कर्म करण्यास निश्चयात्मक बुद्धीनें तयार होतात व कोणी कर्म टाकावें म्हणतात, अशाप्रकारें कर्मत्याग अमेळांत-वादांत पडून राहिला, कर्मत्यागाविषयीं वाद निर्माण झाला आहे ४३. तर तो त्यागासंबंधीचा वाद मिटेल व कर्माचा त्याग कसा करावा हा निर्णय कळेल, असें तुला मी उत्तम रीतीनें निकाल करून सांगतों तिकडे चांगलें लक्ष दे ४४.

**अन्वयार्थ**--**हे भरतसत्तम**-हे भरतश्रेष्ठा अर्जुना !- **तत्र त्यागे**-त्या त्यागाविषयीं-**मे निश्चयं**-माझा निश्चय **श्रृणु**-ऐक-**हे पुरुषव्याघ्र**-हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना !- **त्यागः**-त्याग-**त्रिविधः**-तीन प्रकारचा-**हि संप्रकीर्तितः** -खरोखर सांगितलेला आहे ४.

तरी अर्जुना ! हा त्याग तीन प्रकारचा आहे असें समज. आतां ते तिन्ही प्रकार नीट निरनिराळे वर्णन करून सांगतों ४५. त्यागाचें तीन प्रकार जरी पुढे स्पष्ट सांगावयाचें आहेत, तरी प्रस्तुत त्यांचें तात्पर्यरूप सार एवढेंच आहे असें तूं समज ४६. कीं जे माझ्यासारख्या सर्वज्ञाच्याहि बुद्धीला अगदीं खरें वाटतें, फार पटते आणि ज्या त्याग निर्णयाविषयीं माझे मनाचा ठाम निश्चय झाला आहे, तो निश्चय कोणता तो ऐक ४७. तर संसार बंधनापासून आपली सुटका व्हावी म्हणून जो मुमुक्षु दक्ष-सावध राहूं असें म्हणतो त्याला सर्व प्रकारें हेंच एक त्यागाचे खरें स्वरूप ओळखून तो करावा ४८.

**अन्वयार्थ**--**यज्ञ दान तपः कर्म**-यज्ञ, दान व तप **हें कर्म**-**न त्याज्यं**-टाकूं नये-**तत्**-तर तें-**कार्यम् एव**-अवश्य करावेंच-**यज्ञः दानं च तपः एव**-यज्ञ, दान व तपच-**मनीषिणां पावनानि**-विद्वानांना पावन करणारीं आहेत ५.

ते असें कीं प्रवास करणारानें ज्याप्रमाणें पाऊला पुढे पावलें टाकण्याचे [ मार्ग चालण्याचें ] सोडतां कामा नये, त्याप्रमाणें, यज्ञ, दान व तप इत्यादि हीं जीं आवश्यक कर्में आहेत तीं सोडूं नयेत ४९. हरवलेला जिन्नस जोपर्यंत दिसत-सांपडत नाहीं तोपर्यंत जसा त्याचा माग सोडतां कामा नये अथवा तृप्ति झाली [ पोट भरले ] नाहीं तोपर्यंत जसें आपल्या पुढील वाढलेलें ताट दूर-पलीकडे सारतां कामा नये १५०. किंवा नाव नदीचें कांठास न पोहोंचता मध्येच त्या नावेचा जसा त्याग करूं नये. अथवा केळीला फळें येण्यापूर्वींच जशी ती केळीचीं झाडें कापून टाकू नयेत किंवा ज्याप्रमाणें ठेवलेली वस्तु सांपडली-दिसली नाहीं तोपर्यंत दिवा मालवू नये ५१. त्याप्रमाणें जोपर्यंत आत्मज्ञानाविषयीं दृढ निश्चय झाला नाहीं, तोंपर्यंत यागादिक कर्में [ किंवा श्रवणादिक साधनानुष्ठान ] करण्याविषयीं उदासीन होऊं नये ५२. तर आपल्या अधिकाराप्रमाणेंच ती यज्ञ, दान व तप इत्यादि कर्में यथाविधि वरचेवर अधिक दक्षतेनें आचरिली पाहिजेत ५३. कारण, चालण्याची गति जसजशी वाढत जाईल तसतसा तो चालण्याचा वेग त्यास विसावा घेण्यासच उपयोगी पडतो तसें कर्माचरणावर दिलेला अधिक भर हा नैष्कर्म्यस्थिति प्राप्तीसच उपयोगी पडत असतो ५४. एखादा रोगी मनुष्य औषध घेण्याविषयीं जों जों अधिकाधिक नियमितपणें तयार होतो, तों तों औषध सेवनामुळें रोगापासून लवकर मुक्त होत जातो ५५. त्याप्रमाणें जों जों कर्में विधिपूर्वक योग्य हातवटीनें लवकर लवकर करावींत तों तों रजोगुण [ चंचलता ] तमोगुण [ पाप वासना ] समूळ नाहीं-तसे होतात ५६. अथवा हिणकस सोन्यास एकामागून एक जेव्हां क्षाराची पुटें देणें वडतें तेव्हां त्यांतील हिणकसपणा लवकर नाहींसा होतो व तें सोने निर्दोष-शुद्ध होतें ५७. तसें निष्ठापूर्वक कर्माचें आचरण केलें असतां; तें रज व तम यांचा नाश करून सत्त्वशुद्धीचें प्रत्यक्ष दर्शन करून देतें. म्ह. अंतःकरण शुद्ध होतें ५८. म्हणून अर्जुना ! अंतःकरणशुद्धी प्राप्त होण्याची इच्छा करणारास सत्कर्में हींच तीर्थांच्या योग्यतेस पावतात ५९. तीर्थांनीं बाह्य मलाचें क्षालन होतें आणि कर्माच्यायोगें अंतःकरण अंतर्मल नाहींसा होऊन शुद्ध होते. एवंच सत्कर्में हींच चित्तशुद्धीस तीर्थें होत १६०. तहानेनें पीडित झालेल्या मनुष्यास मारवाडच्या निर्जल प्रदेशांत जसा झळेबरोबर एखादा अमृताचा, पाण्याचा झरा सांपडावा किंवा आंधळ्याच्या सुखार्थ त्याच्या डोळ्यांत साक्षात सूर्यच येऊन आपल्या तेजासह प्रगट व्हावा ६१.

१ हेळसांडीनें. २ सुंदर. ३ रांधल्याशिवाय. ४ सिद्धांत. ५ विरुद्ध वादांत. ६ चांगलें. ७ प्रत्यक्ष. ८ तात्पर्याचे. ९ खरेंच, अचुक. १० सावध राहूं म्हणेल. ११ शोध. १२ भोजनताट. १३ कडेस. १४ चांगली. १५ यथाविधि. १६ वरचेवर. १७ वाढत. १८ कंबर बांधतो, अवसान धरतो. १९ लवकर, वारंवार. २० विधिपूर्वक.

नदीच धाविन्नली । पडतया पृथ्वीच कळवळिली । निमतयां मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धी ॥६२॥ तैसें कर्में कर्मबद्धता । मुमुक्षु सोडविले पंडुसुता । जैसा रैसरीति मरतां । राखिला विषें ॥ ६३ ॥ तैसीं एकें हातवटिया । कर्में कीजती धनंजया । बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होती ॥ ६४ ॥ आतां तेचि हातवटी । तुज सांगों गोमटी । जया कर्मातें किरीटी । कर्मचि रुसे ॥ ६५ ॥

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च । कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

तरी महायागप्रमुखें । कर्में निफजतांही अचुकें । कर्तेपणाचें न ठाके । फुंजेणें आंगीं ॥ ६६ ॥ जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहे । ऐसिये श्लाघ्यतेचां नोहे । तोषु जेवीं ॥ ६७ ॥ का मुद्रा समर्थाचिया । जो एकवटु झोंबे राया । तो मी जिणतां ऐसिया । न येचि गर्वा ॥ ६८ ॥ जो कांसे लागोनि तरे । तया पोहती'' उर्मी नुरे । पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ॥ ६९ ॥ तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथा अवसरें । कृत्यजातांचें मोहरें । सारीजती ॥ १७० ॥ केल्या कर्मा पांडवा । जो आथी फळाचा यावा । तया मोहरा हों नेदावा । मनोरथु ॥ ७१ ॥ आधींचि फळीं आस तुटिया । कर्में आरंभावीं धनंजया । परावें बाळ धाया । पाहिजे जैसें ॥ ७२ ॥ पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा । तैसिया फळनिराशा । कीजती कर्में ॥ ७३ ॥ सांडूनि दुधाची टकळी । गोंवारी गांवधेनु वेंटाळी । किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ ७४ ॥ ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी । आपणा आपुलिया गांठी । लाहेचि तो ॥ ७५ ॥ म्हणौनि फळीं लागु । सांडोनि देहसंगु । कर्में करावीं हा चांगु । निरोपु माझा ॥ ७६ ॥ जो जीवबंधें शिणला । सुटके जाचे आपला । तेणें पुढतपुढतीं या बोला । आन न कीजे ॥ ७७ ॥

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते । मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

नातरी आंधाराचेनि रोखें । जैसीं डोळां रोंविजती नखें । तैसा कर्मद्वेषें अशेखें । कर्मचि सांडी ॥ ७८ ॥ तयाचें जें कर्म सांडणें । तें तामस पैं मी म्हणें । शिसाराचे रागें लोटणें । शिरचि जैसें ॥ ७९ ॥ हां गा मार्गु दुवाडु होये । तरी निस्तरितील पाये । कीं तेचि खांडणें आहे । मार्गापराधें ॥ १८० ॥ भुकेलियापुढें अन्न । हो कां भलतैसें उन्ह । तरी बुद्धी न घेतां लंघन । भाणें

नदींत बुडणाऱ्यास तारण्याकरितां प्रत्यक्ष नदीच धांवून यावी किंवा पडणाराविषयीं जसा पृथ्वीलाच कळवळा येऊन तिनें त्यास झेलावें अथवा मरणारास मृत्युनेंच आयुष्य वाढवून द्यावें १६२. त्याप्रमाणें मुमुक्षूंस कर्मापासून होणारी बद्धता ती कर्माचरणानेंच दूर करावी; अथवा हे अर्जुना! रसायन करण्याची ज्यास युक्ति माहीत आहे, त्या वैद्यानें ज्याप्रमाणें मारक जें विष त्यास रसायनानें शुद्ध करून त्याचें अमृत करून दिलें तर मरत असलेल्या मनुष्याचे प्राण रक्षण होतात १६३. त्याप्रमाणें धनंजया! कर्माचरणाच्या युक्तीनें कर्में केली असतां ती स्वरूपानें बंधक असणारी कर्मेंहि मुक्त करण्यास कारणीभूत होतात १६४. तर अर्जुना, ज्या युक्तीनें कर्में केली असतां तें कर्मच कर्माचा नाश करते, ती युक्ति कोणती ती तुला आतां उत्तम रीतीनें सांगतों १६५.

**अन्वयार्थ**—**तु**–पण–**हे पार्थ**–हे अर्जुना!–**एतानि कर्माणि अपि**–हीं कर्में सुद्धां–**संगं च फलानि त्यक्त्वा**–कर्तृत्वाभिमान व फलें टाकून–**कर्तव्यानि**–करावीं–**इति**–असें–**मे**–माझें–**निश्चितं उत्तमं मतं**–निश्चित उत्तम मत आहे ६.

तर पंचमहायज्ञादि प्रमुख कर्में आपल्या हातून यथाविधि अचूक घडली असतांहि जो आपल्या आंगीं कर्तृत्वाचा अभिमान मुळींच बाळगीत नाहीं १६६. जो मोलानें प्रयागादि तीर्थयात्रा करण्यास जातो त्याला 'मी यात्रा करीत आहे' असा मोठेपणा नसतो, म्हणून त्याचा त्यास हर्षहि होत नाहीं १६७. किंवा राजशिक्क्याच्या, आज्ञेच्या बळावर जो एकटाच राजसेवक दुसऱ्या राजाबरोबर लढतो, त्याला पकडून आणतो, त्याचे मनांत 'मी एकट्यानें राजास जिंकलें' असा गर्वहि होत नाहीं १६८. जो दुसऱ्याच्या कांसेस लागून नदी उतरून पलीकडे जातो, त्याला मी पोहणारा आहे, असा गर्व होत नाहीं; किंवा यजमान राजातर्फे दुसऱ्यास आपल्या हातानें दानधर्म करणारा उपाध्याय त्या दानाबद्दल 'मी दाता' असा अभिमान बाळगून मिरवीत नाहीं १६९. त्याचप्रमाणें कर्म संबंधानें येणाऱ्या कर्तृत्वाचा अभिमान आपल्याकडे न घेतां ज्या ज्या वेळीं जीं जीं उचित कर्में प्राप्त होतील तीं तीं यथाविधि करून संपवावी १७०. हे पांडवा! केलेल्या कर्मांची जी फलप्राप्ति व्हावयाची असते तिच्याविषयीं आपल्या मनांत इच्छेला वळूं-फिरकूं देऊं नये ७१. हे धनंजया! याप्रमाणें आरंभींच, प्रथमच फळाची आशा सोडून [ निष्काम ] कर्मास आरंभ करावा तो कसा, तर ज्याप्रमाणें दुसऱ्याचें लेंकरांकडे [ निर्हेतुक दृष्टीनें ] पाहून त्याच्या ठिकाणीं स्नेह न ठेवतां नुसतां संतोष मानावा ७२. पिंपराच्या आशेनें जसा कोणी पिंपळास पाणी घालीत नाहीं, तशी फळाची आशा सोडून कर्में करावींत ७३. गुराखी दुधाची आशा व त्याचा घ्यास सोडून जशा गावांतील गाई वळतो, अधिक काय सांगावें!! तसें कर्मफळाविषयीं करावें [ फलाविषयीं निरिच्छ असावें ] ७४. अशा या युक्तीनें जे कर्मांचे आचरण घडत असते त्या कर्माचे आचरण करणारास आपल्या अति जवळच असलेल्या आत्मस्वरूपाचा लाभ होत असतो ७५. म्हणून फळाविषयीं आशा सोडून व देहाहंकार, मी कर्ता हा अभिमान सोडून कर्में करावीत, असा हा [ सर्वांस ] माझा चांगला निरोप [ आज्ञा ] आहे ७६. जो जीव संसारबंधानें [ जन्ममृत्यूच्या दुःखानें त्रासून ] शिणला, भागला आहे व जो आपली मुक्तता [ त्यापासून सुटका ] होण्याविषयीं प्रयत्नशील आहे, काळजींत आहे त्याला वारंवार सांगणें आहे कीं, त्यानें या माझ्या निरोपाचे [ आज्ञेचे ] उल्लंघन करून दुसरें कांहीं करूं नये ७७.

**अन्वयार्थ**–**नियतस्य कर्मणः**-नित्य कर्मांचा-**संन्यासः**–परित्याग–**तु**–तर–**न उपपद्यत**–उत्पन्न होत नाहीं–**तस्य**–नित्य कर्मांचा–**मोहात्**–अज्ञानामुळें–**परित्यागः**–केलेला त्याग–**तामसः परिकीर्तितः**–तामस सांगितलेला आहे ७.

एखादा मनुष्य अंधारांत [ चालत असतां ] दिसत नाहीं म्हणून, त्याबद्दलचा राग डोळ्यावर काढून, डोळ्यांत जशीं नखें खुपसतो त्यप्रमाणें [ कर्में जन्मबंधास कारण आहेत, म्हणून] कर्मांच्या द्वेषानें जो तीं सर्व कर्मेंच टाकून देतो ७८. त्याचे जें हे कर्मत्यागाचे कृत्य आहे त्यास मी 'तामस त्याग' असें म्हणतों, ज्याप्रमाणें अर्धशिशी उठल्यावर कोणी त्याच्या रागानें आपलें शिरच कापावें तसेंच हे करणें होय ७९. अरे! वाट जरी वाईट, अवघड असली, तरी ती पायच चालून संपवितील; पण ते टाकून त्या वाटेच्या अपराधामुळें [ वाईटपणामुळें ] ते पायच तोडावेत कीं काय? १८०. भूक लागलेल्या मनुष्यापुढें ठेवलेलें अति कढत अन्न, मग ते वाटेल तितके उन असले तरी बुद्धीनें लंघन विचार न करतां, अविचारानें तें लाथेनें झुगारून

१ मरणारास. २ रसायनक्रियेच्या गुणामुळें. ३ हातोटीनें, ४ दूर करी. ५ पंचमहायज्ञ. ६ गर्व, अहंकार. ७ रातीचा. प्रतिष्ठेचा. ८ शिक्का. ९ एकटा. १० जिंकणारा. ११ पोहण्याचा अभिमान. १२ राजोपाध्याय. १३ आवेश बाळगीत.

पापेंरां हेल्या ॥ ८१ ॥ तैसा कर्मांचा बांधु कर्में । निस्तरिजे करितेनि वर्में । हे तामसु नेणें भ्रमें । माजविला ॥ ८२ ॥ कीं स्वभावें आलें विभागा । तें कर्मचि वोसंडी[४] पैं गा । तरी झणें आतळा त्यागा । तामसा तया ॥ ८३ ॥

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् । स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

अथवा स्वाधिकारु बुझे । आपुलें विहितही सुंजे । परी करितया उमजे । निबरपणां ॥ ८४ ॥ जे कर्माची ऐलीकंड । नावेकें दिसे दुवाड । जे वाहतिये वेळे जड । शिदोरी जैसी ॥ ८५ ॥ जैसा निंब जिभे कडवटु । हिरडा पहिलें तुरटु । तैसा कर्मा ऐल शेवटु । खणुवाळें होय ॥ ८६ ॥ कां धेनु दुवाड शिंग । शेवंतीये[५] अडव आंग । भोजनसुख महाग । पाकु करितां ॥ ८७ ॥ तैसें पुढतपुढती कर्म । आरंभींच अति विषम । म्हणौनि तो तें श्रम । करितां मानी ॥ ८८ ॥ एऱ्हवीं विहितत्वें मांडी । परी घालितां असुरवाडी । तेथ पोळला ऐसा सांडी । आदरिलेंही ॥ ८९ ॥ म्हणे वस्तु देहासारिखी । आली बहुतीं भाग्यविशेखीं । मा जाचूं कां कर्मादिकीं । पापिया जैसा ? ॥ १९० ॥ केलें कर्मीं जें द्यावें । तें झणें मज होआवें । आजि भोगूं ना कां बरवे । हातींचे भोग ?॥ ९१ ॥ ऐसा शरीराचिया क्लेशा- । भेणें कर्में वीरेशा । सांडी तो परियेसा । राजसु त्यागु ॥ ९२ ॥ एऱ्हवीं तेथही कर्म सांडे । परी तया त्यागफळ न जोडे । जैसें उतलें आगीं पडे । तें नलगेचि होमा ॥ ९३ ॥ कां बुडोनि प्राण गेले । ते अर्धोदकीं निमालें । हें म्हणों नये जाहलें । दुर्मरणचि ॥ ९४ ॥ तैसें देहाचेनि लोभें । जेणें कर्मा पाणी सुभे । तेणें साच न लभे । त्यागाचें फळ ॥ ९५ ॥ किंबहुना आपुलें । जैं ज्ञान होय उदया आलें । तैं नक्षत्रातें पाहलें । गिळी जैसें ॥९६॥ तैशा सकारण क्रिया । हारपती धनंजया । तो कर्मत्यागु ये जया । मोक्षफळासी ॥ ९७॥ तें मोक्षफळ अज्ञाना । त्यागिया नाहीं अर्जुना । म्हणौनि तो त्यागु न माना । राजसु जो ॥ ९८ ॥ तरी कोणे पां एथ त्यागें । तें मोक्षफळ घर रिघे । हेंही आइक प्रसंगें । बोलिजेल ॥ ९९ ॥

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन । सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

तरी स्वाधिकाराचेनि नांवें । जें वांटिया आलें स्वभावें । तें आचरे विधि-

दिलें, तर त्याला लंघनच करावें लागणार ! ८१. त्याप्रमाणें कर्माचें बंधन कर्म करण्याच्या युक्तीनें, कर्माचेच आचरण करून कर्माचा बंध-दोष नाहींसा करावा हें तो तामस मनुष्य भ्रमानें ग्रस्त झाला असल्यामुळें मुळींहि जाणत नाहीं ८२. तर तो उलट आपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें आपल्या वांट्यास आलेलें जें कर्म तेंच टाकून देतो, तेव्हां कदाचित् तूं त्या मनुष्याप्रमाणें तामस कर्मत्यागाच्या स्वाधीन होशील; पण त्याचा चुकून त्रिटाळहि होऊं देऊं नकोस हो ! ८३.

**अन्वयार्थ—यत् कर्म**-जें कर्म-**दुःख**-दुःख आहे-**इति एव**-असें समजूनच-**कायक्लेशभयात्**-शरीराच्या-क्लेशाच्या भयानें-**त्यजेत्**-टाकलें जातें-**सः**-तो असा-**राजसं त्यागं कृत्वा**-राजस त्याग करून-**त्यागफलं**-त्यागाच्या फलास-**न एव लभेत्**-प्राप्त होत नाहींच ८.

अथवा, आपला अधिकार काय आहे, हें तो जाणतो व आपलें विहित कर्तव्य कर्म कोणतें, हेंहि त्यास समजते, परंतु तीं कर्में करण्याच्या क्लेशास-कठीणपणास भिऊन जो त्याजविषयीं कंटाळा करितो ८४. कारण, कर्माची आरंभींची अवस्था क्षणभर कठीण दिसते खरी-जशी शिदोरी वाहतेवेळेस पहिल्यान्दां जड वाटते ८५. जसा पहिल्या प्रथम लिंब खातेवेळेस जिभेस कडू लागतो व हिरडा पहिल्यान्दां तुरट लागतो, तसा कर्माचा अलिकडील शेवट-आरंभींची बाजू, ही कठीण कष्टकर वाटत असते ८६. किंवा गाय दुभती, स्वरूपतः चांगली असली, तरी शिंग मारकेपणा हा दोष असतो; शेवंती सुगंधी म्हणून चांगली खरी; पण त्या झाडालाहि कांटे असतात, भोजनाचें सुख असतें खरें; पण स्वयंपाकाच्या दगदगीच्या त्रासामुळें तेंहि कष्टसाध्य असेंच होय. ८७. तसें कर्म आरंभिते वेळेसच अति कष्टकर असतें, म्हणून तें कर्म वारंवार करतांना श्रमच होतात; असें तो समजतो ८८.वास्तविक पाहतां कर्माचा आरंभ यथाविधि करतो; पण जशी एखादी कढत वस्तु हातांत घेऊन हात भाजतांच ती टाकून देतो, त्याप्रमाणें त्या कर्माचरणापासून श्रम, क्लेश होऊं लागल्यावर तीं आरंभिलेलीहि कर्में मध्येंच टाकतो; ८९. आणि तो म्हणतो कीं, माझें विशेष असे महद्भाग्य म्हणून या देहासारखी उत्तम वस्तु लाभली आहे तर मग पाप्याप्रमाणें कर्मादिकांचे आचरण करून मीं आपल्यास त्रास, शिण कां करून घ्यावा ? १९०. कदाचित् कर्माचें आचरण केले असतां तें कर्म कांहीं अदृष्ट फल देईल, पण मला तसलें अदृष्ट-उधार फळ मुळींच नको, तर आज प्रस्तुत आपल्या हातांत उपलब्ध झालेलें भोगैश्वर्य आहे, त्याचाच उत्तम उपभोग घ्यावा हेंच बरें नव्हें काय ? ९१. अशा प्रकारें अर्जुना ! शरीरास क्लेश-कष्ट होतील या भीतीनें जो कर्में टाकून देतो, हें पहा ! त्याला 'राजस त्याग' असें म्हणतात. ९२. वास्तविक पाहतां तेथेंहि [ राजस त्यागांतहि ] कर्मत्याग होतो; खरा; परंतु त्याला त्यापासून खऱ्या कर्मत्यागाचें फळ मिळत नाहीं, ज्याप्रमाणें उतू गेलेलें [ तूप अगर दूध ] आगींत पडलें असतां ते होमार्थ कारणी लागले म्हणून त्यास होमाची योग्यता प्राप्त झाली, असें होत नाहीं ९३. किंवा एखाद्याचे पाण्यांत बुडून प्राण गेले असतां त्यानें अर्धोदकांत जलसमाधि घेतली, असें म्हणूं नये, तर त्याचें तें अपघाताचेंच, वाईट मरण होय, असें म्हटलें पाहिजे ९४. त्याप्रमाणें देहावर प्रीति ठेवली असल्यामुळें ज्यानें कर्मावर पाणी सोडले, [ कर्में टाकली ] तर त्याला खऱ्या कर्मत्यागाचें फल मिळत नाहीं [ हे खास ] ९५. फार काय सांगावें !! जेव्हां आत्मज्ञान चित्तांत उदयास येते, तेव्हां त्याला सूर्योदयानें उजाडलें म्हणजे तो ज्याप्रमाणें नक्षत्रांना तेजासह नाहींसें करतो ९६. त्याप्रमाणें अर्जुना ! ज्या कर्मत्यागापासून सर्व क्रिया आपल्या कारणरूप अज्ञानासह वर्तमान लोपतात, त्या कर्मत्यागापासून जें मोक्षप्राप्तिरूप फल मिळते ९७. अर्जुना ! तें मोक्षप्राप्तिरूप फळ, अज्ञानानें कर्माचा त्याग केला असतां त्या त्यागास प्राप्त होत नाहीं. म्हणून अज्ञान्यानें केलेला कर्मत्याग तो 'राजस त्याग' होय. तो खरा 'त्याग' आहे, असें मानूं नकोस हो ! ९८. आतां कोणत्या कर्मत्यागापासून मोक्षप्राप्तिरूप फल आपल्या घरीं घुसतें, आपण होऊन चालत येतें तेंहि प्रसंगानुरोधानें तुला येथें सांगेन तें ऐक ९९.

**अन्वयार्थ—अर्जुन**-हे अर्जुन ! **यत् नियतं कर्म**-जे नित्य कर्म-**कार्यम् इति एव**-हें मला अवश्य करावयास पाहिजे असें समजूनच-**संग च फलं त्यक्त्वा एव**-आसक्ति व फल सोडूनच-**क्रियते**-केलें जातें-**सः त्यागः**-तो त्याग-**सात्त्विकः मतः**-सात्त्विक मानलेला आहे ९.

तर आपापल्या अधिकारानुरूप, जें सहज वर्णाश्रमधर्मानुसार आपल्या वाट्यास आलेले, स्वाभाविक कर्म तें साहित्य-

१ लाथेनें. २ शृंगारल्यास. ३ दोष. ४ त्यागी. ५ स्वाधीन होऊं नका. ६ समजे. ७ पाहे. ८ त्रासतो, कंटाळतो. ९ कठीणपणास. १० प्रारंभ. ११ क्षणभर. १२ वाईट. १३ कठीण. १४ कांटे शेवंतीच्या झाडास.

गौरवें । शृंगारोनि ॥ २०० ॥ परी हें मी करितु असे । ऐसा आठवु त्यजी मानसें । तैसेचि पाणी दे' आशे । फळाचिये ॥ १ ॥ पैं अवज्ञा आणि कामना । मातेच्या ठायीं अर्जुना । केलिया दोनी पतनां । कारण होती ॥ २ ॥ तरी दोनीं यें त्यजावीं । मग माताचि ते भजावी । वांचूनि मुखालागीं वाळांवी । गायचि सगळी ? ॥ ३ ॥ आवडतियेही फळीं । असारें साली आंठोळी । त्यासाठीं अवगेळी । फळातें कोण्ही ? ॥ ४ ॥ तैसा कर्तृत्वाचा मद्दु । आणि कर्मफळाचा आस्वाद्दु । या दोहींचें नांव बंधु । कर्माचा कीं ॥ ५ ॥ तरी या दोहींच्या विखीं । जैसा बापु नातळे लेंकीं । तैसा हों न शके दुःखी । विहिता क्रिया ॥ ६ ॥ हा तो त्याग तरुवरु । जो गा मोक्षफळें ये थोरु । सात्त्विक ऐसा डगंरु । यासींच जगीं ॥ ७ ॥ आतां जाळूनि बीज जैसें । झाडा कीजे निर्वंशें । फळ त्यागूनि कर्म तैसें । त्यजिलें जेणें ॥ ८ ॥ लोह लागतखेंवो परिसीं । धातूची गंधिकाळिमा जैसी । जाती रजतमें तैसीं । तुटलीं दोन्ही ॥ ९ ॥ मग सत्त्वें चोखाळें । उघडती आत्मबोधाचे डोळे । तेथ मृगांबु सांजवेळे । होय जैसें ॥ २१० ॥ तैसा बुद्ध्यादिकांपुढां । असतु विश्वाभासु हा येवढा । तो न देखे कवणीकडां । आकाश जैसें ॥ ११ ॥

न द्वेष्टयकुशलं कर्म कुशले नानुषज्जते । त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

म्हणौनि प्राचीनाचेनि बळें । अलंकृतें कुशलांकुशलें । तियें व्योमोआंगीं आभाळें । जिरालीं जैसीं ॥१२॥ तैसीं तयाचिये दिठी । कर्में चोखाळलीं किरीटी । म्हणौनि सुखदुःखीं उंठी । पडेना तो ॥ १३ ॥ तेणें शुभकर्म जाणावें । मग तें हर्षें करावें । का अशुभालागीं होआवें । द्वेषिया ना ॥ १४ ॥ तरी इयाविषयींचा कांहीं । तया एकुही संदेहो नाहीं । जैसा स्वप्नाच्या ठायीं । जागिन्नालिया ॥ १५ ॥ म्हणौनि कर्म आणि कर्ता । या द्वैतभावाची वार्ता । नेणें तो पंडुसुता । सात्त्विक त्यागु ॥ १६ ॥ ऐसेनि कर्में पार्था । त्यजिलीं" त्यजिती सर्वथा । अधिकें बांधिती अन्यथा । सांडिलीं तरी ॥ १७ ॥

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः । यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

आणि हां गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्माची ।

सह गौरवानें आदरपूर्वक यथाविधि आचरण करितो; २००. परंतु 'हें कर्म मी करीत आहें,' अशी मनांतून कर्तृत्वाची आठवणहि टाकीत असतो. तसेंच फळाच्या आशेवरहि तो पाणी सोडतो १. अर्जुना! मातेच्या सांगीची अवज्ञा–अवहेलना केली वा तिची कामना [ तिच्याविषयीं मनांत कोणतीहि दुष्टवासना ] केलीं तर या दोन्हीं गोष्टी मुलाच्या जशा अधःपतनास कारणीभूत होतात २. म्हणून ह्या दोन्ही वर्ज्य कराव्यात व केवळ मातृबुद्धीनेंच मातेची सेवा करावी. अरे! गाईचें एक मुख अपवित्र असले म्हणून सगळी–सर्वांगासह गायच टाकावी कीं काय? ३. आपल्यास आवडतें जें फळ [ आंबा ] त्यांत त्याची साल, कोय–बी यामध्यें रस नाहीं. ह्या दोन असार गोष्टी त्याच्या ठिकाणीं आहेत, त्यासाठीं म्हणून तो आंबा कोणी टाकून देईल काय? ४. त्याप्रमाणें कर्म कर्तृत्वाचा अहंकार–अभिमान आणि कर्मफलाची लालसा या दोहोंसच 'कर्मांचा बंध' असें नांव आहे ५. म्हणून बाप ज्याप्रमाणें आपल्या कन्येविषयीं कोणतीहि इच्छा न बाळगतां तिचे परिपालन करतो त्याप्रमाणें विहित कर्में केवळ कर्तव्य समजून [ कर्तृत्वमद व फलास्वाद ] या दोन्हीस टाकून जो करतो तो दुःखी होऊं शकत नाहीं ६. हा तो त्यागरूपी वृक्ष आहे, कीं जो सर्व वृक्षांत श्रेष्ठ वृक्ष असून, यालाच मोक्षरूप मोठालीं. फळें येतात म्हणून सर्व जगांत 'सात्त्विक त्याग' अशी यासच प्रसिद्धि लाभली आहे ७. आतां, झाडाचें बीजच जाळून झाडास जसें निर्वंश करावें, तसें फलाचा त्याग करून ज्यानें कर्मांचा त्याग केला आहे ८. ज्याप्रमाणें परिसाला लोखंडाचा स्पर्श होतांक्षणींच लोखंडाचा गंज, कलंक वा काळेपणा ही जातात, त्याप्रमाणें कर्मकर्तृत्वाचा अभिमान आणि कर्मफलाची इच्छा या दोन गोष्टींचा त्याग केल्यावर रजोगुण व तमोगुण हे दोन्ही नाहींतसे होतात ९. मग शुद्ध सत्त्वगुणानें आत्मबोधाचें डोळें उघडतात तेव्हा संध्याकाळीं मृगजळ जसे आपोआप नाहींतसें होतें २१०. किंवा एवढे मोठे आकाश सर्वत्र असूनहि जसें ते कोणीकडेच दिसत नाहीं, तसा बुद्ध्यादिकांपुढा [ वृत्तिज्ञानाच्या पुढें ] जगाचा एवढा मोठा मिथ्याभास आहे; पण त्यास तो कोणीकडेहि दिसत नाहीं ११.

**अन्वयार्थ**——**अकुशलं कर्म**–संसाराला कारण होणाऱ्या काम्यादि कर्मांचा–**न द्वेष्टि**–द्वेष करीत नाहीं–**कुशले न अनुषज्जते**-चित्तशुद्धीच्या द्वारां मोक्षाला कारण होणाऱ्या नित्यकर्मांमध्यें आसक्त होत नाहीं, तर तो–**त्यागी**-संग व फल यांचा त्याग करून नित्यकर्मांचें अनुष्ठान करितो–**सत्त्वसमाविष्टः**–आत्मनात्मविवेकाला कारण होणाऱ्या सत्त्वानें संयुक्त होतो–**मेधावी**–तो आत्मज्ञानरूप प्रज्ञेनें संयुक्त होतो–**छिन्नसंशयः [ भवति ]** त्यामुळें त्याचे सर्व संशय तुटलेले असतात १०.

म्हणून पूर्वकर्मानुरोधानें [ प्रारब्धबलानें ] जीं बरींवाईट कर्मे फलें देण्यास सन्मुख झालीं असतां तीं, आकाशाचे स्वरूपांत जसे ढग उत्पन्न होऊन मावळून, जातात १२. तशीं अर्जुना! सात्त्विक, त्यागी पुरुषाच्या दृष्टीनें सर्व कर्में निर्दोष–विशुद्ध झालेली असतात. म्हणून त्यापासून होणाऱ्या सुख–दुःखांची उठाठेव करण्याच्या भानगडीत तो पडत नाहीं १३. अमुक एक शुभ कर्म आहे असें [ भेदबुद्धीनें ] जाणावें व मग तें आनंदानें करावे किंवा हें अशुभ कर्म आहे म्हणून त्याचा द्वेष करावा असेंच [ घडेल ] ना? १४. ज्याप्रमाणें जागृत झाल्यावर स्वप्नांत पाहिलेल्या बऱ्यावाईट गोष्टी मिथ्याच असल्यामुळें त्याचें कोणी सुखदुःख मानीत नाहीं. त्याप्रमाणें शुभ किंवा अशुभ यांविषयीं त्याच्या मनांत कोणतीहि शंकाच [ संशयभ्रांति ] नसते १५. म्हणून अर्जुना! [ ज्या त्यागात ] हें एक कर्म आणि मी त्याचा कर्ता या द्वैतभावाची वार्ताहि तो जाणत नाहीं, त्याला 'सात्त्विक त्याग' असें म्हणतात १६. पार्था! अशा प्रकारें कर्में त्यागिली असतां ती कर्में खरी, परिपूर्णपणें टाकलीं जातात; पण जर या व्यतिरिक्त अन्यप्रकारें कर्में टाकली असतां तीं उलटीं अधिकच बांधतात १७.

**अन्वयार्थ**——**देहभृता**–देहच आत्मा असा अभिमान धरणाऱ्या पुरुषाकडून–**कर्माणि**–कर्में–**अशेषतः**–निःशेष–**त्यक्तुं**–टाकलीं जाणें–**न हि शक्यं**–शक्य नाहीं–**तु**–पण–**यः कर्मफलत्यागी**–जो कर्मफलाचा त्याग करणारा–**सः त्यागी**–तो त्यागी–**इति अभिधीयते**–असें म्हटलें जातें ११.

---

१ पाणी सोडतो, तिलांजली देतो. २ नरकपातास. ३ त्यजावी. ४ बीं. ५ त्यागी. ६ अभिमान, गर्व. ७ प्रसिद्धि. ८ वृक्षाला. ९ स्पर्शतांच. १० परिसास. ११ अमंगळ, काळिमा, कलंक. १२ स्वच्छ, शुद्ध. १३ मृगजळ. १४ प्रारब्धाच्या, पूर्वसंचिताच्या. १५ बरी वाईट. १६ आकाशात. १७ उठाठेव. १८ त्यागिली ती त्यजिलीं.

तें गांवढे गा ॥ १८ ॥ मृत्तिकेचा वीटु । घेऊनि काय करील घटु ? । केउंता ताथु पटु । सांडील तो ? ॥ १९ ॥ तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणें आगी । कीं तो दीपु प्रभेलागीं । द्वेषु करील काई ? ॥ २२० ॥ हिंगु त्रासिला घाणी । तरी कैचें सुगंधत्व आणी ? । द्रवपण सांडूनि पाणी । कें राहे तें ? ॥ २१ ॥ तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जंव असे । तंव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी ? ॥ २२ ॥ आपण लाविजे टिळा । म्हणौनि पुसों ये वेळोवेळा । मों घाली फेडी निडळा । कां करूं ये गा ? ॥ २३ ॥ तैसें विहितं स्वयें आदरिलें । म्हणौनि त्यजूं ये त्यजिलें । परी कर्मचि देह आंतलें । तें कां सांडील गा ? ॥ २४ ॥ जें श्वासोच्छ्वासवरी । होत निजेलियाहीवरी । कांहीं न करणेंयाचि पेंरी । होती जयाची ॥ २५ ॥ या शरीराचेनि मिसकें । कर्मचि लागलें असिकें । जितां मेलया न ठाके । इया रीती ॥ २६ ॥ यया कर्मातें सांडिती परी । एकीचि ते अवधारीं । जे करितां न जाइजे हारीं । फळाशेचिये ॥ २७ ॥ कर्मफळ ईश्वरीं अर्पे । तत्प्रसादें बोधु उद्दीपे । तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्याळशंका ॥ २८ ॥ तेणें आत्मबोधें तैसें । अविद्येसीं कर्म नाशे । पार्था त्याजिजे जैं ऐसें । तैं त्यजिलें होय ॥ २९ ॥ म्हणौनि इयापरी जगीं । कर्में करितां मानूं त्यागी । येर मूर्छने नांव रोगी । विसांवा जैसा ॥२३०॥ तैसा कर्मी शिणे एकीं । तो विसांवो पाहे आणिकीं । दांडेयाचे घाय बुकी । धाडणें जैसें ॥ ३१ ॥ परी हें असो पुढती । तोचि त्यागी त्रिजगतीं । जेणें फळत्यागें निष्कृती । नेलें कर्म ॥ ३२ ॥

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मण: फलम् । भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ।

एऱ्हवीं तरी धनंजया । त्रिविधा कर्मफळा गा यया । समर्थ ते कीं भोगावया । जे न सांडितीचि आशा ॥ ३३ ॥ आपणचि विऊनि दुहिता । कीं न मम म्हणे पिता । तो सुटे कीं प्रतिग्रहिता । जांवई शिरके ॥ ३४ ॥ विषाचे आगरही वाहती । ते विकितां सुखें लाभे जिती । येर निमालें जे घेती । वेंचोनि मोलें ॥३५॥ तैसें कर्ता कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू । एथ न शके आवरूं । दोहींतें कर्म ॥ ३६ ॥ वाटे पिकलिया रुखाचें । फळ अपेक्षी तयाचें । तेवीं साधारण कर्माचें । फळ घे तया ॥ ३७ ॥ परी करूनि फळ नेघे । तो जगाच्या कामीं न

आणि अर्जुना ! जे प्रत्यक्ष देहाची मूर्ति धारण करून कर्म करण्याचा कंटाळा करितात, ते मूर्खे, अडाणी होत १८. मातीचा कंटाळा करून घट काय करील ! आणि वस्त्र तंतूच्या संबंधाचा त्याग कसा करील ! १९. तसेंच अग्नीच्या अंगीं अग्नित्व असून तो अग्नि उष्णतेला कसा बरें कंटाळेल ! किंवा दिवा आपल्या प्रभेचा द्वेष करील काय ! २२०. हिंग जरी आपल्या उग्र घाणीला त्रासला, कंटाळला असला तरी तो चांगला सुवासिकपणा कोठून आणील ! किंवा पाणी पातळपणा टाकून कसें व कोठें राहील ! २१. त्याप्रमाणें शरीराचे अवस्थेंत जोंपर्यंत मनुष्य व्यवहार करीत आहे, तोंपर्यंत कर्मत्यागाचें [आग्रहात्मक] वेड तरी काय उपयोगाचे ! २२. आपण आपल्या कपाळास लावलेले गंध वांकडें लागले असले, तर ते वरचेवर पुसतां येते; परंतु मूळचें कपाळच जर वांकडे असेल, तर तें काढून [ अदलाबदल करून ] दुसरें नीट बसवितां येईल काय ! २३. त्याप्रमाणें ज्या वेदविहित-कर्माचा आपणच स्वतः आदर, स्वीकार केलेला असतो म्हणून त्याचा त्याग करावयाचा म्हटलें व टाकले तर टाकतां येईल; पण त्यायोगें कांहीं खरा कर्मत्याग होणार नाहीं. कारण, शरीररूपानें हें कर्म अवतरले असल्यामुळें तें कर्म कसें टाकतां येईल ! २४. कां कीं मनुष्य निजला असला तरीहि श्वासोच्छ्वासाच्या रूपानें [स्वाभाविक] कर्म हें घडतच असते. अर्थात् स्वाभाविक कर्म असें कीं, आपण कांहींएक न केले तरीहि त्यांत त्यांची उभारणी होतेच होते २५. या शरीराच्या निमित्तानें संपूर्ण कर्मच हें [ जीवाच्या ] पाठीस लागलें आहे तें इतकें कीं याप्रमाणें तें जिवंतपणीं [ आमरणांत ] व मेल्यावरही कर्म करण्याचें रहातच नाहीं २६. तर हें बघ ! आतां या कर्माचा त्याग करण्याचा एकच एक प्रकार आहे. तो हा असा कीं, विहित कर्म करीत असतां फलेच्छेच्या ताब्यांत, आहारीं जाऊं नये २७. कर्माचें फल ईश्वरास अर्पण केलें, म्हणजे त्याच्या प्रसादानें [ब्रह्मात्मैक्य] ज्ञान प्रगट होतें आणि मग दोरीचें यथार्थ ज्ञान प्राप्त झाल्यावर तद्वारां जशी सर्पाची शंका, भ्रांति नाहींशी होते २८. तसा या ब्रह्मात्मैक्यबोधानें अज्ञानासह कर्माचा नाश [ बाध ] होतो. पार्था ! जेव्हां कर्माचा अशा रीतीनें त्याग करावा, तेव्हांच तो खरा त्याग केला असे होते २९. म्हणून जगामध्यें या सात्त्विक त्यागाच्या हातवटीनें जो कर्में करितो, त्यालाच आम्ही कर्मत्यागी असें मानूं. नाहींतर याहून व्यतिरिक्त त्याग म्हणजे रोग्याला मूर्च्छा आली असतां ज्याप्रमाणें रोगी विसांवा घेतो आहे, असें लोकांनीं भ्रमानें म्हणण्यासारखेंच होय २३०. त्याप्रमाणें जो एक कर्म करतांना त्यांत दुःख झाले म्हणून कंटाळतो म्हणून दुसरें कर्म सुरू करून त्यांत विसांवा घेऊं पाहतो. असें हे त्याचे करणें म्हणजे जसे दांड्याचें घाव बुक्क्याच्या मारावर घालविणें, तसाच हा प्रकार आहे ३१. परंतु हे असो; ज्यानें कर्मफलाचा त्याग करून कर्माला नैष्कर्म्य स्थितीस नेले आहे, तोच या त्रिभुवनांत खरा त्यागी होय ३२.

**अन्वयार्थ**—**अनिष्टं**–पश्वादि योनि प्राप्त होणें हें अनिष्ट–**इष्टं**–देवादि योनि प्राप्त होणें हें इष्ट–**च**–व –**मिश्रं**–मनुष्यादि-योनिप्राप्ति हें मिश्र असें–**कर्मणः**– कर्माचें–**त्रिविधं फलं**–तीन प्रकारचे फल–**अत्यागिनां**– त्याग न करणारांना–**प्रेत्य**–मेल्यावर–**भवति**–प्राप्त होतें– –**तु**–पण–**संन्यासिनां** – संन्याश्यांना–**क्वचित्**–केव्हांहि तें–**न**–मिळत नाहीं १२.

अर्जुना ! तत्त्वतः विचार करून पाहिलें तर जे कर्मफलाची आशा सोडीतच नाहींत, तेच या तीन प्रकारच्या कर्मफलाचा भोग घेण्यास समर्थ, पात्र असतात ३३. आपणच कन्येस जन्म दिला असूनहि [ कन्यादान-समयीं ] 'न मम', 'ती माझी नाहीं' असें म्हणतो व तो पिता जेव्हां कन्यादानाचें उदक सोडितो, तेव्हां तो तिच्या मायापाशांतून सुटतो व पाणिग्रहण करणारा जांवई मात्र तिच्या मायापाशांत अडकला जातो ३४. जे विषाच्या [ बचनाग, अफू वगैरेंच्या ] बागांची शेतीची लागवड करतात ते त्यांतील मालाची विक्री करून किंवा व्यापार करून, त्याजवर नफा मिळवून त्यावर सुखानें प्रपंच करितात, जगतात; पण जे दुसरे त्याचें सेवन करितात, जे द्रव्य खर्चून घेतात तें मरण पावतात ! ३५. कर्ता [ कर्तृत्वाहंकार धारण करणारा तो प्रयत्नानें फलाशा न धरतां ] कर्म करो ! अथवा अकर्ता [ कर्तृत्वाहंकार विमुक्त, सहजच फलाशा विमुक्त तो ] फलाशा न धरतां सहज कर्म करो ! त्या दोघांसहि केवळ कर्म बांधू शकत नाहीं [ किंवा कर्म करणें दोघांसहि अनावर आहे. चुकत नाहीं ] ३६. वाटेवरील वृक्षाच्या पिकलेल्या फळाची जो इच्छा करितो, त्यासच तें फळ बंधनकारक होतें, तसें साधारण कर्माच्या फळाची जो इच्छा करील त्यास ते बंधनकारक होतें ३७. परंतु कर्म करून जो फलाची आशा करीत नाहीं, तो जगाच्या [ जन्ममृत्यूंच्या ] घडामोडीच्या सपाट्यांत

१ अडाणी. २ मातीला कंटाळून. ३ कसें. ४ कंटाळणें. ५ मग. ६ कपाळ. ७ योग्य, बरें. ८ झालें. ९ प्रकार.

रिघे । जे त्रिविध जग अवघें । कर्मफळ हें ॥ ३८ ॥ देव मनुष्य स्थावर । यया नांव जगडंबर । आणि हें तंव तिन्ही प्रकार । कर्मफळांचे ॥३९॥ तेंचि एक गा अनिष्ट । एक तें केवळ इष्ट । आणि एक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसें ॥ २४० ॥ परी विषयंमंतीं बुद्धी । आंगीं सूनि अविधी । प्रवर्तती जे निषिद्धीं । कुव्यांपारीं ॥ ४१ ॥ तेथ कृमि कीट लोष्ट । हे देह लाहती निकृष्ट । तया नाम तें अनिष्ट । कर्मफळ ॥ ४२ ॥ कां स्वधर्मा मानु देतां । स्वाधिकारु पुढां सूतां । सुकृत कीजे पुसतां । आम्नायातें ॥४३॥ तैं इंद्रादिक देवांचीं । देहें लाहिजेंती सव्यसाची । तया कर्मफळा इष्टाची । प्रसिद्धि गा ॥ ४४ ॥ आणि गोड आंबट मिळे । तेथ रसांतर फरसोळें । उंठी दोहीं वेगळें । दोहीं[१४] जिणतें ॥ ४५ ॥ रेचंकुचि योगवशें । होये स्तंभावयोंदोषें । तेवीं सत्यासत्य समरसें । सत्यासत्यचि जिणिजे[१८] ॥ ४६ ॥ म्हणौनि समभागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानांचें उंभें । तेणें मनुष्यत्व लाभे । तें मिश्र फळ ॥ ४७ ॥ ऐसें त्रिविध यया भागीं । कर्मफळ मांडलेंसे जगीं । हें न सांडी तयां भोगीं । जें सूदले आशा ॥ ४८ ॥ जेथें जिव्हेचा हातु फांटे । तंव जेवितां वाटे गोमटें । मग परिणामीं शेवटें । अवश्य मरण ॥ ४९ ॥ संवचोरमैत्री चांग । जंव न पविजे तें दांग । सामान्या भली आंग । न शिवे तंव ॥ २५० ॥ तैसीं कर्में करितां शरीरीं । लाहती महत्त्वाची फरारी । पाठीं निधनीं एकसरी । पावती फळें ॥ ५१ ॥ जैसा समर्थु आणि ऋणिया । मागों आला बाइणिया । न लोटे तैसा प्राणिया । पडे तो भोगु ॥ ५२ ॥ मग कणिसौनि कणु झडे । तो विरूढला कणिसा चढे । पुढती भूमी पडे । पुढती उठी ॥ ५३ ॥ तैसें भोगीं जें फळ होय । तें फळांतरें वीत जाय । चालतां पावो पाय । जिणिजे जैसा ॥ ५४ ॥ उताराचिये सांगडी । ठाके ते ऐलीच थडी । तेवीं न मुकिजती वोढी । भोग्याचिये ॥ ५५ ॥ पैं साध्य-साधनप्रकारें । फळभोगु तो पसरे । एवं गोंविले संसारें । अत्यागी ते ॥ ५६ ॥ एऱ्हवीं जाईचियां फुलां फांकणें । त्याचि नाम जैसें सुकणें । तैसें कर्ममिषें न करणें । केलें जिहीं ॥ ५७ ॥ बीजाचि वरोसि वेंचे । तेथ वाढती कुळवाडी खांचे । तेवीं फळत्यागें कर्मांचें । सारिलें काम ॥ ५८ ॥ ते सत्त्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपामृत-तुषारें । सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥ ५९ ॥ तेव्हां जगदाभासमिषें ।

सांपडत नाहीं. कारण, हें तीन प्रकारचें जग हें अवघें कर्माचें फल आहे. ३८. देव, मनुष्य व स्थावर यालाच जगडंबर, असें नांव आहे आणि हे तिन्ही प्रकार तर प्रत्यक्ष तीन कर्म फळेंच आहेत. ३९. तेंच कर्मफळ एक अनिष्ट [ प्रतिकूल ] आहे, एक तें केवळ इष्ट [ अनुकूल ] आहे आणि एक इष्टानिष्ट असें मिश्र आहे; असें तीन प्रकारचे कर्मफल आहे; २४०. परंतु जे विषयासक्त बुद्धीचें आहेत, अविधीचा व स्वैराचाराचा अंगीकार करून अंगवळणी पाडून निषिद्ध अशा वाईट कर्मामध्यें प्रवृत्त होतात; ४१. तेव्हां त्यायोगें कृमि, कीटक अथवा मातीचे ढेकूळ असे हे वाईट देह त्यास पावतात, त्याला ' अनिष्ट कर्मफल ' असें नांव आहे ४२. किंवा स्वधर्माला मान देऊन आपल्या अधिकारानुरूप वेदांस विचारून त्यांनीं सांगितल्याप्रमाणें जेव्हां सुकृत-पुण्यकर्म केलें जाते ४३. तेव्हां अर्जुना ! त्यांना इंद्रादिक देवतांचे देह प्राप्त होतात; त्या कर्मफलाला ' इष्ट कर्म फल ' असें म्हणतात ४४. आणि जेव्हां गोड-मधुर व आंबट ही एकत्र मिश्रण होत असते तेव्हां तेथें गोड व आंबट या दोही रसांहून निराळ्या रुचीचा, पण त्या दोहींस स्वाद दृष्ट्या मागे सारणारा, वरचढ असा भिन्न रुचीचा तिसराच रस उत्पन्न होतो ४५. किंवा बाहेर सोडण्याचा प्राणवायूच योगाभ्यासानें दाबून धरला असतां तोच त्याहून उलट लक्षणाच्या कुंभकास कारणीभूत होतो, त्याप्रमाणें सत्य व असत्य याचे मिश्रण झालें म्हणजे ते त्या दोहोंनाहि जिंकण्यास कारणीभूत [ असणारे ] तिसरेच निर्माण होते ४६. म्हणून शुभ व अशुभ कर्में समभाग मिळून जें कर्मानुष्ठान घडतें, त्याचें योगानें मनुष्यपणानें युक्त देहाचा लाभ होतो हेंच ते मिश्रफल होय ४७. या जगांत असें तीन प्रकारचें कर्मफल मांडलेलें आहे; जे भोगाच्या आशेंत सांपडले आहेत त्यांस हे कर्मफल सोडीत नाहीं ४८. जिभेचें रुचि घेणें जसजसें वाढत जातें, तसतसें पदार्थ जेवतांना समाधान वाटत असतें; पण शेवटीं त्याचा परिणाम म्हणजे [ अजीर्ण, रोगद्वारां ] अवश्य मरणाची प्राप्ति, हा होय ४९. जोंपर्यंत अरण्य लागलें नाहीं, तोपर्यंतच संभावित चोराची मैत्री चांगली किंवा वेश्येचा जोंपर्यंत अंग स्पर्श झाला नाहीं, तोंपर्यंतच ती वेश्या चांगली २५०. त्याप्रमाणें देहांत आहेत तोंपर्यंत कर्में करीत असतां कर्तेपणाच्या गर्वास प्राप्त होतात, परंतु शेवटीं मरणानंतर त्यास केलेल्या कर्मांची फळें एकसारखी भोगावयास प्राप्त होतात ५१. जसा समर्थ असून ज्याचेजवळ ऋण काढलला सावकार आहे, तो वायद्याच्या मुदतीस पैसे मागण्यास आला तर तो जसा पैसे घेतल्याविना परत जात नाहीं [ त्यास नाहीं म्हणवत नाहीं ] त्याप्रमाणें प्राणिमात्राला कर्माचें फलाचा भोग भोगणें भाग पडतें. [ त्याविना त्या कर्मफलांतून सुटका नाहीं ] ५२. मग कणसांतून बीजकण खालीं पडते, तो कण उगवला म्हणजे पुनः त्याला कणीस येतें व पुनः त्या कणसांतील दाणे भूमीवर पडतात, पुनः त्या दाण्यापासून कणसें उत्पन्न होतात [ असा अविरत क्रम सुरू होतो ] ५३. तसें मागील कर्मफल [ शरीरद्वारां ] भोगीत असतांना जी [ रागद्वेष मूलक ] कर्में होतात तीं आणखी दुसऱ्या कर्मफलांस प्रसवत राहतात. वाट चालूं लागले असतां एक पाय दुसऱ्या पायास जिंकीत पुढें जात असतो ५४. उताराची होडी एका तीराहून दुसऱ्या तीरास जाऊन लागून थांबते ते तीर म्हणजे तिला अलिकडलाच कांठ होय, कारण, प्रत्येक तीरास तिला पलीकडेपणा आहेच, म्हणून पुनः दुसऱ्या तीरास वाहून न्यावयाचे असते तसा भोग्यरूप कर्मफलाच्या उपभोगाच्या प्रयासांतून कधींहि सुटका होत नाहीं ५५. हें बघ, साध्य [ कर्मफल ] आणि त्याचें साधन [ कर्म ] अशा क्रमानें कर्मफलाचा भोग एकसारखा वाढत असतो व कर्म फलेच्छेचा जे त्याग न करणारे. आहेत ते याप्रमाणें संसार चक्रांत गोंवले जातात ५६. एव्हवी जाईच्या फुलांचें ज्याप्रमाणें उमलणें-प्रफुल्लीत होणें म्हणजे तत्क्षणीं त्या फुलांचें सुकणें होय त्याप्रमाणें कर्माचरण करण्याच्या निमित्तानें ज्यानें [ कर्तृत्वमद, फलास्वाद टाकल्यामुळें ] तें कर्म जणुं केलें नाहीं असें केलें ५७. बीजाकरितां ठेवलेलें धान्य जेव्हां दररोजच्या पोटगीस खर्च केलें जाते तेव्हां मग पुढें वाढणारा शेतकीचा-पेरण्याचा व्यवहार जसा बंद पडतो, तसें कर्मफलाच्या त्यागानें ज्यानें कर्माचें काम [ कर्मापासून प्राप्त होणारे जन्ममृत्यु इत्यादि फलें ] सारलें, संपविलें आहे ५८. अंतःकरण शुद्धीच्या साह्यानें व त्यांतहि गुरुकृपारूपी अमृताच्या तुषारानें सिद्ध झालेल्या, अभिव्यक्त झालेल्या आत्मबोधद्वारां त्यांचें द्वैतरूपी दैन्य पार नाहींसें होते ५९. मग जगत

१ वाईट. २ चांगलें. ३ विषयप्रिय. ४ शिरवून. ५ कुकर्मीं. ६ मातीचे ढेंकूळ. ७ पावतात. ८ ठेवितां, घालितां. ९ वेदाला. १० मिळतात. ११ मधुर. १२ भिन्न रुचीचें. १३ जिंकून. १४ मूळच्या दोहीं रसास जिंकणारें. १५ बाहेर सोडण्याचा प्राणवायू. १६ कुंभक होण्यास कारण होतो. १७ ऐक्यानें. १८ जिंकावें. १९ कर्में घडते.

स्फुरे तें त्रिविध फळ नाशे । येथ भोक्ता भोग्य आपैसें । निमालें हें ॥ २६० ॥ घडे ज्ञानप्रधानु हा ऐसा । संन्यासु जयां वीरेशा । तेचि फळभोग सोसों । मुकले गा ॥ ६१ ॥ आणि येणें कीर संन्यासें । जैं आत्मरूपीं दिठी पैसे । तैं कर्म एक ऐसें । देखणें आहे ? ॥ ६२ ॥ पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती । कां पाहालेया राती । आंधारे उरे ? ॥ ६३ ॥ जैं रूपचि नाहीं उभें । तैं साउली कवणाची शोभे ? । दर्पणेवीण बिंबे । वदन कें पां ? ॥ ६४ ॥ फिटलिया निद्रेचा ठावो । कैंचा स्वप्नासि प्रस्तावो ? । मग साच का वावो । कोण म्हणे ? ॥ ६५ ॥ तैसें गा संन्यासें येणें । मूळ अविद्येसीचि नाहीं जिणें । मा तियेचें कार्य कोणें । घेपे दीजे ? ॥६६॥ म्हणौनि संन्यासीं ये पाहीं । कर्माची गोठी कीजेल काई ? । परी अविद्या आपुलां देहीं । आहे जैं कां ॥ ६७ ॥ जैं कर्तेपणाचेनि थांवें । आत्मा शुभाशुभीं धांवे । दृष्टि भेदाचिये रांणिवे । रचलीसे जैं ॥ ६८ ॥ तैं तरी गा सुवर्मा । बिजांवळी आत्मया कर्मा । अपाडें जैसी पश्चिमा । पूर्वेसि कां ॥ ६९ ॥ नातरी आकाशा का आभाळा । सूर्या आणि मृगजळा । बिजावळी भूतळा । वायूसि जैसी ॥ २७० ॥ पांघरौनि नईचें उदक । असे नईचिमाजीं खडक । परी जाणिजे का वेगळिक । कोडीची ते ॥ ७१ ॥ हो कां उदकाजवळी । परी सीनीनीचि ते बाबुळी । काय संगास्तव काजळी । दीपु म्हणों ये ? ॥७२॥ जरी चंद्रीं जाला कलंकु । तरी चंद्रेसीं नव्हे एकु । आहे दृष्टी डोळ्यां विवेकु । अपाडु जेतुला ॥७३॥ नाना वाटा वाटे जातयां । वोघा वोघीं वाहातया । आरसा आरसां पाहातया । अपाडु जेतुला ॥ ७४ ॥ पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनिसीं कर्म सिनें । परी घेवविजे अज्ञानें । तें कीर ऐसें ॥ ७५ ॥ विकाशें रवितें उपजवी । द्रुती अलीकैरवी भोगवी । ते सरोवरीं कां बरवी । अब्जिनी जैसी ॥ ७६ ॥ पुढतपुढती आत्मक्रिया । अन्यकारणकाचि तैशिया । करूं पांचांही तयां । कारणां रूप ॥ ७७ ॥

पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे । सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥

आधि पांचही कारणें तियें । तूंही जाणसील विपायें । जें शास्त्रें उभऊनी बाहे । बोलती तयांतें ॥ ७८ ॥ वेदरायाचिया राजधानीं । सांख्यवेदांताच्या भुवनीं । निरूपणाच्या निशाणध्वनीं । गर्जती जियें ॥ ७९ ॥ जे सर्वकर्मसिद्धीलागीं । इयेंचि

प्रतीतीच्या निमित्तानें जे तीन प्रकारच्या कर्मांचे फल स्फुरते [ सर्व जग उत्पन्न होते ] तें जेव्हां आपोआप नाहींसे होते तेव्हां भोक्ता व भोग्यवस्तु हाहि व्यवहार आपोआपच लयास जातो २६०. हे विरेशा! ज्याच्या हातून अशा प्रकारचा ज्ञानप्रधान संन्यास [ कर्म त्याग ] होतो, तेच कर्मफल भोगाच्या होणाऱ्या [ जन्ममरणात्मक ] त्रासापासून मुक्त झाले ६१. आणि त्या कर्मफल संन्यासानेंच खरोखर जेव्हां आत्मरूपी दृष्टी पोहोंचते, तेव्हां [ मी कर्मकर्ता व ] कर्म हे एक निराळें आहे, असें दिसतें काय? ६२. चित्रें काढलेली भिंत पडून गेल्यावर भिंतीवरील चित्राची केवळ मातीच होत असते [ आश्रय नाशानें नाश होतो ] अथवा उजाडल्यावर रात्रीचा अंधार शिल्लक राहतो काय? ६३. जर शरीराकृतीच उभी नसते, तेव्हां सांवली कसली शोभेल? आरशाविना आपले मुख कोठें प्रतिबिंबित होईल ६४. झोंपेचा ठाव ठिकाणा नाहींसा झाल्यावर स्वप्न प्रतीति–प्रसंग कोठून असणार! आणि मग तें स्वप्न खरें अथवा खोटें आहे असें कोण म्हणेल? ६५. त्याप्रमाणें या [ ज्ञानप्रमुख ] संन्यासामुळें जर मूळच्या अविद्येलाच जगणें, थारा मिळणें शक्य होत नाहीं; तर मग त्या अविद्येचे कार्य जें कर्म तें कोणीं करावे वा टाकावे? किंवा कर्मफलाचा कोणी उपभोग घ्यावा व द्यावा ६६. म्हणून ज्ञानप्रधान संन्यास केल्यावर कर्मांची गोष्ट कोठून बोलतां येणार? तर शक्य नाहीं; परंतु अज्ञान आपल्या देहांत जेव्हां वास करीत असते ६७. जेव्हां कर्तेपणाच्या बळानें आत्मा चांगलीं व वाईट कर्में करण्यास प्रवृत्त होतो व जेव्हां दृष्टीहि [ वृत्तीहि ] भेदाच्या ऐश्वर्यानें युक्त झालेली असते ६८. जसा पूर्व व पश्चिम यांचा संबंध नसतो. तेव्हांहि हे सुवर्मा अर्जुना! आत्मा व कर्म यांचा अत्यंत वेगळेपणा असल्यामुळें मुळींच संबंध नसतो ६९. आकाश व ढग, सूर्य आणि मृगजळ, पृथ्वी आणि वायु यांच्यांत संबंध जरी दिसला, तरी ते एकमेकांहून अत्यंत भिन्न असतात २७०. नदीचें पाणी अंगावर पांघरून घेऊन खडक नदींतच असतो; परंतु नदी व खडक त्या दोहोंत जसें कोडपट अंतर असतें; असें समज ७१. किंवा पाण्यावर असलेलें शेवाळें पाण्याच्या अगदीं जवळ असते, पण ते पाण्यापासून केव्हांहि वेगळेंच असते, काजळाचा दिव्याशीं संबंध असला तरीहि त्यामुळें काजळीला दीप म्हणतां येईल काय? ७२. जरी चंद्राला कलंक लागला आहे, तरी त्याचें चंद्राशीं एकरूपत्व नाहीं, तसेंच दृष्टि व डोळे [ गोलकें ] यामध्यें जितका भेद, विलक्षण अंतर आहे ७३. अथवा वाट व वाटेनें चालणारा वाटसरू, नदीचा ओघ व ओघांत वाहणारें पाणी, आरसा व आरशांत पाहणारा मनुष्य यांच्यांत जितका विलक्षण भेद आहे ७४. तितक्याच मानानें आत्म्याहून कर्म वस्तुतः भिन्न आहे; परंतु अर्जुना! अज्ञानामुळें जे कर्म आत्म्याचे ठिकाणीं आहे, असें भासतें तें तत्त्वतः असें [ अत्यंत विलक्षण ] आहे ७५. जशी सरोवरांतील कमलिनी आपल्या विकसित होण्यानें रवीचा उदय झाला असल्याचे सुचवित असते व आपल्यांतील मकरंदाचा भ्रमराकडून उपभोग घेवविते ७६. तशीं आत्म्याच्या ठिकाणीं मिथ्या दिसणारी क्रियाकर्में वस्तुतः अन्य कारणांकडूनच उत्पन्न होतात, असें मी वारंवार सांगत आहे, तीं कारणें पांच आहेत. त्यांचीं स्वरूप लक्षणें तुला सांगतो ७७.

**अन्वयार्थ**—**महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना!–**सर्व कर्मणां सिद्धये**—सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं–**सांख्ये कृतांते**—कर्मांची ज्यांत परिसमाप्ति होते त्या वेदान्तांत **प्रोक्तानि**-सांगितलेलीं–**एतानि पंच कारणानि**—हीं पांच कारणें–**मे निबोध**—तूं माझ्यापासून समजून घे १३.

तीं कर्मांची पांच कारणें तूंहि कदाचित् जाणत असशील, कारण, ज्याविषयीं शास्त्रें बाहू उभारून [ स्पष्टरूपानें ] त्या कारणाचें वर्णन करीत आहेत ७८. तीं वेदराजाच्या राजधानींत असलेल्या सांख्य व वेदांतरूपी मंदीरांत निरूपणरूपी नौबदीच्या ध्वनिद्वारां [ तीं कारणें ] गाजत [ प्रसिद्ध ] आहेत ७९. कारण, सर्व कर्मांची सिद्धि होण्याकरितां या जगांत हीं पांचच मुख्य कारणें अवश्य आहेत असें असल्यामुळें त्या कर्मांचे कारणांतर्गतच असंग आत्मराजा आहे, असें

१ आपोआप. २ हांवेला, दुःखाला. ३ दृष्टि. ४ पोचतें. ५ उजाडल्यावर. ६ सांवली. ७ कशाची. ८ कोठें. ९ संपल्यावर. १० प्रसंग. ११ मिथ्या. १२ अज्ञानाला. १३ घ्यावें व द्यावें. १४ वार्ता. १५ अज्ञान. १६ बळानें. १७ ऐश्वर्यानें. १८ दुजेपण. १९ पुष्कळ, अत्यंत. २० नदीचें. २१ कोडपटीची. २२ निराळीच. २३ शेवाळ. २४ विलक्षण अंतर. २५ वाटसरूला. २६ भिन्न. २७ प्रफुल्लितपणानें. २८ मकरंद. २९ भ्रमराकडून. ३० कमळिनी. ३१ आत्म्याच्या ठिकाणीं असलेलीं कर्में. ३२ पूर्वींच्या ओवींत जशी कमल क्रिया अन्यकारण आहे तशी.

मुंहलें हो जगीं । तेथ नें[2] सुवावा अभंगीं[3] । आत्मराजु ॥ २८० ॥ ह्या बोलाची डांगुरटी[4] । तियें प्रसिद्धीचि आली किरीटी । म्हणौनि तुझ्या हन कर्णपुटीं । वसों हें काज ॥ ८१ ॥ आणि मुखांतरीं आइकिजे । तैसें कायसें हें ओझें । मी चिद्रत्न[5] तुझें । असतां हातीं ॥ ८२ ॥ दर्पणुं[6] पुढां मांडलेया । कां लोकांचिया डोळयां । मानु द्यावा पहावया । आपुलें निकें[7] ॥ ८३ ॥ भक्त जैसेनि जेथ पाहे । तेथ तें तेंचि होत जाये । तो मी तुझें जाहालों आहें । खेळणें आजी ॥ ८४ ॥ ऐसें हें प्रीतीचेनि[8] वेगें । देवो बोलतां से[10] नेघे[11] । तंव आनंदामाजीं आंगें । विरंतसे येरु ॥ ८५ ॥ चांदिणियाचा पडिभरु[12] । होतां सोमकांताचा डोंगरु । विघरोनि[13] सरोवरु । हों पाहे जैसा ॥ ८६ ॥ तैसें सुख आणि अनुभूती[14] । या भावांची मोडूनि भिंती । आतलें[15] अर्जुनाकृती । सुखचि जेथ ॥ ८७ ॥ तेथ समर्थु म्हणौनि देवा । अवकाशु जाहला आठवा । मग बुडतयाचा धांवा । जीवें केला ॥ ८८ ॥ अर्जुना येसणें[16] धेंडें[17] । प्रज्ञा[18] पसरेंसीं बुडे । आलें भरतें एवढें । तें काढूनि पुढती ॥ ८९ ॥ देवो म्हणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा । तंव श्वासूनि[19] येरें माथा । तुकियेलें[20] ॥ २९० ॥ म्हणे जाणसी दातारा । मी तुजशीं व्यक्तिशेजारा[21] । उबगला[22] आजी एकाहारा[23] । येवों पाहें ॥ ९१ ॥ तयाही हा ऐसा । लोभें देतसां[24] जरी लोलसा[25] । तरी कां जी घालीतसां । आड[26] आड जीवा ? ॥ ९२ ॥ तेथ श्रीकृष्ण म्हणती निकें[27] । अद्यापि नाहीं मा ठाउकें । वेड्या चंद्रा[28] आणि चंद्रिके । न मिळणें आहे ? ॥ ९३ ॥ आणि हाही बोलोनि भावो । तुज दाऊं आम्ही भिवों[29] । जे रुसतां बांधे थांवो[30] । तें प्रेम गा हें ॥ ९४ ॥ एथ एकमेकांचिये खुणें[31] । विसंवादु[32] तंवचि जिणें[33] । म्हणौनि असो हें बोलणें । इयेविषयींचें ॥ ९५ ॥ मग कैशी कैशी ते आतां । बोलत होतों पंडुसुता । सर्व कर्मां भिन्नता । आत्मेनिसीं ॥ ९६ ॥ तंव अर्जुन म्हणे देवें । माझिये मनींचेंचि स्वभावें । प्रस्ताविलें[34] बरवें । प्रमेय[35] तें जी ॥ ९७ ॥ जें सकळ कर्मांचें बीज । कारणपंचक तुज । सांगेन ऐसी पैज । घेतली कां ॥ ९८ ॥ आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा लागु[36] नाहीं । हे पुढारलासि[37] ते देईं । लाहाणें[38] माझें ॥ ९९ ॥ यया बोला विश्वेशें । म्हाणितलें तोषें बहुवसे । इयेविषयीं धरणें बैसे । ऐसें[39] कें जोडे ? ॥ ३०० ॥ तरी अर्जुना निरूपिजेल । तें कीर भाषेआंतुल । परी मेचुं[40] ये होईजेल । ऋणिया तुज ॥ १ ॥ तंव अर्जुन म्हणे देवो । काई विसरले मागील

समजूं नये २८०. अर्जुना ही कर्मकारणें आहेत अशी शास्त्रांनीं दवंडी पिटल्यानें तीं चहूंकडे प्रसिद्धीस आलेलीं आहेत म्हणून ती कारणें तुझ्या कानांवर असूं देत [ उपयोग होईल] ८१. आणि मी ज्ञानरूपी रत्न तुझे हातीं-स्वाधीन असल्यावर, दुसऱ्याचे तोंडांतून तूं ही गोष्ट ऐकावीस, इतकी अडचण तुला कशास पाहिजे ? ८२. अरे ! आपल्या समोर आरसा मांडल्यावर आपलें रूपसौंदर्य पाहण्यासाठीं लोकांच्या डोळ्यांना [ माझें रूप कसें दिसतें तें मला सांगा, अशी ] मानानें विनंति कां करावी लागते ? ८३. भक्त ज्या भावनेनें जेथें पाहील, त्या ठिकाणीं त्याच्या भावनेनुसार तशी ती वस्तु मीच होत असतो, असा जो मी तो आज तुझ्या हातचे खेळणें झालों आहे. [ परिपूर्ण स्वाधीन झालों आहे ] ८४. असें प्रेमाच्या भरांत देव बोलत असतां भुलून गेलें व त्यांना स्वतःची आठवणच राहिली नाहीं, तों इकडे पार्थहि तसाच आनंदांत निमग्न होऊन देह-भानरहित होऊं लागला ८५. पौर्णिमेच्या चांदण्यांचा भर सोमकांत मण्याचा डोंगरावर पडला असतां तो पाझरून त्याचें जसें सरोवर व्हावयास लागते ८६. त्याप्रमाणें सुख व त्याची अनुभूति, अशा या द्वैत भावांची भिंत मोडून नाहींशी होऊन जेव्हां निखळ सुखच अर्जुनाच्या आकारानें झाल्याचें दिसूं लागलें; ८७. तेव्हां देव सर्व समर्थ असल्यामुळें देह स्मृतीवर येण्यास त्यांस शक्य झाले व मग त्यांनीं सुखाचें समुद्रांत बुडणाऱ्या अर्जुनाची कींव केली, [ अर्जुनास देहभानावर आणण्याचा प्रयत्न केला ] ८८. अर्जुना एवढे थोर प्रस्थ असूनहि तो आपल्या बुद्धीच्या प्रसरासह आनंदांत बुडूं लागला होता, एवढें प्रेमास—आनंदास भरतें आलें होतें, तें बाजूला सारून त्यांतून त्यास बाहेर काढून नंतर ८९. देव म्हणाले अरे ! "पार्था ! तूं आपले स्वरूप पाहून चांगला शुद्धीवर ये" तेव्हां उसासा टाकून अर्जुनानें मस्तक डोलविले [ देह स्मृतीवर आला ] २९०. आणि तो म्हणतो कीं, "हे प्रभो ! तूं जाणतोसच कीं, तुझ्याहून उपाधिसंबंधानें [ द्वैतभावानें येणाऱ्या ] व्यक्ति सान्निध्याला, संगतीला कंटाळलेला जो मी तो आज आपल्या ऐक्यास येऊं पाहात आहे ९१. त्या माझीहि तुम्ही जर प्रेमानें, कौतुकानें इच्छा पूर्ण करीत असाल तर मग त्या ऐक्य होण्यास मध्येंच मला जीवदशेस आणून अडथळा कां घालीत आहांत ? ९२. तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात कीं, "अरे वेड्या ! खरोखर [ आपले स्वरूपतः ऐक्य आहेच हे ] तुला अजून माहीत नाहीं काय ? कीं, चंद्र आणि त्याची प्रभा यांचा कधीं वियोग घडतो काय ? ९३. आणि असा हा एकतेचा अभिप्राय तुला बोलून दाखविण्यास आम्हांस भीति वाटते, कारण आवडीचे कोणी रुसले म्हणजे प्रेम अधिक बळकट होत असते. तसेंच हें मला तुझ्या विषयींचे प्रेम आहे ९४. प्रस्तुत उपाधितः वेगळेपणानें, एकमेकांचे खुणेनें परस्परांस जोपर्यंत बोलणें आहे तोपर्यंतच आपले संवा-दाच्या आनंदानें जगणें शक्य आहे, म्हणून याविषयीं आतां वादविवाद पुरे. [ पारमार्थिक ऐक्य सदाचेच आहे ] ९५. मग अर्जुना ! आपण कसें काय बरें बोलत होतो कीं, सर्व कर्में हीं आत्म्याहून भिन्न आहेत, हें असेंच ना बोलत होतो ?" ९६. तेव्हां अर्जुन म्हणाला, "देवांनीं माझ्या मनांत असलेलें जे बरवे तात्पर्य तेंच सांगण्यास स्वाभाविकपणें आरंभ केला आहे ९७. सर्व कर्मांस बीजभूत-कारणीभूत, अशी जी पांच कारणें 'तीं तुला मी सांगेन' अशी जी आपण प्रतिज्ञा केली ९८. आणि आत्म्याचा कर्म कारणांशीं व कर्मांशीं कांहीं एक संबंध नाहीं, असें जें तुम्हीं बोलला होता तो माझा आवडता विषय मला सांगा" ९९. हें बोलणें ऐकून विश्वेश भगवान् अतिसंतोषानें म्हणाले "याविषयीं तूं धरणें घेऊन बसलास, असा जिज्ञासापूर्वक विचारणारा आम्हांला तरी मिळतो आहे कोठें ? ३००. तर अर्जुना ! आतां तुला खरोखर सोप्या भाषेंत तो सिद्धांत सांगतों; पण तुला या प्रेमाचें ऋणी मात्र व्हावें लागेल १. तेव्हां अर्जुन म्हणाला, हे देवा ! आपणच मागील बोललेल्या गोष्टीचा अभिप्राय इतक्यांत

---

१ मांडवलें. २ न घालावा. ३ मध्यें. ४ दीठीनें. ५ दुसऱ्या तोंडून. ६ ज्ञानरस. ७ आरसा. ८ रूप. ९ प्रेमाच्या. १० आठवण. ११ विरघळला, निमग्न झाला. १२ भर. १३ पाझरून. १४ अनुभव. १५ दिसूं लागलें व्यापलें, झालें. १६ एवढें. १७ थोर. १८ बुद्धीच्या प्रसारा-सह. १९ उसासा टाकून. २० डोलविला. २१ वेगळ्या. व्यक्तिसान्निध्याला. २२ त्रासून. २३ एकत्वास. २४ देतां. २५ लाभ, कौतुक. २६ प्रतिबंधक. २७ खरे. २८ प्रमेस. २९ भितो. ३० बळ, ठिकाण. ३१ वर्म. ३२ विरोध. ३३ वाचणें. ३४ सांगण्यास आरंभ केला. ३५ अर्थ, तात्पर्य. ३६ संबंध. ३७ बोललास. ३८ ऐवज देणें. ३९ कोठें. ४० शब्दाचें वर्म, सिद्धांत. ४१ प्रीति, आवड.

भावो ? । इये गोंठीस कीं राखत आहों । मीतूंपण जी ? ॥ २ ॥ एथ श्रीकृष्ण म्हणती हो कां । आतां अवधानाचा पसरु निका । करूनियां आइका । पुढारलें तें ॥ ३ ॥ तरी सत्यचि गा धनुर्धरा । सर्व कर्मांचा उभारा । होतसे बाहिर-बाहिरा । करणीं पांचें ॥४॥ आणि पांच कारण दळवाडें । जिहीं कर्माकारु मांडे । ते हेतुस्तव घडे । पांच आथी ॥५॥ येर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादानें । ना तें अंगें करी संवाहन । कर्मसिद्धीचें ॥ ६ ॥ तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजती कर्में ऐसीं । राती दिवो आकाशीं । जियापरी ॥७॥ तोयें तेजें धूंमु । ययां वायूसीं संगमु । जालिया होय अभ्रागमु । व्योमें तें नेणें ॥ ८ ॥ नाना काष्ठीं नाव मिळे । ते नावाडेंनि चळे । चालविजे अनिळें । उदक तें साक्षी ॥ ९ ॥ कां कवणें एकें पिंडें[11] । वेंचितां अवतरे भांडें । मग भवंडीजे दंडें । भ्रमे चक्र ॥ ३१० ॥ आणि कर्तृत्व कुलालाचें । तेथ काय तें पृथ्वीयेचें । आधारावांचूनि वेंचे । विचारीं पां ॥ ११ ॥ हेंही असो लोकांचिया । राहाटी होतां आघविया । कोण काम सेवितया । आंगा आलें ? ॥ १२ ॥ तैसें पांचहेतुमिळणीं । पांचेंचि इहीं कारणीं । कीजे कर्मलतांची लावणी । आत्मा सिनो ॥ १३ ॥ आतां तेंचि वेगळालीं : पांचही विवंचू[12] गा भलीं । तुंकोनि घेतलीं । मोतियें जैसीं ॥ १४ ॥

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् । विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवाऽत्र पञ्चमम् ॥ १४ ॥

तैसीं यथा लक्षणें । आइकें कर्म-कारणें । तरी देह हें मी म्हणें । पहिलें एथ ॥ १५ ॥ ययातें अधिष्ठान ऐसें । म्हणिजे तें याचि उद्देशें । जे स्वभोग्येंसीं वसे । भोक्ता येथ ॥ १६ ॥ इंद्रियांच्या दोंहें हातीं । जोंचोनियां दिवोरांती । सुखदुःखें प्रकृती । जोडीजती जियें ॥ १७ ॥ तियें भोगावया पुरुखा । आन ठावोचि नाहीं देखा । म्हणौनि अधिष्ठानभाखा । बोलिजे देह ॥ १८ ॥ हें चोविसांही तत्त्वांचें । कुटुंबघर-वस्तीचें । तुटे बंधमोक्षाचें । गुंथाडे एथ ॥ १९ ॥ किंबहुना अवस्थात्रया । हें अधिष्ठान धनंजया । म्हणौनि देहा यया । हेंचि नाम ॥ ३२० ॥ आणि कर्ता हें दुजें । कर्माचें कारण जाणिजे । प्रतिबिंब म्हणिजे । चैतन्याचें जें ॥ २१ ॥ आकाशचि वर्षे नीर । तें तळवटीं बांधे डाबर । मग बिंबोनि तदाकार । होय जेवीं ॥२२॥ कां निद्राभरें बहुवें । राया आपणपें ठाउवें नव्हे । मग स्वप्नींचिये सामावे ।

विसरुन गेलांत काय? आणि विसरला नसाल तर महाराज अर्जुन मी व तूं हें द्वैत आपल्या भाषणांत आपण ठेवलेतच कीं? २. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, असें आहे काय? मी जी गोष्ट तुला सांगतों म्हणून सुरुवात केली होती, ती आतां सांगतों, अवधानाचा चांगला विस्तार करून एकाग्र चित्तानें ऐक ३. तर हे धनुर्धरा! खरोखरच सर्व कर्मांची उभारणी या पांच कारणांनीं [ आत्म्याहून ] बाहेरच्या बाहेर, परभारे होते ४. आणि ज्या या पांच कारणाच्या समुदायामुळें जी कर्माची सुरुवात होते, तींच पांच कारणें त्या कर्मास हेतु होण्यास्तव ते हेतूहि पांचच आहेत ५. त्याहून वेगळा जो आत्मा आहे तो उदासीन-अलिप्त असून कर्मोत्पत्तीस निमित्तकारण किंवा उपादानकारणहि तो होत नसतो. अथवा तो स्वतः कर्मसिद्धीला [ तडीस नेण्यास ] सहाय्यहि करीत नाहीं ६. ज्याप्रमाणें रात्र व दिवस आकाशांत उत्पन्न झालीं तरी आकाश त्याहून जसें वेगळें असते. त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचे ठिकाणीं शुभ अथवा अशुभ अशीं उभय स्वरूपाचीं कर्मे उत्पन्न होत असलीं तरी आत्मा असंग होण्यास्तव त्याहून अलिप्त आहे ७. पाणी व तेज यांपासून उत्पन्न होणाऱ्या वाफेचा वायूशीं संबंध झाला म्हणजे ती आकाशांत जाऊन त्यापासून ढगांची निर्मिति होते; तरीपण आकाशास जशी ही गोष्ट माहीतहि नसते ८. पुष्कळ लांकडें एकत्र जोडून नाव तयार केली जाते व ती नाव नावाड्याकडून पाण्यावर ढकलली जाते. व वाऱ्याच्या साहाय्यानें चालविली जाते; परंतु त्या ठिकाणीं उदक जसें कांहींएक न करितां [ त्या सर्व व्यवहारांस ] साक्षीभूत, आधारभूत असते ९. कोण्या एका मातीच्या गोळ्यानें खर्चीं पडून ज्या चक्रावर तो गोळा ठेवून दांड्यानें चाकाला फिरविल्यावर ते चाक फिरत राहते, त्यांतून भांडें-गाडगें तयार होते ३१०. आणि त्या चिखलाच्या गोळ्यास मडक्याचा आकार देण्याचें काम कुंभार करतो. या मडके बनविण्यांत भांड्यास एका आधारावांचून पृथ्वीचे दुसरें काय खर्च होते याचा विचार कर बरें! ११. हेंहि असो; परंतु जगांतील लोकांचे सर्व व्यापार सूर्यप्रकाशानें चालत असतांहि साक्षात सूर्याकडे कोणत्या कार्याचे कर्तृत्व आले [त्यापासून तो अगदीं अलिप्त असतो] १२. त्याचप्रमाणें पांच कारणें एकत्र मिळाल्यावर त्याकडून सर्व कर्मरूप वेलीची मांडणूक-लावणी केली जाते त्यांत आत्मा हा [ त्या कारणांहून व क्रियांहून ] अत्यंत वेगळाच असतो १३. मोत्यें ज्याप्रमाणें अचूक वजन करून घ्यावीं लागतात त्याप्रमाणें आतां तींच पांच कारणें चांगल्या प्रकारें वेगवेगळालीं खुलासेवार वर्णन करून सांगतों १४.

**अन्वयार्थ**--**अधिष्ठानं**-शरीर-**तथा कर्ता**-तसाच कर्ता- 'मी' असें म्हणणारा-**च पृथग्विधं करणम्**-आणि नाना प्रकारचे श्रोत्रादिक इंद्रियजात-**च विविधाः पृथक् चेष्टाः**- आणि नाना पृथक् पृथक् प्राणादिकांच्या चेष्टा-**च**-आणि-**अत्र**-या चार कारणांत-**दैवम् एव पंचमम्**-इंद्रियांवर अनुग्रह करणारें आदित्यादि दैवत हें पांचवें १४.

त्याप्रमाणें, तीं कर्माची सर्व कारणें त्याच्या यथार्थ लक्षणास अनुसरून तुला सांगतों तीं ऐक. तर त्यांत देह हें पहिलें कारण होय, असें मी म्हणतों १५. या देहाला अधिष्ठान असें म्हणतात, त्याचे प्रयोजन-कारण इतकेंच कीं आपले भोग्य जे विषय, त्यांसहवर्तमान भोक्ता असा जीव येथें [ देहांत ] वास्तव्य करून राहतो १६. इंद्रियात्मक दहा हातांनीं रात्रंदिवस कष्ट सोसून प्रकृतीच्या योगानें जीं सुखें व दुःखें मिळविलीं जातात १७. तीं [ सुखदुःखें ] भोगण्याकरितां देहाशिवाय जीवास दुसरें ठिकाणच नाहीं, म्हणून देहाला 'अधिष्ठान' असें म्हणतात १८. चोवीस तत्त्वात्मक कुटुंबाचे वसतिस्थान म्हणजे हा देह आहे आणि बंध व मोक्ष यांच्या गुंतागुंतीचा उलगडा या देहांत होत असतो १९. फार काय सांगावें! अर्जुना! जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थांचे देह हेंच मुख्य आश्रयस्थान होय, म्हणून, या देहाला 'अधिष्ठान' हेंच नांव योग्य आहे ३२०. आणि कर्माचें दुसरें कारण 'कर्ता' हें होय असे जाणावें आणि ज्या कर्त्यांस-जीवास, चैतन्याचें प्रतिबिंब असें म्हणतात २१. आकाशांतूनच पाऊस पडल्यावर ते पाणी पृथ्वीवर खळग्यांत सांचून डबकें होत असते आणि मग त्यांत सर्वत्र व्यापक आकाशाचेंच प्रतिबिंब होऊन ज्याप्रमाणें तें प्रतिबिंब त्या डबक्याच्याच आकाराचें होतें २२. किंवा अतिशय

१ बोललों. २ परभारें बाहेरच्या बाहेर. ३ पांच सांधनांनीं. ४ स्वरूप. ५ निमित्त, कारण. ६ निमित्त. ७ साहाय्य. ८ दिवस. ९ पाणी. १० सूर्य. ११ वाफ. १२ ढग. १३ आकाश. १४. चालते. १५ मातीच्या गोळ्यानें. १६ आकारास येतें. १७ कुंभाराचें. १८ व्यापार, वागणुकी. १९ सूर्याच्या. २० पांच कारण मिळाल्यानें. २१ वेगळा साक्षी. २२ सांगूं. २३ वजन करून. २४ आधार. २५ दहा हातानीं. २६ कष्ट सोसून. २७ दिवस व रात्र.

रंकपणीं ॥२३॥ तैसें आपुलेनि विसरें। चैतन्यचि देहाकारें। आभासोनि आविष्करें। देहपणें जें ॥ २४ ॥ जया विसराच्या देशीं। प्रसिद्धि गा जीवु ऐसी। जेणें भाषें केली देहेंसी। आघवाविषयीं ॥ २५ ॥ प्रकृति करी कर्में। तीं म्यां केलीं म्हणें भ्रमें। येथ कर्ता येणें नामें। बोलिजे जीवु ॥ २६ ॥ मग पातेयांच्यां केशीं। एकीच उठी दिठी जैसी। मोकळी चवरी ऐसी। चिरीवं गमे ॥ २७ ॥ कां घराआंतुल एकु। दीपाचा तो अवलोकु। गवांक्षभेदें अनेकु। आंवडे जेवीं ॥ २८ ॥ कां एकुचि पुरुषु जैसा। अनुसरत नवां रसां। नवविधु ऐसा। आवडों लागे ॥ २९ ॥ तेवीं बुद्धीचें एक जाणणें। श्रोत्रादिभेदें येणें। बाहेरी इंद्रियपणें। फांके जें कां ॥ ३३० ॥ तें पृथग्विधं करण। कर्माचें इया कारण। तिसरें गा जाण। नृपनंदना ॥ ३१ ॥ आणि पूर्वपश्चिम-वाहणीं। निघालिया वोघाचिया मिळणी। होय नदी नद पाणी। एकचि जेवीं ॥ ३२ ॥ तैसी क्रियाशक्ति पवनीं। असे जे अनपायिनी। ते पडिली नानास्थानीं। नाना होय ॥ ३३ ॥ जैं वाचे करी येणें। तैं तेंचि होय बोलणें। हाता आली तरी घेणें। देणें होय ॥ ३४ ॥ अगा चरणाच्या ठायीं। तरी गति तेचि पाहीं। अधोद्वारीं दोहीं। क्षरणें तेचि ॥ ३५ ॥ कंदौनि हृदयेंवरी। प्रणवाची उजरी। करितां तेचि शरीरीं। प्राणु म्हणिजे ॥ ३६ ॥ मग ऊर्ध्वीचिया रिगांनिगा। पुढती तेचि शक्ति पैं गा। उदानु ऐसिया लिंगा। पात्र जाहली ॥ ३७ ॥ अधोरंध्राचेनि वाहें। अपानु हें नाम लाहे। व्यापकपणें होये। व्यानु तेचि ॥ ३८ ॥ आरोगिलेनि रसें। शरीर भरी सरिसें। आणि न सांडितां असे। सर्वसंधीं ॥ ३९ ॥ ऐसिया इया राहटीं। मग तेचि क्रिया पाठीं। समानु ऐसी किरीटी। बोलिजे गा ॥ ३४० ॥ आणि जांभई शिंक ढेंकर। ऐसैसा होतसे व्यापार। नाग कूर्म कृकर। इत्यादि होय ॥ ४१ ॥ एवं वायूची हे चेष्टा। एकीचि परी सुभटा। वर्तनास्तव पांलटा। येतसे जे ॥ ४२ ॥ ते भेदली वृत्तिपंथें। वायुशक्ति गा एथें। कर्मकारण चौथें। ऐसें जाण ॥ ४३ ॥ आणि ऋतु बरवा शारदु। शारदीं पुढती चांदु। चंद्रीं जैसा संबंधु। पूर्णिमेचा ॥ ४४ ॥ कां वसंतीं बरवा आरामु। आरामींही प्रियसंगमु। संगमीं आगमु। उपचारांचा ॥ ४५ ॥ नाना कमळीं पांडवा। विकासु जैसा बरवा। विकासींही यावा। परागाचा

निद्रेच्या भरानें राजा आपण आपल्यास व आपल्या ऐश्वर्यास स्मरत नाहीं, मग आपण भिकारी झालों आहोत असें स्वप्न पडते तेव्हां तो रंकपणाशीं समरस होतो ३२३. तसेंच आपलें स्वरूपाचा विसर पडल्यामुळें चैतन्यच देहाकारानें भासून प्रकट होते 'मी देहच आहें' असें मानावयास लागतो ३२४. ज्या देहांत आत्मरूपाचा विसर पडतो, तेथें चैतन्य 'जीव' या नांवानें प्रसिद्ध आहे व त्या [ चिदाभासरूप ] जीवानें देहाबरोबर सर्व विषयाविषयीं मी तुझा अभिमान कधींहि सोडणार नाहीं, असें प्रतिज्ञापूर्वक वचनच दिलें [ अलिखित करार केला ] आहे ३२५. देहादि प्रकृति जीं जीं कर्में करिते, तीं तीं कर्में म्याच केलीं असें जीव भ्रमानें म्हणतो, म्हणूनच जीवाला 'कर्ता' आहे, असें म्हणतात ३२६. मग ज्याप्रमाणें दृष्टि ही एकच एक अखंड असून पापण्याच्या केसांमधून बाहेर पडली असतां चवरीच्या केसांप्रमाणें चिरल्यासारखी दिसते ३२७. अथवा घरांत असलेल्या एकाच दिव्याचा प्रकाश वेगवेगळ्या झरोक्यांतून पाहिला असतां, जसे त्याचे अनेक दीपप्रकाश आहेत असें वाटते ३२८. किंवा एकच पुरुष, शृंगार, वीर, करुण इत्यादि नवरसानुगुण आविर्भाव दाखवूं लागला, म्हणजे तो जसा नऊ प्रकारचा आहे, असे वाटूं लागते ३२९. तसें बुद्धीचें एकच ज्ञान असून तें वेगवेगळ्या श्रोत्रादि इंद्रियांच्या–द्वारां निरनिराळेपणानें होऊन इंद्रियानुगुणच बाहेर पसरत असते ३३०. हे नृपनंदना ! तीं निरनिराळीं इंद्रियें ही या कर्माचें तिसरें कारण होय, असें समज ३३१. आणि जसें एकच पाणी पूर्वपश्चिमवाहिनी नद्यांच्या ओघांत मिळून वाहूं लागले असतां, तेंच पाणी नदी व नद या भिन्न भिन्न नांवानें ओळखलें जाते ३३२. तशी रजोगुणाची क्रिया [ कर्तृत्व ] शक्ति जी संपादन केल्याशिवाय प्राणवायूंत मूळचीच अखंड आहे, ती एकच शक्ति निरनिराळ्या अवयवांत वाटली म्हणजे निरनिराळ्या रूपानें भासते ३३३. म्हणजे जेव्हां ती [ क्रियाशक्ति ] वाचेंत येते व वाचाद्वारें बाहेर पडते, तेव्हां तीच 'बोलणें' होते, असें आपण म्हणतो, तीच हातांत येऊन, हस्तद्वारें बाहेर पडल्यावर घेण्यादेण्याचें व्यापाररूपानें प्रगट होते ३४. अरे, ती पायांत आली असतां गति तरी तीच होते असें समज व मलमूत्रद्वाराचे ठिकाणीं आली असतां क्षरणें-विसर्जन तरी तीच होय असें जाण ३५. नाभीकमलापासून हृदयापर्यंत ॐकाराची शरीरांत वृद्धि, अभिव्यक्ति करीत असते तेव्हां तिलाच 'प्राण' असें म्हणतात ३६. मग त्याच शक्तीच्या वरच्या श्वासोच्छ्वासाच्या रूपानें येण्याजाण्यामुळें त्याच शक्तीला 'उदान' [ कंठस्थ वायु ] असें नांव प्राप्त होतें ३७. व गुदद्वारानें बाहेर येऊं लागली म्हणजे 'अपान' हें नांव त्याच क्रियाशक्तीस प्राप्त होतें, आणि सर्व शरीरांतील व्यापकपणामुळें तीच शक्ति 'व्यान' नांवास पात्र झाली आहे ३८. खाल्लेल्या अन्नाचा रस सर्व शरीरांत समप्रमाणानें पसरून कोणताहि सांधा न सोडतां तीच सर्व सांध्यांमध्यें भरलेली असते ३९. अर्जुना, अशा व्यवहारामुळें याच क्रियाशक्तीस नंतर 'समान' वायू असें म्हणतात ३४०. आणि जांभई शिंक, ढेंकर वगैरे जे वायूचे व्यापार होतांत तेव्हा तीच क्रियाशक्ति नाग, कूर्म, कृकर इत्यादि नांवांनी उपप्राणांचें रूपानें प्रगट होते ४१. हे सुभटा ! याप्रमाणें वायूची क्रियाशक्ति ही एकच आहे व हे सर्व व्यवहारहि तिचेच कार्य आहे; तरीपण त्यांच्या त्यांच्या निरनिराळ्या क्रियात्मक वर्तनाप्रमाणें नांवांत, स्थानांत बदल होतो एवढेच ४२. अशी ती आपापल्या निरनिराळ्या व्यापारांमुळें निरनिराळी झालेली जी वायूची शक्ति तेच येथें कर्माचें चौथें कारण होय ४३. आणि सर्व ऋतूंमध्यें शरद्-ऋतूसारखा उत्तम ऋतु असून त्यांतहि उत्तम चंद्रोदय व्हावा व तशांत चंद्रास पौर्णिमेचा योग असावा ४४. अथवा वसंत ऋतु असून त्यांत उत्तम रमणीय बाग असावी व त्या बागेंत प्रिय मनुष्यांचा सहवास घडेल तर चांगलेच आणि तशा अवस्थेंत इतर सर्व उपचारांचीहि अनुकूलता लाभलेली असावी ४५. अथवा अर्जुना, कमल असून तेथें त्याचा विकास शोभादायक असतो.

१ प्रकटे. २ प्रतिज्ञा, शब्द देणें. ३ पापण्यांचा. ४ चिरल्याप्रमाणें. ५ अवलोकन. ६ झरोका इत्यादिकांच्या योगानें. ७ वाटे. ८ निरनिराळीं इंद्रियें. ९ पूर्व पश्चिम मार्गानें. १० रजोगुणाची कर्तृत्वशक्ति. ११ प्राणवायूंत. १२ अविनाशी. १३ मलमूत्रद्वारां. १४ टाकणें. १५ नाभीपासून हृदयापर्यंत. १६ ओंकाराची बुद्धि. १७ वरल्या रिघण्या निघण्यास. १८ कंठस्थ वायू. १९ चिन्हास. संज्ञेस. २० गुदद्वारानें. २१ गुदस्थ वायू. २२ व्यापक शरीरस्थ वायु. २३ भक्षिलेल्या, खाल्लेल्या रसानें. २४ नाभिस्थ वायु. २५ नागादि उपप्राण. २६ नाग, कूर्म, कृकर, देवदत्त व धनंजय हे उपप्राण ह्याची जांभई, शिंक, ढेकर, उचकी व शरीर फुगवणें हीं लक्षणें. २७ निराळेपणाला. २८ शरदृतु.

॥ ४६ ॥ वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्वं । रसिकत्वीं परतत्त्व- । स्पर्शु जैसा ॥ ४७ ॥ तैसी सर्ववृत्तिवैभवीं । बुद्धिचि एकली बरवी । बुद्धीही बरव नवी । इंद्रियप्रौढी ॥ ४८ ॥ इंद्रियप्रौढीमंडळा । शृंगारु एकुचि निर्मळा । जैं अधिष्ठात्रियां कां मेळा । देवतांचा जो ॥ ४९ ॥ म्हणौनि चक्षुरादिकीं दाहें । इंद्रियां पोठीं स्वानुग्रहें । सूर्यादिकां कां आहे । सुरांचें वृंद ॥ ३५० ॥ तें देववृंद बरवें । कर्म-कारण पांचवें । अर्जुना एथ जाणावें । देवो म्हणे ॥ ५१ ॥ एवं मांने तुझिये आयणी । तैसी कर्मजातांची हे खाणी । पंचविध आकर्णीं । निरूपिली ॥ ५२ ॥ आतां हेचि खाणी वाढे । मग कर्माची सृष्टि घडे । जिहीं ते हेतुही उघडे । दाऊं पांचै ॥ ५३ ॥

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः । न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

तरी अवसांत आली मांधवी । ते हेतु होय नवपल्लवीं । पल्लव पुष्पपुंज दावी । पुष्प फळातें ॥ ५४ ॥ कां वांर्षिये आणिजे मेघु । मेघें वृष्टिप्रसंगु । वृष्टिस्तव भोगु । सस्यसुखाचा ॥ ५५ ॥ नातरी प्रांची अरुणातें विये । अरुणें सूर्योदयो होये । सूर्यें सगळा पांहे । दिवो जैसा ॥ ५६ ॥ तैसें मन हेतु पांडवा । होय कर्मसंकल्पभावा । तो संकल्पु लावी दिवा । वाचेचा गा ॥ ५७ ॥ मग वाचेचा तो दिवटा । दावी कृत्य-जातांचिया वाटा । तेव्हां कर्ता रिगे कामठां । कर्तृत्वाच्या ॥ ५८ ॥ तेथ शरीरादिक दळवाडें । शरीरादिकां हेतुचि घडे । लोहकाम लोखंडें । निर्वाळिजे जैसें ॥ ५९ ॥ कां तांथुवाचा ताणा । तांथु घालितां वैरणा । तो तंतुचि विचक्षणा । होय पटु ॥ ३६० ॥ तैसें मनवाचादेहाचें । कर्म मनादि हेतुचि रचे । रत्नीं घडे रत्नाचें । दळवाडें जेवीं ॥ ६१ ॥ एथ शरीरादिकें कारणें । तेंचि हेतु केवीं हें कोणें । अपेक्षिजे तरी तेणें । अवधारिजो ॥ ६२ ॥ आइका सूर्याचिया प्रकाशा । हेतु कारण सूर्युचि जैसा । कां ऊंसाचें कांडें ऊंसा । वाढी हेतु ॥ ६३ ॥ नाना वाग्देवता वानावी । तैं वाचाचि लागे कामवावी । कां वेदां वेदेंचि बोलावी । प्रतिष्ठा जेवीं ॥ ६४ ॥ तैसें कर्मा शरीरादिकें । कारण हें कीर ठाउकें । परी हेंचि हेतु न चुके । हेंही एथ ॥ ६५ ॥ आणि देहादिकीं कारणीं । देहादि हेतु मिळणीं । होय जया उभारणी । कर्मजातां ॥ ६६ ॥ तें शास्त्रार्थें मांनिलेया । मार्गा अनुसरे धनंजया । तरी न्याय्य तो न्याया ।

व मग विकासांतहि पुष्परेणूचा उद्भव व्हावा; तो अधिक बरा ४६. एखाद्याचे वाणींत कवित्व असावें, हें चांगलेच आहे त्या कवित्वांत रसिकतेची भर असावी आणि त्या रसिकतेंत परमात्म तत्त्वांच्या वर्णनाच्या संबंधाची भर पडावी ४७. तसेंच, सर्व वृत्तीच्या ऐश्वर्यांत जशी एकटी जी बुद्धि, तीच उत्तम प्रकारची असून तशांत सर्व इंद्रियांच्या सामर्थ्याची त्या बुद्धीला अनुकूलता असावी; हें विशेष चांगले ४८. आणि इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवतांचा मेळावा, तोहि त्यांस अनुकूल असावा हेंच एक सुदृढ इंद्रिय समुदायास चांगलें भूषणच आहे. ४९. म्हणून चक्षुरादि दहा इंद्रियांच्या ठिकाणीं आपल्या अनुग्रहासह सूर्यादि देवदेवतांचा समुदाय आहे ३५०. तेंच 'दैव' म्हणजे देवांचा समुदाय हें या कर्माचें पांचवें चांगलें कारण आहे असें समज, असें देव म्हणतात ५१. याप्रमाणें तुझ्या बुद्धीस कळेल अशा रीतीनें सर्व कर्मांची पांच प्रकारच्या कारणाची खाणी तुला सांगितली तीं ऐकलीस ना ? ५२. आतां ज्या हेतूंच्या योगें पांच कारणात्मक खाण वाढते व मगच हीं कर्मे घडतात, ते पांच हेतुहि तुला उघड करून सांगतों ५३.

**अन्वयार्थ**—**नरः**—पुरुष—**शरीर—वाङ्—मनोभिः**—शरीर, वाणी व मन यांनीं—**यत्**—जें—**न्याय्यं वा विपरीतं वा कर्म**—शास्त्रीय—धर्मकार्य किंवा त्याच्या उलट अधर्मकार्य—**प्रारभते**—आरंभितो—**तस्य**—त्याचे—**एते पंच**—हे पांच—**हेतवः**—हेतु आहेत १५.

तर अकस्मात् वसंतऋतु प्राप्त झाला असतां तो वृक्षवेलींना नवी पालवी फुटण्यास कारणीभूत होतो, त्या नव्या पालवीपासून फुलांचें घोस येतात आणि फुलांपासून फळें निर्माण होतात; ५४. अथवा वर्षाऋतु मेघांना आणतो, मेघांपासून पर्जन्यवृष्टि होते आणि पर्जन्य वृष्टीमुळें धान्यापासून मिळणाऱ्या सुखाचा भोग घडतो ५५. किंवा पूर्व दिशा अरुणोदयास प्रसवते, अरुणोदय झाल्यामुळें सूर्य उगवतो, आणि सूर्याचा पूर्ण प्रकाश झाला म्हणजे सगळा दिवस उजाडतो ५६. त्याप्रमाणें अर्जुना ! मन हें कर्माविषयींचा सकल्प होण्यास कारण आहे आणि तोच कर्मसंकल्प वाचेचा दिवा लावतो म्हणजे वाचेनें बोलण्याच्या रूपानें बाहेर पडतो, ५७. मग वाणीची मशाल आपल्या उजेडानें [ अर्थ प्रकाशनद्वारां ] सर्व कर्मांची वाट स्पष्ट दाखविते, तेव्हां कर्ता हा कर्तृत्वाच्या व्यापारांत सांपडतो [ कर्म करण्यास प्रवृत्त होतो तेव्हां तो कर्ता होतो ] ५८. तेव्हां शरीरादिक सर्व इंद्रिय समुदाय शरीरादिकांस [ कर्मास ] 'हेतू' च होतात. लोखंडाचा एखादा जिन्नस तयार करणें झाल्यास ज्याप्रमाणें तो लोखंडाच्याच हत्यारांनीं तयार करावा लागतो ५९. अथवा उभे असलेल्या तंतूंच्या ताण्यांतमागांत आडवे तंतूच भरीला घातले म्हणजे त्या तंतूंचेच वस्त्र होते; ३६०. जसें रत्नाचें पैलू पाडावयाचें तें रत्नानेंच पाडावे लागतात, तसें मन, वाचा व देह यांचें कर्म मनादि हेतूंकडूनच घडते असते ६१. या ठिकाणीं, कर्मांचीं शरीरादिक कारणें, तींच त्यांना हेतु कशीं होतील ? अशी जर कोणी शंका घेईल, किंवा जाणण्याची इच्छा करील तर सांगतों, तें त्यानें ऐकावें ६२. हें पहा ! सूर्याच्या प्रकाशास जसा सूर्यच हेतु व कारण आहे, किंवा ऊंसाचें एक कांडें हेंच ऊंसाच्या दुसऱ्या कांड्याच्या वाढीस हेतु आहे ६३. अथवा वाग्देवतेची—सरस्वतीची जेव्हां स्तुति करावयाची असते तेव्हां जसे वाणीचेच श्रम वा साह्य घ्यावे लागते किंवा वेदांची थोरवी वर्णन करावयाची असल्यास ती वेदांनींच करावी लागते ६४. तसें कोणत्याहि कर्माच्या उत्पत्तीस शरीरादि हींच कारणें होत. हें सर्वांस निश्चित माहीत आहे, परंतु येथेंही शरीरादिकच कर्मांस हेतुहि आहेत यांत कांहींहि चूक नाहीं ६५. आणि पूर्वी प्रतिपादिलेल्या देहादिक—अधिष्ठानादिक पांच कारणांना देहादिकच हेतूंची साह्यता मिळाली तर सर्व त्यामुळें ज्या कर्मांची उभारणी, उत्पत्ति होते ६६.

१ गोडी. २ आत्मतत्त्व. ३ सर्व वृत्तीच्या ऐश्वर्यानें. ४ शोभा. ५ आश्रय करून राहणाऱ्या. ६ ठायीं. ७ सकृपेनें. ८ समुदाय. ९ आद्या प्रकारें. १० कळेल. ११ बुद्धि. १२ अकस्मात्. १३ वसंतशोभा. १४ कारण. १५ फुलांचे झुबके. १६ पावसाळ्यानें. १७ धान्यलाभाचा. १८ पूर्वदिशा. १९ उजेड. २० मशाला. २१ सर्व कृत्यांच्या. २२ व्यापारांत. २३ पैलू पाडणें. २४ कर्माला. २५ स्वच्छ घडावें, निर्मळ करावें. २६ तंतूंचा. २७ थोडे थोडे तंतू घालतां, 'जसे जात्यांत वगैरे थोडें थोडें धान्य घालतात.' २८ जाण्याची इच्छा असेल. २९ वाढण्यास. ३० सरस्वती. ३१ वर्णावी. ३२ श्रमवावी. ३३ अधिष्ठानीं. ३४ अंगिकार करून.

हेतु होय ॥ ६७ ॥ जैसा पर्जन्योदकाचा लोटु। विपर्यये धरी साळीचा पाटु। तो जिरे परी अचाटु। उपयोगु आथी ॥ ६८ ॥ कां रोषें निघालें अवचटें । पडिलें द्वारकेचिया वाटे। तें शिणे परी सुनाटें। नँ वचिती पंदें ॥६९॥ तैसें हेतुकारण मेळें। उठी कर्म जें आंधळें। तें शास्त्राचें लांहे डोळे। तैं न्याय म्हणिपे ॥३७०॥ ना दूध वोंढिता ठावो पावे। तंव उतोनि जाय स्वभावें। तोही वेंचु परी नव्हे। वेंचिलें तें ॥ ७१ ॥ तैसें शास्त्रसाह्येंवीण । केलें नोहे जरी अकारण। तरी लँगो कां नागवेंण। दानलेखीं ॥७२॥ अगा बावन्ना वर्णांपरता। कोण मंत्रु आहे पंडुसुता। कां बावन्नही नुच्चारितां। जीवु आथी? ॥ ७३ ॥ परी मंत्राची कडसणी। जंव नेणिजे कोदंडपाणी । तंव उच्चारफळ वाणी। न पवे जेवीं ॥ ७४ ॥ तेवीं कारणहेतुयोगें। जें बिसाट कर्म निगे। तें शास्त्राचिये न लगे। कांसे जंव ॥ ७५ ॥ कर्म होताचि असे तेव्हांही। परी तें होणें नव्हे पाहीं । तो अन्यायो गा अन्यायीं। हेतु होय ॥ ७६ ॥

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः। पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

एवं पंचकारणा कर्मा। पांचही हेतु हे सुमहिमा। आतां एथें पाहें पां आत्मा। सांपडला असे? ॥ ७७ ॥ भानु न होनि रूपें जैसीं। चक्षुरूपातें प्रकाशी। आत्मा न होनि कर्मे तैसीं। प्रकटित असे गा ॥ ७८ ॥ पैं प्रतिबिंब आरिसा। दोन्ही न होनि वीरेशा। दोहींतें प्रकाशी जैसा। न्याहाळिता तो। ॥७९ ॥ कां अहोरात्र सविता। न होनि करी पंडुसुता। तैसा आत्मा कर्मकर्ता। न होनि दावी ॥३८०॥ परी देहाहंमान भुली। जयाची बुद्धि देहींचि आतली । तया आत्मविषयीं जाली। मध्यरात्री गा ॥ ८१ ॥ जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा। देहचि केलें परमसीमा। तया आत्मा कर्ता हे प्रमा। अलोट उपजे ॥ ८२ ॥ आत्माचि कर्मकर्ता। हाही निश्चयो नाहीं तत्त्वतां। देहोचि मी कर्मकर्ता। मानितो साचे ॥ ८३ ॥ जे आत्मा मी कर्मातीतु। सर्वकर्मसाक्षिभूतु। हे आपली कहीं मातु। नायकेचि कानीं ॥ ८४ ॥ म्हणौनि उमपा आत्मयातें। देहचिवरी मविजे एथें। विचित्र काई रात्रि दिवसातें। डुडुळ न करी? ॥ ८५ ॥ पैं जेणें आकाशींचा कहीं। सत्य सूर्यु देखिला नाहीं। तो थिल्लरींचें बिंब काई। मानूं न लोहे? ॥८६॥ थिल्लराचेनि जालेपणें। सूर्यासि आणी होणें।

ती कर्मे शास्त्रानें मानलेल्या मार्गानुसार जर केलीं तर हे धनजया ! [ तें पुण्य कर्म होय व त्यासच न्याय्य कर्म म्हणतात] तो न्याय्य मार्गच न्याय्य कर्मास हेतुहि होतो ६७. जसें पर्जन्याच्या पाण्याचा लोट अवचित पाटानें साळीला मिळाला तर तो जमिनींत जिरतो; परंतु त्यापासून पुष्कळच उपयोग होतो ६८. अथवा कोणी एखादा मनुष्य रागावून घरांतून निघाला तो सहज, अकस्मात् द्वारकेच्या वाटेस लागला, तर त्याला चालण्याचे श्रम होतील खरे, परंतु त्याचें चालणें [ एक पाउलहि ] व्यर्थ जाणार नाहीं ६९. तसें हेतु व कारण यांच्या योगानें मिळून जें आंधळें [ शास्त्र निर्णय न जाणतां ] कर्म घडतें, त्याला शास्त्रदृष्टि लाभली म्ह. ते जर सशास्त्र घडले तर तेंव्हां त्यालाच न्याय्य–पुण्यकर्म म्हटलें जाते ३७०. अथवा एका भांड्यांतील दूध वाढण्याची वेळ झाली आणि इतक्यांत त्यां पात्रांतील दूध आपोआप उतास जाऊन संपलें, तर तोही पात्रांतील दूधाचा खर्चच झाला हे खरें, तथापि उतू गेलेलें दूध योग्य कारणीं लागलें, असें मात्र म्हणतां येत नाहीं ७१. तसें शास्त्राच्या साह्यावांचून केलेलें कर्म जर व्यर्थ होत नसेल तर दरवड्यांत चोरीस गेलेलें द्रव्य, दानधर्मांत जमा धरावे लागेल ! वा तसे कां समजू नये? ७२. अर्जुना ! बावन वर्णाविरहित कोणता मंत्र आहे अथवा बावनहि वर्णांचा उच्चार न करतां राहिलेला असा कोणी मनुष्य प्राणी सांपडेल काय? ७३. परंतु अर्जुना ! जोंपर्यंत मंत्राची वैदिक पद्धति वा युक्ति समजली नाहीं, तोंपर्यंत त्या बावन अक्षरांच्या उच्चारानें वाणीस जसे मंत्रोच्चाराचे फलप्राप्त होणार नाहीं ७४. त्याप्रमाणें कारण व हेतु यांच्या योगानें जें सामान्य यदृच्छेनें कर्म घडतें, तें कर्म जोंवर शास्त्राच्या कांसेला लागणार नाहीं म्ह० यथाशास्त्र घडणार नाहीं ७५. तेंव्हांहि कर्म हें घडतच असतें; पण बाबारे ! तें कर्माचें उचित घडणें नव्हे; तो अन्याय्य मार्ग [ पाप कर्म ] आहे तो अन्याय्य, पाप कर्मालाच हेतु आहे, असें जाणावें ७६.

**अन्वयार्थ**––**तु**–परंतु–**तत्र एवं सति**–प्रत्येक कर्माचीं अशी पांच कारणें असतांना–**यः**–जो मनुष्य–**अकृतबुद्धित्वात्**–शास्त्रीय उपदेशकांनीं बुद्धि संस्कृत झालेली नसल्यामुळें–**केवलम् आत्मानम्**–एकट्या आत्म्यालाच–**कर्तारं**–कर्ता–**पश्यति**–पाहतो–**सः दुर्मतिः**–तो दुर्बुद्धि पुरुष–**न पश्यति**–बरोबर पहात नाहीं–त्याला आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसतें १६.

अशा प्रकारें, हे सुमहिमा, पांच कारणें असलेल्या कर्मास हे पांचहि हेतु आहेत. तर आतां या कर्मांच्या कारणांत व हेतूंत आत्मा हा कोठें सांपडला आहे काय ! विचारानें सांग बरें ! ७७. आतां हे खरें कीं, ज्याप्रमाणें सूर्य हा स्वतः कोणासहि दृश्य विषय न होतां त्याच्याकडून नेत्रादि पांच इंद्रियांचे व त्यांच्या विषयांचे सहज प्रकाशन होतें. त्याप्रमाणें आत्मा स्वतः कर्मे [ वा कारण ] न होतां आत्मप्रकाशानें ती कर्मे सहज प्रकाशित केली जातात ७८. हें बघ अर्जुना ! आरशांत पहाणारा, आरसा व प्रतिबिंब हीं दोन्हीं आपण स्वतः न होतां जसा दोहींला प्रकाशित करितो ७९. किंवा हे पंडुसुता ! सूर्य हा दिवस व रात्र न होऊन त्यांस कारणीभूत असतो व ज्याप्रमाणें त्यांपासून अलिप्त असतो, त्याप्रमाणें आत्म्याच्या अधिष्ठानावर जरी कर्म होतें, तरी तो कर्म व कर्ता न होऊन त्यांचें प्रकाशन करतो ३८०. परंतु देहाहंकाराच्या भ्रमानें ज्याच्या बुद्धीची 'देहच मी आहे' अशी पक्की खात्री झाली आहे व त्याला आपल्या आत्मस्वरूपाविषयींची मध्यरात्रच झाली आहे [ आत्म्याचें मुळींहि यथार्थज्ञान नाहीं ] ८१. ज्यानें चैतन्य, ईश्वर व ब्रह्म या सर्वांस देहाच्याच मर्यादेचे [ परिच्छिन्न ] मानलें आहे, त्याला 'आत्मा कर्ता आहे' अशी दृढ बुद्धि होणें, हें अगदीं साहजिक आहे. ८२. खरें पाहूं गेले तर आत्मा हाच कर्मकर्ता आहे, असाहि ज्याचा पक्का निश्चय नसतो, तर तो खरोखर देहालाच 'मी' समजून कर्मकर्ता मीच आहे, असेंहि खरेंच मानतो. ८३. कारण, कर्मातीत व सर्व कर्मांना साक्षीभूत असा आत्मा मीच आहें, अशी यथार्थ स्वस्वरूपाची गोष्ट तो कानानेंहि कधीं ऐकत नाहीं ८४. म्हणून सर्वव्यापक, अपरिच्छिन्न असा जो आत्मा त्यास देहच होय, असें देहानें तो मोजतो [ व्यापक आत्म्यास देहाच्या उपाधीनें मर्यादित असेंच समजून त्या विषयींच प्रमाबुद्धि ठेवतो ] यांत आश्चर्य ते काय ? घुबड हे ढवळ्या दिवसालाच रात्र मानीत नाहीं काय ? ८५ हें पहा ! ज्यानें आकाशांतील खऱ्या सूर्यास कधीं पाहिलें नाहीं, तो डबक्यांतील पाण्यांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबासच खरा सूर्य म्हणून समजणार नाहीं काय?८६. डबक्यांत पाणी सांचलें म्हणजे

१ कदाचित्. २ विलक्षण. ३ व्यर्थ. ४ जात नाहींत. ५ पाउलें. ६ हेतु व कारण यांच्या योगानें. ७ मिळवी.

८ न्यायास अनुसरून, पुण्यकर्म. ९ वर वर येता. १० कांठाला पोंचूत. ११ खर्च. १२ व्यर्थ. १३–१४ गणना होत नाहीं.

त्याच्या नाशीं नाशणें । कंपें कंपू ॥ ८७ ॥ आणि निद्रिस्ता चेवो नये। तंव स्वप्न साचें हों लाहे । रज्जु नेणतां सापा बिहे । विस्मो कवण ? ॥ ८८ ॥ जंव केवळ आथि डोळां। तंव चंद्रु देखावा कीं पिंवळा। काय मृगींहीं मृगजळा। भोळावें नाहीं ? ॥ ८९ ॥ तैसा शास्त्रगुरूचेनि नांवें । जो वाराही टेंकों नेदी सिवें । केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ॥३९०॥ तेणें देहात्मदृष्टीमुळें। आत्मया घापे देहाचें जाळें। जैसा अभ्राचा वेगु कोल्हें । चंद्रीं मानीं ॥९१॥ मग तया मानणयासाठीं । देहबंदि-शाळे किरीटी । कर्माच्या वज्रगांठी । कळासे तो ॥ ९२ ॥ पाहें पां बद्ध भावना दृढा । नळियेवरी तो बापुडा । काय मोकळेयाहि पायाचा चवडा । न ठकेचि पुंसा ॥ ९३ ॥ म्हणौनि निर्मळा आत्मस्वरूपीं । तो प्रकृतीचें केलें आरोपी । तो कल्पकोडीच्या मापीं । मवीचि कर्में ॥ ९४ ॥ आतां कर्मा-माजीं असे । परी तयातें कर्म न स्पर्शे । वडवानळातें जैसें । समुद्रोदक ॥ ९५ ॥ तैसेंनि वेगळेपणें । जयाचें कर्मीं असणें । तो कीर वोळखावा कवणें । तरी सांगों ॥ ९६ ॥ जे मुक्तातें निर्धारितां । लाभे आपलीच मुक्तता । जैसी दीपें दिसे पाहतां । आपली वस्तु ॥ ९७ ॥ नातरी दर्पणु जंव उटिजे । तंव आपणपयां आपण भेटिजे । कां तोय पावतां तोय होईजे । लवणें जेवीं ॥९८॥ हे असो परतोनि मागुतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें । तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय ॥ ९९ ॥ तैसें हारपलें आपणपें पावे । तैं संतांतें पाहतां गिंवसावें। म्हणौनि वानावे ऐकावे । तेचि सदा ॥४००॥ परी कर्मीं असोनि कर्में। जो नावरे समें-विषमें । चर्मचक्षूंचेनि चामें । दृष्टि जैसी ॥ १ ॥ तैसा सोडवला जो आहे । तयाचें रूप आतां पाहें । उपपत्तीची बाहे । उभऊनि सांगों ॥ २ ॥

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७ ॥

तरी अविद्येचिया निदा । विश्वस्वप्नाचा हा धांदा । भोगीत होता प्रबुद्धा । अनादि जो ॥ ३ ॥ तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थांवें । माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा ॥ ४ ॥ तैसा विश्वस्वप्नेंसीं माया। नीद सांडूनि धनंजया । सहसा चेइला अद्वया- । नंदपणें जो ॥ ५ ॥ तेव्हां मृगजळाचे पूर । दिसते एक निरंतर। हारपती कां चंद्रकर । फांकतां जैसे ॥ ६ ॥ कां बाळत्व निघोनि जाय । तैं बागुला

सूर्य जन्मास आला असें मानतो, तेंच पाणी वाऱ्यानें हाललें म्हणजे सूर्यहि हाल्ठे, कांपू लागला आहे, असें मानतो आणि डबकें कोरडें पडलें म्हणजे सूर्याचा नाश झाला असें तो समजतो ८७. आणि निजलेला मनुष्य जोपर्यंत जागा झाला नाहीं, तोपर्यंत त्याला स्वप्न खरें, सत्य भासणें शक्य, स्वाभाविक आहे; ज्याला ही दोरी आहे हें कळत नाहीं, तो त्या दोरीला साप समजून भ्याला तर यांत नवल तें कोणतें ? ८८. जो पर्यंत डोळ्यांत कावीळीचा दोष झालेला आहे, तोपर्यंत चंद्र पिवळा दिसावा यांत नवल ते काय ? अरे ! मृगांनीहि मृगजळाला मुळं नये काय ? [ तर मग कोणी भुलावें ? ] ८९. त्याप्रमाणें जो शास्त्रांच्या व गुरूंच्या नावानें [ ते उच्चारल्याबरोबर, त्यांचे कडून आलेला ] त्यांचा वाराहि आपल्या गांवाच्या शिवेस लागूं देत नाहीं [ त्यांस मानीत नाहींत. ] कारण, तो मूर्खपणाच्याच जीवित्वाच्या बळावर जगलेला असतो ३९०. अभ्रें चालत असलीं म्हणजे त्याच्या वेगाचा ज्याप्रमाणें कोल्हे हे [चंद्र चालतो असा] त्या चंद्रावरच आरोप करतात, त्याप्रमाणें त्यानें देहासच आत्मा मानला आहे, अशा त्या दृष्टीमुळें आत्म्याला देहरूप जाळ्यांत घातलें जाते ९१. मग अर्जुना ! त्याच्या या समजुतीनें तो जीव देहरूपी बंदीशाळेंत कर्माच्या बळकट गांठीनें जखडला जाऊन बंदिवान् होतो ९२. अरे ! हें पहा, बिचारा राघू नळीवर बसलेला असतो, तो ' मीं बांधला गेलों आहे, ' अशा दृढ कल्पनेनें आपल्या पायाचा पंजा मोकळा असूनहि ती धरलेली नळी न सोडतां फसत नाहीं काय ? ९३. म्हणून निर्मळ अशा आत्मस्वरूपावर जो प्रकृतीनें, देहानें केलेल्या कर्मांचा आरोप करतो, तो कल्पकोटीपर्यंत कर्मांतच गुंडाळला जातो ९४.[ अवतरण ] वडवानल हा समुद्रांत असूनहि त्याला समुद्राचें पाणी स्पर्श करीत नाहीं, तसा तो आतां कर्मांमध्यें असूनहि ज्याला कर्म स्पर्श करूं शकत नाहीं ९५. तसें जो कर्मांत [ कर्माचरण करीत ] असूनहि कर्मांपासून अलिप्तपणानें असतो तो खरोखर कोणत्या लक्षणानें ओळखावा तेहि सांगतो ९६. जसें आपली वस्तु [ अंधारांत ] दिव्याच्या साह्यानें पाहिली तर ती आपल्याला दिसते, तसेंच मुक्ताच्या स्वरूपाविषयीं विचार करूं लागलें असतां आपलीच स्वाभाविक नित्य-सिद्ध असणारी मुक्तता आपल्यास प्राप्त होते ९७. अथवा आरसा जसजसा स्वच्छ करावा तसतसें आपणासच आपल्याला भेटतां येते. [ आपलेंच स्वरूप त्यांत आपल्यास अधिक स्पष्ट दिसतें ] किंवा मीठ पाण्यांत घातलें असतां जसें तें पाणीच होतें ९८. हे असूं दे ! प्रतिबिंब मागें परतून जेव्हां पुनः आपल्या बिंबाला जों पाहूं लागतें तों त्याचे पाहणेंपणहि–दृशी–क्रिया नाहींशी होऊन तें सहज मूळचें बिंबच बनतें ९९. आपलें अज्ञानानें हरवलेलें, अप्राप्तवत् झालेलें आत्मस्वरूप आपल्यास प्राप्त व्हावे [ अज्ञानकृत आवरण निवृत्तिपूर्वक आत्माभिव्यक्ति व्हावी] अशी जर खरी इच्छा असेल तर त्यानें संतांच्या 'सहजस्थिती'चा विचार करावा म्हणजे सहज ब्रह्मात्मैक्यस्थिति त्यास शोधीत येते [ प्रगटते ] म्हणून नेहमीं संतांचेच वर्णन करावे व नेहमीं संताचेच गुण वर्णन श्रवण करावे ४००. परंतु कर्म करीत असूनहि जो कर्माच्या वाईट अथवा चांगल्या परिणामानें लिप्त होत नाहीं, ते कसें तर जशी चर्मचक्षूंच्या कातड्यांत दृष्टि असूनहि ती दृष्टि खरी त्यानें लिप्त होत नाहीं १. तसा जो सर्व कर्मांहून अतीत झाला आहे त्याचीं लक्षणें तुला वैचारिक युक्तीच्या बाहु उभारून म्ह. युक्तिपूर्वक सांगतों, त्याकडे लक्ष दे २.

**अन्वयार्थ—यस्य**–ज्याला–**अहंकृतः भावः**–मी कर्ता आहें असा भाव–अशी भावना–प्रत्यय–**न**–नसतो व **यस्य**–ज्याची–**बुद्धिः**–मति– अंतःकरण–**न लिप्यते**–मीं हें केलें, याच्या योगानें मी नरकास जाईन, अशा अनुतापानें लिप्त होत नाहीं–**सः**–तो-**इमान् लोकान्**-या लोकांना–या सर्व प्राण्यांना– **हत्वा अपि**–मारूनहि–**न हन्ति**–मारीत नाहीं व–**न निबध्यते**–त्या कर्माच्या फळानें बद्ध होत नाहीं १७.

तर हे प्रबुद्धा अर्जुना ! जो अविद्यारूपी निद्रेंत विश्व-रूपी स्वप्न व्यवहाराचा अनुभव अनादि काळापासून घेत होता ३. त्यास "तत्त्वमसि" या महावाक्याचा उपदेश केला व तो त्याला फलद्रूप व्हावा म्हणून त्याचे मस्तकावर हात ठेवला, नुसतां हात ठेवला असेंच नव्हे, तर जणुं काय त्यांनीं थापटी मारून त्याला आपल्या कृपेच्या सामर्थ्यानें आत्मस्वरूपाविषयीं निरंतरचे जागे केलें ४. तसा अर्जुना ! जगद्रूपी स्वप्नासह ती माया अज्ञानरूपी निद्रा टाकून देऊन जो मी सहज अद्वया-नंदादि निजस्वरूप आहें, अशा यथार्थ बोधानें जागा झाला ५. तेव्हां चंद्रकिरणें फांकतांक्षणींच मृगजळाचे एकसारखे दिसणारे पूर जसें आपोआप नाहींतसें होतात ६. किंवा बाल्यदशा निघून गेल्यावर बागुलबुवाला बळ–सत्ताच नसल्यामुळें जसें कोणी

१ जागृति. २ खरे. ३ भितो. ४ नवल. ५ कावीळ नांवाचा रोग. ६ भुलावें. ७ हद्दीस.

नाहीं त्रांय। पैं जळालिया इंधन न होय। इंधन जेवीं ॥ ७ ॥ नाना चेवो[3] आलिया पाठीं। तें स्वप्न न दिसे दिठी। तैसी अहं ममता किरीटी। नुरेचि तया ॥ ८ ॥ मग सूर्यु आंधारालागीं। रिघो कां भलते सुरंगीं। परी तो तयाच्या भागीं। नाहींचि जैसा ॥९॥ तैसा आत्मत्वें वेष्टिला होये। तो जया तया दृश्यातें पाहे। तें दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये। तयाचेंचि रूप ॥४१०॥ जैसा वन्हि जया लागे। ते वन्हिचि जालिया आंगें। दाह्यदाहकविभागें। सांडिजे तें ॥ ११ ॥ तैसा कर्माकारा दुजेया। तो कर्तेपणाचा आत्मया। आळु आला तो गेलिया। कांहीं बाहीं जें उरे ॥ १२ ॥ तिये आत्मस्थितीचा जो रावो। मग तो देहीं इये जाणेल ठावो ?। काय प्रलयांबूचा उन्नाहो। वोघु मानी ? ॥ १३ ॥ तैसी ते पूर्ण अहंता। काई देहपणें पंडुसुता। आवरे काई सविता। बिंबें धरिला ? ॥ १४ ॥ पैं मथूनि लोणी घेपे[11]। तें मागुती ताकीं घापे। तरी तें अलिप्तपणें सिंपे[12]। तेणेंसीं काई ? ॥ १५ ॥ नाना काष्ठौनि वीरेशा। वेगळा केलिया हुताशा। राहे काष्ठाचिया मांडुसा। कोंडलेपणें ? ॥ १६ ॥ कां रात्रीचिया उदराआंतु। निघाला जो हा भास्वंतु। तो रात्री ऐसी मातु। ऐके कायी ? ॥ १७ ॥ तैसें वेद्य वेदकपणेंसी। पडिलें कां जयाचे ग्रासीं। तया देह मी ऐसी। अहंता कैंची ? ॥ १८ ॥ आणि आकाशें जेथें जेथुनी। जाईजे तेथ असे भरोनी। म्हणौनि ठेलें कोंदोनी। आपेंआप ॥ १९ ॥ तैसें जें तेणें करावें। तो तेंचि आहे स्वभावें। मा कोणें कर्मीं वेष्टावें। कर्तेपणें ? ॥ ४२० ॥ नुरेचि गगनावीण ठावो। नोहेचि समुद्रा प्रवाहो। नुंठीचि ध्रुवा जांवो। तैसें जाहालें ॥ २१ ॥ ऐसेनि अहंकृतिभावो। जयाचा बोधीं जाहला वावो। तऱ्ही देहा जंव निर्वाहो। तंव आथी कर्में ॥२२॥ वारा जरी वाजोनि वोसरे। तरी तो डोल रुखीं उरे। कां सेंदें[26] द्रुति राहे कापुरें। वेंचलेनी ॥२३॥ कां सरलेया गीताचा समारंभु। न वचे राहवलेपणाचा क्षोभु। भूमी लोळोनि गेलिया अंबु। वोल थारे ॥ २४ ॥ अगा मावळलेनि अर्कें। संध्येचिये भूमिके। ज्योतिदीसी[34] कौतुकें। दिसे जैसी ॥ २५ ॥ पैं लक्ष भेदिलियाहीवरी। बाण धांवेचि तंववरी। जंव भरली आथी उरी। बळाची ते ॥२६॥ नाना चक्रीं भांडें जालें। तें कुलालें परतें नेलें। परी भ्रमेंचि तें मागिले। भोवंडिलेपणें ॥ २७ ॥ तैसा

भीत नाहीं, किंवा लांकूड जळल्यावर त्यांत जसा [ पाकोपयोगी ] इंधनपणा रहात नाहीं ७. अथवा जागृत झाल्यावर स्वप्न जसें दृष्टीस दिसत नाहीं तसा अर्जुना ! त्याला मी व माझें हा अभिमान शिल्लक रहात नाहीं ८. मग अंधार पाहण्याकरितां सूर्य वाटेल त्या भुयारांत प्रवेश करो ! पण तेथें जसा तो अंधार त्याच्या वांट्याला रहातच नाहीं ९. तसा मी जो आत्मत्वानें सर्वत्र व्याप्त आहें, अशी ज्याची पूर्ण समजूत झाली, तो ज्या ज्या दृश्य वस्तूकडे पाहील ती ती दृश्य वस्तु द्रष्टेपणासह त्याला आत्मरूपच दिसेल ४१०. जसा अग्नि ज्या पदार्थास लागतो तो पदार्थ अंगानें अग्निरूपच होतो व मग जसा दाह्य [ जळणारे ] व दाहक [ जाळणारे ] असा त्यांतील भेद शिल्लक रहात नाहीं ११. तसें कर्म ही एक आत्मभिन्न अशी दुसरीच वस्तु मानून त्या कर्मामुळें आत्म्यावर जो कर्तेपणाचा आळ आलेला होता, तो नाहींसा झाल्यावर जें कांहीं बाहीं म्हणजे वाच्यवाचक भावातीत उरते, तीच आत्मस्थिति होय १२. त्या आत्मस्थितींत राहणारा जो राजश्रेष्ठ पुरुष तो, हा देह मी किंवा माझा आहे, असें मानील कसें ? कारण, पूर्ण आत्मज्ञानानें देहाभिमान नष्ट झाला आहे ना ? हें पहा ! प्रलयकालीं जलाची वृद्धि होऊन सर्वच जलमय झाल्यावर त्यांत लहान लहान ओघ–प्रवाह; आपल्याहून निरनिराळे भेद मानील काय ? १३. त्याप्रमाणें अर्जुना ! ब्रह्माचें ठिकाणीं पूर्ण अहंता उत्पन्न झाली असतां म्हणजे मी ब्रह्मच आहे, [ व हें सर्व ब्रह्मरूपच आहे ] असा अगाध व्यापक बोध झाला असतां ती ब्रह्मरूप झालेली अहंता, देहात्मभ्रांतीनें देहापुरती कशी आवरली जाईल ? हें पहा ! व्यापक सूर्यप्रकाश सूर्यबिंब जितकें असते तितकाच मर्यादित होणार आहे काय ? १४. ताक घुसळून लोणी काढल्यावर तें पुनः ताकांत घातलें तर तें अलिप्तपणानें असल्यामुळें ताकाशीं एकरूप होईल काय ? १५. अथवा हे वीरेशा ! लांकडांत स्वभावतःच गुप्त असलेला अग्नि घर्षणादि उपायानें वेगळा–प्रगट केल्यास पुनः तो लांकडाच्या पेटींत कोंडून ठेवल्यावर राहील काय ? १६. किंवा रात्रीच्या उदरांतूनच जो सूर्य बाहेर उदय पावलेला आहे, तो "रात्र" अशी गोष्ट तरी कानांनीं ऐकेल काय! १७. त्याप्रमाणें वेद्य-जाणण्याची वस्तुही तत्सापेक्ष जाणणारासह–ज्ञातृत्वासह गिळून म्ह. ज्याचें बोधांत ती पूर्णतया नाहींशीं झालीं आहेत, त्याला 'मी देह आहे, अथवा 'देहच आत्मा आहे,' अशी अहंता कोठून असणार ? १८. आणि आकाशानें जेथून ज्या ठिकाणीं जावें, त्या ठिकाणीं तें भरलेलेंच असते कारण, स्वभावतःच तें सर्व ठिकाणीं ओतप्रोत व्याप्त–भरून राहिले आहे १९. तसें तो जें जें कांहीं करितो, तें त्याचेच [ आत्म- ] स्वरूप आहे; मग कोणत्या कर्मानें त्याला कर्तेपणानें गुंडळावें ? [ त्यानें कोणत्या कर्माच्या सापेक्षतेनें आपल्याकडे कर्तेपणा घ्यावा ? ] ४२०. गगनाशिवाय कोणतेंहि ठिकाण [ रिकामे ] नाहीं, समुद्राला जसा प्रवाह नाहीं व ध्रुव नक्षत्राला जसे आपले स्थान सोडून कोठेंहि जाणें नाहीं, तशी या मनुष्याची स्थिति झाली आहे २१. अशा प्रकारें ज्याला आत्मज्ञानाच्या योगें कर्माच्या कर्तेपणाचा व देहाचा अभिमान [ देहात्मत्वभ्रांति ] बाधीत म्हणजे मिथ्या झाला आहे; तरीपण जोपर्यंत त्याचा देह आहे, तोपर्यंत त्याच्या देहसंघाताकडून कांहींतरी कर्में हीं होणारच; २२. वारा वाहण्याचा जरी बंद झाला, तरी वाऱ्यानें निर्माण केलेलें. 'झाडाचें हालणें' बंद होत नाहीं अथवा करंडींतील कापूर जरी संपला, तरी त्या करंडींत त्याचा वास शिल्लक असतो २३. अथवा गाण्याचा समारंभ संपला, तरी गाणें ऐकून त्या रागरंगाचा मनावर झालेल्या आनंदाचा भर–परिणाम जसा जात नाहीं, कमी होत नाहीं, किंवा जमीनीवरून पाणी वाहून नाहींसें झालें तरीसुद्धां जशी त्याची ओल मागें रहातें २४. अरे ! सूर्य मावळल्यावरहि संध्याकाळीं पश्चिमेकडे आकाशांत सूर्याच्या ज्योतीचें तेज [ संधिप्रकाश ] जसें सहज दिसतें २५. तसेंच लक्ष्याचा भेद केल्यावरहि बाण जसा त्यांतील वेगशक्ति शिल्लक असेंपर्यंत सारखा पुढेंच जात असतो २६. अथवा कुंभाराच्या चाकावर तयार झालेलें भांडें–घागर कुंभारानें बाजूस काढून घेतल्यावरहि पूर्वी दिलेल्या गतीमुळें चाक फिरतच राहत असतें २७. तसा हे धनंजया ! देहाचा

१. सत्ता, अस्तित्व. २ पाकक्रिया, स्वयंपाक. ३ जागृति. ४ भुयारांत. ५ दाह्य–काष्ठें आदि व दाहक–अग्नि ह्या दोन प्रकारच्या विभागानें. ६ द्वैत. ७ कांहीं अवशेष. ८ प्रलयकालच्या जलाचा. ९ वृद्धि. १० अहंब्रह्म. ११ घेतलें जातें, काढलें असतां. १२ स्पर्शें, मिसळेल. १३ लांकडांतून. १४ वेगळा केला असतां. १५ अग्नि. १६ पेटींत. १७ सूर्य. १८ जाणणाऱ्यासकट, वेद्यज्ञानविषयक वस्तु. १९ भरून. २० आपल्या स्वरूपांत. २१ ध्रुव नक्षत्राला चलनवलन [गति] प्राप्त होत नाहीं. २२ व्यर्थ. २३ आहेत. २४ नाहींसा होतो. २५ झाडाचें ठिकाणीं. २६ करंडयांत. २७ सुगंध. २८ खपून गेला तरी. २९ गढून गेल्याचा. ३० भर. ३१ सूर्यानें. ३२ संध्याकाळच्या. ३३ आकाशांत. ३४ तेज.

देहाभिमानु गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जालें तें अपैसया । चेष्टवीच तें ॥२८॥ संकल्पेंवीण स्वप्न । न लावितां दांगीचें बन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें ॥ २९ ॥ आत्मयाचेनि उद्यमेंवीण । तैसें देहादिपंचकारण । होय आपणयां आपण । क्रियाजात ॥ ४३० ॥ पैं प्राचीनसंस्कारवशें । पांचही कारणें सहेतुकें । कामंवीजती गा अनेकें । कर्माकारें ॥ ३१ ॥ तया कर्मामाजीं मग । संहरो आघवें जग । अथवा नवें चांग । अनुकरो ॥ ३२ ॥ परी कुंमुद कैसेनि सुके । कैसें तें कमळ फांके । हीं दोन्हीं रवी न देखे । जयापरी ॥ ३३ ॥ कां वीजु वर्षोनि आभाळ । ठिकरियो आतो भूंतळ । अथवा करूं शोड्वळ । प्रसन्नावृष्टी ॥ ३४ ॥ तरी तया दोहींतें जैसें । नेणिजेचि कां आकाशें । तैसा देहींच जो असे । विदेहदृष्टी ॥ ३५ ॥ तो देहादिकीं चेष्टीं । घडतां मोडतां हे सृष्टी । न देखे स्वप्न दृष्टी । चेइला जैसा ॥ ३६ ॥ एऱ्हवीं चामाचे डोळेवरी । जे देखती देहचिवरी । ते कीर तो व्यापारी । ऐसेंचि मानिती ॥ ३७ ॥ कां तणाचा बाहुला । जो आगरामेरें ठेविला । तो साचचि राखता कोल्हा । मानिजे ना ? ॥३८॥ पिसें नेसलें कां नागवें । हें लोकीं येऊनि जाणावें । ठाणोरियांचें मवावें । आणिकीं घाय ॥ ३९ ॥ कां महासतीचे भोग । देखे कीर सकळ जग । परी ते आगी ना आंग । ना लोकु देखे ॥ ४४० ॥ तैसा स्वस्वरूपें उठिला । जो दृश्येंसीं द्रष्टा आटला । तो नेणे काय राहटला । इंद्रियग्रामु ॥ ४१ ॥ अगा थोरीं कल्लोळीं कल्लोळ साने । लोपतां तिरींचेनि जनें । एकीं एक गिळिलें हें मनें । मानिजे जऱ्ही ॥ ४२ ॥ तऱ्ही उदकाप्रति पाहीं । कोण ग्रसितसे काई । तैसें पूर्णा दुजें नाहीं । जें तो मारी ॥४३॥ सुवर्णाचिया चंडिका । सुवर्णशूळेंचि देखा । सुवर्णाचिया महिखा । नाशु केला ॥ ४४ ॥ तो देवलवसिया कडा । व्यवहारु गमला फुडा । वांचूनि शूळ महिष चामुंडा । सुवर्णचि तें ॥ ४५ ॥ पैं चित्रींचें जळ हुतांशु । तो दृष्टीचाचि आभासु । पटीं आगी बोलांशु । दोन्ही नाहीं ॥ ४६ ॥ मुक्ताचें देह तैसें । हालत संस्कारवशें । तें देखोनि लोक पिसे । कर्ता म्हणती ॥ ४७ ॥ आणि तयां करणेया आंतु । घडो तिहीं लोकां घातु । परी तेणें केला हे मातु । बोलों नये ॥ ४८ ॥ अगा अंधारुचि देखावा तेजें । मग तो फेडी हें बोलिजे । तैसें ज्ञानिया नाहीं दुजें । जें तो मारी ॥ ४९ ॥ म्हणौनि

अभिमान बाधित झाल्यावरहि, ज्या प्रारब्ध कर्मांनें देह उत्पन्न झाला आहे, तें प्रारब्ध कर्मच त्या देहाकडून आपोआप चेष्टा–कर्म करावयास लावीलच २८. [ अमूक एक स्वप्न पडावे अशा ] आपल्या संकल्पाशिवाय जसें आपणास स्वप्न दिसतें किंवा जशी अरण्यांत न लावितां झाडें उत्पन्न होतात व कोणीहि रचना केल्याशिवाय आकाशांत जशीं गंधर्वनगरें निर्माण झाल्याची दृष्टीस पडतात २९. तशी आत्म्याच्या खटपटीशिवाय, संकल्पाशिवाय जीं देहादि पांच कारणें मागें सांगितलीं, तींच क्रिया करण्यास कारणीभूत होऊन आपोआप सर्व कर्में होतात ४३०. परंतु पूर्वजन्मींच्या शेष संस्कार–वशात् देहादि पांचहि कारणें व हेतु यांचेद्वारां अनेक-क्रिया निर्माण होतात ३१. मग त्याच्या त्या कर्मांत सर्व जगाचा संहार होवो, अथवा नवें चांगलें जग उत्पन्न होवो; [त्याचा हा सर्व व्यवहार संकल्परहित असतो] ३२. परंतु, चंद्रविकासिनी कमल कसें सुकतें व सूर्यविकासिनी कमल कसे विकसित होते, हे आपल्या उदयापासून होणारे दोन्ही परिणाम सूर्यास माहीत नसतात ३३. किंवा मेघाकाशांतून वीजेचा वर्षाव होऊन पृथ्वीच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होवोत किंवा मेघद्वारां उत्तम पाऊस पडून अखिल भूतल हिरवेगार होवो ३४. तरी या दोहींलाहि जसें आकाश जाणतच नाहीं, तसा तो पुरुष देहाभिमानरहित दृष्टीनें देहांतच वास करीत असला तरी ३५. तो, जसा स्वप्नांतून जागा झालेला मनुष्य स्वप्न पहात नाहीं, तसा देहादिकांच्या व्यवहारापासून सृष्टीचा उद्भव झाला किंवा तिचा लय झाला, तरीहि त्याला त्याची दाद नसते ३६. एऱ्हवीं, 'हा देही–देहधारी आहे' असें जे चर्मचक्षूंनीं–स्थूल नजरेने पाहतात, ते खरोखर तोच कर्म करणारा आहे, असेंच मानतात ३७. अथवा गवताचें बुजगावणें करून तें शेताच्या बांधावर उभें केलेलें असते तेव्हां कोल्हा त्यालाच खरा खरा रखवालदार आहे, असे समजत नाहीं काय ? ३८. वेडा मनुष्य वस्त्र नेसलेला आहे किंवा नागवा आहे, हें जसें इतर लोकांनीं येऊन जाणावें लागतें किंवा रणांत पडलेल्या योद्ध्या मनुष्याच्या अंगावरचे घाव जसें दुसऱ्यांनींच मोजावे लागतात ३९. अथवा एखादा सती जाण्यास निघालेल्या महासतीचे भोग [ तेव्हांचें न्हाणे, माखणें, मळवट भरणें, इत्यादि सौभाग्य शृंगार जरी करीत आहे असें ] खरोखर सर्व लोक पाहतात; तरीपण तिच्या दृष्टीनें अग्नि दिसत नाहीं, स्वतःच्या शरीराचेंहि तिला भान नसतें, किंवा पाहणारें लोकहि तिला दिसतच नसतात. कारण, ती एका पतिस्वरूपांत तल्लीन झालेली असते ४४०. त्याप्रमाणें जो आत्मरूप बोधप्राप्तीच्यायोगें जागा झाला आहे व ज्याच्या द्रष्टा–दृश्यासह सापेक्ष मनोवृत्ति नष्ट झाल्या आहेत [ पाहणारा व पहावयाची वस्तु हा परस्परावलंबी सापेक्षभात्र बाधित झाला ] तो आपल्या सर्व इंद्रिय समुदायानें काय [ व्यवहार, कर्म ] केलें हें जाणतहि नाहीं ४१. अरे ! अर्जुना ! समुद्राचें तीरावर असलेल्या लोकांस त्याच्या मनानें जरी असें वाटलें कीं थोरल्या एका लाटेनें धाकट्या लाटांस एकदम गिळून टाकलें आहे ४२. तरी अधिष्ठान असलेल्या उदकाच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां कोणती लाट कोणत्या लाटेस खाऊन टाकते ? त्याप्रमाणें जो पूर्ण आत्मस्वरूप झाला त्यास द्वैत असें नाहींच; कीं ज्यास तो मारील. [ त्यास कर्म टाकावें इतकेंहि कर्माविषयींचे द्वैत रहात नाहीं]४३.हे पहा! सोन्याच्या देवीनें सोन्याच्याच त्रिशुळानें सोन्याच्याच महिषासुराचा नाश केला ४४. हा सर्व व्यावहारिक प्रकार पुजाऱ्याच्या दृष्टीनें खरा असा भासतो, परंतु तत्वतः सोन्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्रिशूळ, महिषासुर व देवी हें सर्व सोनेंच आहे ४५. तसेंच पटावर काढलेल्या चित्रांतील एक पाण्याचा तलाव व एक अग्निकुंड हा फक्त दृष्टीलाच भासणारा भेद आहे परंतु त्या दोहोस आधार असलेला जो पट त्यांत तत्त्वतः अग्नि किंवा ओलेपणाचा अंश ही दोन्हींहि नाहींत ४६. त्याप्रमाणें मुक्त–ज्ञान्याचा देह हा प्रारब्धकर्मवशात् व पूर्वानुक्रम संस्कारवशात् हालत [ कर्मोपासनादि व्यवहार करीत ] असतो, आत्मस्वरूपाशीं त्याचा यत्किंचितहि संबंध नसतो, परंतु हे न समजतां वेडे लोक त्यालाच कर्म-कर्ता असें म्हणतात ४७. मग अशा त्या मुक्ताच्या कर्मे करण्यांत जरी त्रैलोक्याचा घात होवो; तरीपण तो त्या मुक्तानें केला अशी गोष्ट बोलूंच नये ४८. अगोदर तर सूर्यानें अंधार पहावा आणि मग त्याला दूर करा, असें त्यानें म्हणावें [ पण सूर्यापुढें अंधार येतच नसल्यामुळें हे संभवतच नाहीं ] त्याप्रमाणें, ज्ञान्याला [ स्वभिन्न ] अशी जर कांहीं दुसरी वस्तूच नाहीं कीं, जिचा तो नाश करील. [कारण त्याचे ठिकाणचा संपूर्ण द्वैतभाव जाऊन सर्व जग त्याला स्वस्वरूप झालेले असतें;]४९. म्हणून त्याची

१. आपोआप. २ अरण्यांतलें. ३ संकल्पाशिवाय. ४ पूर्व-जन्मींच्या संस्कारानें. ५ क्रिया करविती. ६ रचो, उत्पन्न करो. ७ चंद्रविकासी कमल. ८ वीज पडून. ९ तुकडे तुकडे होवो. १० जमीन. ११ हिरव्यागार गवतावर प्रसाद करणारी.

तयाची बुद्धी । नेणे पापपुण्याची गेंधी । गंगा मीनलियों नदी । विटाळु जैसा ॥ ४५० ॥ आगीसी आगी झगटलिया । काय पोळे धनंजया । कीं शस्त्र रुपे आपणया । आपणाचि ॥५१॥ तैसें आपणपयापरतें । जो नेणें क्रियाजातातें । तेथ काय लिंपवी बुद्धीतें । तयाचिये ॥५२॥ म्हणौनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहलें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मी बंधु ॥ ५३ ॥ जे कर्ता जीव विंदाणीं । काढूनि पांचहा खाणी । घडित आहे करणीं । आउतीं दाहें ॥ ५४ ॥ तेथ न्यावो आणि अन्यावो । हा द्विविधु साधूनि आवो । उभवितां न लवी खेंवो । कर्मभुवनें ॥ ५५ ॥ या थोरांडा कीर कामा । विरजों नोहे आत्मा । परी म्हणसी हन उपक्रमा । हातु लावी ॥ ५६ ॥ तो साक्षी चिद्रूपु । कर्मप्रवृत्तीचा संकल्पु । उठी तो कां निरोपु । आपणचि दे ? ॥ ५७ ॥ तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं । तया आयासु नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचेही उलिगीं । लोकुचि आथी ॥ ५८ ॥ म्हणौनि आत्मयाचें केवळ । जो रूपचि जाहला निखिळ । तया नाहीं बंदिशाळ । कर्मांची हे ॥ ५९ ॥ परी अज्ञानाच्या पटीं । अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी । तेथ चितारणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे कां ॥ ४६० ॥

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना । करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय । हें जगाचें बीज त्रय । तें कर्माची निःसंदेह । प्रवृत्ति जाण ॥६१॥ आतां ययाचि गा त्रया । व्यक्ती वेगळालिया । आइकें धनंजया । करूं रूप ॥ ६२ ॥ तरी जीवसूर्यबिंबाचे । रश्मी श्रोत्रादिकें पांचें । धांवोनि विषय-पद्माचे । फोडिती मढ ॥ ६३ ॥ कीं जीवनृपाचे वारु उपलाणें । घेऊनि इंद्रियांचीं केकाणें । विषयदेशींचें नागवणें । आणीत जे ॥ ६४ ॥ हें असो इहीं इंद्रयीं राहाटे । जें सुखेंदुःखेंसीं जीवा भेटे । तें सुषुप्तिकालीं वोहटे । जेथ ज्ञान ॥ ६५ ॥ तया जीवा नांव ज्ञाता । आणि जें हें सांगितलें आतां । तेंचि एथ पंडुसुता । ज्ञान जाण ॥६६॥ जें अविद्येचिये पोटीं । उपजतखेंवो किरीटी । आपणयातें वांटी । तिहीं ठायीं ॥६७॥ आपुलिये धांवे पुढां । घालूनि ज्ञेयाचा गुंडा । उभारी मागिलीकडां । ज्ञातृत्वातें ॥६८॥ मग ज्ञातया ज्ञेया दोघां । तो नांदणुकेचा बगा । माजीं जालेनि पैं गा । वाहे जेणें ॥ ६९ ॥ ठाकूनि ज्ञेयाची शिंव । पुरे जयाची धांव । सकळ पदार्थां नांव ।

बुद्धि पाप व पुण्य यांचा गंधहि जाणत नसते. जशी एखादी नदी गंगेस मिळाली असतां तिचा पूर्वीचा अपवित्रपणा राहात नाहीं ४५०. अर्जुना ! अग्नीला जर अग्निचा स्पर्श झाला तर कोण कोणाला पोळील बरें ! किंवा शस्त्र आपणच आपल्याला कधीं रुपेल काय ? ५१. त्याप्रमाणें आपल्या स्वरूपाहून कोणतेंहि कर्म आपणाहून भिन्न आहे, असें जो समजत नाहीं अशा स्थितींत कोणते [विहितादिक] कर्म त्याच्या बुद्धीला कर्तृत्वानें लिप्त करील ? ५२. म्हणून कार्य, कर्ता व क्रिया इत्यादि सर्व त्रिपुटी ज्याला आपलेंच स्वरूप झाले आहे, त्याला शरीरादिकांकडून होणाऱ्या कर्मांपासून कधींहि बंधन होत नाहीं ५३. आपल्या बुद्धि चातुर्यानें [देहात्मत्व भ्रमात्मक अभिमान धारण करून स्वतःस ] 'कर्ता' कर्तृत्ववान् समजणारा जो जीवात्मा तो कर्मास कारणीभूत असलेलीं शरीरादिक पांच कारणें, ह्याच कोणी खाणी काढून दहा इंद्रियरूपी दहा आऊतांच्या साह्यानें यच्चयावत् कर्में करीत असतो ५४. आणि त्या ठिकाणीं न्याय [ विहित ] किंवा अन्याय [निषिद्ध] अशा दोन प्रकारचें आकार [कर्में करण्याचे ] साधून कर्मांचीं भुवनें-मंदीरें तयार करून उभारण्यास एक क्षणहि लावीत नाहीं ५५. पण या एवढ्या मोठ्या कृत्यास आत्मा हा खरोखर साह्यकर्ताहि होत नाहीं व तो या कामाच्या आरंभाला हात लावतो असें म्हणशील; पण म्हणूं नकोस ५६. तो केवल ज्ञानस्वरूप व सर्व कर्माचा साक्षीभूत आहे असे असतां, तो त्या कर्म प्रवृत्तीचा जो संकल्प उत्पन्न होतो, त्याला तरी तो आपण स्वतः निरोप-आज्ञा देतो काय ? [तर नाहीं.] ५७. तर कर्म प्रवृत्तिसाठींहि ज्ञानस्वरूप आत्म्याला परमार्थतः स्वतःला असें यत्किंचितहि परिश्रम पडत नाहींत, कारण, कर्म प्रवृत्तीला लागणारी सर्व बिगार [ खटपट ] वाहणारे देहबुद्धीवान् [ देहतादात्म्य भ्रांतिग्रस्त ] जीवच आहेत ५८. म्हणून जो केवळ शुद्ध आत्मस्वरूपच झाला आहे, त्याला ही कर्माची बंदीशाळा नाहींच नाहीं ५९. परंतु अज्ञानरूपी पटावर जें विपरीत [ स्थूल-सूक्ष्म प्रपंचाच्या वृत्ति ] ज्ञानाचें चित्र उमटतें तेथें चित्र, चित्र काढणारा चितारी व चित्रपट ही त्रिपुटी प्रसिद्ध-स्पष्ट आहे, ती आतां तुला सांगतों ४६०.

**अन्वयार्थ**--**ज्ञानं**-ज्यानें सर्व विषयांचें ज्ञान होतें तें ज्ञान-**ज्ञेयं**-सर्व प्रकारचें ज्ञेय-विषय-**परिज्ञाता**-त्यांना जाणणारा भोक्ता-**त्रिविधा कर्मचोदना**-अशी ही तीन प्रकारची कर्मचोदना आहे. कर्मांत प्रवृत्त करणारी सामग्री आहे-**करणं**-बाह्य व आंतर इंद्रियें-**कर्म**-कर्त्याला अत्यंत इष्ट असलेलें कर्म-**कर्ता**-कारणांकडून व्यापार करविणारा-**इति**-असा-**त्रिविधः**-तीन प्रकारचा-**कर्मसंग्रहः**-कर्मसंग्रह आहे १८

कारण, ज्ञान, ज्ञाता व ज्ञेय या स्वरूपाची हीच त्रिपुटी जगास कारणीभूत आहे. आणि हिच्यापासून कर्माची निःसंशय प्रवृत्ति होते, असें समज ६१. हे धनंजया ! आतां ह्याच त्रिपुटींतील प्रत्येकांची निरनिराळीं स्वरूपें उघड करून सांगतों तीं ऐक ६२. तर जीवरूपी सूर्यबिंबाची वृत्तिज्ञानरूपी किरणें श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियादिद्वारां विषयरूपी कमळाचे कळीकडे धांवत येऊन त्या विषयात्मक कळ्यांना उमलवितात ६३. अथवा जीवरूपी राजाचे उपलाणी म्हणजे खोगीराशिवाय, मोकळ्या पाठीचें, संकल्परूपी घोडे स्वारीसाठीं बरोबर घेऊन, इंद्रियांचे समुदाय विषयरूपी प्रदेशावर स्वारी करून त्या देशांतून जी [ भोगात्मक ] लूट आणितात ६४. हें असो, जें ज्ञान या इंद्रियांच्याद्वारें वागून आपला व्यवहार चालवितें व जें जीवाला सुख व दुःख यांचें भोग प्रत्यक्ष अनुभवास आणून देतें व जें ज्ञान गाढ निद्राकालीं [ अज्ञानांत ] लीन होऊन असतें ६५. त्यावेळीं असलेल्या प्राज्ञ-बीजभूत त्या जीवाला आतां 'ज्ञाता' असें म्हणतात, आणि जें [ इंद्रियद्वारां व्यवहारास कारणीभूत किरणें म्हणून वर जें ] हे येथें सांगितलें, त्यालाच 'ज्ञान' असें म्हणतात, असें तूं समज ६६. अर्जुना ! जें जीवाचे विपरीत ज्ञान अविद्येच्या पोटांतून उपजतांक्षणींच आपल्यास तीन ठिकाणीं वांटून घेतें ६७. ते असें, आपल्या धांविपुढें-वृत्तीपुढें जाणावयाचे विषयरूप [ ज्ञानहीन जडास ] दगडास 'ज्ञेय' करून आपल्या मागचे बाजूस ज्ञात्याला [ आश्रयास ] उभें करिते ६८. मग जें ज्ञान ज्ञाता व ज्ञेय या दोघांचा सांधा जुळविणारें जें अतःकरणवृत्तिरूप तें ज्ञान त्या उभयांच्या मध्यें राहतें. ज्ञातृत्वादि त्रिपुटीरूप व्यवहार चालवितें ६९. ज्ञेयाच्या शिंववर

१ वार्ता, गंध. २ मिळाली असतां. ३ अपवित्रपणा. ४ भेटला असतां ५ भाजतो. ६ कोणता पदार्थ. ७ कार्य करणारा व करण. ८ कौशल्यानें. ९ हेतु. १० इंद्रियरूप दहा नांगरांनीं ११ न्याय. १२ आकार. १३ क्षणहि १४ मोठ्या. १५ साह्यकर्ता. १६ आरंभास. १७ ज्ञानस्वरूप. १८ बिगारीत. १९ द्वैताचें. २० चित्र काढणारी, चित्र व पट हीं त्रिपुटी २१ आकार. २२ स्पष्टीकरण. २३ किरण. २४ कळी. २५ घोडें. २६ पाठीवर खोगीर नसलेले, उघड्यापाठीचे. २७ हत्यारें. २८ सुखदुःख भोगरूपीलूट. २९ गाढ झोंपेंत. ३० नाहींसें होतें. ३१ अज्ञानाच्या. ३२ उपजतांच.

सूतसे जें ॥४७०॥ तें गा सामान्य ज्ञान । या बोला नाहीं आन । ज्ञेयाचेंहि चिन्ह । आइक आतां ॥७१॥ तरी शब्द स्पर्शु । रूप गंध रसु । हा पंचविध आभासु । ज्ञेयाचा तो ॥ ७२ ॥ जैसें एकेचि चूतफळें । इंद्रियां वेगवेगळें । रसें वर्णें परिमळें । भेटिजे स्पर्शें ॥ ७३ ॥ तैसें ज्ञेय तरी एकसरें । परी ज्ञान इंद्रियद्वारें । घे म्हणौनि प्रकारें । पांचें जालें ॥ ७४ ॥ आणि समुद्रीं वोघाचें जाणें । सरे लाणीपासीं धांवणें । कां फळीं सरे वाढणें । सस्याचें जेवीं ॥ ७५ ॥ तैसें इंद्रियांच्या वाहवटीं । धांवतया ज्ञाना जेथ ठी । होय तें गा किरीटी । विषय ज्ञेय ॥ ७६ ॥ एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया । तिहीं रूप केलें धनंजया । हे त्रिविध सर्व क्रिया- । प्रवृत्ति जाण ॥ ७७ ॥ जे शब्दादि विषय । हें पंचविध जें ज्ञेय । तेंचि प्रिय कां अप्रिय । एकेपरीचें ॥ ७८ ॥ ज्ञान मोटकें ज्ञातया । दावी ना जंव धनंजया । तंव स्वीकारा कीं त्यजावया । प्रवर्तेचि तो ॥ ७९ ॥ परी मीनातें देखोनि बकु । जैसा निधानातें रंकु । कां स्त्री देखोनि कामुकु । प्रवृत्ति धरी ॥ ४८० ॥ जैसें खालारां धांवे पाणी । भ्रमर पुष्पाचिये घाणीं । नाना सुटला सांजवणीं । वत्सुचि पां ॥ ८१ ॥ अगा स्वर्गींची उर्वशी । ऐकोनि जेवीं माणुसीं । वराता लावीजती आकाशीं । यागांचिया ॥ ८२ ॥ पैं पारिवा जैसा किरीटी । चढला नभाचिये पोटीं । पारवी देखोनि लोटी । आंगचि सगळें ॥ ८३ ॥ हें ना घनगर्जनासरिसा । मयूर वोवांडे आकाशा । ज्ञाता ज्ञेय देखोनि तैसा । धांवचि घे ॥ ८४ ॥ म्हणौनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता । हे त्रिविध गा पंडुसुता । होयचि कर्मा समस्तां । प्रवृत्ति येथ ॥ ८५ ॥ परी तेंचि ज्ञेय विपायें । जरी ज्ञातयातें प्रिय होये । तरी भोगावया न साहे । क्षणही विलंबु ॥ ८६ ॥ नातरी अवचटें । तेंचि विरुद्ध होऊनि भेटे । तरी युगांत वाटे । सांडावया ॥ ८७ ॥ व्याळा कां हारा । वरपडा जालेया नरा । हरिखु आणि दरारा । सरसाचि उठी ॥ ८८ ॥ तैसें ज्ञेय प्रियाप्रियें । देखिलेनि ज्ञातया होये । मग त्याग स्वीकारीं वाहे । व्यापारातें ॥ ८९ ॥ तेथ रागी प्रतिमल्लाचा । गोसांवी सर्वदळाचा । रथु सांडूनि पायांचा । होय जैसा ॥ ४९० ॥ तैसें ज्ञातेपणें जें असे । तें ये कर्ता ऐसिये दशे । जेवितें बैसलें जैसें । रंधन करूं ॥ ९१ ॥ कां भंवरेंचि केला मळा । वरकलुचि झाला अंकसळा । नाना देवो

जाऊन पोंहचलें असतां ज्या ज्ञानाची धांव संपते-खुंटतें व जें ज्ञान सर्व ज्ञेय पदार्थाला [ हें अमुक आहे, तमुक आहे अशी ] नांवें देत असतें ४७०. अर्जुना ! तें सामान्य ज्ञान होय, यांत अन्यथा वा संशय नाहीं. आतां ज्ञेयाचींहि लक्षणें सांगतो, तीं ऐक ७१. तर शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे हे ज्ञेय विषयांचे पांच प्रकारचे भेद दिसून येतात ७२. जसें एकाच आंब्याच्या फळानें दृष्टीस पडल्यावर निरनिराळ्या इंद्रियांना निरनिराळ्या प्रकारानें भोग द्यावेत म्हणजे ' आंबा ' या शब्दानें ' कानास ' भेटावें, रसानें जिभेस समजावें, रंगानें डोळ्यास भेटावें, परिमळानें नाकाप भेटावें आणि स्पर्शानें त्वचेस भेटावें ७३. तसें ज्ञेय तर एकच आहे, परंतु जीव हा एकाच ज्ञेयाचें आपल्या निरनिराळ्या पांच इंद्रियांच्या द्वारानें त्याजविषयीं निरनिराळें ज्ञान संपादन करून घेतो. म्हणून त्या ज्ञेयाचे शब्दस्पर्शादि पांच प्रकार झाले आहेत ७४. समुद्रास मिळाल्यावर नदीच्या ओघाचें वाहणें संपतें, शेवटच्या मुक्कामापाशीं प्रवाशाचें चालणें संपतें. अथवा धान्यादि पिकांची वाढ त्यास कणसें, फळें आल्यावर ज्याप्रमाणें खुंटतें ७५. त्याप्रमाणें अर्जुना ! इंद्रियांच्या द्वारें धांवत असलेल्या ज्ञानाचा जेथें शेवट होतो, ते थांबते त्या विषयालाच ' ज्ञेय ' असें म्हणतात ७६. याप्रमाणें धनंजया ! ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या तिघांचीं लक्षणें तुला सांगितलीं ही त्रिपुटी सर्व प्रकारच्या कर्मांच्या मूळ प्रेरणेस कारणीभूत-प्रेरक आहे, असें जाण ७७. कारण, शब्दादि विषय हेच पांच प्रकारचे ज्ञेय होय आणि तेंच प्रिय किंवा अप्रिय या दोन प्रकारांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारचें असतें ७८. हें धनंजया ! ज्ञान हें ज्ञात्याला तो विषयात्मक ज्ञेयपदार्थ किंचित् दाखवितें न दाखवितें तोंच त्याचा [ प्रिय-सुखसाधन असल्यास ] स्वीकार किंवा [ अप्रिय-दुःखसाधन असल्यास ] त्याग करण्याविषयीं तो ज्ञाता उद्युक्त, प्रवृत्तच होतो ७९. परंतु, माशाला पाहतांच जसा बगळा त्यांस धरावयास अति त्वरेनें झडप घालतो अथवा द्रव्याचा ठेवा पाहतांक्षणीं तो घेण्यास दरिद्री मनुष्य धांवतो, किंवा स्त्री पाहतांच जसा कामुक पुरुष तिची प्राप्ति करून घेण्याविषयीं जितक्या वेगानें पुढें प्रवृत्ति धरून सरसावतो ४८०. जसें पाणी उतारावर धांवतें, भ्रमर पुष्पांचा वास घेण्यास धांवतो अथवा धार काढण्याचें वेळीं वांसरूं सोडल्यावर तें वांसरूं गाईकडे अति त्वरेनें धांवत जातें ८१. अरे ! स्वर्गांतील उर्वशी नामक अप्सरेविषयींचें वर्णन ऐकून ती उपभोगास मिळावी म्हणून जसे त्या कामी लोकांकडून आकाशांत यज्ञात्मक साधनानुष्ठानाच्या शिड्या लाविल्या जातात ८२. अथवा अर्जुना ! आकाशांत फिरत उंच चढलेला पारवा पारवीस पहातांच जसा एकदम आपलें सगळें आंगच लोटून देऊन तिजजवळ येतो ८३. इतकेंच नव्हे ! तर मेघांची गर्जना होतांक्षणींच मोर जसा आनंदयुक्त होऊन कौतुकानें आकाशांत उड्डाण करण्याचा प्रयत्न करूं लागतो. तसा ज्ञाता हा ज्ञेयास [ विषयास ] पाहून तिकडे धांवच घेत असतो ८४. म्हणून हें पंडुसुता ! ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता हीच त्रिपुटी कर्मास प्रेरणा करणारी अर्थात् प्रवृत्तीस कारणीभूत होते ८५. आणि कदाचित् तोच ज्ञेय विषय जर ज्ञात्यास प्रिय आवडता असेल तर मग तो विषय भोगण्याविषयीं त्याला एका क्षणाचाहि विलंब सहन होत नाहीं ८६. अथवा कदाचित् तोंच ज्ञेय-विषय ज्ञात्यास जर अप्रिय नावडता असेल तर त्या विषयाचा केव्हां एकदांचा त्याग होईल, असें वाटतें त्या त्याग करण्याविषयीं एकेक क्षणहि वेळ लागला तर तो वेळ त्याला युगाप्रमाणें भासतो ८७. एखादा मनुष्य सर्पाजवळ किंवा निल मण्यांचा हाराजवळ प्राप्त झाला व सर्पावर हा रत्नहार आहे, अशी समजूत झाली तर त्या भावनेनें हर्ष होतो व त्यास हात लावतांक्षणींच तो हार नसून सर्प आहे असें लक्षांत आलें कीं, लागलींच त्यास भीती उत्पन्न होतें ८८. त्याप्रमाणें प्रिय किंवा अप्रिय विषय पाहिल्यावर ज्ञात्याची स्थिति होते आणि त्या ज्ञेय विषयाचा त्याग किंवा स्वीकार करण्याबद्दलच्या क्रियेकडे तो प्रवृत्त होतो; ८९. तेव्हां [ रथावर आरूढ होऊन जाणारा ] राजा बरोबरीच्या पहिलवानाबरोबर कुस्ती करण्याचा रागी-शोकी आहे व जो सर्व चतुरंग सेनेचा सत्ताधारी-अधिपति असला; तरीहि समोर येणारा दुसरा मल्ल-पहिलवान् पाहिल्याबरोबर त्याच्याशीं लढत करण्यासाठी रथ सोडून खालीं उतरावा व [ दंड थोपटून उभा राहण्यासाठीं ] पादचारी व्हावा ४९०. तसा स्वस्थानावर ज्ञातेपणानें ज्ञाता म्हणून असतो, तोच [ वृत्तिज्ञानानें ] विषयासक्त झाला कीं, लागलींच तो ' कर्ता ' अशा [ हीन ] अवस्थेस येऊन पोचतो असें त्याचें कर्तेपणास येणें. हें ज्याप्रमाणें पानावर बसून आयते जेवण्याच्या अधिकारी मनुष्यानें तें सुख सोडून स्वयंपाकाचें कष्ट करण्यास बसावें ९१. किंवा आपल्यास पुष्परेणु भोगण्यास मिळावें म्हणून भ्रमरानेंच

रिगाला देउळा- । चिया कामा ॥ ९२ ॥ तैसा ज्ञेयांचिया हांवां । ज्ञातों इंद्रियांचा मेळावा । राहाटवी तेथ पांडवा । कर्ता होय ॥ ९३ ॥ आणि आपण होउनी कर्ता । ज्ञाना आणी करणंता । तेथें ज्ञेयंचि स्वभावतां । कार्य होय ॥ ९४ ॥ ऐसा ज्ञानाचिये निजगती । पालटु पडे गा सुमती । डोळ्याची शोभा रातीं । पालटे जैसी ॥९५॥ कां अदृष्ट जालिया उदासु । पालटे श्रीमंताचा विलासुं । पुनिवेपाठीं शीतांशु । पालटे जैसा ॥ ९६ ॥ तैसा चाळितां करणें । ज्ञाता वेष्टिजे कर्तेपणें । तेथिंचीं तियें लक्षणें । ऐक आतां ॥ ९७ ॥ तरी बुद्धि आणि मन । चित्त अहंकार हन । हें चतुर्विध चिन्ह । अंतःकरणाचें ॥ ९८ ॥ बाह्य त्वचा श्रवण । चक्षु रसना घ्राण । हें पंचविध जाण । इंद्रियें गा ॥ ९९ ॥ तेथ आंतुलें तंव करणें । कर्ता कर्तव्या घे उमाणें । मग तें जरी जाणें । सुखा येतें ॥ ५०० ॥ तरी बाहेरीलें तियेंही । चक्षुरादिकें दाहाही । उठौनि लवलाहीं । व्यापारा सूये ॥ १ ॥ मग तो इंद्रियेंकदंबु । करविजे तंव रांबु । जंव कर्तव्याचा लाभु । हातासि ये ॥ २ ॥ ना तें कर्तव्य जरी दुःखें । फळेल ऐसें देखे । तो लावी त्यागमुखें । तियें दाहाही ॥ ३ ॥ मग फिटे दुःखाचा ठावो । तंव राहाटवी रात्रिदिवो । विकणवेंतें कां रावो । जयापरी ॥ ४ ॥ तैसेनि त्याग स्वीकारीं । वाहातां इंद्रियांची धुरी । ज्ञातयातें अवधारीं । कर्ता म्हणिपे ॥ ५ ॥ आणि कर्तयाच्या सर्व कर्मी । आउतांचिया परी क्षमी । म्हणौनि इंद्रियांतें आम्ही । करणें म्हणों ॥ ६ ॥ आणि हेचि करणेंवरी । कर्ता क्रिया ज्या उभारी । तिया व्यापे तें अवधारीं । कर्म एथ ॥ ७ ॥ सोनाराचिया बुद्धी लेणें । व्यापे चंद्रकरीं चांदणें । कां व्यापे वेल्हाळपणें । वेली जैसी ॥ ८ ॥ नानों प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षु-रसु । हें असो अवकाशु । आकाशीं जैसा ॥ ९ ॥ तैसें कर्तयाचिया क्रिया । व्यापलें जें धनंजया । तें कर्म गा बोलावया । आन नाहीं ॥५१०॥ एवं कर्ता कर्म करण । या तिहींचेंही लक्षण । सांगितलें तुज विचक्षण- । शिरोमणी ॥ ११ ॥ एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेयं । हें कर्माचें प्रवृत्तित्रय । तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्मसंचयो ॥ १२ ॥ वन्हीं ठेविला असे धूमु । आथी बीजीं जेवीं द्रुमु । कां मनीं जोडे कामु । सदा जैसा ॥ १३ ॥ तैसा कर्ता क्रिया करणीं । कर्माचें आहे जितवणीं । सोनें जैसें खाणी ।

जशी आयती बाग टाकून स्वतः बाग लावण्याची खटपट करावी अथवा सोन्याची परीक्षा करणारा सराफच आपले ऐश्वर्य तुच्छ मानून जसा कसोटीचा दगड व्हावा, किंवा देवानेंच जसें [ देवळांत स्वस्थ बसण्याचें सोडून देऊळ बांधण्याचे ] कामास प्रवृत्त व्हावें ९२. तसें विषयाच्या इच्छेनें जेव्हां ज्ञाता-जीव इंद्रियांच्या समुदायास [विषय प्राप्त्यर्थ] कामास लावतो तेव्हां तेथें अर्जुना; तोच 'कर्ता' या दशेस, संज्ञेस प्राप्त होतो ९३. आणि आपण जो ज्ञाता, तो कर्ता होऊन ज्ञानाला करणता [ साधनपण ] आणतो मग येथें ज्ञेय हें सहजच क्रियाफल म्ह. कार्य होतें ९४. हे सुमते ! अशा रीतीनें ज्ञानाच्या स्वतःच्या गतीस पालट पडतो [ ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी जाऊन त्याचे ऐवजी तेथे कर्ता, करण व कर्म ही त्रिपुटी येते ] जसे नेत्राचें तेज तेंच, पण कमी झाल्यानें ते रात्री विशेष उपयोगी पडत नाहीं ९५. किंवा दैव उदास-प्रतिकूल झाल्यावर श्रीमंताचे विलास कमी कमी होऊन मावळतात अथवा पौर्णिमा झाल्यानंतर ज्याप्रमाणें चंद्राची स्थिति एकेक कलेनें कमी होऊन बदलते ९६. त्याप्रमाणें ज्ञाता इंद्रियांचे द्वारां व्यवहार करण्यास प्रवृत्त झाला म्हणजे तो कर्तेपणानें व्यापला जातो [ कर्तव्याभिमानांत गुंततो ] आतां ज्ञाता हा कर्ता होतो त्या वेळची त्याचीं लक्षणें तुला सांगतों, तीं ऐक ९७. तर बुद्धि, मन, चित्त व अहंकार अशा या एकाच अंतःकरणाच्या कार्यपरत्वें चार प्रकारच्या वृत्ति आहेत ९८. आणि बाहेर त्वचा, कान, डोळे, जिव्हा व नाक अशीं पांच प्रकारचीं ज्ञानेंद्रियें आहेत असें समज ९९. तेव्हां कर्ता जो जीव तो अंतःकरण चतुष्टयात्मक वृत्तीच्या योगें जेव्हां कर्म करण्याविषयीं स्फुरण येऊन विचार करतो, तेव्हां जर हे कर्म करणें आपल्यास सुखकारक होईल असें त्यास वाटले ५००. तर नेत्रादिक पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशा दहाहि बाह्येंद्रियांना त्वरेनें उठवून त्यांना तो क्रियात्मक व्यापार करावयास लावितो १. नंतर त्या इंद्रिय-समुदायाला त्या आरंभिलेल्या कर्माचें फल हातीं येईपर्यंत सारखा राबवितो २. किंवा जर त्या कर्मापासून दुःख हें फल होईल असें त्यास वाटलें, तर तो त्या कर्माचा त्याग करण्याकडे त्याच दहाहि इंद्रियांची योजना करितो ३. एवढेच नव्हे तर मग जसा एखादा शेतसारा थकलेल्या कणहीन-ज्याचे जवळ धान्याचा एक कणहि नाहीं त्या शेतकऱ्याला राजा तो शेतसारा वसूल करण्याकरितां रात्रंदिवस राबवितो, तसा तो त्या दुःखाचा ठाव ठिकाणा नाहींसा होईपर्यंत त्या इंद्रियसमुदायास रात्रंदिवस राबवितो ४. अशा प्रकारें त्यागार्थ अथवा स्वीकारार्थ कराव्या लागणाऱ्या व्यापारांत इंद्रियांची योजना करण्यासाठीं त्या इंद्रियांचे पुढारीपण ज्ञात्यानें आपल्याकडे घेतले म्हणजे त्या ज्ञात्यालाच 'कर्ता' असें म्हणतात ५. आणि कर्त्याच्या सर्व कर्मव्यवहारांत हीं इंद्रियें आउताप्रमाणें [ कर्म करण्यास ] समर्थ-कार्यक्षम असतात. म्हणून आम्ही त्या इंद्रियांस 'करणें' म्हणजे क्रियेचीं साधनें असें म्हणतो ६. आणि याच इंद्रियांकरवीं कर्ता ज्या ज्या क्रिया उभारतो-करितो, त्या क्रियांकडून जें व्यापिलें जातें त्यास येथें 'कर्म' असें म्हणतात ७. सोनाराच्या बुद्धीनें जसे दागिने व्यापिले जातात, चंद्राच्या किरणांनीं जसें चांदणें व्यापिलें जातें, किंवा विस्तृतपणानें जसा वेल व्यापिला जातो ८. अथवा सूर्याच्या प्रभेनें जसा सूर्यप्रकाश व्यापला जातो व गोडीनें जसा उंसाचा रस व्यापला जातो, हें असो, अवकाश जसा आकाशानें व्यापिला जातो ९. तसें अर्जुना ! कर्त्याच्या क्रियांनीं जें व्यापिलें जातें तेंच कर्म होय, यांत अन्यथा वा शंका नाहीं ५१०. याप्रमाणें चतुरश्रेष्ठ अर्जुना ! तुला कर्ता, कर्म व करण या तिघांचींहि लक्षणें सांगितलीं ११. म्हणून येथें ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय हीं त्रयी-तीन कर्मप्रवृत्ति जनक [ कर्म प्रेरक ] आहेत. तसेंच कर्ता करण व कार्य हीं त्रयी अर्थात् हा 'कर्म संचय' [ कर्म सांठा ] आहे १२. विस्तवांत जसा धूर हा अगदीं ठेवल्यासारखाच असतो, बीजांत जसा वृक्ष सूक्ष्मरूपानें असतो, अथवा मनामध्यें जसा नेहमीं काम-संस्कार असतो १३. किंवा जसें सुवर्णाच्या खाणींचे सोनेंच जीवन आहे तसा कर्ता, क्रिया व करणें [ इंद्रियें ]

१ विषयेच्छेनें. २ विषय. ३ इंद्रियस्वरूप. ४ विषय. ५ दैव. ६ प्रतिकूल. ७ ऐश्वर्य. ८ चंद्र. ९ इंद्रियें. १० मनादि क्रियासाधनें. ११ जीव. १२ स्फुरण. १३ घालतो, लावतो. १४ इंद्रियसमुदाय. १५ राबणूक, व्यापार. १६ वसूल करण्याकरितां. १७ प्रवृत्ति, पुढारीपण. १८ नांगरादिकोंच्या. १९ खपवितो. २० क्रियासाधनें. २१ विस्तारानें. २२ अथवा. २३ इंद्रियें. २४ ज्ञाता, ज्ञान, कर्ता, ज्ञेय कार्य [ कर्म ] करण [ इंद्रियें ] २५ जाणण्याची वस्तु. २६ कर्माचें साहित्य. २७ वृक्ष. २८ इच्छा. २९ जिव्हाळा.

सुवर्णाचिये ॥ १४ ॥ म्हणौनि हें कार्य मी कर्ता । ऐसें आथि जेथ पंडुसुता । तेथ आत्मा दूरी समस्ता- । क्रियांपासीं ॥ १५ ॥ यालागीं पुढतपुढती । आत्मा वेगळाचि सुमती । आतां असो हे किती । जाणतासि तूं ॥ १६ ॥

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः । प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

परी सांगितलें जें ज्ञान । कर्म कर्ता हन । ते तिन्ही तिहीं ठायीं भिन्न । गुणीं आहाती ॥ १७ ॥ म्हणौनि ज्ञाना कर्मा कर्तया । पैतेजों नये धनंजया । जे दोनी बांधती सोडावया । एकचि प्रौढ ॥ १८ ॥ तें सात्त्विक ठाउवें होये । जे गुणभेदु सांगों पाहे । जो सांख्यशास्त्रीं आहे । उेवाइला ॥ १९ ॥ जें विचारक्षीरसमुद्र । स्वबोधकुमुदिनीचंद्र । ज्ञानडोळसां नरेंद्र । शास्त्रांचा जें ॥ ५२० ॥ कीं प्रकृतिपुरुष दोनी । मिसळलीं दिवोरजनीं । तियें निवडितां त्रिभुवनीं । मार्तंडु जें ॥ २१ ॥ जेथ अपारा मोहराशी । तत्त्वाच्या मापीं चोविसीं । उगाणां घेऊनि पैरेशीं । सुखाडिजे ॥ २२ ॥ अर्जुना तें सांख्यशास्त्र । पढे जयाचें स्तोत्र । तें गुणभेदचरित्र । ऐसें आहे ॥ २३ ॥ जे आपुलेनि आंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें । दृश्यजात तितुकें । अंकित केलें ॥ २४ ॥ एवं सत्त्वरजतमा । तिहींची एवढी असे महिमा । जे त्रैविध्य आदी ब्रह्मा । अंतीं कृमी ॥ २५ ॥ परी विश्वींची आघवी मांदी । जेणें भेदलेनि गुणभेदीं । पडिली तें तंव आदी । ज्ञान सांगों ॥ २६ ॥ जे दिठी जरी चोख कीजे । तरी भलतेंही चोख सुंजे । तैसें ज्ञानें शुद्धें लाहिजे । सर्वेही शुद्ध ॥ २७ ॥ म्हणौनि तें सात्त्विक ज्ञान । आतां सांगों दे अवधान । कैवल्यगुणनिधान । श्रीकृष्ण म्हणे ॥ २८ ॥

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते । अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥

तरी अर्जुना गा तें फुडें । सात्त्विक ज्ञान चोखडें । जयाच्या उदयीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसीं ॥ २९ ॥ जैसा सूर्य न देखे अंधारें । सरितां नेणिजती सागरें । कां कवळिलिया न धरे । आत्मछाया ॥ ५३० ॥ तयापरी जया ज्ञाना । शिवादि तृणावसाना । इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ॥ ३१ ॥ जैसें हातें चित्र पाहातां । होय पाणियें मीठ धुतां । कां चेवोनि स्वप्ना येतां । जैसें होय ॥ ३२ ॥ तैसें

ही सर्व त्रिपुटी कर्माचें जीवनच–जिव्हाळाच आहे. म्हणून १४. हें पंडुसुता ! जेथें अमुक एक कार्य व त्या कार्याचा मी कर्ता, असा भाव, कर्तेपणा जीवानें एकदां धारण केला म्हणजे तेथें सर्व क्रिया त्याच्याजवळ येतात, परंतु तेव्हांहि आत्मा या सर्व क्रियांपासून दूर असतो, हें विसरूं नकोस १५. याच कारणास्तव हें सुमते, कर्मापासून आत्मा वेगळाच आहे, हें तुला वारंवार किती सांगावें ? आतां हें राहूं दे. कारण, हें तूं जाणतच आहेस १६.

**अन्वयार्थ**––**गुणसंख्याने**–गुणांची गणना ज्यांत केली आहे त्या कपिलाच्या सांख्यशास्त्रांत–**ज्ञानं**–ज्ञान–**कर्म**–क्रिया **च**–व–**कर्ता च**–क्रियांचा कर्ता–**गुणभेदतः**–तत्त्वादि गुणांच्या भेदानें–**त्रिधाएव**–तीन प्रकारचाच–**प्रोच्यते**–सांगितला जातो–**तानि अपि**–तीं ज्ञानादिकहि–**यथावत्**–यथाशास्त्र–**श्रृणु**–ऐक १९.

पण त्यांत तुला जें ज्ञान, कर्म व कर्ता म्हणून हें जें तीन आतां सांगितलें, तीं तिन्हीं गुणभेदामुळें निर-निराळीं तीन प्रकारचीं झालीं आहेत १७. म्हणून अर्जुना ! केवळ ज्ञान, कर्म व कर्ता यांच्यावर विश्वासूं, विसंबू नये हो ! कारण, यांतील राजस व तामस या दोन गुणांपासून झालेले प्रकार मनुष्यास बांधणारे–बद्ध करणारे आहेत व फक्त सत्त्वगुणसंपन्न असा एकच प्रकार सुटका करण्यास समर्थ आहे १८. तो सात्त्विक गुणाचा प्रकार असा कीं, ज्या गुणभेदाविषयीं सांख्य-शास्त्रांत विवेचन केलेलें आहे, तो प्रकार तुला समजेल असा सांगतों १९. जें सांख्यशास्त्र जणुं काय विचार-रूपी क्षीरसमुद्रच आहे, आत्मबोधरूपी चंद्र विकासनी कमलास प्रफुल्लित करणारा जणुं चंद्रच आहे आणि ज्ञानानें डोळस म्ह. ज्ञान प्रतिपादक सर्व शास्त्रांत श्रेष्ठ राजाच आहे; ५२०. किंवा प्रकृति व पुरुष हींच दोन्हीं जणुं काय दिवस व रात्र असून, याप्रमाणें ती अहर्निश एकमेकांत मिसळली आहेत कीं, त्यांना वेगवेगळे, पृथक् करून दाखविणारे सांख्यशास्त्र ते या त्रिभुवनांत सूर्यच आहे २१. जें सांख्यशास्त्र अपार अशा मोहाच्या राशीचें [ संसाराचे ] चोवीस तत्त्वांच्या मापानें मोजमाप घेऊन निवाडा करून परतत्त्व प्राप्तिसह सुखी होऊन राहावयास लावते २२. अर्जुना ! असें जें सांख्यशास्त्र, तें ज्या गुणभेदाचें वर्णन करितें, त्या तीन गुणभेदाचें चरित्र–प्रकार वर्णन असें आहे २३. ज्या तीन गुणांनीं आपल्या अंगभूत सामर्थ्यानें त्रिविधपणाचें शिक्के देऊन सर्व दृश्य पदार्थ चिन्हित करून, आपल्या स्वाधीन केलें आहेत २४. याप्रमाणें सत्त्व, रज व तम या तीन गुणांचा एवढा सामर्थ्यमहिमा आहे कीं, त्यांनीं ब्रह्मदेवापासून तों थेट कीटकापर्यंत सर्व पदार्थांत तीन भेद केलें आहेत २५. परंतु विश्वांतील सर्व पदार्थसमुदाय, जें [ ज्ञान ] भेदले गेल्यामुळें या तीन गुणांच्या सपाट्यांत सांपडलें तें 'ज्ञान' तर तुला अगोदर सांगतों २६. कारण, दृष्टि कां एकदां निर्मळ–शुद्ध केली म्हणजे त्यास पाहिजे ते शुद्ध दिसते म्ह. त्या पदार्थांचें यथार्थ स्वरूप समजतें; त्याप्रमाणें शुद्धज्ञान प्राप्त झालें असतां, त्यामुळें सर्व पदार्थांचें शुद्ध स्वरूप कळतें २७. म्हणून तें 'सात्त्विक ज्ञान' आतां तुला सांगतों, लक्ष दे, असें कैवल्यगुणनिधान जे भगवान् श्रीकृष्ण ते म्हणाले २८.

**अन्वयार्थ**––**येन**–ज्या ज्ञानानें–**विभक्तेषु सर्वभूतेषु** अगदीं भिन्न भिन्न असलेल्या सर्व भूतांमध्यें–**एकम् अविभक्तम् अव्ययं भावम्**–एक अभिन्न अव्ययभाव–आत्मवस्तु–**ईक्षते**–पाहतो–**तत् ज्ञानं**–तें ज्ञान–**सात्त्विकं**–सात्त्विक आहे, असें–**विद्धि**–जाण २०.

तर अर्जुना ! तेंच खरोखर शुद्ध सात्त्विक ज्ञान होय कीं, ज्याचा उदय होण्याबरोबर त्यामध्यें ज्ञेय हें ज्ञात्या-सह बुडून लीन होतें २९. ज्याप्रमाणें सूर्य अंधाराला पाहूंहि शकत नाहीं, किंवा समुद्राला नद्यांची अजिबात ओळखहि नसते, अथवा आपल्या पडछायेस कितीहि मिठी मारून धरूं लागलें असतां ती आपलीच सावली; पण सांपडत नाहीं ५३०. त्याप्रमाणें ज्या ज्ञानाला शिवापासून तों अखेर गवतापर्यंतच्या वेगवेगळ्या सर्व व्यक्ति सत्यत्वानें भिन्न दिसत नाहींत ३१. [ पाटीवर काढलेलें ] चित्र पाटीवर हात फिरवून पाहूं लागले असतां तें चित्रच पुसलें जाते किंवा मीठ पाण्यानें धुतलें असतां तें जसें विरघळून नाहींसेंच होते किंवा जागे होऊन स्वप्न पाहूं गेले असतां ते स्वप्नच जसें नाहींसें होतें ३२. तसें

१. वारंवार. २ विश्वासू. ३ रज व तम. ४ सत्त्वगुणच. ५ समर्थ होतो. ६ स्पष्ट केला. ७ आत्मबोध, कमलास प्रफुल्लित कर्ता चंद्र. ८ ज्ञान उत्पन्न करणाऱ्या. ९ दिवस-रात्रीप्रमाणें. १० सूर्य. ११ माप. १२ परतत्त्वाशीं. १३ सुखी व्हावें–सुखी करतें. १४ लवन. १५ आंगच्या बळानें.

१६ आकारानें चिन्हानें, छापानें. १७ तिहेरीपणा. १८ मेळा, समुदाय. १९ कळतें, समजतें. २० मिळवावें. २१ लक्ष. २२ मोक्षप्राप्तीचा ठेवा. २३ शुद्ध. २४ नद्या. २५ सांपडे. २६ गवतापर्यंत.

ज्ञानें जेणें । करितां ज्ञातव्यातें पाहाणें । जाणता ना जाणणें । जाणावें उरे ॥ ३३ ॥ पैं सोनें आटूनि लेणीं । न काढिती आपुलिया आयणी । कां तरंग न घेपती पाणी । गाळूनि जैसें ॥ ३४ ॥ तैसी जया ज्ञानाचिया हाता । न लगेचि दृश्यपथा । तें ज्ञान जाण सर्वथा । सात्त्विक गा ॥ ३५ ॥ आरिसा पाहों जातां कोडें । जैसें पाहातेंचि कां रिगे पुढें । तैसें ज्ञेय लोटोनि पडे । ज्ञाताचि जें ॥ ३६ ॥ पुढती तेंचि सात्त्विक ज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन । हें असो ऐक चिन्ह । राजसाचें ॥३७॥

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् । वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥

तरी पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस । जे भेदाची कांस । धरूनि चाले ॥ ३८ ॥ विचित्रता भूतांचिया । आपण आंतोनि ठिकेरिया । बहु चंकै ज्ञातया । आणिली जेणें ॥ ३९ ॥ जैसें साचा रूपाआड । घालूनि विसराचें कवाड । मग स्वप्नाचें कावाडं । ओपी निद्रा ॥ ५४० ॥ तैसें स्वज्ञानाचिये पौळी । बाहेरि मिथ्या मेंहीं खळीं । तिहीं अवस्थांचिया वह्यांळी । दावी जें जीवा ॥ ४१ ॥ अलंकारपणें झांकलें । बाळा सोनें कां वायां गेलें । तैसें नामीं[15] रूपीं दुरावलें । अद्वैत जया ॥४२॥ अवतरली गाडग्यां घडां । पृथ्वी अनोळख जाली मूढां । वन्हि जाला कोंनडा । दीपत्वासाठीं ॥ ४३ ॥ कां वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे । नाना मुग्धां पटु लोपे । दाऊनि चित्र ॥ ४४ ॥ तैशी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ती भिन्ना । ऐक्यबोधाची भावना । निमोनि[20] गेली ॥ ४५ ॥ मग इंधनीं[21] भेदला अनळु । फुलांवरी परिमळु । कां जळेंभेदें[22] शकलें[23] । चंद्रु जैसा ॥ ४६ ॥ तैसें पदार्थभेद बहुवस । जाणोनि लहान थोर वेष । आंतलें[24] तें राजस । ज्ञान येथ ॥४७॥ आतां तामसाचेंहि लिंग । सांगेन तें वोळख चांग । डावलावेंया[25] मातंग- । सदनें[26] जैसें ॥ ४८ ॥

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् । अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

तरी किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रेंहीन । श्रुति पाठमोरी नग्न । म्हणोनि तया ॥ ४९ ॥ येरींही शास्त्र बटिकरीं । जें निंदेचे विटाळवरी । बोळविलेंसे

१ दृष्टीनें, बुद्धीनें. २ लाटा. ३ आवडीनें. ४ मंदिर. ५ व्यापून. ६ वेगळेपणा, ठिकऱ्या. ७ चकविणें, भ्रम. ८ अज्ञानाचें ९ पडदा. १० कष्टमय स्थिति. ११ मंदिराभोंवतीं. १२ मायेच्या. १३ जागृति, स्वप्न व सुषुप्ति १४ क्रीडा. १५ नामरूपाच्या भेदानें. १६ घागरीमध्यें. १७ अपरिचित. १८ मूर्खांस. १९ पडदा. २० नाश पावलो. २१ काष्ठांनीं. २२ प्रतिबिंबाच्या भेदानें. २३ तुकडे झालेला. २४ व्यापलें. २५ टाकण्यासाठीं. २६ मांगाचें घर.

ज्या ज्ञानाच्या प्रकाशानें ज्ञेय पाहूं गेले असतां तेथें जाणता-ज्ञाता, जाणणें-ज्ञान व जाणावें-ज्ञेय ही त्रिपुटीच उरत नाहीं ३३. परंतु व्यवहारचतुर लोक जसें आपल्या बुद्धीनें दागिने आटवून त्यांतील सोनें काढीत नाहींत [ तर दागिन्याच्या स्वरूपानें सोनेंच आहे असें जाणतात ] किंवा ते तज्ञ लोक पाणी घ्यावयाचे असल्यास त्यावरील लाटा गाळून मग तें पाणी घेत नाहींत ३४. तसा ज्या ज्ञानाच्या हाताला सर्व दृश्य वस्तूंचा भेद लागत-दिसत नाहीं तेंच ज्ञान सर्वतोपरी 'सात्त्विक' ज्ञान आहे,असें समज ३५. कौतुकानें आरसा पाहूं गेलें असतां जसें पाहणाराचेंच प्रतिबिंबरूपानें समोर भान होतें, त्याप्रमाणें ज्ञेयास लोटून [ ज्ञेयत्वाचा बाध करून, ज्ञेय निरासपूर्वक, ज्ञानद्वारां ] पाहूं गेले तर [ ज्ञेयास आत्मभिन्न स्वतंत्रसत्ता-स्फूर्ति नाहींच या दृष्टीनें ] त्या ज्ञेयरूपानें ज्ञाताच [ आत्मस्वरूपच ] सर्वत्र असल्याचें अनुभवास येते ३६. हेंच जें 'सात्त्विक ज्ञान' आहे तेंच मोक्षलक्ष्मीचें मंदिर होय. हें सात्त्विक ज्ञानवर्णन पुरें. आतां तुला 'राजस' ज्ञानाचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक ३७.

**अन्वयार्थ**—**तु**-परंतु-**यत् ज्ञानं**-जें ज्ञान-**सर्वेषु भूतेषु**-सर्व प्राण्यांमध्यें-**पृथक्त्वेन**-प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न रूपानें-**नानाभावान् पृथग्विधान्**-भिन्न भिन्न लक्षणांचे निरनिराळे पदार्थ-**वेत्ति**-जाणतें-**तत् ज्ञानं**-तें ज्ञान-**राजसं**-राजस आहे, असें-**विद्धि**-जाण २१.

तर पार्था ! तेंच ज्ञान राजस होय, कीं जें ज्ञान द्वैताचा, भेदभावाचा आश्रय करून चालत असतें, असें समज ३८. ज्या ज्ञानानें भूतमात्राच्या औपाधिक अनेकत्वामुळें आपण आपल्या ठिकऱ्या ठिकऱ्या [ वेगळेपणा ] करून घेतल्या आहेत व ज्यानें ज्ञात्याला चकवून फारच भ्रमिष्टपणा आणिला आहे ३९. ज्याप्रमाणें निद्रा ही खऱ्या स्वस्वरूपाचे आड विसराचें-अज्ञानाचे दार लावून मग स्वप्नांतील कष्टमय स्थिति आणते ५४०. त्याप्रमाणें जें ज्ञान आत्मज्ञानाच्या मंदिराच्या आवाराबाहेर भोंवताला मिथ्या मायेच्या माळरानावर पसारा घालून जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांचे खेळ दाखवून जीवास फसविते ४१. अलंकाररूपास आलेलें सोनें अलंकार या नांवानें व अलंकारपणानें झांकलें जाऊन लहान मुलास तें अलंकार दाखविलें तरी त्यास सोन्याची ओळख होत सल्यामुळें सोनेंपण बालकदृष्ट्या वांया जातें. त्याप्रमाणें याकार्य असणाऱ्या कल्पित ] नाम-रूपांच्या योगानें [ तत्त्वतः अध्यस्त पदार्थांस अधिष्ठानाव्यतिरिक्त सत्ताच नसल्यामुळें ] अद्वैत परब्रह्मवस्तु असूनहि ज्या ज्ञानाला ते दुरावले आहे ४२. अज्ञानी मनुष्याला मडकी व घागरी यांच्या रूपास प्राप्त झालेली जी माती ती दाखविली असतां त्यास जशी मूळ मातीची अनोळखच झालेली असते, अथवा दिवा पाहिला असतां दीपपणामुळें अग्नीची ओळख होणें कठीण पडते ४३. किंवा मूर्ख मनुष्याला वस्त्रपणाच्या आरोपामुळें त्यांतील तंतूची ओळख न पटून तंतु नाहींसा झाल्यासारखा होतो अथवा मूर्खास, पडदा आपल्यावरील चित्रें दाखवून त्या मूर्खाच्या दृष्टीनें आपण लोपतो म्ह० त्यास पडद्याची ओळख नसते ४४. तसें ज्या ज्ञानानें भूतमात्र भिन्न भिन्न आहेत, असें समजल्यामुळें त्या ज्ञानाची ऐक्यबोधाची भावना नाश पावलेली असते ४५. मग अनेक लांकडें पेटल्यावर त्यांच्या आकाराप्रमाणें अग्नि निरनिराळा भेदला जावा, किंवा अनेक फुलांवरून सुवास भेदला जावा अथवा चंद्राचा प्रकाश पाण्यांत पडल्यामुळें ते पाणी हालल्यावर चंद्राचे तुकडे झाले आहेत असें वाटावें ४६. तसा नानाप्रकारच्या पदार्थांत नामरूपानें पुष्कळ भिन्नपणा आहे, अथवा वेषावरून हा लहान व हा मोठा असा भेद आहे, या समजुतीनें भरलेलें जें ज्ञान, तें 'राजस ज्ञान' होय ४७. आतां गांवाबाहेर असणाऱ्या मांगाचें घर टाळण्याकरितां जसें वाटसरास त्या घराची माहीती बजावून सांगावी लागते, तशी तामस ज्ञानाचीं लक्षणें तुला सांगतों, तीं तामस ज्ञान टाकण्याकरितां सांगतों; हें चांगलें पूर्ण ध्यानांत ठेव ४८.

**अन्वयार्थ**--**तु**-पण-**यत्** [ **ज्ञानं** ]-जें ज्ञान-**एकस्मिन् कार्ये**-एका कार्यात म्ह० शरिरांत किंवा बाहेर प्रतिमादिकांत-**कृत्स्नवत्**-परिपूर्ण असल्यामुळें-**सक्त**-जीव किंवा ईश्वर हा एवढाच, यापेक्षां अधिक नाहीं अशा अभिनिवेशानें युक्त असलेलें-**अहेतुकं**-युक्तिशून्य-**अतत्त्वार्थवत् च**-तत्त्वार्थरहित व त्यामुळें-**अल्पम्**-अगदीं अल्प असतें-**तत् तामसं**-ते तामस ज्ञान म्हणून-**उदाहृतं**-म्हटलेलें आहे २२.

तर अर्जुना ! जें ज्ञान विधिरूपी वस्त्र पांघरल्याशिवाय असें नागवें संचार करितें म्हणूनच सर्वांची व सर्व शास्त्रांची जी श्रुतिमाऊली त्या ज्ञानाचा अव्हेर करून त्याला पाठमोरी होते ४९ श्रुतीस अनुसरणाऱ्या इतर शास्त्रांनींहि त्या तामस ज्ञानास 'ते निंद्य आहे' म्हणून बट्टा-दोष देऊन आपल्याला विटाळ होईल, म्हणून म्लेंच्छधर्मरूपी डोंगराकडे ज्यांची बोळवण केली [ बहिष्कृत

डोंगरीं । म्लेंच्छधर्मांच्या ॥ ५५० ॥ जें गा ज्ञान ऐसें । गुणग्रहें तामसें । घेतलें भवें पिसें । होऊनियां ॥ ५१ ॥ जें सोयरिकें बाधु नेणें । पदार्थीं निषेधु न म्हणे । निरोविलें जैसें सुणें । शून्यग्रामीं ॥ ५२ ॥ तया तोंडीं जें नाडळे । कां खातां जेणें पोळे । तेंचि एक वाळे । येर घेणेंचि ॥ ५३ ॥ पैं सोनें चोरितां उंदिरु । न म्हणे थरुविथरु । नेणें मांसखाइरु । काळें गोरें ॥ ५४ ॥ नाना वनामाजीं बोहंरी । कडसंणी जेवीं न करी । कां जीत मेलें न विचारी । बैसतां माशी ॥ ५५ ॥ अगा वांता कां वाढिलेया । साजुक कां सेडलिया । विवेकु कावळिया । नाहीं जैसा ॥ ५६ ॥ तैसें निषिद्धं सांडूनि द्यावें । कां विहित आदरें घ्यावें । हें विषयांचेनि नांवें । नेणेंचि जें ॥ ५७ ॥ जेतुलें आड पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं । मग तें स्त्री-द्रव्य वाटी । शिश्नोदरां ॥५८॥ तीर्थातीर्थ हे भांख । उदकीं नाहीं सनोळखें । तृषा वोळे[१२] तेंचि सुख । वांचूनियां ॥ ५९ ॥ तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य । तोंडा आवडे तें मेध्यँ । ऐसाचि बोधुं ॥ ५६० ॥ आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियांचि वोळखे । तियेविषयीं सोयरिकें । एकचि बोधु ॥ ६१ ॥ पैं स्वार्थीं जें उपकरे । तयाचि नाम सोयिरें । देहसंबंधु नें सरे । जिये ज्ञानीं ॥ ६२ ॥ मृत्यूचें आघवेंचि अन्न । आघवेंचि आगी इंधंन । तैसें जगाचि आपलें धन । तामसज्ञाना ॥ ६३ ॥ ऐसेनि विश्व सकळ । जेणें विषयोचि मानिलें केवळ । तया एक जाण फळ । देहभरण ॥ ६४ ॥ आकाशपतिता नीरा । जैसा सिंधूचि येक थारा । तैसें कृत्यजात उदरा- । लागींचि बुझे ॥ ६५ ॥ वांचूनि स्वर्ग नरकु आथी । तया हेतु प्रवृत्ति निवृत्ती । इये आघावियेचि राती । जाणिवेची जें ॥ ६६ ॥ जें देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाणप्रतिमा । ययापरौति प्रमा । ढळों नेणें ॥ ६७ ॥ म्हणे पडिलेनि शरीरें । केलेंनिसीं आत्मा सरे । मा भोगावया उरे । कोण वेषें ॥ ६८ ॥ ना ईश्वरु पाहातां आहे । तो भोगवी हें जरी होये । तरी देवचि खाये । विकूनियां ॥ ६९ ॥ गांवींचें देवळेश्वर । नियामकचि होती साचार । तरी देशींचे डोंगर । उगे कां असती ? ॥ ५७० ॥ ऐसा विपायें देवो मानिजे । तरी पाषाणमात्रचि जाणिजे । आणि आत्मा तंव म्हणिजे । देहातेंचि ॥ ७१ ॥ येरें पापपुण्यादिकें । तें आघवेंचि करोनि लटिकें । हित मानी अग्निमुखें । चरणें जें कां ॥७२ ॥ जें चामाचे डोळे दाविती । जें इंद्रियें गोडी लाविती । तेंचि

ठरविलें ] ५५०. जें ज्ञान तमोगुणरूपी पिशाच्चानें पछाडल्यामुळें, त्याचा संचार झाल्यामुळें वेडे होऊन फिरत आहे ५१. जसें ओसाड गांवांत सोडलेलें एखादे कुत्रें स्वेच्छेनें वागते,तसे जें ज्ञान [ विषयोपभोगार्थ ] शरीर, संबंधाची, नात्याची अडचण बाळगीत नाहीं; पदार्थांच्या ठिकाणीं निषेधपणा ओळखीत नाहीं ५२. त्याच्या तोंडांत जें सांपडत नाहीं अथवा जें खाल्लें असतां तोंडच भाजतें तीच वस्तु तें टाकतें, बाकी इतर सर्व वस्तु घेतच असतें ५३. उंदीर [ लाख भरून अलंकार केलेलें ] सोनें चोरून नेत असतांना चांगलें अथवा वाईट हें तो म्हणत नाहीं, अथवा मांस खाणारा हा, मांस काळें आहे कां गोरे आहे, हा भेद जाणत नाहीं ५४. किंवा रानास वणवा लागल्यावर तो जसा बरे वाईट अशी निवड वा कसलाच विचार करीत नाहीं, अथवा माशी पदार्थांवर बसतांना तो [ प्राणी ] जिवंत आहे कां मेलेला आहे याचा विचार करीत नाहीं [ ती माशी वाटेल त्यावर बसते ] ५५. अरे कावळ्यास जसें अन्न ओकलेलें किंवा वाढलेलें, साजुक, ताजे किंवा सडलेलें हा विचार मुळींच नसतो ५६. तसें अपवित्र, निषिद्ध वस्तूंचा सर्वथैव त्याग करावा, अथवा शास्त्रविहित गोष्टींचा आदरानें स्वीकार करावा, हें विषयांच्या बाबतींत जें ज्ञान जाणत नाहीं ५७. जें ज्ञान जेवढे म्हणून कांहीं दृष्टीस पडेल, तेवढे सर्वच्या सर्व उपभोगासाठीं म्हणून घेतें; आणि मग ते स्त्री असल्यास शिश्नास व द्रव्य असल्यास उदरास वांटून देतें ५८. ज्या पाण्यापासून तहान भागते तें तेवढेंच सुख जें मानते, यापेक्षां उदकाच्या बाबतींतहि हें पवित्र किंवा हें अपवित्र, या भाषेचीहि ज्यास ओळख नसते ५९. त्याचप्रमाणें भक्ष्याभक्ष्य व निंद्यानिंद्य यांचा जें तामस ज्ञान विचारच करीत नाहीं, फक्त आपल्या तोंडास जें आवडेल तेंच पवित्र आहे, असाच ज्याचा निश्चय झालेला असतो ५६०. आणि स्त्री जात म्हणून जेवढी आहे तिजविषयीं त्वगिंद्रियांचा भोग्य विषय म्हणून एवढीच एक ज्याची ओळख आहे व त्या स्त्री जातीशी सोयरिक-संबंध करण्याविषयीं एकच जाणीव [ असून त्यास जें तत्पर ] असतें; ६१. हें पहा ! जें आपल्या कामाच्या उपयोगी पडतील तेच आपले सोयरे आहेत, व देहसंबंध झालेलें आहेत, ते सोयरे आहेत असा बोध नाहीं, अशी ज्या [तामस ] ज्ञानाची समजूत असते ६२. जसें सगळें जगच मृत्यूचे अन्न-खाद्य आहे; अग्नीला सगळेंच पदार्थ सरपण आहेत तसें या तामस ज्ञानाला सर्व जगत् हें आपलेंच [ भोग्य] धन आहे, असें वाटतें ६३. याप्रमाणें सर्व विश्व हें उप-भोगार्थ निर्माण केलेलें भोग्यच आहे, अशी ज्या ज्ञानाची समजूत झालेली असते व त्या तामस ज्ञानास देहभरण हेंच एक पुरुषार्थ वा फळ आहे असें समज ६४. आकाशां-तून पडलेल्या पाण्यास समुद्र हाच एक जसा थारा-आश्रय आहे, त्याप्रमाणें जें तामस ज्ञान यच्चयावत् कर्म-कृत्यें हीं केवळ पोटासाठींच आहेत असें समजतें ६५. या विना स्वर्ग किंवा नरक आहेत व त्यांच्या प्राप्तीकरितां यथाशास्त्र विहित व निषिद्ध आचरण हेंच कारण होय, या जाणिवेविषयीं ज्या ज्ञानाला रात्र म्ह. पूर्ण अज्ञान असतें ६६. कारण, परिच्छिन्न देहच आत्मा आहे व ईश्वर म्हणजे दगडाची मूर्ति हाच आहे, या पलिकडे ज्या तामस ज्ञानाची धांव, समजूत नसते ६७. आणि तें तामस ज्ञान असें म्हणतें कीं, हें शरीर पडलें असतां आत्म्याचाच केलेल्या कर्मांसह सदाचाच नाश होतो; मग कर्मांचीं फळें भोगावयास या मृत्युलोकीं कोणत्या रूपानें तो आत्मा शिल्लक राहील ? ६८. किंवा खरें विचारपूर्वक पाहूं गेल्यास ईश्वर आहे [ असें दिसत नाहीं, तथापि] व तो केलेल्या कर्मांचीं फळें भोगावयास लावितो म्हणून जर म्हणावें, तर तसेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, एखादा देवाच्या सोन्यारुप्याच्या मूर्तिच विकून खातो त्याची काय वाट ? ६९. गांवाच्या देव-ळांतील प्रमुख देव तेच जर खरोखर कर्माबद्दल शासन करणारे, नियामक असतील तर त्या मूर्ति ज्या डोंगरांतील दगडांच्या तयार केलेल्या असतात, तें डोंगर तरी स्वस्थ कां बसतील ? ५७०. याप्रमाणें कदाचित् देव आहे असें मानलें, तरी तो दगडाची मूर्तिच आहे असेंच समजतो आणि आत्मा म्हणजे फक्त देहच आहे असें समजतो ७१. याशिवाय इतर जे पाप किंवा पुण्य इत्यादि हीं सर्वच लटकीं-खोटी आहेत असें मानून अग्नि जसा पुढें येणाऱ्या सर्व जिनसांचें सरसकट भक्षण करितो, त्याप्रमाणें जी जी गोष्ट भोगण्यास येईल वा मिळेल, तिचा भोग घेण्यांतच हित आहे, असें जें ज्ञान समजतें ७२. चर्मचक्षू जे जे पदार्थ दाखवितील म्ह. दृष्टीस पडतील व इंद्रियें ज्या विषयांची गोडी लावतील, त्याच

१ बरें वाईट. २ मांस खाणारे. ३ अग्नि, वणवा. ४ विचार. ५ ओकलेल्या. ६ कुजलेल्या. ७ अपवित्र. ८ शास्त्रप्रतिपादित. ९ समोर येईल, दिसेल. १० बोली. ११ ओळखीची. १२ हरे. १३ भक्ष्याभक्ष्य. १४ पवित्र. १५ निश्चय. १६ भोग्यविषय. १७ आपल्या हेतूला. १८ कामास. १९ योग्य होत नाहीं. २० काष्ठ.

साच हे प्रतीती । फुडी जया ॥ ७३ ॥ किंबहुना ऐसी प्रथा । वाढती देखसी पार्था । धूमाची वेली वृथा । आकाशीं जैसी ॥ ७४ ॥ कोरडा ना वोला । उपेगा आथी गेला । तो वाढोनि मोडला । भेंडु जैसा ॥ ७५ ॥ नाना उंसांचीं कणसें । कां नपुंसकें माणुसें । वन लागलें जैसें । सांबरीचें ॥७६॥ नातरी बाळकाचें मन । कां चोराघरींचें धन । अथवा गळास्तन । शेळियेचे ॥ ७७ ॥ तैसें जें वायाँणें । वोसाँळ दिसे जाणणें । तयातें मी म्हणें । तामस ज्ञान ॥७८॥ तेंही ज्ञान इयां भाषां । बोलिजे तो भावो ऐसा । जात्यंधाचा कां जैसा । डोळा वाडु ॥७९॥ कां बधिराचे नीट कान । अपेया नाम पान । तैसे आडनांव ज्ञान । तामसा तया ॥ ५८० ॥ हें असो किती बोलावें । तरी ऐसें जें देखावें । तें ज्ञान नोहे जाणावें । डोळस तम ॥ ८१ ॥ एवं तिहीं गुणीं । भेदलें यथालक्षणीं । ज्ञान श्रोतेशिरोमणी । दाविलें तुज ॥ ८२ ॥ आतां याचि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्धरा । प्रकाशें होती गोचरा । कर्तयांच्या क्रिया ॥ ८३ ॥ म्हणौनि कर्म पैं गा । अनुसरे तिहीं भागां । मोहरे जालिया वोघा । तोय जैसे ॥ ८४ ॥ तेंचि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें असे । तेथ सात्त्विक तंव ऐसें । परिसे आधीं ॥ ८५ ॥

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् । अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥

तरी स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मांनिलें आंगें । पतिव्रतेचेनि पैरिष्वंगें । प्रियातें जैसें ॥ ८६ ॥ सांवळ्या आंगा चंदन । प्रमदालोचनीं अंजन । तैसें अधिकारासी मंडण । नित्यपणें जें ॥ ८७ ॥ तें नित्य कर्म भलें । होय नैमित्तिकीं सांवाइलें । सोनयासि जोडलें । सौरभ्य जैसें ॥ ८८ ॥ आणि आंगा जीवाची संपत्ती । वेंचूनि बाळाची करी पाळती । परी जीवें उबगेणें हें स्थिती । न पाहे माय ॥ ८९ ॥ तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी । परी फळ न सूये दिठी । उखिती क्रिया पेठी । ब्रह्मींचि करी ॥ ५९० ॥ आणि प्रियें आलिया स्वैभावें । शंबळें उरे वेंचे ठाउवें । नव्हे तैसें सत्प्रसंगें करावें । पौरुषे जरी ॥ ९१ ॥ तरी अकरणाचेनि खेदें । द्वेषातें जिवीं न बांधे । जालियाचेनि आनंदें । फुंजों नेणें ॥ ९२ ॥ ऐसऐसिया हातवटिया । कर्म निफजे जें धनंजया । जाण सात्त्विक हें तया । गुणनाम गा ॥ ९३ ॥ ययावरी राजसाचें । लक्षण सांगिजेल साचें । न करी अवधानाचें । वाणेंपण ॥ ९४ ॥

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः । क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

तरी घरीं मातापितरां । धड बोली नाहीं संसारा । येर विश्व भरी आदरा ।

गोष्टी खऱ्या आहेत असा त्याचा पक्का अनुभव-निश्चय आहे ७३. अर्जुना ! फार काय सांगावें ! ! आकाशांत धुराचे लोट वेलीप्रमाणें व्यर्थच वाढतात त्याप्रमाणें ज्याची अनुभूति अशा रीतीनें व्यर्थच वाढत जात असल्याचें आढळांत येईल ७४. कोरडा किंवा ओला असला तरी कोणत्याच उपयोगास येत नाहीं असा जो भेंडाचा वृक्ष तो मोठा वाढून जसा व्यर्थच मोडून जातो ७५. अथवा ऊंसास आलेलीं कणसें किंवा नपुंसक माणसें अथवा निवडुंगाची झाडें, रानें हीं सर्व जशीं निरुपयोगी आहेत, ७६. अथवा बालकाचें मन किंवा चोराच्या घरांत चोरून आणलेलें धन अथवा शेळीचें गळ्यास असणारे स्तन जसे निरुपयोगी असतात, ७७. तसें जें ज्ञान निरर्थक व ओशाळलेलें असें दिसतें त्याला मी 'तामस ज्ञान' असें म्हणतो ७८. त्या तामस ज्ञानासहि 'ज्ञान' अशा शब्दानेंच वर्णन करून सांगतात त्याचा अभिप्राय हाच कीं, मनुष्य जन्मांध असला तरी "त्याचे डोळे मोठे आहेत" असें विरुद्ध अर्थानें म्हणावें ७९. किंवा बहिऱ्याचे कान काय सरळ मोठे आहेत, 'अथवा अपेयास' अपवित्र वस्तूस आपण पान [ पिण्यास योग्य वस्तू ] असें म्हणावें तसें या तामस ज्ञानाला 'ज्ञान' हें केवळ आडनांवच होय ! ५८०. हें राहूं दे. आतां या संबंधानें आणखी किती वर्णन करावें ? तर असें जें ज्ञान दृष्टीस पडेल तें ज्ञानच नव्हें; तर तो प्रत्यक्ष डोळस-स्वच्छ निव्वळ तमोगुणच आहे असें समजावें ८१. याप्रमाणें, हें श्रोतृश्रेष्ठा ! तीन गुणांनीं तीन प्रकारे भेद पावलेलें जें ज्ञान, त्याचीं यथार्थ लक्षणेंहि तुला सांगितलीं ८२. हें धनुर्धरा! आतां याच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या प्रकाशानें कर्त्यांच्या क्रिया उघड दिसून येतात ८३. म्हणून एका पाण्याला जसें ओघाप्रमाणें जिकडे लावावें तिकडे तें वाहात जातें, तसें कर्म हें ज्ञानाच्या तीन भागांमुळें निरनिराळे तीन प्रकारचेच घडतें ८४. तेंच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या अनुरोधानें जें तीन प्रकारचें कर्म होत असतें, त्यांपैकीं सात्त्विक कर्माचीं लक्षणें प्रथम सांगतों तीं ऐक ८५.

**अन्वयार्थ**--**यत्**-जें-**अफलप्रेप्सुना**-फलाच्या प्राप्तीची इच्छा न करणाऱ्या कर्त्याकडून-**अरागद्वेषत: कृतं**-राग-द्वेषावांचून केलेलें-**नियतं संगरहितं कर्म**-नित्य आसक्तिरहित-कर्म-**तत् सात्त्विकम् उच्यते**-त्याला सात्त्विक कर्म म्हटलें जातें २३.

तर पतिव्रता स्त्री-आलिंगनानें प्रिय पतीस जसा संतोष होतो, तसें आपल्या अधिकारानुरूप आपल्या वांट्यास आलेले जें कर्म तें कर्म जो स्वभावत: संतोषानें आचरण करितो ८६. सांवळ्या रंगाच्या शरिरास जसें चंदन शोभतें व तरुण स्त्रियांच्या नेत्रांस जसें अंजन शोभा देतें, तसें ज्या अधिकारानुरूप कर्तव्य अशा नित्य कर्माचें आचरण केलें असतां त्यांस भूषणच येते ८७. तें नित्यकर्म करीत असतां त्यांत नैमित्तिक कर्मांची भर पडली, साहाय्यता लाभली असतां, सोन्याच्या दागिन्यास सुगंधानें शोभा यावी, त्याप्रमाणें नित्य कर्मास शोभा येते ८८. जशी शारीरानें, जीवानें व संपत्ति खर्चूनहि माता आपल्या बालकाचें भरण-पोषण करिते तरी तिला पालनाच्या कष्टाचा कंटाळा आला असें कधींहि होत नाहीं ८९. तसें सर्व प्रकारानें कर्माचें अनुष्ठान करतो पण फलाची लोभ दृष्टीनें इच्छा मात्र धरीत नाहीं, तर सर्व कर्म ब्रह्मार्पण करितो; ५९०. आणि आपला कोणी प्रियकर घरीं आल्यावर त्याच्या सन्मान समयीं आपल्यास जिन्नस उरेल किंवा संपेल हेंहि जसें स्वभावत:च लक्षांतहि येत नाहीं, तसें कर्म करीत असतां उचित प्रसंग म्ह. साधुजन घरीं आल्यावर त्याचें आदरातिथ्य करण्यांत वेळ मोडून जरी नित्य कर्म करण्याचे राहिलें ९१. तरी तो नित्य कर्म करण्याचें राहिले, असा खेद मनास होऊं देत नाहीं किंवा तें कर्म त्याचे हातून यथासांग शेवटास गेलें असतांहि ज्याला आनंदानें गर्वहि चढत नाहीं ९२. या युक्तीनें जें जें कर्म होत असतें त्याला अर्जुना ! 'सात्त्विक कर्म' असे हें नांव त्यांच्या गुणामुळें त्यास प्राप्त होतें, असें समज ९३. यापुढें राजस कर्माचें खरें लक्षण तुला सांगतों, तें ऐकण्यास हयगय, करूं नकोस ९४.

**अन्वयार्थ**--**तु**-पण-**यत्**-जें-**कर्म**-कर्म-**कामेप्सुना** फलप्राप्तीची इच्छा करणाराकडून-**वा पुन:**-किंवा-**साहंकारेण**-अहंकारानें युक्त झालेल्या पुरुषाकडून-**बहुलायासं**-पुष्कळ आयासानें-**क्रियते**-केलें जातें-**तत्**-तें-**राजसम् उदाहृतं**-राजस कर्म म्हटलेलें आहे २४.

तर जसा मूर्ख मनुष्य घरीं मातापितरें असून त्यांच्याशीं

१ वरूंतील मुरकुंड. २ निवडुंगांचे. ३ निरर्थक. ४ शून्य, आशाळलेले, वाईट. ५ ह्या भाषेंत. ६ मोठा. ७ प्रत्यक्ष अंधार. ८ सर्व लक्षणांनीं युक्त. ९ प्रत्यक्ष. १० मार्गास लागलेले. ११ उक्त. १२ आलिंगनानें. १३ श्यामवर्ण. १४ स्त्रीच्या नेत्रांनीं. १५ भूषण, शोभा. १६ कर्म. १७ साहाय्य झालें. १८ सुगंध. १९ खर्चून. २० रक्षण. २१ कंटाळणें, त्रासणें. २२ फळ दृष्टीनें पाहात नाहीं. २३ अवघी. २४ अर्पण, प्रविष्ट. २५ आवडतें. २६ सहज. २७ सामुग्री, शिदोरी. २८ राहे. २९ न केले याविषयींच्या. ३० गर्वास चढत नाहीं. ३१ रजोगुण युक्तीचें. ३२ कमताई.

मूर्खु जैसा ॥ ९५ ॥ कां तुळशीचिया झाडा । दुरूनि न घोंपें सिंतोडा । द्राक्षीचिया तरी बुडा । दूधचि लाविजे ॥ ९६ ॥ तैसी नित्यनैमित्तिकें । कर्मैं जियें आवश्यकें । तयांचेविषयीं न शके । बैसला उठूं ॥ ९७ ॥ येरां काम्याचेनि तरी नांवें । देह सर्वस्व आघवें । वेंचितांही नै मनवे । बहु ऐसें ॥ ९८ ॥ अगा देवढी' वाढी लाँहिजे । तेथ मोल देतां नैं धाइजे । पेरितां पुरें न म्हणिजे । बीज जेवीं ॥९९॥ कां परिसु आलिया हातीं । लोहालागीं सर्वसंपत्ती । वेचितां ये उन्नेती । साधकु जैसा ॥ ६०० ॥ तैसीं फळें देखोनि पुढें । काम्यकर्मैं दुवाडें । करी परी तें थोकडें । केलेंही मानी ॥ १ ॥ तेणें फळकामुकें । यथाविधी नेटकें । काम्य कीजे तितुकें । क्रियाजात ॥ २ ॥ आणि तयाही केलियाचें । तोंडीं लावी दौंडीचें' । कर्मी या नांवंपाटाचें । वाणें'' सारी ॥ ३ ॥ तैसा भरे कर्माहंकारु । मग पिता अथवा गुरु । ते न मनी काळज्वरु । औषध जैसें ॥४॥ तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें । कीजे गा आदरें । जें जें कांहीं ॥ ५ ॥ परी तेंही करणें बहुवसा । वळेंघोनि करी सायासैं । जीवनोपावो कां जैसा । कोल्हाँटियांचा ॥ ६ ॥ एका कणालागीं उंदिरु । आसका उपसे डोंगरु । कां शेवाँळोद्देशें दर्दुरु । समुद्रु डहुंळी ॥ ७ ॥ पैं भिकेपरतें न लाहे । तऱ्ही गारुडी सापु वाहे । काय कीजे शीणुचि होये । गोडु येकां ॥ ८ ॥ हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे'' । तैसें स्वर्गसुखलोभें । विचंबँणें जें ॥ ९ ॥ तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें येथ राजस । आतां चिन्ह परिस । तामसाचें ॥ ६१० ॥

अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् । मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

तरी तें गा तामस कर्म । जें निंदेचें काळें धांम । निषेधांचें जन्म । साचें जेणें ॥ ११ ॥ जें निपजविल्यापाठीं । कांहींच न दिसे दिठी । रेघ काढिलिया पोटीं । तोयाचे जेवीं ॥ १२ ॥ कां कौंजी घुसळलिया । कां राखोंडी फुंकलिया । कांहीं न दिसे गाळिलिया । वाळुघाणा ॥ १३ ॥ नाना उंपणिलिया भूंस । कां विंधिलियैं आकाश । नाना मांडिलिया पाश । वारयासी ॥ १४ ॥ हें आवघेंचि जैसें । वांझें होऊनि नासे । जें केलिया पाठीं तैसें । वायांचि जाय ॥ १५ ॥ एऱ्हवीं नरदेहाही येवढें । धन आटंणींये पडे । जें कर्म निफजवितां मोडे । जगाचें सुख ॥ १६ ॥ जैसा

जो संसारांत गोड भाषणहि करीत नाहीं, परंतु जगांतील इतर सर्व लोकांशी आदरातिथ्यपूर्वक प्रेमानें वागतो ९५. किंवा तुळशीच्या झाडास दुरून पाण्याचा शिंतोडाहि घालीत नाहीं, [ कारण त्यापासून फल किंवा पुष्प यांची प्राप्ति नाहीं ] परंतु द्राक्षाच्या झाडाच्या बुडास मात्र दूधच घालतो ९६. त्याप्रमाणें आवश्य आचरणीय अशीं जीं नित्यनैमित्तिक कर्मे आहेत, त्यांचें आचरण करण्याविषयीं जो बसल्या जागेवरून उठूं सुद्धा शकत नाहीं; ९७. एऱ्हवीं इतर काम्य कर्माच्या नांवानी धन देहादि सर्वस्व जरी खर्च करावें लागले तरी आपण फार खर्च केला, असें त्यास शीणून वाटत नाहीं ९८. अरे ! वाढीदिढीच्या व्यापारांतील पैसे मिळतील तेथें द्रव्य खर्च करण्यास ज्याची तृप्ति होत नाहीं किंवा जसें जमिनींत धान्य-बीज पेरूं लागल्यावर कितीहि पेरलें तरी कुणब्याला ते पुरे असें म्हणवत नाहीं ९९. किंवा परीस हातीं आल्यावर जो लोखंडाचें सोनें करण्याकरितां सर्व संपत्ति खर्च करूनहि उत्साहानें लोखंडच खरेदी करतो आणि उत्कर्षच पावतो ६००. त्याप्रमाणें पुढील प्राप्त होणाऱ्या फलावर आशा ठेवून कठीण अशीं काम्यकर्मेंहि पुष्कळ करतो, परंतु तींहि अगदीं थोडींच केलीं असें मानतो १. त्या फलाची इच्छा करणाऱ्याकडून जितकीं म्हणून काम्यकर्में असतील, तितकीं यथाविधि अगदी बरोबर केलीं जातात २. आणि केलेल्या त्या काम्य-कर्मांची आपल्या तोंडानें वाखाणणी करून, दवंडी देऊन प्रसिद्धि करितो व 'मी मोठा कर्मठ आहें' मी अमुक कर्म केलें या नांवाच्या ख्यातीचे चोहोंकडे वाणे वाटून पसरवितो ३. त्या पुरुषामध्यें ' मी कर्म कर्ता ' असा कर्माहंकार भरतो कीं, काळज्वर जसा कोणत्याच औषधाला जुमानीत नाहीं, तसा तो पिता किंवा गुरु यांनाहि मानीत नाहीं ४. तशा अहंकारयुक्त कर्माभिमानी व फलाभिलाषी पुरुषाकडून जें जें कांहीं कर्म मोठ्या आदरानें केलें जातें ५. तें तें कर्म करण्यांतहि पुष्कळ आयास असतात कोल्हाट्यांचा पोटाच्या उपजीविकेसाठीं धंदा असतो त्याप्रमाणें अगदीं थोड्या फायद्यासाठीं जीवापाड कष्टालाच तें कर्म कारण होते ६. धान्याच्या एका कणाकरितां उंदीर जसा संपूर्ण डोंगर पोखरतो, अथवा शेवाळाच्या प्राप्तीच्या हेतूनें बेडूक जसा समुद्र ढवळतो ७. पहा कीं, भिक्षेशिवाय दुसरी कांहींहि प्राप्ती होत नाहीं, तरीहि गारुडी जसें सापाचें ओझें वाहातो; काय करावें ! एखाद्यास कष्ट-परिश्रमच गोड वाटतात ८. हें असो; एका परमाणूच्या कणाच्या आशेकरितां वाळवी ही पाताळापर्यंत खोल खणत जाते, त्याप्रमाणें स्वर्गसुखाच्या प्राप्तीच्या लोभानें जें श्रम करणें ९. तेंच क्लेशयुक्त काम्यकर्म येथें राजस कर्म आहे असें जाणावें. आतां तामस कर्माचें लक्षण सांगतों, तें ऐक ६१०

**अन्वयार्थ-यत् कर्म**-जे कर्म-**अनुबंधं**-मागून होणारा परिणाम-**क्षयं**-शक्तीचा व धनाचा क्षय-**हिंसां**-प्राण्यांची पीडा-**च पौरुषम्**-आणि आपलें सामर्थ्य यांस-**अनपेक्ष्य**-न पाहून-**मोहात्**-मोहानें-**आरभ्यते**-आरंभिलें जातें-**तत् तामसम् उच्यते**-त्याला तामस कर्म म्हटलें जातें २५.

जें केवळ निंदेचें काळें [ पापमय ] घरच होय आणि ज्याच्यामुळें निषेधाचे [ निषिद्ध कर्माच्या ] जन्माचें खरे सार्थक झालें आहे, तें तामस कर्म होय ११. जशीं पाण्यावर रेघ काढली असतां तेथें कांहींच दिसत नाहीं, त्याप्रमाणें जें तामस कर्म केल्यानंतर त्यापासून कांहींच फलप्राप्ति दिसत नाहीं १२. किंवा ताकाची निवळी घुसळली असतां जसें लोणी निघत नाहीं, किंवा [ सोनाराच्या घरांतल्या राखेशिवाय इतर ठिकाणची ] राखोंडी फुकीत बसलें असतां [ जसें सोन्याचे कण वगैरे ] कांहींच निष्पन्न झाल्याचें आढळांत येत नाहीं, अथवा वाळू घाण्यांत घालून गाळली असतां जसें तिजपासून तेल किंवा पेंड कांहींच उत्पन्न होत नाहीं, १३. अथवा भूस वाऱ्यावर उफणणें किंवा आकाशास बाणानें मारून छेदन करणें अथवा वाऱ्यास धरण्या-करितां फांस टाकणें १४. या सर्वच गोष्टी ज्याप्रमाणें करून निष्फळ होऊन व्यर्थ जातात, त्याप्रमाणें ज्या कर्माचे आचरण करूनहि ते वायांच जातें १५. एऱ्हवीं तामस कर्माचरणांत नरदेहा एवढें धनहि खर्ची पडते व जें कर्म केलें असतां त्याच्या योगानें जगाचे प्राप्त सुख नाहींसे होतें. अर्थात् सुख न होतां उलट दुःख मात्र होते १६. ज्याप्रमाणें कमळवनावर

१ न घालावा, घालीत नाहीं, पडूं देत नाहीं. २ मानवत नाहीं. ३ दिढीनें वाढे. ४ तृप्त होत नाहीं. ५ उत्साहास, उत्कर्षास. ६ कठीण. ७ चांगल्या प्रकारें. ८ प्रसिद्धीच्या. ९ कर्मठ. १० अधिकाराचें नांव, सुखाचें पडनांव. ११ वायनें बांटतो, पुकारा करतो. १२ आश्रय करून. १३ कष्टास. १४ डोंबाऱ्याच्या. १५ शेवाळीकरितां. १६ ढवळतो. १७ वाळवी. १८ श्रम करणें. १९ घर. २० अपवित्रतेचें, मनाईचें. २१ खरे. २२ पेज. २३ घाण्यांत वाळू रगडिली तरी. २४ वारवले असतां. २५ बाण मारलें असतां. २६ निष्फळ. २७ खर्ची.

कमळवनीं फांसु। काढिलिया कांटेंसु। आपण झिंजे नाशु। कमळां करी ॥ १७ ॥ कां आपण आंगें जळे। आणि नाँगवी जगाचे डोळे। पतंगु जैसा सैळें। दीपाचेनि ।१८। तैसें सर्वस्व वायां जावो। वरी देहाही होय घावो। परी पुढिलां अपावो। निफजविजे जेणें ॥ १९ ॥ मासी आपणयातें गिळवी । परी पुढीला वांती शिणवी । तें कश्मळ आठवी । आचरण जें ॥ ६२० ॥ तेंही करावया दोषें । मज सामर्थ्य असे कीं नसे । हेंहीं पुढील तैसें । न पाहतां करी ॥ २१ ॥ केवढा माझा उपावो । करितां कोण प्रस्तावो । केलियाही आवो । काय येथ ॥ २२ ॥ इये जाणिवेची सोये । अविवेकाचेनि पायें । पुसोनियां होये । साटोप कर्मी ॥ २३ ॥ आपुला वसौटा जाळुनी । बिसाटे जैसा वन्ही । कां स्वमर्यादा गिळोनि । सिंधु उठी ॥ २४ ॥ मग नेणें बहु थोडें । न पाहे मागें पुढें । मार्गामार्ग येकवढें । करीत चाले ॥ २५ ॥ तैसें कृत्याकृत्य सरकटित । आपपर नुरवित । कर्म होय तें निश्चित । तामस जाण ॥ २६ ॥ ऐसी गुणत्रयभिन्ना । कर्माची गा अर्जुना । हे केली विवंचना । उपपत्तींसीं ॥२७॥ आतां ययाचि कर्मा भजतां । कर्माभिमानिया कर्ता । तो जीवुही त्रिविधता । पातला असे ॥ २८ ॥ चतुराश्रमवशें । एकु पुरुषु चतुर्धा दिसे । कर्तया त्रैविध्य तैसें । कर्मभेदें ॥ २९ ॥ तरी तयां तिहीं आंतु । सात्त्विक तंव प्रस्तुतु । सांगेन दत्तचित्तु । आकर्णीं तूं ॥ ६३० ॥

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः । सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥

तरी फळोद्देशें सांडिलिया । वाढती जेवीं सरळिया । शाखा कां चंदनाचिया । बावन्नया ॥ ३१ ॥ कां न फळतांही सार्थका । जैसिया नागलतिका । तैसिया करी नित्यादिकां । क्रिया जो कां ॥ ३२ ॥ परी फळशून्यता। नाहीं तया विफळता। पैं फळासीचि पंडुसुता । फळें कायिसी ॥ ३३ ॥ आणि आदरें करी बहुवसें । परी कर्ता मी हें नुमसे । वर्षाकाळींचें जैसें । मेघवृंद ॥ ३४ ॥ तेवींचि परमात्मलिंगा । समर्पावया-जोगा । कर्मकलापु पैं गा । निपजावया ॥ ३५ ॥ तया काळातें नुलंघणें । देश-शुद्धिही साधणें । कां शास्त्रांच्या वातीं पाहणें । क्रियानिर्णयो ॥ ३६ ॥ वृत्ती करणें येकवळा । चित्त जावों न देणें फळा । नियमांचिया सांखळा । वाहणें सदा ॥ ३७ ॥ हा निरोधु साहावयालागीं । धैर्याचिया चांगचांगीं । चिंतवणी जिती आंगीं ।

कांव्याचा फांस टाकून त्यावरून ओढला असतां [ आपल्यास श्रम होतात ] तो फांस स्वतः झिजतो आणि कमळांचाहि नाश होतो; १७. किंवा पतंग ज्याप्रमाणें दिव्याचा हेवा करून द्वेषानें त्यावर झडप घालतो तेव्हां दिवा विझतो आणि स्वतः पतंग नाश पावतो व लोकांच्या डोळ्यांनाहि अंधारामुळें दिसेनासे करितो १८. त्याप्रमाणें आपलें सर्वस्वहि वायां गेलें किंवा देहालाहि श्रम-दुःख जरी झाले तरी [ चालेल ] हरकत नाहीं, पण दुसऱ्यास ज्या कर्मापासून अपाय उत्पन्न होतो १९. माशी ही स्वतःला गिळविते, [ पोटांत जाऊन स्वतः मरते ] पण दुसऱ्याला [ गिळणारास ] वांती करून ओकारीनें शिणविते, तशा प्रकारच्या [ आपपर पीडाकारक ] आचरणाची जें सदोष तामस कर्म आठवण करून देते ६२०. बरें ! तेंहि कर्म करण्यासाठीं आपल्याला सामर्थ्य आहे किंवा नाहीं, हा पुढील विचार तर करावा ! पण तसें कांहीं न पाहतां कर्म करूं लागतो २१. माझी योग्यता काय ? माझें सामर्थ्य व प्रयत्न केवढा आहे ? हा प्रसंग कोणता आहे ? व त्याचा मी केवढा पसारा मांडिला आहे, व तें कर्म केल्यापासून मला काय प्राप्ति होणार आहे ? २२. या विचाराला जणुं काय अविवेकाच्या पायानें तुडवून टाकतो आणि उलट त्या कर्माबद्दल 'मी कर्मकर्ता आहे' या अभिमानानें कर्माचरणास प्रवृत्त होतो २३. अग्नि [ ज्या वेळूपासून उत्पन्न होतो, तो ] आपला आश्रय [ वेळूचें बेट ] जाळून जसा पसरावा अथवा आपल्या मर्यादेचे उल्लंघन करून खवळून समुद्र वाढावा २४. म्हणजे मग लहान किंवा मोठी वस्तु यांचा विचार न करितां व मागे पुढें न पाहतां सरसकट मार्ग [ पवित्र ] व अमार्ग [ अपवित्र वस्तु ] एकत्र करून वाढण्याचा सपाटा चालवितो २५. तसें करण्यास योग्यायोग्य असें कर्म एके ठिकाणीं रगडून आपलें व दुसऱ्याचें हा विचार न करितां जे भेद असा उरूं देत नाहीं, तें तामस कर्म आहे, असें समज २६. याप्रमाणें अर्जुना ! गुणांच्या भिन्नपणामुळें कर्महि तीन प्रकारचें कसें झालें, तें तुला दृष्टांत, युक्तिसह स्पष्ट विवेचन करून सांगितलें २७. आतां याच कर्माचा अभिमान बाळगून त्याचें आचरण करीत असतां कर्माभिमानी कर्ता जो जीव, तोहि याचे योगानें तीन प्रकारचा झाला आहे. २८. ज्याप्रमाणें, एकच पुरुष ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्रमांच्या योगानें चार प्रकारचा दिसत असतो. त्याचप्रमाणें कर्माच्या तीन भेदामुळें कर्ताहि तीन अवस्थांचा-तीन प्रकारचा झाला २९. तरीपण आतां त्या तिहींपैकीं 'सात्त्विक कर्ता' या अवस्थेचें वर्णन पहिल्यानंदां करितों, तें तूं पूर्ण लक्ष देऊन ऐक ६३०.

**अन्वयार्थ**---**मुक्तसंगः**-ज्यानें संग सोडला आहे-**अनहंवादी**-'मी मी' असें म्हणण्याचें ज्याचें शील नाहीं-**धृत्युत्साहसमन्वितः**-धृति व उत्साह यांनीं जो युक्त आहे,-**सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः**-सिद्धी व असिद्धि यांतील कांहीं झालें तरी चित्तांत निर्विकार असणारा-**कर्ता**-कर्ता-**सात्त्विकः**-सात्त्विक - **उच्यते**-म्हटला जातो २६.

ज्याप्रमाणें मलय पर्वतावरील बावन्नसंज्ञक चंदनाच्या फांद्या फळाची इच्छा सोडून देऊन नीट-सरळ वाढतात, [ कारण, त्या झाडाच्या सर्व भागांस उत्तम सुवासच असतो; हेंच फळ ] ३१. किंवा ज्याप्रमाणें नागवेलीला फळें न येतांच ती सफल आहे [ कारण तिचीं पानेंच उपयोगी पडतात, हेंच तिचे फळ आहे ] त्याप्रमाणें जीं कर्में सर्वतोपरी उत्तम आहेत, त्या नित्यनैमित्तिक कर्मांच्या फळांची इच्छा न धरितां जो त्याचें आचरण करितो ३२. पण त्याला अजिबात फळ नाहीं, असें मात्र नाहीं किंवा त्या कर्माला विफलता-फळ व्यर्थ जाते असें नाहींच, [ ते सदा सफलच असते किंवा अंतःकरण शुद्धिपूर्वक वैराग्य प्राप्ति हेंच त्याचें फळ आहे ] म्हणून अर्जुना, फळाला फळें कोठून येणार ? ३३. आणि ज्याप्रमाणें पावसाळ्यांतील मेघसमुदाय वृष्टि करितात, कांहींहि गडबड-गर्जना करीत नाहींत, तशीं तीं कर्में बहुत आदरानें करितो; पण 'मी कर्ता आहे' असा कर्तृत्वाचा अभिमान बाळगीत नाहीं. ३४. त्याप्रमाणें परमात्मस्वरूपास अर्पण करण्यास योग्य होईल असाच कर्मसमुदाय निर्माण करण्याकरितां, ३५. योग्य कालाची जी मर्यादा असेल ती न ओलांडणे उचित देशशुद्धिहि साधणें व कर्मांच्या योग्यायोग्यतेचा निर्णय शास्त्ररूप दिव्यानें-शास्त्रदृष्टीने पहातो ३६. इंद्रिय निग्रहपूर्वक वृत्ति एकाग्र करणें, फलाकडें चित्तास जाऊं न देणें, शास्त्राची नियमरूपी बेडी पायांत बाळगणे म्ह. शास्त्रमर्यादेचे पालन करणें ३७. ही अट, हा निग्रह सहन करण्याकरितां अतिशय उत्तम प्रकारचें धैर्य आपल्या अंगीं असावें, अशाविषयीं जो आपल्या मनांत जिवंत चिंता, विचार

१ काड्या तोडून चोपून रचलेला ढीग. २ काट्यांचा. ३ श्रमी होय. ४ हिरावून घेतो, अंधार करितो. ५ संतापानें.

वाहे जो कां ॥ ३८ ॥ आणि आत्मयाचिये आवडी । कर्मे करितां वेरपडीं । देहसुखाचिये पैरवडीं । येवों न लाहे ॥ ३९ ॥ आळस निद्रा दुन्हावे । क्षुधा नै बाणवे । सुखाडु न पावे । आंगाचा ठावो ॥ ६४० ॥ तंव अधिकाधिक । उत्साहो धरी आगळीक । सोनें जैसें पुटीं तुके । तुटलिया कसीं ॥ ४१ ॥ जरी आवडी आथी साच । तरी जीवितही सलंच । आगीं घालितां रोमांच । देखिजती सतिये ॥ ४२ ॥ मा आत्मया येवढीया प्रिया । वालभेला जो धनंजया । देहही सिंदंतां तया । काय खेदु होईल ? ॥ ४३ ॥ म्हणौनि विषयसुखाडु तुटे । जंव जंव देहबुद्धि आटे । तंव तंव आनंदु दुणवटे । कर्मी जया ॥ ४४ ॥ ऐसेनि जो कर्म करी । आणि कोणे एके अवसरीं । तें ठांके ऐसी पैरी । वाहे जरी ॥ ४५ ॥ तरी कँडाडीं लोटला गाडा । तो आपणपें न मनी अवघडा । तैसा ठाकलेनिही थोडा । नोहे जो कां ॥ ४६ ॥ नातरी आदरिलें । अव्यंग सिद्धी गेलें । तरी तेंही जिंतिलें । मिरवूं नेणें ॥ ४७ ॥ इया खुणा कर्म करितां । देखिजे जो पंडुसुता । तयातें म्हणिपे तत्त्वतां । सात्त्विकु कर्ता ॥ ४८ ॥ आतां राजसा कर्तेया । वोळखणें हें धनंजया । जे अभिलाषा जगाचिया । वसौटा तो ॥ ४९ ॥

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः । हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

जैसा गांवींचिया कश्मळा । उकरडा होय येकवळा । कां स्मशानीं अमंगळा । आघवयांची ॥ ६५० ॥ तयापरी जो अशेषां । विश्वाचिया अभिलाषां । पायपोंखाळणिया दोषां । घरटा जाला ॥ ५१ ॥ म्हणौनि फळाचा लैंगु । देखे जिये असलगु । तिये कर्मी चांगु । रोहो मांडी ॥ ५२ ॥ आणि आपण जालिये जोडी । उपखों नेदी कवडी । क्षणक्षणा कुरोंडी । जीवाची करी ॥ ५३ ॥ कृपणु चित्तीं ठेवा आपुला । तैसा दक्षु पराविया माला । बकु जैसा खुतला । मासेयासी ॥ ५४ ॥ आणि गोंवी गेलिया जवळी । झगटलिया अंग फाळी । फळें तरी आंतु पोळी । बोरांटी जैसी ॥ ५५ ॥ तैसें मनें वाचा कायें । भलतया दुःख देतु जाये । स्वार्थु साधितां न पाहे । पराचें हित ॥ ५६ ॥ तेवींचि आंगें कर्मी । आचरणें नोहे क्षमी । न निघे मनोधर्मी । अरोचकु ॥ ५७ ॥ कनकाचिया फळा । आंतु माज बाहेरी मौळा । तैसा सबाह्य

वाहतो ३८. आणि आत्म्याचे प्राप्तीविषयीं आवडीनें विहित कर्में करणें प्राप्त झालें असतां देहसुखाची वा त्याच्या नाशाची पर्वा करीत नाहीं ३९. कर्माचरण करीत असतां आळस व झोप ही बुरावतात व त्याला भुकेचीहि आठवण होत नाहीं आणि त्यायोगें त्यास सुख लाभत नाहीं. उलट जों जों सुखावस्था दूर दूर पळते ६४०. तों तों, सोनें ज्याप्रमाणें आंचींत घातल्यावर वजनास कमी भरलें तरी कसास जास्त वाढते त्याप्रमाणें कर्में करण्याविषयींचा उत्साह नानाप्रकारें अधिकाधिक वाढत असतो ४१. जेथें खरोखर आवड–प्रीति आहे, तेथें जीवितहि तुच्छ वाटत असते. पतिव्रता स्त्रीचे पतिवर खरोखरच प्रेम असते. म्हणून पतीच्या मरणानंतर तिला स्वतःचें जीवित तुच्छ वाटते. अशी पतिव्रता सहगमन करतांना अग्नींत उडी टाकते समयींहि पतिप्रेमामुळें त्या पतिव्रता स्त्रीच्या अंगावर रोमांच दिसतील काय? ४२. मग अर्जुना! आत्म प्राप्तीसारखी अलभ्य व परम प्रिय वस्तु प्राप्त होण्याविषयीं ज्याला तीव्रतम स्वरूपाची इच्छा झाली आहे, त्याचे शरीरास कितीहि कष्ट झाले तरी त्याचा त्यास खेद होईल काय? ४३. म्हणून विषयसुखेच्छा नाहींशी होऊन जों जों देहात्मत्त्वबुद्धि, देहाविषयीं अभिमानहि नाहींसा होतो, तों तों कर्में करण्याविषयीं त्याचा आनंद दुप्पट वाढतो ४४. याप्रमाणें कर्म करीत असतां प्रारब्धवशात् एखादेवेळीं तें कर्म जरी बंद पडण्याचा प्रसंग आला तरी, ४५. जेव्हां एखादा गाडा डोंगरावरून वेगांत येतांना आपोआप खालीं पडून मोडून त्याचे तुकडे झाले तरी जसें त्याला त्याजबद्दल आपणावर एक अवघड संकटच आलें आहे, असें वाटत नाहीं, तसें कर्म करणें राहिलें असतां तो यत्किंचितहि संकोच, खेद मानीत नाहीं ४६. अथवा आरंभिलेलें कर्म पूर्णपणें सिद्धीस गेलें असतांहि त्याजबद्दल आपण एक मोठा जय मिळविला, प्रतिष्ठा मिरवावी असेंहि तो जाणत नाहीं ४७. अर्जुना! कर्माचें आचरण करीत असतां, हीं लक्षणें ज्याचे ठिकाणीं आढळतील, त्याला निश्चयानें 'सात्त्विक कर्ता' असें म्हणावें ४८. हे धनंजया! आतां राजस कर्त्यास ओळखण्याचीं चिन्हें तुला सांगतों तो या जगांतील सर्व अभिलाषांचें माहेरघरच–आश्रय स्थानच होय ४९.

**अन्वयार्थ—रागी**–ज्याला राग–विषयासक्ति आहे असा रागी–**कर्मफलप्रेप्सुः**–कर्मफलाची इच्छा करणारा–**लुब्धः**–परद्रव्याचा लोभ धरणारा–**हिंसात्मकः**–दुसऱ्याला पीडा देण्याचें ज्याचें शील आहे असा–**अशुचिः**–बाह्य व अन्तःशुद्धि न ठेवणारा–**हर्षशोकान्वितः**–हर्ष व शोक यांनीं युक्त–**कर्ता**–असा कर्ता–**राजसः परिकीर्तितः**–राजस कर्ता सांगितलेला आहे २७.

ज्याप्रमाणें गांवांतील केरकचरा इत्यादि सर्व घाणेरडे पदार्थ एकत्र टाकण्याचें ठिकाण म्हणजे एक उकिरडा हें होय अथवा स्मशानांत सर्वच अमंगळ पदार्थ जसें एकत्र झालेले असतात ६५०. त्याप्रमाणें वस्तुतः पाहिलें असतां जो जगांतील सर्व लोकांच्या निषिद्ध आशारूप दोषदूषित असें पाय धुण्याची जागाच झाला आहे ५१. म्हणून ज्या कर्मामध्यें सोप्या साधनानें इच्छित विषयरूप फलप्राप्ति होण्याची दाट शक्यता आहे, तें कर्म करण्याकडे रोख ठेवून त्या कर्मास आरंभ करतो ५२. आणि आपण संपादन केलेल्या द्रव्यादि पदार्थांपैकीं एक कवडीहि खर्च होऊं देत नाहीं आणि क्षणोक्षणीं त्या पदार्थांवरून आपला जीव ओंवाळून टाकतो ५३. कृपण मनुष्य आपल्या ठेवीविषयीं जसा चित्तांत नेहमीं लक्ष ठेवून दक्ष असतो, जसा बगळा मासा धरण्याविषयीं ध्यान धरून मोठ्या तत्परतेनें बसलेला असतो, तसा हा "राजसकर्ता" दुसऱ्याचें मौल्यवान् पदार्थ मिळविण्याविषयीं दक्ष असतो ५४. आणि बोरीचें झाडाजवळून गेलें असतां तें आपल्या काट्यानें वस्त्र अडकून त्यास गुंतवितें, दांडगाईनें ते काढूं लागल्यावर त्यास अंग घासले तर अंगास ओरखडतें [ अंगाची कातडी फाडते ] व तिचीं फळें काढून पाहूं गेलें असतां तीं इतकी आंबट असतात कीं, तीं खाल्ली तर जिभेला पोळतात ५५. तसें कायावाचामनेंकरून जो वाटेल त्याला दुःखच देत जातो व जो आपला स्वार्थ साधीत असतां दुसऱ्याचे हिताकडे मुळींहि लक्ष देत नाहीं; ५६. तसेंच स्वतः आरंभिलेलें कार्य ते शेवटपर्यंत, निरंतर चालविण्याचे व पार पाडण्याचे बाबतींत शरीरानें समर्थ नसतो तरीहि त्या कर्माविषयीं त्याच्या मनांत अरुचि निर्माण होत नाहीं व त्यापासून परावृत्तहि होत नाहीं, ५७. धोत्र्याच्या फळाला जशी आंत कैफ, भूल आणणाऱ्या

१ प्राप्त झालेली. २ देहसुखाची पर्वा करीत नाहीं. परवडी, प्रतिबंध. ३ आठवण होत नाहीं. ४ सुखावस्था. ५ आधिक्य, वाढ. ६ वजन. ७ खरी. ८ तुच्छ, दुःखरूप. ९ आवडीनें युक्त झालेला. १० कष्टतो, ११ विषयाची आवड. १२ बंद पडतें. होत नाहीं. १३ प्रकार, योग. १४ डोंगराच्या अवघड ठिकाणीं. १५ म्लान, दुःखित. १६ वसतीचें स्थान. १७ मळाला, केर कचऱ्याला. १८ एक ठिकाण. १९ संपूर्ण. २० इच्छेला. २१ पाय धुण्याचा. २२ स्थान, न्हाणीघर. २३ संबंध

दुबळा। शुचित्वें जो ॥ ५८ ॥ आणि कर्मजात केलिया । फळ लाहे जरी धनंजया । तरी हरिखें जगा यया । वांकुलियाँ वाये ॥ ५९ ॥ अथवा जें आदरिलें। हीनफळ होय केलें। तरी शोकें तेणें जिंतिलें। धिक्कारों लागे ॥ ६६० ॥ कर्मी राहाटी ऐसी। जयातें होती देखसी । तोचि जाण त्रिशुद्धीसी । राजस कर्ता ॥ ६१ ॥ आतां यया पाठीं येरुं । जो कुकर्माचा आगरु। तोही करूं गोचरु । तामस कर्ता ॥ ६२ ॥

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः। विषादी दीर्घसत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

तरी मियां लागलिया कैसें। पुढील जळत असे । हें नेणिजे हुंताशें । जियापरी ॥६३॥ पैं शस्त्रें मियां तिखटें । नेणिजे कैसेनि निवंटे । कां नेणिजे काळकूटें। आपुलें केलें ॥ ६४ ॥ तैसा पुढीलया आपुलया । घातु करीत धनंजया । आदरी वोखैटिया। क्रिया जो कां ॥ ६५॥ तिया करितांही वेळीं । काय जालें हें न सांभाळी। चळला वायु वाहटुंळी । चेष्टे तैसा ॥ ६६ ॥ पैं करणिया आणि जया । मेळु नाहीं धनंजया। तो पाहुनी पिसेयां । कैंची त्रायें? ॥ ६७॥ आणि इंद्रियांचें वोगरिलें। चरोनि राखे जो जियालें । बैलातळीं लागलें। गोचिड जैसें ॥६८॥ हांसयां रुदना वेळु। नेणतां आंदरी बाळु । राहाटे उंच्छृंखळु। तयापरी ॥६९॥ जो प्रकृती आंतलेपणें । कृत्याकृत्यस्वादु नेणे । फुगे केरें धालेपणें । उकरडा जैसा ॥६७०॥ म्हणौनि मान्याचेनि नांवें। ईश्वराही परी नै खालवे। स्तब्धपणें न मनवे। डोंगरासी ॥ ७१ ॥ आणि मन जयाचें विषकल्लोळीं। राहाटी फुडी चोरिली । दिठी कीर ते वोली। पण्यांगनेची ॥ ७२ ॥ किंबहुना कपटाचें। देहचि वळिलें तयाचें। तें जिणें कीं जुंवाराचें। टिटेघर ॥ ७३ ॥ नोहे तयाचा प्राडुर्भावो । तो साभिलाष भिल्लांचा गांवो। म्हणौनि नये येवों जावों । तया वाटा ॥७४॥ आणि आणिकांचें निकें केलें। विरु होय जया आलें। जैसें अपेय पया मिनलें। लवण करी ॥७५॥ कां हींव ऐसा पदार्थु। घातलिया आगीआंतु । तेचि क्षणीं धडाडितु । अग्नि होय ॥ ७६ ॥ नाना सुद्रव्यें गोमटीं । जालिया शरीरीं पैठीं । होऊनि ठाती किरीटी । मळुचि जेवीं ॥ ७७ ॥ तैसें पुढिलाचें बरवें । जयाच्या भीतरीं पावे । आणि विरुद्धचि आघवें। होऊनि निगे ॥७८॥ जो गुण घे दे दोख । अमृताचें करी विख । दूध पाजलिय देख। व्याळु जैसा ॥७९॥ आणि ऐहिकीं जियावें। जेणें परत्रा साच यावें। तें उचित

बीया असतात व बाहेरून मऊ कांटे असतात, तसा जो शुचित्वाचे बाबतींतहि अंतर्बाह्य दरिद्री [अपवित्र] असतो ५८. आणि अर्जुना! कदाचित् केलेल्या कर्मापासून इच्छित फलप्राप्ती झाली तर त्या आनंदाच्या भरानें या जनास वेडावून दाखवितो५९. अथवा आरंभिलेलें कर्म जर फलद्रूप न झालें म्हणजे निष्फल झालें तर त्या शोकानें ग्रस्त होऊन त्या कर्माचा धिक्कार करावयास लागतो ६६०. अशा रीतीनें कर्माविषयीं ज्याची वागणूक तूं पाहशील, दृष्टीस पडेल तो ' राजस कर्ता ' होय, असें खचित, निश्चयानें समज ६१. आतां यानंतर दुसरा जो वाईट कर्मांची मुख्य. खाणच असा ' तामस कर्ता ' त्याचींहि लक्षणें तुला स्पष्टरूपानें कळतील, अशीं सांगतों ६२.

**अन्वयार्थ**—**अयुक्तः**—ज्याचें चित्त समाहित नसतें—**प्राकृतः**—जो अत्यंत असंस्कृत—मूर्खासारखा असतो—**स्तब्धः**—कोणापुढेंहि नम्र न होणारा असतो—**शठः**—मोठा मायावी—**नैष्कृतिकः**—दुसऱ्याच्या वृत्तीचा छेद करणारा—**अलसः**—आळशी—**विषादी**—नेहमीं खेद करणारा **च दीर्घसूत्री**—व चेंगट—**कर्ता**—कर्ता असतो त्याला—**तामसः**—तामस कर्ता—**उच्यते**—म्हटलें २८.

आपला संबंध झाला तर त्या स्पर्शामुळें जवळचे दुसरे पदार्थ कसे जळतात, हें जसें अग्नीस समजत नाहीं ६३. अथवा आपल्या धारेनें दुसऱ्याचा जीव कसा घेतला जातो, हे जसें तीक्ष्ण शस्त्राला समजत नाहीं; किंवा आपल्यायोगें होणाऱ्या दुसऱ्याचा नाशरूपी परिणामाची काळकूट विषाला मुळींहि जाणीव नसते ६४. तसा हे धनंजया! ज्या क्रिया आपला व दुसऱ्याचा घात करणाऱ्या अशा वाईट आहेत त्याच क्रिया करण्यास जो प्रवृत्त होतो६५. ज्याप्रमाणें वावटळ सुटल्यावर वायु हवातसा, हवातिकडे वाहतो. त्याप्रमाणें त्या क्रिया करतेवेळीं सुद्धां यांत शेवटीं, परिणामीं काय लाभ होईल याविषयीं जो लक्षपूर्वक सावधगिरी बाळगीत नाहीं ६६. हें बघ अर्जुना! त्याच्या क्रियांचा, कृतीचा व त्याचा कांहींहि मेळ नसतो, असला तो तामस कर्ता पाहिला म्हणजे त्याचे पुढें वेड्याची काय किंमत आहे? ६७. आणि बैलाचे [कांसे] खालीं जसे गोचीड अगदीं चिकटून बसलेले असते, तसें इंद्रियांनीं दिलेले भोग्यविषय भोगूनच जो आपलें जीवित कंठतो-रक्षण करीत असतो ६८. ज्याप्रमाणें लहान मूल हें योग्यायोग्य वेळ न जाणतांच हंसण्यास व रडण्यास आरंभ करिते, त्याप्रमाणें ज्याच्या कृतींत कांहीं मेळ नसतो. म्ह. स्वैर वागत असतो ६९. प्रकृतीचे आधीन असल्यामुळें करण्यास योग्य काय व अयोग्य काय याविषयींच्या निर्णयाचे ज्याला ज्ञान नसतें व केरानें जसा उकिरडा फुगतो, तसा जो स्वैर कुकर्माचरणाच्या तृप्तीनें फुगलेला असतो ६७०. म्हणून गर्वाच्या भरांत मान्यपणाच्या नांवानें ईश्वरासहि नम्र होत [लवत] नाहीं व ताठ्यानें स्तब्धपणाच्या बाबतींत डोंगरालाहि ज्याच्यापुढें किंमत नसल्यानें तुच्छ करतो ७१. आणि ज्याचें मन म्हणजे केवळ विषाच्याच लाटा होत; ज्याचें आचरण नेहमीं पक्के चोरटें असते वरकांति दिसण्यांत चांगलें; पण अंतर्यामीं दुसऱ्याचा घात करणारें असते आणि दृष्टि केवळ वेश्यांच्या कपटी प्रेमदृष्टिप्रमाणें वरपंग गोड; पण खरोखर दुसऱ्याचें सर्वस्व हरण करणारी असते ७२. इतकेंच नव्हे तर, ज्याचा सर्व देहच कपटाचाच बनविलेला असतो व ज्याचें आयुष्य जगणें म्हणजे जुगाराच्या तिव्हाट्यावरचे वाईट कृत्याचें माहेरघरच होय ७३. त्याचा अविर्भाव, अवतार म्हणजे केवळ अभिलाषरूप स्वार्थी लुटारू भिल्लाचें राहाण्याचे गांवच होय; म्हणून त्या वाटेनें कोणीहि जाऊं येऊं नये ७४. आणि दुसऱ्याचें चांगले केलेले वा झालेले पाहून ज्यास आपल्यावर संकटच कोसळलें म्हणून वैर उत्पन्न होतें, ज्याप्रमाणें दुधांत मीठ मिळालें असतां तें दुधास पिण्यास अयोग्य करते ७५. अथवा कितीहि थंड असा पदार्थ जर अग्नींत घातला तर तो तत्क्षणींच धडधडीत अग्नि होत असतो ७६. किंवा अर्जुना! कितीहि उत्तम उत्तम [पक्वान्नादि] पदार्थ असले तरीं ज्याप्रमाणें तें पोटांत गेले असतां जसा त्यांचा मळच होऊन राहतो. ७७. त्याप्रमाणें दुसऱ्याचें चांगलें झालेलें ज्यास ऐकून किंवा पाहून कळून आले तर ते त्याला सहन न होऊन लागलींच सर्व विपरीत होऊन बाहेर येते. [तो उलट निंदा करूं लागतो] ७८. असें पहा कीं, सर्पास दूध पाजलें असतां ज्याप्रमाणें तो त्या दुधाचे विषच करीतो त्याप्रमाणें दुसऱ्याचें गुण घेतो [ऐकतो] व त्यास नांवें ठेवतो. [जो त्यास दुर्गुणच मानतो] ७९. आणि ज्याच्या योगाने इहलोकीं कीर्ति होऊन सुखानें

१ दरिद्री. २ हर्षानें. ३ वेडावी. ४ निर्फळ. ५ शोकाकुल होऊन. ६ खचित. ७ इतर, तामस. ८ मुख्य स्थान. ९. स्पष्ट ओळखण्याजोगा. १० अग्नीनें. ११ मरे. १२ वाईट. १३ वावटळ. १४ फिरतो, वाहतो. १५ वेड्याला, मूर्खाला. १६ सत्ता, नांव, मर्यादा. १७ इंद्रियांनीं दिलेले भोग. १८ जीवित. १९ हंसण्यास व रडण्यास. २० प्रारंभीं. २१ यथेच्छ. २२ व्यापलेपणें, अधीनतेनें. २३ कर्माकर्मांची रुचि. २४ तृप्तपणानें. २५ गर्वाच्या भरांत. २६ न लवे.

कृत्य पावे । अवसरीं जिये ॥६८०॥ तेव्हां जया आपैसी । निद्रा ये ठेविली ऐसी । दुर्व्यवहारीं जैसी । विटाळें लोटे ॥ ८१ ॥ पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे वायसा । कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ॥ ८२ ॥ तैसा कल्याणकाळु पाहे । तैं तयातें आळसु खाये । ना प्रमादीं तरी होये । तो म्हणे तैसें ॥ ८३ ॥ जेवींचि सागराच्या पोटीं । जळे अखंड आंगिठी । तैसा विषादु वाहे गांठीं । जिवाचिये जो ॥ ८४ ॥ लेंडोराआगीं धूमावधि । कां अपांना आंगीं दुर्गंधि । तैसा जो जीवितावधि । विषादें केला ॥ ८५ ॥ आणि कल्पांताचिया पौरा । वेगळेंही जो वीरा । सूत्र धरी व्यापारा । साभिलाषा ॥ ८६ ॥ अगा जगाही परौती । शुंचा वाहे पैं चित्तीं । करितां विषीं हातीं । तृणही न लगे ॥ ८७ ॥ ऐसा जो लोकाआंतु । पांपपुंजु मूर्तु । देखसी तो अव्यांहेतु । तामसु कर्ता ॥ ८८ ॥ एवं कर्म कर्ता ज्ञान । या तिहींचें त्रिधा चिन्ह । दाविलें तुज सुजन- । चक्रवर्ती ॥८९॥

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु । प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥

आतां अविद्येचिया गांवीं । मोहाची वेढूनि मेंदवी । संदेहाचीं आघवीं । लेऊनि लेणीं ॥ ६९० ॥ आत्मनिश्चयाची बरंव । जया आरिसां पाहे सावयेंव । तिये बुद्धीचीही धांव । त्रिधा असे ॥९१॥ अगा सत्त्वादि गुणीं इहीं । कायी एक तिहीं ठायीं । न कीजेचि येथ पाहीं । जगामाजीं ॥ ९२॥ आगी न वसतां पोटीं । कवण काष्ठ असे सृष्टीं । तैसें तें कैंचें दृश्यकोटीं । त्रिविध जें नोहे ॥९३॥ म्हणौनि तिहीं गुणीं । बुद्धी केली त्रिगुणी । धृतीसिही वांटणी । तैसीचि असे ॥९४॥ तेंचि येक वेगळालें । यथा चिन्हीं अळंकारलें । सांगिजैल उपाइलें । भेदलेपणें ॥ ९५॥ परी बुद्धि धृति इयां । दोहीं भागांमाजीं धनंजया । आधीं रूप बुद्धीचिया । भेदासि करूं ॥ ९६ ॥ तरी उत्तमा मध्यमा निकृष्टा । संसारासि गा सुभटा । प्राणियां येतिया वाटा । तिनी आथी ॥ ९७ ॥ जे अकरणीय काम्य निषिद्ध । ते हे मार्ग तिन्ही प्रसिद्ध । संसारभयें सबाध । जिवां ययां ॥ ९८ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये । बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥३०॥

म्हणौनि अधिकारें मानिलें । जें विधीचेनि वोघें आलें । तें येकचि येथ भलें । नित्य कर्म ॥ ९९ ॥ तेंचि आत्मप्राप्ति फळ । दिठी सूनि केवळ । कीजे जैसें

जगणें होईल, व खरोखर परलोकींहि गति मिळेल असें कृत्य करण्याचा प्रसंग ज्या वेळेस येईल ६८०. त्या वेळेस ज्याला हटकून झोंप सहजच कशी ठेवल्याप्रमाणें येतें, आणि वाईट कर्म करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां त्या वेळेस तीच झोंप [ विटाळशीसारखी ] विटाळल्यामुळें त्याच्यापासून दूर राहते ८१. हें पहा, द्राक्षांच्या किंवा आंब्याच्या रसाचा [उपभोग घेण्याचे] दिवसांत ज्याप्रमाणें कावळ्याचें तोंड-मुखरोगानें सडते किंवा घुबडाचे डोळे ज्याप्रमाणें दिवसास फुटतात-त्यास दिसेनासे होतें ८२. त्याप्रमाणें कल्याण होण्याची वेळ आली असतां [ म्हणजे सत्संगती किंवा सत्शास्त्र श्रवणाची वेळ आली असतां ] त्यास आळस ग्रासून टाकतो आणि उलट अन्यायाचें, चुकीचें कर्म करण्याचे वेळीं तो म्हणेल तसे होते [ तोच आळस त्याचे हुकुमांत वागतो ] ८३. जसा समुद्राचें पोटांत अग्नि [ वडवानळ ] अखंड जळत असतो, तसा जो अंतःकरणांत [ दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नाहीं असा ] अखंड विषाद वाहत असतो ८४. लेंड्यांच्या विस्तवांत जसा शेवटपर्यंत धूरच असतो, किंवा अपान-द्वारानें निघणाऱ्या वायूचे अंगांत जशी दुर्गंधी असते, तसा जन्मभर जो खेदानें ग्रासिलेला असतो [ मरेपर्यंत मनांत विषाद बाळगतो ] ८५. आणि अर्जुना ! जो भ्रमानें कल्पांताच्या पारा पलिकडेहि आपल्याला लाभ होईल, अशा अभिलाषानें [धोरणानें] व्यापाराचे सूत्र हातीं धरतो-व्यापार आरंभ करतो ८६. अरे ! जगापलीकडील [ जगांतील जें शहाणे लोक व्यापार करीत नाहींत ते ] करण्याविषयीं मनांत इच्छा, चिंता वाहतो व कर्म करतो, परंतु त्यापासून इच्छित लाभापैकीं गवताच्या काडीचाहि त्यास लाभ होत नाहीं ८७. असा जो लोकांमध्यें मूर्तिमंत पापाची राशीच होय असें तूं पाहशील तो निःसंशय, सर्वथैव 'तामस कर्ता' आहे असें जाण ८८. याप्रमाणें अर्जुना ! तुला कर्म, कर्ता व ज्ञान या तिन्हींचीं त्रिविध लक्षणें खुलासेवार सांगितलीं ८९.

**अन्वयार्थ**--**धनंजय**-हे पार्था !-**बुद्धेः**-बुद्धीच्या-**च एव**-आणि-**धृतेः**-धृतीच्या--**गुणतः**--गुणांमुळें होणाऱ्या-**त्रिविधं भेदं**-तीन प्रकारच्या भेदांला-**अशेषेण**-कांहीं बाकी न ठेवितां-**प्रोच्यमानं**-माझ्याकडून सांगितल्या जाणाऱ्या [ भेदाला ]-**पृथक्त्वेन**-विवेकतः तूं-**शृणु**-ऐक २९.

आतां अविद्यारूपी गांवांत मोहरूपी वस्त्र नेसून संशयात्मक सर्व अलंकार घालून ६९०. आत्मनिश्चयाची शोभा [ चांगलेपणा ] स्पष्ट पाहण्याची जी बुद्धि म्हणजे मूर्तिमंत एक आरसाच आहे त्या बुद्धीचीहि प्रवृत्ति तीन प्रकारची आहे ९१. अर्जुना ! अरे ! या सत्त्वरजतमो-गुणांनीं जगांतील कोणत्या म्हणून एका वस्तूचे तीन प्रकार केलें नाहींत ? ९२. पोटांत अग्नि नाहीं असें या जगांत कोणते लांकूड आहे ? त्याप्रमाणें जिचें, गुणांनीं तीन प्रकार केलें नाहींत, अशी दृश्य वर्गांत कोणती वस्तु आहे ? ९३. म्हणून या तीन गुणांनीं बुद्धीहि तीन प्रकारची केली आहे. तसेंच धृतीचेहि [ धैर्याचेहि ] तीन भेद झालेले आहेत ९४. तीच एक बुद्धि व धृति तीन गुणानुसार निरनिराळे भेद ज्या यथोचित चिन्हांनीं अलंकृत झाले आहेत त्या चिन्हांसहवर्तमान विस्तारपूर्वक सांगतों ९५. परंतु हे धनंजया ! आतां बुद्धि व धृति या दोहोंपैकीं अगोदर बुद्धीच्या त्रिविध भेदाची लक्षणें सांगतों ९६. तर हे सुभटा ! प्राण्यांना या संसारांस येण्यास उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा तीन [ मार्ग ] वाटा आहेत ९७. कारण, अकरण [ विहीत कर्म न करणें, त्यागणें ] काम्य व निषिद्ध कर्म करणें, असें हे तीन मार्ग प्रसिद्ध आहेत आणि या जीवमात्रांना यांच्यापासून संसारभय प्राप्त होत असल्यामुळें हें सदोष आहेत ९८.

**अन्वयार्थ**--**पार्थ**-हे अर्जुना !-**या बुद्धिः**-जी बुद्धि-**प्रवृत्तिं**-कर्ममार्गाला-**च**-व-**निवृत्तिं**-मोक्षमार्गाला-**कार्याकार्ये च**-विहित कर्तव्य व निषिद्ध अकर्तव्य यांना आणि-**भयाभये**-भयाचें कारण व अभयाचें कारण यांस-**बन्धं च मोक्षं**-बंध व मोक्ष यांना-**वेत्ति**-जाणते-**सा**-ती-**सात्त्विकी** [ **बुद्धिः** ]-सात्त्विकी बुद्धि होय ३०.

याकरितां, या लोकीं अधिकारसंमत व विधींच्या ओघानें प्राप्त झालेलें जें कर्म, तें नित्यकर्मच निष्काम बुद्धीनें आचरणें हेंच काय तें एक मोक्षप्राप्तीचें उत्तम साधन होय ९९. तेंच नित्यकर्म केवळ आत्मप्राप्तिरूप फलावर दृष्टि

१ वाईट कर्माचे वेळीं. २ निद्रा विटाळशीप्रमाणें दूर रहाते. ३ कावळ्याचे. ४ घुबडाचे. ५ दोषकाळीं. ६ त्याचें, म्हणण्याप्रमाणें होतें. ७ अग्नि, वडवानळ. ८ दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें, असंतुष्टपणा. ९ लेंड्यांच्या विस्तवांत. १० गुदद्वाराच्या ठिकाणीं. ११ पलीकडे. १२ आरंभ करणें. १३ इच्छा. १४ करण्याविषयीं म्हटलें तर. १५ पापांचा ढीग. १६ सर्वथैव. १७ वस्त्र. १८ चांगुलपणा. १९ मूर्तिवान्. २० दृश्यवर्गांत. २१ धैर्याला. २२ विस्तारानें. २३ कनिष्ट. २४ विहित, निष्काम कर्म. २५ फलेच्छायुक्त कर्म.

कां जळ । सेविजे ताहनें ॥ ७०० ॥ येतुलेनि तें कर्म । सांडी जन्मभय विषमें । करूनि दे सुगम । मोक्षसिद्धि ॥ १ ॥ ऐसें करी तो भला । संसारभयें सांडिला । करणीयत्वें आला मुमुक्षुभागा ॥ २ ॥ तेथ जे बुद्धि ऐसा । बळिया बांधे भरंवसा । मोक्षु ठेविला ऐसा । जोडेल येथ ॥ ३ ॥ म्हणौनि निवृत्तीचि मांडिली । सूनि प्रवृत्तितळीं । इये कर्मी बुडकुळी । द्यावीं कीं ना ? ॥ ४ ॥ तृषार्ता उदकें जिणें । कां पुरीं पडलिया पोहणें । अंधकूपीं गति किरणें । सूर्याचेनि ॥ ५ ॥ नाना पथ्येंसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही जिये । कां मीना जिव्हाळा होये । जळाचा जरी ॥ ६ ॥ तरी तयाच्या जीविता । नाहीं जेवीं अन्यथा । तैसें कर्मी इये वर्ततां । जोडेचि मोक्षु ॥ ७ ॥ हें करणीयाचिया कडे । जें ज्ञान आंथी चोखडें । आणि अकरणीय हें फुडें । ऐसें जाण ॥ ८ ॥ जीं तिथें काम्यादिकें । संसारभयदायकें । अकृत्यपणाचें आंबुखें । पडिलें जयां ॥ ९ ॥ तियें कर्मी अकार्यीं । जन्ममरणसमयीं । प्रवृत्ति पळवी पायीं । मागिलींचि ॥ ७१० ॥ पैं आगीमाजीं न रिघवे । अथावीं न घलवे । धगधगीत नागवे । शूळ जेवीं ॥ ११ ॥ कां काळियानाग धुंधुंवातु । देखोनि न घालवे हातु । न वचवे खोपेआंतु । वाघाचिये ॥ १२ ॥ तैसें कर्म अकरणीय । देखोनि महाभय । उपजे निःसंदेह । बुद्धी जिये ॥ १३ ॥ वाढिलें रांधूनि विखें । तेथें जाणिजे मृत्यु न चुके । तेवीं निषेधीं कां देखे । बंधातें जे ॥ १४ ॥ मग बंधभयभारितीं । तियें निषिद्धीं प्राप्तीं । विनियोगुं जाणे निवृत्ती । कर्मांचिये ॥ १५ ॥ ऐसेनि कार्याकार्यविवेकी । जे प्रवृत्ति निवृत्ति मापकी । खरा कुडा पारखी । जियापरी ॥ १६ ॥ तैसी कृत्याकृत्यशुद्धी । बुझे जे निरवधी । सात्त्विक म्हणिपे बुद्धी । तेचि तूं जाण ॥ १७ ॥

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च । अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

आणि बैंकाच्या गांवीं । घेपे क्षीरनीर सकलवी । कां अहोरात्रींची गोंवी । आंधळें नेणे ॥ १८ ॥ जया फुलाचा मकरंदु फावे । तो काष्ठें कोरूं धांवे । परी भ्रमरपणा नव्हे । अन्हांटा जेवीं ॥ १९ ॥ तैसीं इयें कार्याकार्यें । धर्माधर्मरूपें जियें । तियें न चोजवितां जाये । जाणती जे कां ॥ ७२० ॥ अगा डोळांवीण

ठेवून, करावें तें करी तर तृषाक्रांत मनुष्य जसें तृषाशमनार्थ अत्यंत आदरानें पाणी पितो, तसें विहित नित्य कर्मच करावें ७००. अशा युक्तीनें नित्यकर्म केलें असतां तें दुस्तर अनिष्ट अशा जन्मभयास घालविते व त्यापासून सोडवितें आणि इष्ट अशी मोक्षप्राप्ति सुलभ, सोपी करून देतें १. अशा रीतीनें जो सूज्ञ पुरुष कर्म करितो, तो संसारभयापासून खरोखर सदाचाच मुक्त होतो व या निष्काम कर्माच्या आचरणानें मुमुक्षुत्वाच्या योग्यतेस येऊन पोंचला २. त्या मुमुक्षुदशेंत या नित्यकर्मावर दृढ भरंवसा ठेवून जी बुद्धि त्याच्या आचरणाविषयीं बळकट निश्चय करते, तेथें मोक्षप्राप्ति अगदीं ठेविल्यासारखीच आहे ३. म्हणून शहाण्या मनुष्यानें ज्याचें फल निवृत्ति आहे, ज्याचे पर्यवसान निवृत्तींतच आहे अशा प्रवृत्तिरूप नित्यकर्माची [ बाह्यदृष्ट्या प्रवृत्तिरूप वाटलें तरी मोक्षेच्छावानानें ती कर्में मोक्ष साधनीभूत अंतःकरण शुद्धीची कारण म्हणून ] उभारणी करण्याचा निश्चय करून त्यांत बुडी मारल्यासारखें कां असूं नये ? किंवा तशी बुडी मारतो न मारतो तोंच ४. तहान लागलेल्या मनुष्यास पाणी मिळालें असतां जगतो किंवा पुरांत पडलेल्यास पोहतां येत असेल तर तो पोहून जगतो, अंधाऱ्या विहिरींत पडलेला मनुष्य सूर्यकिरणें प्राप्त झालीं असतां तो जसा जगतो ५. अथवा पथ्यास सांभाळून औषध घेतलें असतां जसा रोगानें ग्रस्त झालेला मनुष्यहि वांचतो, किंवा माशाला जर पाण्याचा जिव्हाळा, आश्रय असला ६. तर तो जगणारच यांत अन्यथा नाहीं. त्याच्या जीवास जसें भय रहात नाहीं, तसें ह्या नित्यकर्माचें आचरण करण्यास प्रवृत्त झालें असतां मोक्षप्राप्ति होतेच होते ७. हें नित्यकरणीय कर्म करण्याकडे ज्या शुद्ध ज्ञानाची प्रवृत्ति असते, आणि हें बघ, अकरणीय म्हणजे खरोखर आचरण्यास जीं योग्य नव्हेत ८. अशीं जीं काम्यादिक कर्में, जीं संसारभयदायक आहेत व ज्या कर्मावर शास्त्राचे निषिद्धपणाचे शितोडे-शिक्के पडले आहेत ९. त्या अकरणीय-अनाचरणीय व जन्ममरणदायक अशा वाईट कर्मांपासून जी बुद्धि आपली प्रवृत्ति मागल्या पायींच पळविते ७१०. अग्नींत जसा प्रवेश करवत नाहीं, अथांग खोल पाण्यांत जशी उडी घालवत नाहीं, व धगधगीत तापून लाल झालेला शूळ जसा हातांत धरवत नाहीं ११. अथवा फूं फूं असे फुसकारे टाकींत असलेला काळा नाग प्रत्यक्ष पाहून त्यास धरण्यासाठीं जसा हात घालवत नाहीं व ज्याप्रमाणें वाघाच्या जाळींत-गुहेंत कोणास जाववत नाहीं १२. त्याप्रमाणें अकरणीय निषिद्ध कर्म पाहूनच ज्या बुद्धींत निश्चयेंकरून मोठें भय उत्पन्न होतें १३. विष घालून तयार केलेलें अन्न खाल्लें [ सेवन केले ] असतां मरण चुकत नाहीं तसें जी बुद्धि निषिद्ध कर्माचें आचरण केलें असतां जन्ममृत्यु चुकत नाहीं, असें बंधास पाहते १४. मग बंध भयग्रस्त जें निषिद्ध कर्म तें प्राप्त झालें असतां [ ज्याचें आचरण केलें असतां जन्ममृत्यूचें भय प्राप्त होतें असें समजून जी बुद्धि ] त्या कर्माच्या त्यागाचा विनियोग जाणते १५. रत्नपारखी जसा खऱ्याखोट्या रत्नाची पारख करून निर्णय करितो, तसा कार्य व अकार्य यांविषयीं प्रवृत्तिनिवृत्तिरूप मापानें जी निर्णय करिते १६. तसेंच जी बुद्धि चांगलें व वाईट याचा विचार स्पष्ट निरंतर जाणते, तींच सात्त्विक बुद्धि होय, असें समज १७.

**अन्वयार्थ—पार्थ**—हे अर्जुना !—**यया**—ज्या बुद्धीच्या योगानें—**धर्मं च अधर्मं च**—धर्म व अधर्म यांस—**कार्यं च अकार्यं एव च**—कर्तव्य व अकर्तव्य यांस—**अयथावत्**—सर्व प्रकारें निर्णयरूपानें नव्हे तर अनिर्णयरूपानें मनुष्य—**प्रजानाति**—जाणतो—**सा राजसी बुद्धिः**—ती राजसी बुद्धि होय ३१.

आणि आतां राजसी बुद्धि ऐक. बगळ्यांच्या गांवांत जसें दूध व पाणी एकत्रच केलेलें, सरसकट घेतले जाते; किंवा आंधळा ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांच्यामधील गुंताडा-भेद जाणत नाहीं १८. ज्या भ्रमराला अतिशय कोमल अशा फुलांचा मकरंद सेवन करण्यासाठीं मिळतो तोच लांकडेंहि कोरण्यासाठीं धांवतो-प्रवृत्त होतो; परंतु ही त्याची कृति कांहीं भ्रमरपणा विरुद्ध [ नष्ट ] होत नाहीं १९. त्याप्रमाणें जी बुद्धि ही जी धर्माधर्मरूपानें असणारीं कार्याकार्यें, त्यांची निवड न करितां जी बुद्धि त्यांचें सरसकट आचरण करिते ७२०. अरे !

१ तहान भागविण्यासाठीं. २ दुस्तर. ३ मुक्तिलाभ. ४ प्रवृत्तीला खालीं दडपून निवृत्ति धारण केली. ५ पाया घालून. ६ बुडी मारणें. ७ पोहणें. ८ व्यापला असतां वांचतो. ९ माशाला. १० आहे. ११ स्पष्ट, खरें. १२ आवरण, शितोडा. १३ जन्ममरणाचें भय उत्पन्न करणारीं. १४ शिरवे. १५ खोल पाण्यांत. १६ प्रखर. १७ धरतां येत नाहीं. १८ फूत्कार टाकणारा. १९ गुहेंत. २० निषिद्ध. २१ व्यवस्था. २२ सुटका. २३ प्रपंचपरमार्थाची माप घेणारी, ओळखणारी. २४ खोटा. २५ समजे. २६ स्पष्ट. २७ बगळ्याच्या. २८ दूध व पाणी.

मोतियें। घेतां पाडु मिळे विपायें। न मिळणें तें आहे। ठेविलें तेथें। ॥ २१ ॥ तैसे अकरणीय अवचटें। नोडवे तरीच लोटे। एऱ्हवीं जाणें एकवटें। दोन्ही जे कां ॥ २२ ॥ ते गा बुद्धि चोखविषीं। जाण येथ राजसी। अक्षेत टाकिली जैसी। मांदियेवरी ॥ २३ ॥

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽऽवृता। सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥

आणि राजा जिया वाटा जाये। ते चोरांसि आर्डव होये। कां राक्षसां दिवो पाहे। राति होऊनि ॥ २४ ॥ नाना निधानचि निदैवा। होये कोळसयाचा उडवा। पैं असतें आपणपें जीवा। नाहीं जालें ॥ २५ ॥ तैसें धर्मजात तितुकें। जिये बुद्धीसी पातकें। साच तें लटिकें। ऐसेंचि बुझे ॥ २६ ॥ ते आघवेचि अर्थ। करूनि घाली अनर्थ। गुण ते ते व्यवस्थित। दोषाचि मानी ॥ २७ ॥ किंबहुना श्रुतिजातें। अधिष्ठूनि केलें संरतें। तेतुलेंही उपरतें। जाणे जे बुद्धी ॥ २८ ॥ ते कोणातेंही न पुसतां। तामसी जाणावी पंडुसुता। रात्री काय धर्मार्था। साच करावी ॥ २९ ॥ एवं बुद्धीचे भेद। तिन्ही तुज विशद। सांगितले स्वबोध- । कुमुदचंद्रा ॥ ७३० ॥ आतां ययाची बुद्धिवृत्ती। निष्टंकिला कर्मजातीं। खांदु मांडिजे धृती। त्रिविधा तया ॥ ३१ ॥ तिये धृतीचेही विभाग। तिन्ही यथालिंग। सांगिजती चांग। अवधान देईं ॥ ३२ ॥

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः। योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

तरी उदेलिया दिनकरु। चोरीसिं थोके अंधारु। कां राजाज्ञा अव्यवहारु। कुंठवी जेवीं ॥ ३३ ॥ नाना पवनाचा सादु। वाजीनालिया नीटु। आंगेंसीं बोभाटु। सांडिती मेघ ॥ ३४ ॥ कां अगस्तीचेनि दर्शनें। सिंधु घेऊनि ठाती मौनें। चंद्रोदयीं कमळवनें। मिठी देती ॥ ३५ ॥ हें असो पावो उचलिला। मदमुख न ठेविती खालां। गर्जोनि पुढां जाला। सिंहु जरी ॥ ३६ ॥ तैसा जो धीरु। उठलिया अंतरु। मनादिकें व्यापारु। सांडिती उभीं ॥ ३७ ॥ इंद्रियां विषयांचिया गांठी। अपैसया सुटती किरीटी। मन मायेच्या पोटीं। रिगती दाही ॥ ३८ ॥ अधोर्ध्व गूढें काढी। प्राण नवांची पेंडी। बांधोनि घाली उडी। मध्यमेमाजीं ॥ ३९ ॥ संकल्पविकल्पांचें लुगडें। सांडूनि मन उघडें। बुद्धि मागिलेकडे। उगीचि बैसे ॥ ७४० ॥ ऐसी धैर्यराजें जेणें। मन प्राण करणें। स्वचेष्टांचीं संभाषणें।

परीक्षेची दृष्टि असल्याविना मोती घेतली असतां योग्य सौदा होऊन चांगली मिळाली तर ती क्वचितच. कारण, तसा नेम नाहीं; पण चांगली मिळणार नाहींत हीं गोष्ट मात्र व्यवहारांत निश्चित आहे २१. तसें निषिद्ध अकरणीय कर्म साहजिकपणें प्राप्त न झालें तरच त्याच्या हातून करावयाचे राहते, एऱ्हवीं जी बुद्धि चांगलें व वाईट हीं दोन्हीं कर्में सरसकटच-सारखीच समजते २२. जसें मोठ्या लग्न समारंभांत सर्व समाजास योग्य व अयोग्य यांचा विचार न करितां त्या समुदायावर अक्षता टाकतात [ जेवण्याचें आमंत्रण द्यावें ] तसें चांगल्या व वाईट कर्मांविषयीं जी अंधबुद्धि तीच 'राजसबुद्धि' होय, असें तूं समज २३.

**अन्वयार्थ--या तामसा आवृता बुद्धिः**-जी अविवेकानें वेष्टित झालेली बुद्धि-**अधर्मं धर्मम् इति**-अधर्माला धर्म असें-**च सर्वार्थान् विपरीतान्**-व सर्व ज्ञेय पदार्थांना विपरीत-**मन्यते**-समजतें-**पार्थ**-हे अर्जुना! **सा तामसी**-[ **बुद्धिः** ]-ती तामसी बुद्धि होय ३२.

[ आतां तामसबुद्धीचें लक्षण ऐक ] राजा ज्या मार्गानें जातो तो चोरास जसा आडमार्ग होतो. किंवा राक्षसाला दिवस जसा रात्री उजाडतो [ दिवस उजाडला तर ती रात्र वाटते ] २४. अथवा पुरलेला धनाचा ठेवा असून भाग्यहीनाला जसा तो कोळशाचाच ढीग होतो. म्हणून ते धन त्याच्याजवळ असूनहि त्या जीवाला नसल्यासारखें होतें [ तसें किंवा आपल्याजवळ असलेलें आपलें आत्मस्वरूप भाग्यहीन जीवास नसल्यासारखें होतें ] २५. तसें शास्त्रांत जितकें म्हणून प्रवृत्तिधर्म सांगितलें आहेत तितके सर्व धर्माचरण करणें हें ज्या बुद्धीला घातक, पातक वाटतें व खरें तें सर्व खोटें असेंच जी बुद्धि समजतें २६. जी बुद्धि शास्त्रांचे सर्वच खरें अर्थ टाकून अनर्थ करून ठेवते व जेवढे गुण म्हणून आहेत तेवढें नेमके सर्व दोषच आहेत असें मानते २७. फार काय सांगावें!! सर्व श्रुतीनें स्वीकारून मान्य केलें आहे असें जितकें कांहीं आहे तितकेंहि सर्व जी बुद्धि विपरीत असेंच समजते २८. अर्जुना! कोणालाहि न विचारतां, बेलाशक ती बुद्धि म्ह. तामसी बुद्धि होय असे जाणावे. हे पहा! दानधर्माला रात्र उचित आहे काय? धर्माविषयीं अज्ञान असणारी बुद्धि धर्माधर्म निर्णयास काय उपयोगाची? २९. याप्रमाणें हे आत्मज्ञानरूपी कमलाला विकसित करणाऱ्या चंद्रा [ सारख्या ] अर्जुना! तुला बुद्धीचे तीन भेद स्पष्ट करून सांगितले ७३०. आतां, याच बुद्धिवृत्तीनें यच्चयावत् कर्म करण्याविषयींचा जेव्हां निश्चय होतो, तेव्हां तिला [ ज्या त्रिविध धैर्याकडून आश्रय दिला जातो त्यास ] 'धृति' अशीं संज्ञा प्राप्त होते ३१. त्या धृतीचेहि तीन प्रकार आहेत त्यांचीं स्वरूपें उचित लक्षणासह स्पष्टपणें सांगतों, तिकडे तू चांगलें लक्ष दे ३२.

**अन्वयार्थ--योगेन**-समाधियोगाशीं-**अव्यभिचारिण्या**-अव्यभिचारिणी अशा-**यया धृत्या**-ज्या धृतीच्या योगानें-**मनःप्राणेंद्रियक्रियाः**--मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया मनुष्य-**धारयते**-धारण करितो-**पार्थ--हे** अर्जुना!-**सा सात्त्विकीधृतिः**-ती सात्त्विकी धृति होय ३३.

सूर्योदय होतांच जसा चौर्यकर्मासह अंधकार थांबतो नाहींसा होतो, किंवा राजाची आज्ञा [ हुकूम ] दुष्ट व्यवहार बंद करते ३३ किंवा वारा चांगला एकसारखा सपाट्यानें वाहूं लागला असतां मेघ हे आपल्या गर्जनांसह आपणहि नाहींतसे होतात ३४. अथवा अगस्तिऋषीच्या दर्शनानें समुद्र गर्जना सोडून मौन धारण करून राहतात, किंवा चंद्रोदय झाल्याबरोबर सूर्यविकासिनी कमळ समुदाय आपोआप मिटतात ३५. हे असूं दे, जर गर्जना करून सिंह पुढें आला तर मदोन्मत्त हत्ती, पुढे टाकण्यासाठीं उचललेला पाय खाली ठेवीत [ त्यास तसें सुचत ] नाहीं ३६. तसें अंतःकरणांत जें [ सात्त्विक ] धैर्य उत्पन्न झालें असतां मन, प्राण व इंद्रियें हीं आपापला व्यापार उभ्या उभ्याच टाकून देतात ३७. अर्जुना! इंद्रियें व विषय यांच्या पडलेल्या स्नेहात्मक गांठी आपोआप सुटतात, आणि तीं दहाहि इंद्रियें घाबरून आपली मनरूपी जी आई त्या मनमायेच्या पोटांत शिरतात [ आपापल्या विषय संगाचा त्याग करून अंतर्मुख होतात ] ३८. जे धैर्य अपानवायूचा खालचा मार्ग व प्राणवायूचा ऊर्ध्वमार्ग यांची मर्यादा काढून प्राणादि पंचप्राण व नागकूर्मादि पंचउपप्राण या नऊहि वायूंचीं एकजुडी करून-एकवटून सुषुम्नेमध्यें उडी घालते ३९. [ज्या धैर्यामुळें] मन हे संकल्पविकल्परूपी वस्त्र फेडून टाकून देऊन उघडे होतें. आणि मग बुद्धिच्याहि मागे जाऊन उगीच स्वस्थ बसते ७४०. याप्रमाणें जो धैर्यरूपी राजा मनास, प्राणांना व इंद्रियांना आपापल्या

१ योग्य, उत्तम. २ क्वचित्. ३ अकस्मात्. ४ प्राप्त न होय. ५ शुद्धतेविषयीं. ६ आमंत्रण केलें. ७ जनसमुदायाला.

८ आडमार्ग. ९ दिवस उजाडतो. १० ठेवा. ११ भाग्यहीनाला. १२ रास, ढीग. १३ वाटे. १४ स्थापून. १५ मान्य.

सांडविजती ॥ ४१ ॥ मग आघवींचि सेडीं । ध्यानाच्या आंतुल्या मढीं । कोंडिजती निरवडी । योगाचिये ॥ ४२ ॥ परी परमात्मया चक्रवर्ती । उंगाणिती जंव होतीं । तंव लांचु न घेतां धृती । धरिजती जिया ॥ ४३ ॥ ते गा धृती येथें । सात्त्विक हें निरुतें । आईक अर्जुनातें । श्रीकांतु म्हणे ॥ ४४ ॥

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन । प्रसंगेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥

आणि होऊनियां शरीरी । स्वर्गसंसाराच्या दोहीं घरीं । नांदे जो पोटभरी । त्रिवर्गोपायें ॥ ४५ ॥ तो मनोरथांच्या सागरीं । धर्मार्थकामांच्या तारुवांवरी । जेणें धैर्यबळें करी । क्रिया वणिज ॥ ४६ ॥ जें कर्म भांडवला सूये । तयाची चौगुणी येती पांहे । येवढें सायास साहे । जया धृती ॥ ४७ ॥ ते गा धृती राजसें । पार्था येथ परियेस । आतां आइक तामस । तिसरी जे कां ॥ ४८ ॥

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च । न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥

तरी सर्वाधमें गुणें । जयाचें कां रूपां येणें । कोळसा काळेपणें । घडला जैसा ॥ ४९ ॥ अहो प्राकृत आणि हीनु । तयाही कीं गुणत्वाचा मानु । तरी न म्हणिजे पुण्यजंनु । राक्षसु काई ? ॥ ७५० ॥ पैं ग्रहांमाजीं इंगळु । तयातें म्हणिजे मंगळु । तैसा तमीं धसाळु । गुणशब्दु हा ॥ ५१ ॥ जे सर्वदोषांचा वसौटा । तमचि कामऊनि सुभटा । उभारिला आंगवठा । जया नराचा ॥ ५२ ॥ तो आळसु सूनि असे कांखे । म्हणौनि निद्रे कहीं न मुके । पापें पोषितां दुःखें । न सांडिजे जेवीं ॥ ५३ ॥ आणि देहधनाचिया आवडी । सदा भय तयातें न सांडी । विसंबू न सके धोंडीं । काठिण्य जैसें ॥ ५४ ॥ आणि पदार्थजातीं स्नेहो । बांधे म्हणौनि तो शोकें ठावो । केला न शके पाप जावों । कृतघ्नौनि जैसें ॥ ५५ ॥ आणि असंतोष जीवेंसीं । धरूनि ठेला अहर्निशीं । म्हणौनि मैत्री तेणेंसीं । विषादें केली ॥५६॥ लसणातें न सांडी गंधी । कां अपथ्यशीळातें व्याधी । तैसी केली मरणावधी । विषादें तया ॥५७॥ आणि वयसा वित्तकामु । ययांचा वाढवी संभ्रमु । म्हणौनि मदें आश्रमु । तोचि केला ॥ ५८ ॥ आगीतें न सांडी तापु । सळातें जातीचा सापु । कां जगाचा वैरी वासिपु । अखंडु जैसा ॥ ५९ ॥ नातरी

क्रियांची [ स्वकीय चेष्टांचीं ] संभाषणें टाकाववयास लावतो ४१. मग [ अष्टांग ] योगात्मक युक्तीनें त्या सडया–एकट्या [ आपापल्या बाह्य क्रियांचा संग सुटलेल्या ]सर्वेच्या सर्व इंद्रियांना ध्यानात्मक आंतल्या कोठडीमध्यें [ जें धैर्य ] कोंडून–निग्रह करून ठेवते ४२. परंतु चक्रवर्ती जो परमात्मा, त्याच्या ताब्यांत त्यांस देईपर्यंत त्यांजपासून लांच न घेतां धैर्यराजाकडून तीं निग्रहानें धरली जातात ४३. अरे अर्जुना ! असें जें धैर्य, तें या जगीं केवळ ' सात्त्विक धैर्य ' होय, असें समज. असें लक्ष्मीपति जें श्रीकृष्ण तें म्हणतात ४४.

**अन्वयार्थ**–**तु**–परंतु–**अर्जुन**–हे अर्जुना! पुरुष–**यया धृत्या** ज्या धैर्यानें––**धर्म–कामार्थान्**–धर्म, काम व अर्थ या तीन पुरुषार्थांना–**धारयते**–धारण करतो व–**प्रसंगेन**–त्यांतील प्रत्येकाच्या धारणेच्या वेळीं–**फलाकांक्षी**–फलाची आकांक्षा करतो–**पार्थ**–हे पार्था ! –**सा**–ती–**राजसी**–**धृतिः**–राजसी धृति होय ३४.

आणि शरीर हेंच माझें स्वरूप असें मानून जो [ जीव ] स्वर्ग व संसार या दोहीं वरांत धर्म, अर्थ व काम या तीन उपायांनीं आनंदानें नांदतो–वास करतो; ४५. तो [ जीवात्मा ] मनोरथरूपी सागरांत धर्मार्थकामरूपी नौकांवर ज्या धैर्यबळानें क्रियारूपी व्यापार करितो ४६. त्या व्यापारांत जें कर्मरूपी भांडवल घालतो व निदानपक्षीं त्याची चौपट तरी प्राप्ति– [ फायदा ] होईल असें अंदाज मांडतो एवढे सायास ज्या धैर्यानें सहन करितो ४७. अर्जुना ! त्या धैर्यास याजगीं राजस धैर्य असें म्हणतात. आतां तिसरे जें तामस धैर्य त्याचीं लक्षणें सांगतों तीं ऐक ४८.

**अन्वयार्थ**––**यया**–ज्या धृतीच्या योगानें–**दुर्मेधाः**–दुर्बुद्धि पुरुष–**स्वप्नं**–निद्रेला–**भयं**–भयाला–**शोकं**–शोकाला–**विषादं**–खेदाला–**च**–**मदं**–**एव**–आणि मदाला **न विमुंचति**–सोडीत नाहीं–**सा धृतिः**–ती धृति–**हे पार्थ**–हे पार्था !–**तामसी मता**–तामसी–मानलेली आहे ३५.

जसा कोळसा हा काळेपणानें घडलेला असतो, त्याप्रमाणें ज्याचें [ तामसी धैर्याचे ] स्वरूप सर्वांत अधम असा जो तमोगुण त्या गुणानें ज्या रूपाला येणें असतें ४९. अहो, जो तमोगुण अगदीं प्राकृत [ जड ] आहे आणि हीन–नीच असा आहे, तरीहि त्याला गुणपणाची ही मोठी पदवी देण्याचें प्रयोजन तरी काय ? [ अशी शंका येईल ] तर असें पहा कीं, पापी, दुष्ट असलेल्या राक्षसांनाहि ' पुण्यजन ' असें म्हणत नाहींत काय ? ७५०. सर्व ग्रहांमध्यें जो इंगळ [ निखाऱ्याप्रमाणें ताप देणारा आहे ] त्यालाहि ' मंगळ ' [ कल्याणकारक ] म्हणत नाहींत काय ? तर म्हणतात. तसा तमाला ' गुण ' हा शब्द धसाळ [ अयुक्त–अविचारितपणें लावलेला ] आहे ५१. हे सुभटा अर्जुना ! सर्व दोषांचें वसतिस्थान जो तमोगुण, तो कमवून ज्या नराची मूर्ति–शरीराकृति उभारिली आहे ५२. ज्याप्रमाणें पापांचें पोषण केलें असता त्यास दुःख हे कधींहि सोडीत नाहीं, त्याप्रमाणें तो तमोगुणी नेहमीं कार्खेत आळस बाळगून असतो; म्हणून निद्राहि त्याला कधींच सोडीत नाहीं, ५३. आणि ज्याप्रमाणें दगडाला कठीणपणा कधींहि दूर लोटूं–सोडूं शकत नाहीं, त्याप्रमाणें देहावर व धनावर त्याची नेहमीं अत्यंत प्रीति असल्यामुळें त्याला भय कधींच सोडीत नाहीं ५४. आणि कृतघ्न मनुष्यापासून पाप जाण्याविषयीं कितीहि खटपट केली असतां जसें तें जाऊं शकत नाहीं, तसें अखिल पदार्थमात्राच्या ठिकाणीं; प्रीति ठेवतो त्यामुळें शोकानें त्यास आपलें राहण्याचें ठिकाण केलेले असते. [ सदाच. शोकग्रस्त असतो ] ५५ आणि तो रात्रंदिवस असंतोषास आपल्या जीवाशीं धरून–बांधून राहिला असल्यामुळें विषादानें–खेदानें ज्याच्याशीं मैत्री केली आहे ५६. लसुणाची घाण जशी त्यास सोडून त्याजपासून दूर होत नाहीं किंवा पथ्य न करणाऱ्या मनुष्याला व्याधि–रोग सोडीत नाहींत त्याप्रमाणें विषादानें त्याजबरोबर आजन्म मैत्री केलेली असते [त्यास खेद मरेपर्यंत सोडीत नाहीं] ५७. आणि या शिवाय तारुण्य, द्रव्य व विषयेच्छा यांचे तो तामसी मनुष्य नसतेच महत्त्व वाढवितो म्हणून मदानेंहि त्यास राहण्याचा आपला आश्रमच केला आहे ५८. अग्नीला जशी उष्णता सोडीत नाहीं, जातिवंत साप जसा आपला डाव धरण्याचा वैरस्वभाव सोडीत नाहीं अथवा भय हा जसा सर्व जगाचा वैरी असून त्याला सोडीत नाहीं; ५९. अथवा जसा काळ हा शरीराला कोणत्याहि वेळीं विसरत नाहीं,

१ सर्वच. २ एकटीं. ३ हृदयकमलांत. ४ कुशलतेनें, युक्तीनें. ५ ताब्यांत दिलीं जातात. ६ धर्म, अर्थ व काम या तीन उपायांनी. ७ गलबतावर. ८ कर्मांचा व्यापार. ९ घाली. १० व्हावी असें. ११ धैर्यानें. १२ रजोगुणात्मक. १३ प्रसिद्ध. १४ राक्षसाला जसे पुण्यजन म्हणतात, सत्पुरुष. १५ आग, निखारा. १६ मंगल नावांचा ग्रह. १७ तमोगुणी.

शरीरातें काळु। न विसंबे कवणे वेळु। तैसा आथी अढळु। तामसीं मदु॥७६०॥ एवं पांचही हे निद्रादिक। तामसाच्या ठाईं दोख। जिया धृती देख। धरिलें आहाती॥ ६१॥ तिये गा धृती नांवें। तामसी येथ हें जाणावें। म्हणितलें तेणें देवें। जगाचेनी॥ ६२॥ एवं त्रिविध जे बुद्धि। कीजे कर्मनिश्चयो आधि। तो धृती या सिद्धि। नेइजो येथ॥ ६३॥ सूर्यें मार्गु गोचरु होये। आणि तो चालती कीर पाये। परी चालणें तें आहे। धैर्यें जेवीं॥ ६४॥ तैसी बुद्धि कर्मातें दावी। ते करणसामग्री निफजवी। परी निफजावया होआवी। धीरतां जे॥ ६५॥ ते हे गा तुजप्रती। सांगितली त्रिविध धृती। यया कर्मत्रया निष्पत्ती। जालिया मग॥ ६६॥ येथ फळ जें एक निफजे। सुख जयातें म्हणिजे। तेंही त्रिविध जाणिजे। कर्मवशें॥ ६७॥ तरी फळरूप तें सुख। त्रिगुणीं भेदलें देख। विवंचूं आतां चोख। चोखीं बोलीं॥ ६८॥ परी चोखी ते कैसी सांगे। पैं घेवों जातां बोलबगें। कानींचियेही लागे। हातींचा मळु॥ ६९॥ म्हणौनि जंयाचेनि अन्हेरें। अवधानही होय बाहिरें। तेणें आइक हो आंतरें। जीवाचेनि जीवें॥ ७७०॥ ऐसें म्हणौनि देवो। त्रिविधा सुखाचा प्रस्तावो। मांडला तो[१२] निर्वाहो। निरूपित असे॥ ७१॥

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ। अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति॥ ३६॥

म्हणे सुखत्रयसंज्ञा। सांगों म्हणौनि प्रतिज्ञा। बोलिलों तें प्राज्ञा। ऐक आतां॥ ७२॥ तरी सुख तें गा किरीटी। दाविजेल तुज दिठी। जें आत्मयाचिये भेटी[१४]। जीवासि होय॥ ७३॥ परी मात्रेचेनि मापें। दिव्यौषध जैसें घेपे। कां कथिलाचें कीजे रुपें। रसभावनीं॥७४॥ नाना लवणाचें जळु। होआवया दोनि चार वेळु। देऊनि सांडिजती ढाळु। तोयांचें जेवीं॥७५॥ तेवीं जालेनि सुखलेशें। जीवु भाविलिया अभ्यासें। जीवपणाचें नासे। दुःख जेथें॥७६॥ तें येथ आत्मसुख। जालें असे त्रिगुणात्मक। तेंही सांगों एकैक। रूप आतां॥७७॥

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्। तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्॥ ३७॥

आतां चंदनाचें बुड। सर्पी जैसें दुवाडें। कां निधानाचें तोंड। विवसियें जेवीं॥७८॥ अगा स्वर्गींचें गोमटें। आडवे यागसंकटें। कां बाळपण दाटें।

तसा तमोगुणयुक्त मनुष्याच्या ठिकाणीं मद अखंड, सदाचाच असतो ७६०. याप्रमाणें निद्रा, भय, शोक, विषाद व मद हे पांच तमाचे दोष 'तामसी' माणसाचे ठिकाणीं ज्या धैर्यानें धारण केले आहेत ६१. अर्जुना ! त्या धैर्याला या जगीं तामस धृति असें म्हणतात, असें जगन्नायक भगवान् श्रीकृष्णानें म्हटलें ६२. याप्रमाणें तीन प्रकारच्या बुद्धीनें पहिल्यानदां जो कर्माचा निश्चय केला जातो, तो या जगीं त्रिविध धैर्यानें शेवटास नेला जातो ६३. सूर्य उगवल्यावर त्यामुळें मार्ग दिसूं लागतो तेव्हांच तो मार्ग खरोखर मनुष्याचे पाय चालतील; परंतु 'चालणें' हें चालणारानें धैर्य धारण केले तरच होणारे आहे. [ त्याशिवाय तें चालणें होत नाहीं ] ६४. त्याचप्रमाणें बुद्धि ही कर्माला दाखविते आणि तें कर्म इंद्रियादि साधन सामग्री घडवून आणते परंतु घडवून आणण्याला जें धैर्य लागतें, ६५. अर्जुना ! तें धैर्य तुला तीन प्रकारांनीं सांगितलें आणि त्याच धैर्यामुळें तीन प्रकारचें कर्म उत्पन्न झाल्यानंतर मग ६६. त्या कर्माला जें फळ येतें व ज्याला 'सुख' अशी संज्ञा आहे, तेंहि कर्माप्रमाणें तीन प्रकारचें आहे, असें समजावें ६७. तर फळरूप जें सुख, तें तीन गुणांनीं निरनिराळें तीन प्रकारचे झालेलें आहे तें सुख आतां चांगल्या शब्दांनीं चांगलें स्पष्ट करून सांगूं ६८. पण तो सांगण्याचा चोखपणा कसा आहे म्हणशील तर शब्दाच्या मार्गानें ग्रहण करूं गेलें असतां [ शब्दाचा मळ त्याला लागतो ] व कर्णद्वारां श्रवण केलें असतां, कर्णरूप हाताचाहि मळ त्याला लागणार ६९. म्हणून ज्याच्या योगानें [ शब्दार्थादि श्रवणार्थ ] अवधानास बाहेर यावें लागते त्याचाहि अव्हेर करून, तें केवळ अंतर्मुख अंतःकरणानें श्रवण कर ७७०. असें बोलून देवांनीं त्रिविध सुखाचें वर्णन करण्याविषयीं प्रस्तावना केली, तीच व्यवस्था मी निरूपण करितो ७१.

**अन्वयार्थ—भरतर्षभ—हे** भरतश्रेष्ठा !–**तु इदानीं**–पण आतां–**यत्र**–ज्या सुखानुभवांत–**अभ्यासात्**-अभ्यासामुळें परिचयामुळें–**रमते**-प्राणी रममाण होतो-**च दुःखान्तं** दुःखाच्या शांतीला–**निगच्छति**–निश्चयानें प्राप्त होतो–[ **तत्** ] **त्रिविधं सुखं**–तें तीन प्रकारचें सुख–**मे शृणु**–मी सांगतों, तें ऐक ३६.

भगवान् म्हणतातः—हे बुद्धिमंता अर्जुना ! सुखाची तीन रूपें गुणांच्या योगानें झाली आहेत तीं लक्षणें तुला सांगूं म्हणून जी प्रतिज्ञा केली होती तीं लक्षणें सांगतों ऐक ७२. हे किरीटी ! ज्यावेळीं जीवाला आत्म्याच्या भेटींत म्हणजे आत्म्याच्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञान होतें त्या वेळेस जें [ अंतःकरणांत अभिव्यक्त ] होतें त्याला सुख असें म्हणावें. ते सुख तुला समजेल असें स्पष्ट सांगतो ७३. जसें दिव्य उत्तम औषध मात्रेच्या प्रमाणानें–सूक्ष्ममापानें सेवन केले जाते अथवा रसाचीं पुटें देऊन जसें कथिलाचें रुपें केले जाते ७४. किंवा मिठाचें पाणी होण्याकरितां ज्याप्रमाणें त्या मिठावर दोन-चार वेळ पाण्याचे हापके देऊन [ शिंपडून ] टाकावे लागतात ७५. त्याप्रमाणें [ जीव व आत्मा यांच्या भेटींत सकृद्दर्शनीं ] झालेल्या सुखाच्या यत्किंचित् लाभानें त्याची आवड निर्माण होऊन तोच अभ्यास पुढें वाढविला तर त्यामुळें जीव दशेचें दुःख जेथें नाहीसें होतें ७६. तें आत्मसुखहि त्रिगुणांच्या योगानें तीन प्रकारचें झालें आहे, त्यांपैकीं एकेकाचीं लक्षणें तुला सांगतों ७७

**अन्वयार्थ–यत्**–जें–**तत्**–तें सुख – **अग्रे** – आरंभीं–**विषम् इव**-विषासारखें क्लेशकर पण-**परिणामे**-परिणामीं-**अमृतोपमम्** – अमृतासारखें – **तत् आत्मबुद्धिप्रसादजं सुखं**–तें आत्मविषयक बुद्धीच्या प्रसादापासून झालेलें सुख–**सात्त्विकं प्रोक्तं**–सात्त्विक म्हटलेलें आहे ३७.

आतां चंदनाच्या झाडाचें बूड सर्पामुळें जसें भयंकर व प्राप्त्यर्थ अति अवघड झालेलें दिसतें अथवा द्रव्याच्या ठेवीच्या तोंडावरील ब्रह्मराक्षसादिकांचा प्रतिबंधामुळें जो ठेवा दुर्लभ झालेला असतो ७८. अरे ! स्वर्गीचे उत्तम, दिव्य भोग मिळविण्यासाठीं प्रथम जसें यज्ञरूपी महत्संकट

१ प्रत्यक्ष दिसणारा.. २ साधनसामुग्री. ३ उत्पन्न करते. ४ धैर्य. ५ कर्माप्रमाणें, कर्मानुसार. ६ विस्तारूं, सांगू. ७ उत्तम शब्दांनीं. ८ शब्दाच्या मार्गानें. ९ कर्णरूपी हाताचा मळ लागेल. १० ज्याचें अव्हेरें [ ज्याचा त्याग केला असतां ] अवधान देखील बाहेर जाईल. ११ विवरण. १२ व्यवस्था. १३ बुद्धिमंता. १४ भेटीनें. १५ प्रमाणानें. १६ किमयेच्या कृतीनें, रसाची पुटें देऊन. १७ पूर. १८ पाण्याचें. १९ भेदभावाचें. २० भयंकर. २१ विघ्नतेमुळें. २२ कठीण मार्ग. २३ यज्ञरूप क्लेश. २४ पीडाकारक.

त्रासकाळें ॥ ७९ ॥ हें असो दीपाचिये सिद्धी । अवघड धू आधीं । नातरी तो औषधीं । जिभेचा ठावो ॥ ७८० ॥ तयापरी पांडवा । जया सुखाचा रिगावा । विषम तेथ मेळावा । यमदमांचा ॥ ८१ ॥ देत सर्वस्नेहा मिठी । आगीं ऐसें वैराग्य उठी । स्वर्ग संसारा कांटी । काढितचि ॥ ८२ ॥ विवेकश्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाती भोकसे । बुद्ध्यादिकांचे ॥८३॥ सुषुम्नेचेनि तोंडें । गिळिजे प्राणापानाचे लोंढे । बोहणियेसीचि येवढें । भारी जेथ ॥ ८४ ॥ जें सारसांही विघडतां । होय वोहाहूनि वत्स काढितां । ना भणंगु दवडितां । भाणयावरुनी ॥८५॥ पैं मायेपुढौनि बाळक । काळें नेतां एकुलतें एक । होय कां उदक । तुटतां मीना ॥८६॥ तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर । युगांतु होय तें वीर । विराग साहाती ॥ ८७ ॥ ऐसा जया सुखाचा आरंभु । दावी काठिण्याचा क्षोभु । मग क्षीराब्धी लाभु । अमृताचा जैसा ॥ ८८ ॥ पहिलया वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडवी गळा । तरी ज्ञानामृतें सोहळा । पाहे जेथें ॥८९॥ पैं कोलिताही कोपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आते ॥ ७९० ॥ तें वैराग्यादिक तैसें । पिकलिया आत्मप्रकाशें । मग वैराग्येंसींही नाशे । अविद्याजात ॥ ९१ ॥ तेव्हां सागरीं गंगा जैसी । आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी । अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥९२॥ ऐसें स्वानुभव-विश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे । तें सात्त्विक येणें नामें । बोलिजे सुख ॥९३॥

विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् । परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

आणि विषयेंद्रियां । मेळु होतां धनंजया । जें सुख जाय थडिया । सांडूनि दोन्ही ॥ ९४ ॥ अधिकारिया रिगतां गांवो । होय जैसा उत्साहो । कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ॥ ९५ ॥ नाना रोगिया जिभेपासीं । केळें गोड साखरेंसीं । कां बचनागाची जैसी । मधुरता पहिली ॥ ९६ ॥ पहिलें संवचोराचें मैत्र । हाटभेटीचें कलत्र । कां लाघवियाचे विचित्र । विनोद ते ॥ ९७ ॥ तैसें विषयेंद्रियदोखीं । जें सुख जीवातें पोखी । मग उपडिला खडकीं । हंसु जैसा ॥ ९८ ॥ तैसी जोडी आघवी आटे । जीविताचा ठाय फिटे । सुकृताचियाही सुटे । धनाची गांठी ॥ ९९ ॥ आणिक भोगिलें जें कांहीं । तें स्वप्न तैसें होय नाहीं । मग हानीच्याचि घाईं ।

[ मातेला बाळ प्रिय असतें पण ] बालपणीं त्या मुलाचा सर्वस्वीं त्रास सहन करावा लागतो ७९. हें राहो, पण दीप सिद्ध्यर्थ-दिवा लावणें झाल्यास प्रथम विस्तव पेटविण्यासाठीं जसा धुराचा त्रास सोसावा लागतो किंवा आरोग्य प्राप्तीकरितां हितकर औषध सेवन करतेवेळीं त्या औषधाचा कडुवटपणा जिभेस सोसावा लागतो, ७८०. त्याप्रमाणें अर्जुना ! ज्या सुखाचा प्रवेश-आरंभ यमदमाच्या साधन समुदायामुळें कठीण असतो [ जें सुख प्राप्त होण्यापूर्वीं यमदमादिक साधनांचें दुःख सोसावें लागतें ] ८१. देहादिकांवरील सर्व स्नेहाला ग्रासून, नाहींसे करीत असें अग्नीप्रमाणें तीव्र वैराग्य जेव्हां उत्पन्न होतें तेव्हां तें स्वर्ग व संसार यांचें कुंपण उपटून काढून टाकतेंच ८२. तीव्र अशा आत्मनात्म विवेकाच्या श्रवणाच्या त्रासानें व कठोर व्रताचरण करतांना जेथें बुद्ध्यादिकांचें भोकसे-त्राभाडे निघतात ८३. सुषुम्ना नाडीच्या तोंडानें प्राण व अपान या वायूंचे लेंढे गिळावे लागतात म्ह. त्याचा रोध करावा लागतो. याप्रमाणें जेथें [ ज्या सुखासाठीं ] सुरवातीसच एवढे भारी कष्ट आहेत ८४. चक्रवाक पक्ष्यांच्या जोडप्याचा वियोग झाला असतां अथवा गाईला पान्हा फुटल्यावर कांसेपासून वांसरास माघारीं ओढून काढीत असतां, किंवा क्षुधित-अन्नेच्छु दरिद्री मनुष्यास वाढलेल्या पानावरून उठवून हांकून लावलें असतां; जसे होते ८५. अथवा आईपुढून काळानें एकुलतें एक लेंकरूं ओढून नेले असतां किंवा माशास पाण्यांतून बाहेर काढलें असतां जसें दुःख होतें ८६. तसें अनुकूल विषयांच्या घराचा त्याग करते वेळेस इंद्रियांना थोर युगांत ओढवल्याप्रमाणें दुःख होतें; परंतु वैराग्यसंपन्न शूर, धन्य आहे त्यांची कीं, तें, तेंहि दुःख सहन करितात ८७. असा ज्या सुखाचा आरंभ, कठीणपणाचा त्रास, अगदीं कष्टमय असल्याचें दाखवितो तो जो सहन करील त्याला, जसा क्षीराब्धीचें मंथन करिते वेळेसचा ज्यांनीं त्रास सहन केला त्यांना नंतर अमृताचा लाभ झाला तसा परमसुखाचा लाभ होतो ८८. पहिल्या प्रथम वैराग्यरूप गरळ-विष ज्यांत निघाले असतां तें प्राशन करण्यास सात्त्विकधैर्यरूपी शंभु जेव्हां आपला गळा 'आ' म्हणून पुढें करील, तेव्हां परिणामीं जेथें [ सुखाचे ठिकाणीं ] ज्ञानरूप अमृताचा सोहळा अभिव्यक्त होतो ८९. हे पहा ! हिरव्या द्राक्षांचा कच्चेपणीं इतका आंबटपणा असतो कीं, तो कोलितासहि मागे सारील असा चटका देतो, परंतु तींच द्राक्षें पिकलीं असतां माधुर्ययुक्त होतात ७९०. तसें तूं वैराग्यादिक आत्मप्रकाशानें परिपक्वतेस, पूर्णतेस आल्यावर मग तेथें वैराग्यासुद्धां सर्व अविद्या नाहींशी होते ९१. जेव्हां समुद्रास गंगा मिळाल्यावर जशी समुद्रस्वरूप होते, तशी बुद्धि आत्म्याचे ठिकाणीं मिळाली असतां तिला अद्वयानंदरूपी सुखाची खाण उघडते ९२. याप्रमाणें ज्या सुखास वैराग्य हें मूळ असून आत्मानुभूतीच्या विश्रांतीच्या रूपानें परिणामास प्राप्त होते त्या सुखाला 'सात्त्विक सुख' असें म्हटलें जाते ९३.

**अन्वयार्थ**---**यत् तत्**-जें तें-**विषयेंद्रियसंयोगात्**-विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून उत्पन्न होतें-**अग्रे**-आरंभीं-**अमृतोपमम्**-अमृतासारखेंच-**परिणामे**-परिणामीं **विषम् इव**-विषासारखें-**तत् सुखं**-तें सुख-**राजस स्मृतम्**-राजस म्हटलें आहे ३८.

आणि अर्जुना ! विषय व इंद्रियें यांचा संबंध झाला असतां [अंतःकरणांत]दोन्ही-दुथड्या भरून बाहेर वाहून जो सुखाचा पूर येतो; [ ते राजस सुख ] ९४. [ राज-सत्ता संपन्न ] अधिकारी आपल्या अधिकाराच्या गांवीं आला असतां जसा गावांत उत्सव होतो; किंवा ऋण काढून लग्नाचा जसा समारंभ-पसारा मांडावा ९५. अथवा रोग्याच्या जिभेला साखरेसह केळीं हीं [ कुपथ्यें असूनहि ] जशीं गोड लागतात; किंवा बचनागाची खातेवेळेस जशी प्रथमतःच गोडी लागते ९६. संभावित चोराची प्रवासांतील मैत्री जशी पहिल्या प्रथम वरपंग गोड असते किंवा बाजारांतील 'कुटुंबाची' [ वेश्यादि-कांची ] आचरणें पहिल्या प्रथम सुखकर वाटतात किंवा नटाचे विनोदात्मक अविर्भाव जसे विचित्र व आल्हादकारक वाटतात ९७. तसें विषय व इंद्रियें यांच्या संबंधामुळें जीवाला जें सुख होतें तसें तें परिणामीं दुःखदायक असतें. हंस आकाशांत संचार करीत असतां खडकावर सांचलेल्या पाण्यांत रात्री *शुक्रादि चांदण्यांचें प्रतिबिंब पडलेलें असते, ते पाहून तीं रत्नें आहेत, अशा भ्रमा-त्मक समजुतीनें हंसानें त्यावर उडी घातली असतां, त्यास रत्नप्राप्ति न होतां जसा तो खडकावर आपटून आपल्या प्राणास मुकतो ९८. तशी ज्यायोगें [ सुकृ-तानें ] मिळविलेली [ सुखसाधनात्मक द्रव्यादि ] कमाई नाहींशी होते, व जिवीताचाहि नाश होतो; आणि [ विषयसुख मिळण्याकरितां ] संपादिलेल्या सर्व पुण्यरूपी धनाचीहि गांठी सुटते-पुण्यक्षय होतो ९९. आणि भोगलेले जें कांहीं विषयसुख तेंहि हां हां म्हणतां स्वप्ना-

लोळावें उरे ॥ ८०० ॥ ऐसें आपत्ती जें सुख। ऐहिकीं परिणमे देख। परत्रीं कीर विख। होऊनि परते ॥ १ ॥ जे इंद्रियजाता लळा। दिधलिया धर्मांचा मळा। जाळूनि भोगिजे सोहळा। विषयांचा जेथ ॥ २ ॥ तेथ पातकें बांधिती थावो। तियें नरकीं देती ठावो। जेणें सुखें हा अपावो। परत्रीं ऐसा ॥ ३ ॥ पैं नामें विष महुरें। परी मारूनि अंतीं खरें। तैसें आदि जें गोडिरें। अंतीं कडू ॥ ४ ॥ पार्था तें सुख साचें। वळिलें आहे रजाचें। म्हणौनि न शिवें तयाचें। आंग कहीं ॥ ५ ॥

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः। निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

आणि अपेयाचेनि पानें। अखाद्याचेनि भोजनें। स्वैरस्त्रीसंनिधानें। होय जें सुख ॥ ६ ॥ कां पुढीलांचेनि मारें। नातरी परस्वापहारें। जें सुख अवतरे। भाटाच्या बोलीं ॥ ७ ॥ जें आलस्यावरी पोखिजे। निद्रेमाजीं जें देखिजे। जयाच्या आद्यंतीं भुलिजे। आपुली वाट ॥ ८ ॥ तें गा सुख पार्था। तामस जाण सर्वथा। हें बहु न सांगोंचि जें कैंथा। असंभाव्य हे ॥ ९ ॥ ऐसें कर्मभेदें मुदलें। फळसुखही त्रिधा जालें। तें हें यथागमें केलें। गोचर तुज ॥ ८१० ॥ तें कर्ता कर्म कर्मफळ। ये त्रिपुटी येकी केवळ। वांचूनि कांहींचि नसे स्थूल-। सूक्ष्मीं इये ॥ ११ ॥ आणि हे तंव त्रिपुटी। तिहीं गुणीं इहीं किरीटी। गुंफिली असे पटीं। तांतुवीं जैसी ॥ १२ ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः। सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

म्हणौनि प्रकृतीच्यां आवलोकीं। न बंधिजे इहीं सत्त्वादिकीं। तैसी स्वर्गीं ना मृत्युलोकीं। आथी वस्तु ॥ १३ ॥ कैंचा लोंवेवीणें कांबळा। मातियेवीण मोदळा। कां जळेंवीण कल्लोळा। होणें आहे? ॥ १४ ॥ तैसें न होनि गुणाचें। सृष्टीची रचना रचे। ऐसें नाहींचि गा साचें। प्राणिजात ॥ १५ ॥ यालागीं हें सकळ। तिहीं गुणांचेंचि केवळ। घडलें आहे निखिळ। ऐसें जाण ॥ १६ ॥ गुणीं देवां त्रैयी लाविली। गुणीं लोकीं त्रिपुटी पाडिली। चतुर्वर्णा घातली। सिनानीं उळिगें ॥ १७ ॥

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप। कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

तेचि चारी वर्ण। पुससी जरी कोण कोण। तरी जयां मुख्य ब्राह्मण। धुरेचे कां ॥ १८ ॥ येर क्षत्रिय वैश्य दोन्ही। तेही ब्राह्मणाच्याचि मानिजे मानी। जे ते वैदिकविधानीं। योग्य म्हणौनि ॥ १९ ॥ चौथा शूद्र जो धनंजया। वेदीं

प्रमाणें नाहींसें होते मग हानीच्या आघातात्मक राशींत लोळणें; हेंच तेवढें त्याच्या वांट्यास शिल्लक राहतें ८००. इहलोकीं प्राप्त झालेलें जें राजस सुख, तेंहि अशा प्रकारच्या [ संकटात्मक ] परिणामास पावतें आणि तें परलोकींहि खरोखर विषरूपानेंच फलप्रद होऊन उलटते १. कारण, सर्व इंद्रियांचे लाड पुरविण्याकरितां म्हणून जें धर्मरूपी मळा त्यांचे स्वाधीन करितात, ते धर्म जाळून [ ज्या राजस सुखांत ] इंद्रियांकडून विषयाचा सोहळा भोगवितात २. तेव्हां पातकांस थारा मिळून तीं बलवान् होतात व तीं नरकामध्यें त्यास जागा करून देतात. ज्या इहलोकाच्या सुखानें परलोकीं हा असा घात होतो ३. हे पहा ! जसें आरंभीं मधुर लागणारें विष हें शब्द मात्र मधुर आहे खरें, परंतु परिणामीं ते त्याचें सेवन करणाराचा प्राणनाश करून मारकत्व खरें करते. तसें इहलोकींचें जें सुख आरंभीं गोड असतें व परिणामीं कडू असते ४. पार्था, तें सुख खरोखर केवळ रजोगुणाचेंच बनलेलें [ राजस ] आहे; म्हणून त्या सुखाला तूं कधींहि स्पर्श करूं नकोस ९.

**अन्वयार्थ**--**यत् सुखं**-जें सुख-**अग्रे च अनुबंधे च**-आरंभीं व अंतीं-**आत्मनः मोहनम्**-आत्म्याला मोह पाववणारें व-**निद्रा-आलस्य-प्रमाद**-**उत्थं**-झोंप, आळस बेसावधपणा यांपासून उत्पन्न झालेलें-**तत् तामसम् उदाहृतं**-तें तामस सुख म्हटलें आहे ३९.

आणि अपेयाच्या पानानें, अभक्ष्याच्या भक्षणानें, भोजनानें, स्वैरिणी स्त्रीच्या संयोगानें जें सुख होत असतें ६. किंवा जें सुख दुसऱ्यास घात करून ठार मारण्यानें अथवा दुसऱ्याचें सर्वस्व हरण करण्यानें किंवा भाटाच्या, स्तुतिपाठकांच्या स्तुतिपाठानें अभिव्यक्त होतें ७. जें सुख आळसानें वाढते किंवा निद्रेमध्यें जें अनुभवास येतें आणि ज्या सुखाच्या आरंभीं व शेवटीं आपल्या कल्याणाच्या [ आत्मसुखाच्या ] मार्गाविषयीं भुरळ पडतें. [ शुद्धिहि नसतें ] ८. तें सुख अर्जुना ! सर्वतोपरी तामस आहे असें तूं जाण. ही कथा मी फार विस्तारानें सांगत बसतच नाहीं कारण, तामस सुखाला 'सुख' अशी संज्ञा देणें असंभाव्य आहे ९. अशा प्रकारें सुखास कारणीभूत असलेलें जें कर्म तें त्रिविध प्रकाराचें असल्या-मुळें त्याचें फल जें सुख तेंहि तीन प्रकारचें झालें आहे, तें तुला यथाशास्त्र स्पष्ट सांगितलें ८१०. ते कर्ता, कर्म व कर्मफल हीं जीं केवळ एक त्रिपुटी आहे त्या त्रिपुटीवांचून या स्थूल सूक्ष्मरूप जगांत दुसरें असें कांहींच नाहीं ११. आणि अर्जुना, पटांत जसें तंतूच गुंफलेलें असतात तशी ही त्रिपुटी पाहूं गेलें असतां तीन गुणांनीं भरलेली, गुंफलेली आहे १२.

**अन्वयार्थ**--**यत्**-जें-**एभिः त्रिभिः प्रकृतिजैः गुणैः**--या तीन प्रकृतिजन्य गुणांनीं-**मुक्तं**-सोडलेलें-**स्यात्**-असेल असें-**तत् सत्त्वं**-तें सत्त्व-असा प्राणी-**पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः**-पृथ्वींत अथवा स्वर्गांतील देवांत-**न अस्ति**-नाहीं ४०.

म्हणून तूं हें लक्षांत ठेव कीं, प्रकृतीच्या कार्यांत या सत्त्वादिक तीन गुणांनीं गोंविली-बद्ध झालेली नाहीं अशी कोणतीहि वस्तु या लोकीं अथवा स्वर्गलोकीं आहे, असें नाहीं १३. लोकरीवांचून कांबळा-घोंगडी कोठली होणार ? व मातीवांचून गोळा कसा होणार ? अथवा पाण्यावांचून लाटांना होणें वा अस्तित्व असणें आहे काय ? १४. त्याप्रमाणें अर्जुना ! गुणसंबंधाचे न बनतां या सृष्टीच्या रचनेमध्यें निर्माण होणारा असा खरोखर कोणीहि प्राणि नाहींच १५. वास्तव, हे सर्व [ जग व पदार्थ ] तीन गुणांनींच केवळ रचलेले आहेत, असें समज १६. या तीन गुणांची शक्ति इतकी अचाट आहे कीं, त्या गुणांनीं देवांच्या पाठीमागे [ एकाच देवाचें ब्रह्मा, विष्णु महेश असें ] तीन प्रकार लाविले आहेत. आणि लोकांचें तीन लोक [ स्वर्ग, मृत्यु व पाताळ ] हे देखील गुणांनीच केलें आहेत आणि चार वर्ण त्यांचीं कर्में ही देखिल गुणांमुळेंच निराळीं झाली आहेत १७.

**अन्वयार्थ**--**परंतप**-हे अर्जुना ! **ब्राह्मणक्षत्रियविशां**-ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचीं-**च**-**शूद्राणां**-व शूद्रांचीं-**कर्माणि**-कर्में-**स्वभावप्रभवैः गुणैः**-मायेपासून उत्पन्न झालेल्या सत्त्वादि गुणांनीं--**प्रविभक्तानि**--अत्यंत विभागलेली आहेत ४१.

तेच चार वर्ण कोणकोणते आहेत असें जर तूं पुसशील, तर ज्या वर्णांत ब्राह्मण हे मुख्य श्रेष्ठ, अग्रणी आहेत १८. इतर दुसरें जें क्षत्रिय व वैश्य हे दोन वर्ण तेहि ब्राह्मणांच्याच बरोबरीचें मानावेंत. कारण, तें वैदिक कर्म करण्याचे अधिकारी आहेत म्हणून १९. हे धनंजया !

१ विपरीत. २ या लोकांत. ३ परिणाम पावतें. ४ लाड. ५ बळावतात. ६ बळ. ७ अपाय. ८ मधुर हें नांवाचें विष. ९ मधुर. १० बनविलें. ११ व्यभिचारिणीच्या संसर्गानें. १२ परद्रव्य हरणानें. १३ उत्पन्न होतें. १४ पुष्ट होतें. १५ स्वधर्म. १६ कारण कीं. १७ त्याज्य, निंद्य. १८ यथाशास्त्र. १९ तंतूंनीं. २० मायेच्या आभासांत, जगांत. २१ लोकरीवांचून. २२ मातीचें ढेंकूळ. २३ ब्रह्मा, विष्णु व महेश किंवा यक्ष, गंधर्व, देव.

लागु नाहीं तया । तन्ही वृत्ति वर्णत्रया- । आधीन तयाची ॥ ८२० ॥ तिये वृत्तीचिया जवळिकां । वर्णा ब्राह्मणादिकां । शूद्रही कीं देखा । चौथा जाला ॥ २१ ॥ जैसा फुलाचेनि सांगातें । तांतु तुरंबिजे श्रीमंतें । तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती ॥ २२ ॥ ऐसैसी गा पार्था । हे चातुर्वर्ण्यव्यवस्था । करूं आतां कर्मपथा । यांचियां रूपा ॥ २३ ॥ जिहीं गुणीं ते वर्ण चारी । जन्ममृत्यूंचिये कातरी । चुकोनियां ईश्वरीं । पैठे होती ॥ २४ ॥ जिये आत्मप्रकृतीचे इहीं । गुणीं सत्त्वादिकीं तिहीं । कर्में चौघां चहूं ठाईं । वांटिलीं वर्णा ॥ २५ ॥ जैसें बापें जोडिलें लेंका । वांटिलें सूर्यें मार्ग पांथिकां । नाना व्यापार सेवकां । स्वामी जैसें ॥ २६ ॥ तैसी प्रकृतीच्या गुणीं । जया कर्मांची वेल्हावणी । केली आहे वर्णीं । चहूं इहीं ॥ २७ ॥ तेथ सत्त्वें आपल्या आंगीं । संमीननिमीन भागीं । दोघे केले नियोगी । ब्राह्मण क्षत्रिय ॥ २८ ॥ आणि रज परी सात्त्विक । तेथ ठेविलें वैश्य लोक । रजचि तमभेसक । तेथ शूद्र ते गा ॥ २९ ॥ ऐसा येकाचि प्राणिवृंदा । भेदु चतुर्वर्णधा । गुणींचि प्रबुद्धा । केला जाण ॥ ८३० ॥ मग आपुलें ठेविलें जैसें । आइतेंचि दीपें दिसे । गुणभिन्न कर्म तैसें । शास्त्र दावी ॥ ३१ ॥ तेंचि आतां कोण कोण । वर्णविहिताचें लक्षण । हें सांगों ऐक श्रवण- । सौभाग्यनिधी ॥ ३२ ॥

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च । ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ती । घेऊनि आपुल्या हातीं । बुद्धि आत्मया मिळे येकांतीं । प्रिया जैसी ॥ ३३ ॥ ऐसा बुद्धीचा उपरमु । तया नाम म्हणिपे शमु । तो गुण गा उपक्रमु । जया कर्माचा ॥ ३४ ॥ आणि बाह्येंद्रियांचें धेंडें । पिटूनि विधीचेनि दंडें । नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ॥ ३५ ॥ तो पैं गा शमा विरजों । दमु गुण जेथ दुजा । आणि स्वधर्माचिया वोजों । जिणें जें कां ॥ ३६ ॥ सटवीचिये रातीं । न विसंबिजे जेवीं वाती । तैसा ईश्वरनिर्णयो चित्तीं । वाहणें सदा ॥ ३७ ॥ तया नाम तप । तें तिजया गुणाचें रूप । आणि शौचैही निष्पाप । द्विविध जेथ ॥ ३८ ॥ मन भावशुद्धी भरलें । आंग क्रियां अळंकारिलें । ऐसें सबाह्य जियालें । साजिरें जें कां ॥ ३९ ॥ तया नाम शौर्य पार्था । तो कर्मीं गुण जये चौथा । आणि पृथ्वीचिया परी सर्वथा । सर्व जें साहाणें ॥ ८४० ॥ ते गा

चौथा जो शूद्रवर्ण आहे, त्याला वेदाचा अधिकार संबंध नाहीं; तरीहि त्याची 'वृत्ति' तीन वर्णांच्या आधीन आहे ८२०. अहो! त्या ब्राह्मणादि तीन वर्णांच्या सेवावृत्तीच्या निकट-सान्निध्यामुळें त्रैवर्णिकांबरोबर शूद्र देखील एक चौथा वर्ण झाला २१. जसा फुलांच्या संगतीनें असलेल्या दोऱ्याचाहि थोर श्रीमंत लोक स्वीकार करतात, तशी श्रुति द्विजांच्या संगतीमुळें शूद्रांचाहि स्वीकार करते २२. पार्था! आतां अशी ही चार प्रकारांनीं या चार वर्णांची व्यवस्था झालेली आहे. आतां त्या त्या वर्णांच्या कर्म मार्गाचे म्ह. त्यांची कर्में कोणतीं ते भेद तुला स्पष्ट सांगतों २३. कीं ज्या गुणांनीं ते चारी वर्ण जन्ममृत्यूचें कात्रींतून, संकट चुकवून ईश्वराप्रत प्राप्त होतात २४. आत्म्याच्या आश्रयावर असणारी जी प्रकृति, तिच्या या सत्त्वादि तीन गुणांनीं चार वर्णाला चार ठिकाणीं कर्मे वांटून दिलीं आहेत २५. ज्याप्रमाणें बापानें मिळविलेली संपत्ती मुलांना वांटून द्यावी किंवा सूर्यानें वाटसरूंस त्यांचे त्यांचे मार्ग दाखवून द्यावेत अथवा स्वामीनें सेवकांस त्यांच्या अधिकारानुरूप भिन्नभिन्न व्यवहार वांटून द्यावेत २६. त्याप्रमाणें, प्रकृतीचे जे तीन गुण, त्यांनीं कर्मांचा विस्तार करून त्यांची चार वर्णांचे ठिकाणीं वांटणी केली आहे २७. त्या ठिकाणीं सत्त्वगुणानें आपल्या समविषम भागानें, न्यूनाधिकतेनें ब्राह्मण व क्षत्रिय हे दोघे [ वर्ण ] अधिकारी उत्पन्न केले २८. आणि प्रधान रजोगुण व त्यास साह्यभूत कांहींसा सत्त्वगुण मिसळलेला आहे. त्या मिश्रणानें "वैश्यवर्णा" चे लोक निर्माण केलें व रजोगुण; पण ज्यांत तमोगुण मिसळलेला आहे त्या मिश्रणानें शूद्र वर्ण निर्माण केला २९. अशा प्रकारें हे प्रबुद्धा! एकच प्राणिमात्राच्या समुदायांत या गुणांनींच असा चार प्रकारचा भेद केला आहे, असे तूं समज. ८३०. मग आपली ठेवलेली वस्तु जशी दिव्याच्या उजेडानें सहजच दिसते, तसें गुणांनीं वेगवेगळे झालेलें कर्म शास्त्र स्पष्टपणें दाखविते ३१. हे श्रवणसौभाग्यसंपन्न अर्जुना! तेच कोणत्या वर्णाला कोणतें विहित कर्म आहे व त्याचें लक्षण काय हे तुला आतां सांगतों ३२.

**अन्वयार्थ**--**शमः**-अंतःकरणाची शांति-**दमः**-बाह्य इंद्रियांचा निग्रह-**तपः**-सतराव्या अध्यायांत सांगितलेलें त्रिविध तप-**शौचम्**-अंतःशुद्धि व बहिःशुद्धि-**क्षांतिः**-क्षमा-**आर्जवम् एव च**-सरळपणा-**ज्ञानम्**-आत्मादि पदार्थांचें ज्ञान-**विज्ञानं**-शास्त्रार्थाचा अनुभव-**आस्तिक्यं**-श्रद्धाळूपणा हें-**ब्रह्मकर्म स्वभावजं**-ब्राह्मण जातीचें स्वभावजन्य कर्म आहे ४२.

[**शमः**] तर ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्री आपल्या पतीशीं एकांतीं मोठ्या प्रेमानें अनुसरते त्याप्रमाणें सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपल्या हातांत घेऊन जी बुद्धि आत्मस्वरूपास मिळते ३३. असा जो बुद्धीचा अंतर्मुखतेनें होणारा लीनपणा आहे त्याला 'शम' असें म्हणतात. तो शम सर्व गुणांमध्यें आरंभींचा पहिला गुण आहे. [ त्याजपासून सर्व कर्मांचा आरंभ होतो ] ३४. [**दमः**] आणि जो बाह्य इंद्रियांचे समुदाय विधीच्या दंडकानें पिटून त्यांना अधर्माच्या मार्गाला कधींहि जाऊं न देणें ३५. तो शमाला साह्यकर्ता असा दुसरा, 'दम' संज्ञक गुण होय. आणि स्वधर्माच्या पद्धतीनें जें जगणें ३६. [ **तपः** ] जसें सटवीचे [ षष्ठीपूजनाचे ] रात्रीं दिव्याला विसंबत नाहींत, तसें सर्वकाळ चित्तांत ईश्वर स्वरूपाविषयींचा विचार करणें ३७. त्याला 'तप' असें नांव आहे आणि हें ब्राह्मणाच्या कर्मांतील तिसऱ्या गुणाचे स्वरूप आहे. [ **शौचम्** ] आणखी शौच म्हणजे पवित्रपणा. हा निष्पाप असून तोहि दोन प्रकारचा आहे ३८. मन हें शुद्धभावानें, श्रद्धेनें भरलेलें असून सर्व शरीर विहित सत्कर्मानें सुशोभित झालेलें आहे, असा अंतर्बाह्य शुचिपणा भरलेला असून जे चांगलें जगणें ३९. त्याला पार्था! 'शौच' असें नांव आहे व तो ब्रह्मकर्मांपैकीं चवथा गुण होय. [ **क्षांतिः** ] आणि पृथ्वीप्रमाणें नेहमीं जे सर्वतोपरी सहन करणें ८४०. त्याला अर्जुना! 'क्षान्ति-क्षमा' असें म्हणतात

१ जीवनोपाय, सेवावृत्ति. २ सेवावृत्तीच्या सान्निध्यानें. ३ दोरा धारण करावा. ४ या चारी वर्णाच्या कर्ममार्गाचें स्पष्टीकरण. ५ कातरीस, संकटास. ६ प्राप्त, प्रविष्ट. ७ वाटसरू लोकांस. ८ अथवा. ९ विस्तार. १० समविषम. ११ उत्पन्न. १२ तमोमिश्र. १३ वर्णपरत्वें. १४ हे भाग्यवंता. १५ लीनपणा. १६ चित्ताचें नियमन. १७ आरंभ. १८ कर्मेंद्रियांचे समुदाय. १९ स्वारी. २० सहाय्यकर्ता. २१ बाह्येंद्रियांचें नियमन. २२ रीतीनें. २३ वांचणें, जीवित. २४ जन्मल्याच्या सहाव्या रात्रीं. २५ दिवा. २६ शुद्ध, शुचिर्भूतता. २७ विचारानें, श्रद्धेनें. २८ सत्कर्माचरणानें भूषित केलें. २९ जिणें.

क्षमा पांडवा । गुण जेथ पांचवा । स्वरांमाजीं सुहावा । पंचमु जैसा ॥ ४१ ॥ आणि वांकडेनी वोघेंसीं । गंगा वाहे उजूचि जैसी । कां पुंटीं वळला ऊंसीं । गोडी जैसी ॥ ४२ ॥ तैसा विषमांही जीवां- । लागीं उजुंकारु बरवा । तें ऐार्जव गा साहावा । जेथींचा गुण ॥ ४३ ॥ आणि पाणियें प्रयत्नें माळी । अखंड जंचे झाडामुळीं । परी तें आघवेंचि फळीं । जाणे जेवीं ॥ ४४ ॥ तैसें शास्त्राचारें तेणें । ईश्वरुचि येकु पावणें । हें फुडें जें कां जाणणें । तें येथ ज्ञान ॥ ४५ ॥ तें गा कर्मी जिये । सातवा गुण होये । आणि विज्ञान हें पाहें । एवंरूप ॥ ४६ ॥ तरी सत्त्वशुद्धीचिये वेळे । शास्त्रें कां ध्यानबळें । ईश्वरतत्त्वींचि मिळे । निष्टंकबुद्धी ॥४७॥ हें विज्ञानें बरवें । गुणरत्न जेथ आठवें । आणि आंस्तिक्य जाणावें । नववा गुण ॥ ४८ ॥ पैं रांजमुद्रा आथिलिया । प्रजा भजे भलतया । तेवीं शास्त्रें स्वीकारिलिया । मार्गमात्रातें ॥ ४९ ॥ आदरें जें कां मानणें । तें आस्तिक्य मी म्हणें । तो नववा गुण जेणें । कर्म तें साच ॥ ८५० ॥ एवं नवही शमादिक । गुण जेथ निर्दोख । तें कर्म जाण स्वाभाविक । ब्राह्मणाचें ॥ ५१ ॥ तो नवगुणरत्नांकरु । यया नवरत्नांचा हारु । नैं फेडित ले दिनकरु । प्रकाशु जैसा ॥ ५२ ॥ नाना चांपा चांपौळी पूजिला । चंद्रु चंद्रिका धवळला । कां चंदनु निजें चर्चिला । सौरभ्यें जेवीं ॥ ५३ ॥ तेवीं नवगुणटिकलग । लेणें ब्राह्मणाचें अव्यंग । कहींचि न संडी आंग । ब्राह्मणाचें ॥ ५४ ॥ आतां उचित जें क्षत्रिया । तेंहीं कर्म धनंजया । सांगों ऐक प्रज्ञेचिया । भंरोवरी ॥ ५५ ॥

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् । दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥

तरी भानु हा तेजें । नापेक्षी जेवीं विरंजे । कां सिंहें न पाहिजे । जावेंळिया ॥५६॥ ऐसा स्वयंभ जो जीवें लैंठु । सावोयेंवीण उँद्भटु । ते शौर्य गा जेथ श्रेष्ठु । पहिला गुण ॥५७॥ आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडिही नक्षत्र हारपे । ना तो तरी न लोपे । सचंद्रीं तिहीं ॥ ५८ ॥ तैसेनि आपुले प्रौढिगुणें । जगा या विस्मयो देणें । आपण तरी न क्षोभैणें । कायसेनही ॥ ५९ ॥ ते प्रागल्भ्यैंरूप तेजा । जिये कर्मीं गुण दुजा । आणि धीरु तो तिजा । जेथींचा गुण ॥ ८६० ॥ वरिपडलिया आकाश । बुद्धीचे डोळे मानस । झांकी ना ते परियेस । धैर्य जेथें ॥ ६१ ॥

तो गुण जेथें पांचवा गुण आहे तो सप्तस्वरांत पंचमस्वर जसा अति मधुर आहे तसा ब्राह्मण कर्मांतील हा गुण होय ४१. [ **आर्जवम्** ] आणि वांकड्या अशा ओघामधूनहि ती गंगा, जलप्रवाहरूपानें सरळच वाहते किंवा ऊंसाची पेरी जरी वांकडी वळलेली असली तरी त्यांची गोडी ज्याप्रमाणें सरळ-सारखींच असते ४२. त्याप्रमाणें आपल्यास त्रास देणाऱ्या प्रतिकूल जीवांविषयीं देखील असणारा जो चांगला सरळपणा त्यासच 'आर्जव' असें म्हणतात व हा ब्राह्मणकर्मांपैकीं सहावा गुण होय ४३. [ **ज्ञानम्** ] आणि माळी हा कष्ट करून प्रयत्नानें झाडांचें मुळांस पाणी घालतो; पण तो आपले सर्व श्रम जसें फळें आल्यावर त्यांत सार्थकी लागले असें समजतो ४४. तसें शास्त्रोक्त आचरण करणें व त्यामुळें एक ईश्वर-प्राप्तीच, संपादन करणें हें जें दृढनिश्चयानें समजणें तें येथें 'ज्ञान' होय ४५. तें ज्ञान ज्या ब्रह्मकर्मांपैकीं सातवा गुण होय; आणि त्याचप्रमाणें विज्ञान हे मात्र अशा स्वरूपाचें आहे कीं ४६. [ **विज्ञानं** ] तर सत्त्व-शुद्धीच्या वेळीं शास्त्रविचारानें व ध्यानाच्या अभ्यासानें ईश्वररूप तत्त्वांतच जी बुद्धि, निश्चयानें मिळते ४७. अर्जुना ! हेंच तें बरवें 'विज्ञान' आहे व तें या गुणकर्मांतील आठवें गुणरत्न होय. [ **आस्तिक्यम्** ] आणि 'आस्तिक्य' हा नववा गुण आहे असें समजावें ४८. हे पहा ! राजमुद्रांकित, असलेल्या कोणत्याहि मनुष्याला सर्व प्रजाजन जसें मानतात त्याप्रमाणें शास्त्रानें स्वीकारावें म्हणून सांगितलेल्या सर्व मार्गांना-४९. जें आदरानें मानणें [ व त्याप्रमाणें आचरण करणें ] याला 'आस्तिक्य' असें मी म्हणतों. तो ब्राह्मणकर्मां-पैकीं नववा गुण होय व याच आस्तिक्य गुणामुळें तें ब्राह्मणकर्म सर्व खरें-सिद्ध होतें ८५०. याप्रमाणें शमादिक नऊ गुण जेथें [ ज्या कर्मांत ] निर्दोष दृष्टीस पडतात, तें ब्राह्मणाचें स्वाभाविक कर्म आहे, असें समज ५१. तो ब्राह्मण या नऊ गुणांचा समुद्रच आहे. ज्याप्रमाणें सूर्य स्वभावतःच प्रकाशरूप असतो, त्याप्रमाणें तो ब्राह्मण हा जणुं नवगुणरूपी रत्नांचा हार न घालतां स्वाभाविकच ल्यालेला असतो ५२. अथवा चांफ्याचा वृक्ष चांफ्याच्याच [ त्याच्याच ] फुलांनीं जसा सदा सुशोभित, पूजिलेला असतो अथवा चंद्र आपल्या प्रभेनेंच जसा सदाशुभ्र, प्रकाशित असतो किंवा चंदन आपल्याच परिमळानें जसा सदाचाच चर्चित असतो ५३. तसें नवगुणरूप रत्नजडित दागिना म्हणजे ब्राह्मणाचें अव्यंग लेणें [ निर्दोष अलंकार ] असते व तो अलंकार ब्राह्मणाचें अंग सोडून कधींच राहात नाहीं ५४. आतां हे धनंजया ! क्षत्रियांना उचित जें कर्म आहे, तेंहि मी सांगतों. तें तूं आपल्या बुद्धिसर्वस्व-चातुर्यानें ऐक ५५.

**अन्वयार्थ**—**शौर्यं**-शूरपणा-**तेजः**-प्रगल्भपणा-**धृतिः**-धैर्य-**दाक्ष्यं**-दक्षता-**च युद्धे अपि अपलायनं**-व युद्धांतूनहि न पळणें-**दानं**-औदार्य-**च ईश्वरभावः**-व प्रमुख-**स्वभावजं क्षात्रं कर्म**-हें स्वभावजन्य क्षत्रिय-जातीचें कर्म आहे ४३.

[ **शौर्यं** ] सूर्य हा प्रकाश पाडण्याचे बाबतींत जशीं दुसऱ्याच्या साह्याची मुळींहि अपेक्षा करीत नाहीं, किंवा सिंह आपल्या पराक्रमाचे बाबतींत सोबत्याच्या मदतीची अपेक्षा, गरज बाळगीत नाहीं ५६. तसा दुसऱ्याच्या साह्यावांचून जो स्वयंभू अंगानेंच बलवान् व अन्य-सहाय्यनिरपेक्ष उत्कर्षास आलेला असतो. तो क्षात्र प्रकृतीचा पहिला 'शौर्य' संज्ञक श्रेष्ठ गुण होय ५७. [ **तेजः** ] आणि सूर्याच्या प्रकाशाच्या सामर्थ्यानें कोटयवधीहि नक्षत्रें निस्तेजित होऊन लोपतात; परंतु चंद्रासहवर्तमान तीं सर्व कोट्यवधि नक्षत्रें जरी असली तरीसुद्धां ती सूर्याचा लोप करण्याविषयीं असमर्थ असल्यामुळें त्यांचेकडून सूर्य लोपत नाहीं ५८. तसें आपल्या सामर्थ्यानें व महत्त्वाच्या गुणानें सर्व जगाला आश्चर्यचकित करून टाकणें व कसलाहि प्रसंग आला तरी आपण न घाबरतां, कशानेंहि चळ-ढळ होऊं न देणें ५९. असें तें निश्चयात्मकतेचे, पाणीदारपणाचें प्रशंसनीय 'तेज' तो त्या क्षात्र प्रकृतीच्या कर्मांत दुसरा गुण होय. [ **धृतिः** ] व 'धीर' हा त्याच प्रतीचा क्षत्रिय कर्मांतील तिसरा गुण होय ८६०. आकाशहि कोसळून अंगावर पडलें तरीहि ज्याच्या बुद्धीचे डोळे-मन हें झांकलें जात नाहींत म्ह. धाक उत्पन्न होत नाहीं त्याचें नांव 'धैर्य' होय ऐक ६१. [ **दाक्ष्यम्** ] आणि पाणी

---

१ मधुर, गोड. २ पंचम नांवाचा स्वर. ३ पेरी वांकडी असली तरी. ४ त्रास देणारे जीव. ५ सरळपण. ६ सरळपणा. ७ खपे. ८ निश्चयात्मिका बुद्धि. ९ अनुभव, ज्ञान. १० श्रुतिस्मृतीविषयीं श्रद्धा. ११ राजशिक्का असलेल्याला. १२ नवगुणरूप रत्नांचा समुद्र. १३ न टाकतां. १४ स्वीकार करतो. १५ चाफ्यांच्या कळ्यांनीं. १६ चांदण्यानें शुभ्र केला. १७ नऊ गुणरूपी रत्नांनी जडित. १८ सामुग्रीनें. १९ साह्य. २० सोबती, पाठीराखा. २१ बलवान्. २२ साहाय्यावांचून. २३ शूर. २४ कोटयवधि. २५ आश्चर्य. २६ घाबरणें. २७ प्रसंशनीय, अलौकिक मोठेपणा, हिंमत. २८ कोसळलें तरी.

आणि पाणी हो कां भलतेतुर्के। परी तें जिणौनि पद्म फांके। कां आकाश उंचिया जिंके। आवडे तयातें॥ ६२ ॥ तेवीं विविध अवस्था। पातलिया जिणौनि पार्था। प्रज्ञाफळ तया अर्था। वेधे देणें जें॥ ६३ ॥ तें दक्षत्व गा चोख। जेथ चौथा गुण देख। आणि झुंज अलौकिक। तो पांचवा गुण॥ ६४ ॥ आदित्याचीं झाडें। सदा सन्मुख सूर्याकडे। तेवीं समोर शत्रूपुढें। होणें जें कां॥ ६५॥ माहेवंणी प्रयत्नेंसी। चुकविजे सेजे जैसी। रिपू पाठी नेदिजे तैसी। समरांगणीं॥ ६६॥ हा क्षत्रियाचेया आचारीं। पांचवा गुणेंद्रु अवधारीं। चहूं पुरुषार्थां शिरीं। भक्ति जैसी॥ ६७ ॥ आणि जालेनि फुलें फळें। शाखिया जैसीं मोकळें। कां उदार परिमळें। पद्माकरु॥ ६८ ॥ नाना आवडीचेनि मापें। चांदिणें भलतेणें घेपे। पुढिलांचेनि संकल्पें। तैसें जें देणें॥ ६९ ॥ तें उमेप गा दान। जेथ सहावें गुणरत्न। आणि आज्ञे एकायतन। होणें जें कां॥ ८७० ॥ पोषूनि अवयव आपुले। करविजती मानविले। तेवीं पालणें लोभविलें। जग जें भोगणें॥ ७१ ॥ तया नाम ईश्वरभावो। जो सर्वसामर्थ्यांचा ठावो। तो गुणांमाजीं रावो। सातवा जेथ॥ ७२ ॥ ऐसें जें शौर्यादिकीं। इहीं सात गुणविशेखीं। अळंकृत सप्तऋखीं। आकाश जैसें॥ ७३ ॥ तैसें सप्तगुणीं विचित्र। कर्म जें जगीं पवित्र। तें सहज जाण क्षात्र। क्षत्रियाचें॥७४॥ नाना क्षत्रिय नव्हे नरु। तो सत्त्वसोनयाचा मेरु। म्हणौनि गुणस्वर्गां आधारु। सातां इयां॥ ७५ ॥ नातरी सप्तगुणार्णवीं। परिवारेंली बरवी। हे क्रिया नव्हे पृथ्वी। भोगीतसे तो॥ ७६ ॥ कां गुणांचे सातांही ओघीं। हे क्रिया ते गंगा जगीं। तया महोदधीचिया आंगीं। विलसे जैसी॥ ७७ ॥ परी हें बहु असो देख। शौर्यादि गुणात्मक। कर्म गा नैसर्गिक। क्षत्रजातीसी॥ ७८ ॥ आतां वैश्याचिये जाती। उचित जे महामती। तें ऐकें गा निरुती। क्रिया सांगों॥ ७९ ॥

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्। परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

तरी भूमि बीज नांगरु। यया भांडवलाचा आधारु। घेऊनि लाभु अपारु। मेळवणें जें॥ ८८० ॥ किंबहुना कृषी जिणें। गोधनें राखोनि वर्तणें। कां सेंमर्घीची विकणें। महर्घीवस्तु॥ ८१ ॥ येतुलाचि पांडवा। वैश्यातें कर्मांचा मेळावा। हा वैश्यजातीस्वभावा- आंतुला जाण॥ ८२ ॥ आणि वैश्य क्षत्रिय

वाटेल तेवढे खोल असलें तरी असो, पण कमळ हें पाण्याला जिंकून वर येतें व विकसित होते, किंवा आकाश हें उंचीविषयीं हव्या त्या पदार्थांस जिंकतें ६२. त्याप्रमाणें नानाप्रकारचे प्रसंग प्राप्त झाले तरी त्यास जिंकून त्या अनेक अवस्थांमुळें बुद्धींत [ फळणारे अर्थ ] प्रतिफलित-उत्पन्न होणारें जें अनेक विकार, त्यास 'वेध देणें' बुद्धीनें भेदन करून, जिंकून त्यांतून पार पडणें, असें जें बुद्धीचें अढळ असणें [ साध्यरूप अर्थास धरून असणें ] ६३. याप्रमाणें सावधगिरी ठेवणें त्यालाच 'दक्षता' म्हणतात व तो क्षात्रप्रकृतीच्या कर्मांमधील चौथा गुण होय. असें समज. [ **युद्धे अपलायनम्** ] आणि 'लोकोत्तर युद्धपराक्रम' हा त्याच क्षात्रप्रकृतीचा पांचवा गुण होय ६४. सूर्यकमळांची तोंडें जशीं नेहमीं सूर्याच्या सन्मुखच असतात, तसें नेहमीं शत्रूंच्या समोर असणें, शत्रूस पाठ न दाखविणें ६५. जशी गरोदर स्त्री हरप्रयत्नें-करून शेजेला [ पाठी देत नाहीं तर ] चुकविते, टाळते तसें रणांगणांत असतांना शत्रूला आपली पाठ दाखविण्याचें तो चुकवितो, टाळतो ६६. धर्मअर्थादि चार पुरुषार्थांत ज्ञानरूप 'भक्ति' ही जशी श्रेष्ठ आहे, तसा क्षात्र प्रकृतीच्या कर्मांतील सगळ्या गुणांमध्यें हा पांचवा गुण इंद्राप्रमाणें सर्वश्रेष्ठ आहे, असें समज ६७. [ **दानम्** ] आणि वृक्ष आपल्याला आलेली पानें, फुलें व फळें हीं जशीं [ याचकास ] अर्पण करण्याचें बाबतींत उदार असतो, अथवा कमळसमुदाय आपला परिमळ देण्याविषयीं जसें उदार असतात ६८. अथवा वाटेल त्याला, ज्याला जितकें हवें असेल तितकें त्यानें चांदण्याचें सुख घ्यावें, तसें दुसऱ्या याचकाच्या इच्छेप्रमाणें त्यास हवे ते देणें ६९. याला 'अमर्याद, विपुल दान' असें म्हणतात. तें क्षात्र प्रकृतीच्या कर्मांत सहावें गुणरत्न होय. [ **ईश्वरभावः** ] आणि आज्ञेचें राहाण्याचें जे एकच स्थान होणें म्हणजे सर्वजण ज्याची आज्ञा मानतात तो क्षत्रिय होय ८७०. आपल्या हस्तपादादिक अवयवांचें चांगलें पोषण केलें असतां त्याजकडून जसें आपल्या आवडीनुसार वाटेल तें काम करून घेतां येतें, त्याप्रमाणें प्रजेचें प्रेमानें-वात्सल्यभावानें पालन केलें असतां त्या प्रजेचा उपभोग राजालाहिं वाटेल तसा घेतां येतो ७१. त्यालाच 'ईश्वर भाव' [ नियामक शक्ति ] असें म्हणतात. असा जो सर्व सामर्थ्याचा आधार आहे. तो ईश्वरभाव या क्षात्रप्रकृतीच्या सर्व गुणांचा राजा, असा सातवा गुण होय ७२. तो जणुं काय सप्तर्षींच्या सात चांदण्यांनीं जसें आकाश सुशोभित दिसतें, त्याप्रमाणें जें कर्म या शौर्यादिक उत्तम अशा सात गुणांनीं विशेष सुशोभित असतें ७३. अशा प्रकारें, या सात पवित्र लोकोत्तर गुणांनीं या जगांत जें कर्म पवित्र झालेले असतें, तें क्षात्र प्रकृतीचें स्वाभाविक सहज कर्म आहे ७४. असा जो पुरुष तो क्षत्रिय, मनुष्य नव्हे, तर सत्त्वगुणरूपी सोन्याचा मेरुपर्वतच होय. म्हणून तो सप्तगुणरूपी किंवा क्षात्र-धर्मरूपी स्वर्गाला जणुं धारण करणारा आधार आहे ७५. किंवा हें कर्म नव्हे तर सप्तगुणरूपी समुद्रांनीं चांगली वेष्टिलेली ही क्षात्रप्रकृतिरूप पृथ्वी होय व तो ती भोगीत आहे ७६. अथवा सप्तगुणरूपी ओघांनीं युक्त, वाहणारी क्षात्रक्रियारूपी गंगा ही या जगीं क्षात्रप्रकृति धारण करणाऱ्या ह्या महोदधीला आश्रय करून, मिळून जशी शोभत आहे ७७. या सर्व गोष्टींचे फार वर्णन राहूं दे. क्षात्रप्रकृतीच्या जातीला शौर्यादि गुणात्मक कर्में हीं स्वाभाविक आहेत ७८. आतां हे महामते! वैश्य जातीला जें योग्य कर्म आहे तें तुला यथार्थ, खात्रीनें सांगतों, ऐक ७९.

**अन्वयार्थ-कृषि गोरक्ष्य वाणिज्यं**-शेत नांगरणें-पशूंचें पालन करणें व देवघेव वगैरे व्यापार करणें, हें-**स्वभावजं वैश्य कर्म**-वैश्याचे स्वभावप्राप्त कर्म आहे-**परिचर्यात्मकं कर्म**-शुश्रूषा सेवारूप-कर्म **शूद्रस्य अपि**-शूद्राचेहि-**स्वभावजं**-स्वाभाविक आहे ४४.

[ **कृषि** ] शेत, बीज, नांगर इत्यादि साहित्य, भांडवल मिळवून त्यांच्या आधारामुळें पुष्कळसा नफा मिळविणें, ८८०. किंबहुना!! कृषिकर्म-शेतकी करून जगणें अथवा! [ **गोरक्ष्य** ] गाईचे संरक्षण करून राहणें किंवा [**वाणिज्यं**] सवंग-स्वस्त वस्तु घेऊन [उचित] महाग दरानें विकणें, ८१. अर्जुना! वैश्य जातीला एवढाच कर्म समुदाय आहे तो करून निर्वाह करणें, हाच त्यांचा स्वाभाविक धर्म होय, असें समज ८२. आणि वैश्य, क्षत्रिय व

१ वाटेल तेवढें, कितीहि. २ जिंकून. ३ जिंकणें. ४ गरोदर. ५ मुख्य गुण. ६ डाहाळ्या. ७ देई ८ कमल सरोवर. ९ विपुल, मोठें. १० वेदाज्ञेस एकनिष्ठ राहाण्याचें स्थान. ११ सप्तऋषींनीं. १२ वेष्टिलेली. १३ शोभतें. १४ स्वभाविक. १५ यथार्थ. १६ शेतकीवर निर्वाह करणें. १७ स्वस्त दरानें घेतलेली वस्तु. १८ महाग.

ब्राह्मण । हे द्विजन्मे तिन्ही वर्ण । ययांचें जें शुश्रूषण । तें शूद्रकर्म ॥ ८३ ॥ पैं द्विजसेवेपरौतें । धांवणें नाहीं शूद्रातें । एवं चतुर्वर्णांचितें । दाविलीं कर्में ॥ ८४ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः । स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**

आतां इयेचि विचक्षणां । वेगळालिया वर्णां । उचित जैसें करणां । शब्दादिक ॥ ८५ ॥ नातरी जळदच्युता । पाणिया उचित सरितां । सरितेसी पंडुसुता । सिंधु उचितु ॥ ८६ ॥ तैसें वर्णाश्रमवशें । जें करणीय आलें असे । गोरेया आंगा जैसें । गोरेपण ॥ ८७ ॥ तया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा । प्रवर्तावयालागीं प्रमा । अढळ कीजे ॥ ८८ ॥ पैं आपुलेंचि रत्न थितें । घेपे पारखियाचेनि हातें । तैसें स्वकर्म आपैतें । शास्त्रें करावीं ॥ ८९ ॥ जैसी दिठी असे आपुलिया ठायीं । परी दीपेंवीण भोग नाहीं । मार्गु न लाहतां काई । पाय असतां होय ? ॥ ८९० ॥ म्हणौनि ज्ञातिवशें साचारु । सहज असे जो अधिकारु । तो आपुलिया शास्त्रें गोचरु । आपण कीजे ॥ ९१ ॥ मग घरींचाचि ठेवा । जेवीं डोळयां दावी दिवा । तरी घेतां काय पांडवा । आडळु असे ? ॥ ९२ ॥ तैसें स्वभावें भागा आलें । वरी शास्त्रें खरें केलें । तें विहित जो आपुलें आचरे गा ॥ ९३ ॥ परी आळसु सांडुनी । फळकाम दवडुनी । आंगें जीवें मांडुनी । तेथेंचि भरु ॥ ९४ ॥ वोघीं पडिलें पाणी । नेणें आनानी वाहणी । तैसा जाय आचरणीं । व्यवस्थौनी ॥ ९५ ॥ अर्जुना जो यापरी । तें विहित कर्म स्वयें करी । तो मोक्षाच्या ऐलद्वारीं । पैठा होय ॥ ९६ ॥ जें अकरणा आणि निषिद्धा । न वचेचि कांहीं संबंधा । म्हणौनि भवा विरुद्धा । मुकला तो ॥ ९७ ॥ आणि काम्यकर्माकडे । न परतेचि जेथ कोडें । तेथ चंदनाचेही खोडे । न लेचि तो ॥ ९८ ॥ येर नित्य कर्म तंव । फळत्यागें वेंचिलें सर्व । म्हणौनि मोक्षाची शींव । ठाकूं लाहे ॥ ९९ ॥ ऐसेंनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं । वैराग्यमोक्षद्वारीं । उभा ठाके ॥ ९०० ॥ जें सकळ भाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रमा । नाना कर्ममार्गश्रमा । शेवटु जेथ ॥ १ ॥ मोक्षफळें दिधली वोल । जें सुकृततरूचें फूल । तयें वैराग्यीं ठेवी पाऊल । भंवरु जैसा ॥ २ ॥ पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वाधावा सांगतया अरुणाचा । उदयो त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥ ३ ॥ किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ये निधान । तें वैराग्य

ब्राह्मण हे तिन्हीं वर्ण द्विजन्मे आहेत म्हणून त्यास द्विज हें नांव आहे व यांची सेवा करणें, हेंच शूद्र वर्णाचें स्वाभाविक कर्म आहे ८३. परंतु द्विजांच्या सेवेवांचून शूद्रांना दुसरें कर्मच करणें [ शास्त्रानें सांगितलें ] नाहीं. या प्रकारेंकरून चारी वर्णांची उचित अशीं कर्मे तुला सांगितलीं ८४.

**अन्वयार्थ--स्वे स्वे कर्मणि**-वर सांगितलेल्या आपापल्या कर्मांमध्यें-**अभिरतः नरः**-अत्यंत निमग्न असलेला पुरुष-**संसिद्धि**-शरीरेंद्रियाची शुद्धि होऊन ज्ञानाची योग्यता प्राप्त होणें या उत्तम सिद्धीला-**लभते**-प्राप्त होतो. आतां-**स्वकर्मनिरतः**-आपल्या कर्मांत अत्यंत रत असलेला पुरुष-**यथा**-ज्याप्रकारें-**सिद्धि**-सिद्धीला-**विंदति**-प्राप्त होतो-**तत् शृणु**-तें ऐक ४५.

आतां चतुर अर्जुना ! ज्याप्रमाणें श्रोत्रादि इंद्रियांना शब्दादिक विषयच योग्य व उचित आहेत. त्याप्रमाणें या चार वर्णांची निरनिराळीं उचित कर्में, त्या त्या वर्णाला कशीं शोभतात तें तुला स्पष्ट करून सांगतों ८५. अथवा मेघापासून पडलेल्या उदकास योग्य स्थान म्हणजे नदीच होय आणि अर्जुना, नदीस उचित स्थान म्हणजे समुद्रच होय ८६. तसें वर्णाश्रमधर्माप्रमाणें जें आवश्यक विहित नित्यनैमित्तिक कर्तव्यकर्म ज्याच्या भागाला आलें असेल तें केलें असतां, गौर अंगास जसें गोरेपण शोभा देतें, तशीं त्या वर्णाला अत्यंत शोभा येतें ८७. हे वीरोत्तमा ! त्या स्वाभाविक विहित कर्मांचें, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें विचार करून आचरण करण्याविषयीं आपली बुद्धि-समजुत निश्चित दृढ करावी ८८. जसें मूळचें आपल्याजवळचेंच रत्न असलें; तरीपण तें रत्नपारख्याच्या हातून पारखून घ्यावें लागतें, तसें आपलें वांट्यास आलेलें स्वकर्म शास्त्राच्या आधारानें ठाम समजून घ्यावें ८९. जशी आपल्याजवळ दृष्टि असते तरीपण दिव्यावांचून तिचा [ रात्रीस ] उपयोग होत नाहीं किंवा मार्ग जर न सांपडला तर पाय असतांहि त्यांचा काय उपयोग होणार ? ८९०. म्हणून जातीप्रमाणें आपल्यास जो जो योग्य अधिकार असेल, तो आपापला अधिकार आपण आपल्या शास्त्रापासून किंवा शास्त्रज्ञापासून समजून घ्यावा ९१. मग अर्जुना ! दिवा जसा आपल्या घरांत असलेलाच ठेवा आपल्या डोळ्यास दाखवितो, तेव्हां तो घेण्याविषयीं कांहीं प्रतिबंध असतो काय ? ९२. तसें स्वभावतः आपल्या वांट्यास आलेलें व शास्त्रानें खरें निश्चित केलेलें, असें जें आपले विहित कर्म त्याचें जो आचरण करतो ९३. पण आळस सोडून व फलेच्छा टाकून मोठ्या हौसेनें, शरीरानें मनापासून, जीवभावानें कर्मारंभ करून त्याच ठिकाणीं जो आपला सर्व भर ठेवून सर्व कर्में करीत असतो ९४. पाणी ओघांत पडल्यावर जसें त्यांतून भलतीकडे जाऊन वेगवेगळा या ओघानें वाहणें जाणत नाहीं, तसें व्यवस्थित होऊन यथाशास्त्र आचरण करीत राहतो ९५. अर्जुना ! याप्रमाणें जो विहित कर्मांचें स्वतः आचरण करतो, तो पुरुष मोक्षरूप घराच्या अलिकडच्या वैराग्यरूपी दारांत प्राप्त होतो ९६. कारण, अकरण [ श्येन यागादिकांचें वेदांत विधान असलें तरीहि तो पापजनक असल्यामुळें तो 'वेदतात्पर्याचा विषय' नाहीं. म्हणून तो अकरणीय आहे किंवा विहित कर्म मुळींच न करणें, याचा आपल्याशीं संबंध येऊं दिला नाहीं ] व निषिद्ध या कर्मांचा आपल्याशीं संबंध होऊं देत नाहीं, म्हणून आत्मप्राप्तीस विरुद्ध, असा जो संसार त्याच्या भयापासून तो मुक्त होतो ९७. तसेंच काम्यकर्मांकडे जो चुकून कौतुकानेंहि पाहात किंवा वळतहि नसल्यामुळें स्वर्गादि फलभोगरूपी चंदनाचाहि खोडा पायांत घालण्यास आणिला तरी पाय अडकवून घेत नाहीं ९८. आणि दुसरें जें नित्य कर्म, त्याच्या फलाचा त्याग केल्यामुळें तेंहि तो संपवितो; त्यामुळें तो मोक्षाच्या शिवेवर प्राप्त होऊं शकला ९९. अशा युक्तीनें कर्माचें निरसन करून शुभाशुभ-पापपुण्यात्मक संसाराकडून तो टाकला जातो व मोक्षाचें द्वार जें वैराग्य तेथें येऊन उभा राहतो ९००. काय त्या वैराग्याची थोरवी सांगावी ! अरे ! जें वैराग्य सकळ भाग्याची सीमा होय व जें वैराग्य मोक्षलाभाचें ज्ञान निश्चयेंकरून देणारें आहे अथवा जें वैराग्य कर्ममार्गाचें श्रमपरिहार होण्याचें अंतिम स्थान होय १. ज्या वैराग्यानें मोक्षफल प्राप्त करून देण्याची जणुं काय जामीनच आपल्याकडे घेतली आहे किंवा जें वैराग्य सत्कर्मरूप, पुण्यरूप वृक्षाचें फूलच आहे. त्या वैराग्यरूपी फुलावर साधक पुरुष भ्रमराप्रमाणें पाऊल ठेवितो २. हे पहा ! अर्जुना ! सूर्योदयाची वार्ता सांगणारा वरधाव्याप्रमाणें जसा अरुणोदय आहे. आत्मज्ञानरूपी स्वच्छ निरभ्र दिवस उजाडत आहे अशी वरधाव्याप्रमाणें पूर्वींच सूचना देणारा वैराग्य हा जणुं अरुणोदयच होय त्या वैराग्याची त्यास प्राप्ति होते ३. फार काय

१ दोन वेळ जन्मलेले-पहिलें सर्वमान्य शौक्ल नांवाचें जन्म व दुसरें उपनयनांग सावित्री-मंत्रोपदेशानें सावित्र नांवचा जन्म हीं ज्यास आहेत ते [ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ]. २ सेवा. ३ स्पष्ट करून. ४ मेघापासून पडलेल्या. ५ नदी. ६ बुद्धि.

दिव्यांजन । जीवें ले' तो ॥ ४ ॥ ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पंडुसुता । अनुसरोनि विहिता । कर्मा यया ॥ ५ ॥ हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्यै वोलावा । आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ॥६॥ पैं आघवाचि भोगेंसीं । पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं । कीं तयाचीं नामें जैसीं । तपें तियां केलीं ॥ ७ ॥ कां बाळका एकी माये- । वांचोनि जिणें काय आहे । म्हणौनि सेविजे कीं तो होये । पाटांचा धर्मु ॥ ८ ॥ नाना पाणी म्हणौनि मासा । गंगा न सांडितां जैसा । सर्व तीर्थ सहवासा । वरपडा जाला ॥ ९ ॥ तैसें आपुलेया विहिता । उपावो असे न विसंबितां । ऐसा कीजे कीं जगन्नाथा । आभारु पडे ॥९१०॥ अगा जया जें विहित । तें ईश्वराचें मनोगत । म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ११ ॥ पैं जीवाचे कुंसीं उतरली । ते दासी कीं गोसांवीण जाली । सिसे' वेंचि तया मांविली । वेंही जेवीं ॥ १२ ॥ तैसें स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परमसेवा । येर तें गा पांडवा । वाणिज्य करणें ॥ १३ ॥

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् । स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥

म्हणौनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खूण पाळिली । जयापासूनि कां आलीं । आकारा भूतें ॥ १४ ॥ जो अविद्येचिया चिंधिया । गुंडूनि जीव बाहुलिया । खेळवीतसे तिगुणिया । अहंकाररज्जू ॥ १५ ॥ जेणें जग हें समस्त । आंत बाहेरी पूर्ण भरित । जालें आहे दीपजात । तेजें जैसें ॥ १६ ॥ तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ १७ ॥ म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजें । वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥ १८ ॥ जिये वैराग्यदशें । ईश्वराचेनि वेधवशें । हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ॥ १९ ॥ प्राणनाथाचिया आधी । विरहणीतें जिणेंही बाधी । तैसें सुखजात त्रिशुद्धी । दुःखचि लागे ॥ ९२० ॥ सम्यक्ज्ञान नुदैजतां । वेधेंचि तन्मयता । उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥ २१ ॥ म्हणौनि मोक्षलाभा- लागीं । जो व्रतें वाहातसे आंगीं । तेणें स्वधर्मु आस्था चांगी । अनुष्ठावा ॥२२॥

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥

अगा आपुला हा स्वधर्मु । आचरणीं जरी विषमु । तरी पाहावा तो

सांगावें ! ! आत्मज्ञानरूप हेंच कोणी एक निधान व तें ज्या वैराग्यरूपी दिव्यांजनानें हातास येतें, तें वैराग्यरूपी दिव्यांजन जो जीवेंभावेंकरून आपल्या बुद्धिरूप डोळ्यांत धारण करितो ४. अर्जुना ! अशा प्रकारें या विहित कर्माला अनुसरून आचरण केलें असतां, त्याला मोक्षप्राप्तीची योग्यता प्राप्त होते ५. हे पांडवा ! हे विहित कर्म म्हणजे आपल्या कल्याणाचा अद्वितीय जिव्हाळा—एकमेव जीवनच होय आणि त्या विहित कर्माचें आचरण करणें म्हणजे मी जो सर्वात्मक ईश्वर त्या माझीहि परमश्रेष्ठ सेवा होय ६. संपूर्ण भोगासह पतिव्रता स्त्री आपल्या प्रिय पतिबरोबर क्रीडा करिते [ ती क्रीडा करणें याचाच अर्थ ] त्याचेंच नांव तिनें सर्व तपें आचरिलीं, असें आहे ७. किंवा बाळाला जगण्याला एका आईवांचून दुसरें काय साधन आहे ? तर कांहींच नाहीं, म्हणून तिचाच अनन्य होऊन आश्रय करावा हा त्या बालकाचा परमश्रेष्ठ धर्म आहे. [ त्यांत त्याचें कल्याण होतें, त्याप्रमाणें स्वधर्माचें आचरण करणें हा मुख्य धर्म होय ] ८. अथवा केवळ पाणी [ आपलें जीवन म्हणून ] समजून गंगेस न सोडतां मासा राहिला तर तो मासा तेथें राहिल्यानें जसा सर्व तीर्थांच्या सहवासाला [ समुद्राला ] सहज प्राप्त होतो ९. तसें सर्वलाभाच्या प्राप्तीला आपल्या विहित कर्माचें आचरणास न विसरणें, हा उपाय आहे त्यावांचून दुसरा उपायच नाहीं व त्याचेहि निश्चयानें न विसरतां आचरण असें करावें कीं, जें केलें असतां जगन्नाथ जो ईश्वर त्यावरहि आपलें ओझेंच पडेल ११०. अरे ! खरा विचार केला तर ज्याला जें विहित—उचित कर्म नेमलेलें, सांगितलेलें आहे, तेंच त्यानें करावें. हेंच ईश्वराचें मनोगत आहे. म्हणूनच तें विहित कर्म केलें असतां निःसंशय तो ईश्वर प्राप्त होतो. ११. पूर्वीची एखादी दासी असूनहि जर एखाद्या राजाच्या मनोगताच्या कसोटीस उतरली, तर प्रथमची दासी; पण तीच पुढें सर्वांची स्वामिणी—मालकीण होते; किंवा स्वामीकार्यार्थ जो आपलें शिर खर्च करणारा त्याला स्वामी जसा इनामपत्र करून देऊन त्याचा आपले दप्तरीं दाखला ठेवितो १२. तसें स्वामीच्या मनोभावाप्रमाणें वागण्यास न चुकणें, हीच त्याची परम सेवा होय व यावांचून जें दुसरें कांहीं कृत्य करणें, तें अर्जुना ! वाणिज्य कर्माप्रमाणें निव्वळ व्यापार आहे १३.

१ घाली. २ एकच. ३ जिव्हाळा. ४ ईश्वराची. ५ पतीशीं. ६ त्याचेंच नांवें. ७ श्रेष्ठत्वाचा. ८ प्राप्त.



**अन्वयार्थ**——**यतः**—ज्याच्यापासून—**भूतानां**—भूतांची—प्राण्यांची—**प्रवृत्तिः**—उत्पत्ति किंवा चेष्टा होते—**येन**—ज्यानें—**इदं सर्व**—हे सर्व—**ततं**—व्यापलें आहे—**तं**—त्याला—**स्वकर्मणा**—आपल्या कर्मानें—**अभ्यर्च्य**—पुजून—**मानवः**—मनुष्य—**सिद्धि**—सिद्धीला—**विंदति**—प्राप्त होतो ४६.

म्हणून विहित कर्म केलें म्हणजे तें कर्म केलें असें नव्हे, तर ज्या परमात्म्यापासून ही सर्व भूतें उत्पन्न झाली आहेत, त्यांचें मनोगतच [ आज्ञाच ] आपण पाळिलें असे होतें ! १४. तो परमात्मा अज्ञानरूपी चिंध्या गुंडाळून जीवरूपी बाहुल्या तयार करितो, आणि सत्त्व, रज व तम अशा तीन पदरी अहंकाररूपी दोरीनें त्यांना खेळवित आहे १५. दिवा जसा एकमेव तेजानें अंतर्बाह्य भरलेला असतो तसें त्या परमात्म्यानेंच हें सर्व जग अंतर्बाह्य ओतप्रोत भरलेलें आहे १६. वीरा अर्जुना ! त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी पुष्पांनीं पूजा केली असतां, ती पूजा त्याला अपार—परमसंतोषाला कारणीभूत होते १७. म्हणून त्या पूजेच्या योगानें संतुष्ट—प्रसन्न झालेल्या आत्मराजाकडून त्या भक्ताला "वैराग्य सिद्धि" हाच खरोखर प्रसाद दिला जातो १८. जी वैराग्यदशा प्राप्त झाली म्हणजे त्या अवस्थेत ईश्वराचा छंद—वेध लागल्यामुळें हें सर्वहि [ संसार, स्वर्गादि विषय ] वमनप्राय, आवडेनासें होते १९. ज्याप्रमाणें आपल्या प्रिय पतीच्या वियोगानें विरहिणी स्त्रीस लागणाऱ्या ध्यासामुळें जिवंत राहणें देखील नकोसें, त्रासदायक होतें, त्याप्रमाणें संसारांतील जीं कांहीं सर्व सुखें आहेत तीं त्याला खरोखर दुःखवत् भासूं लागतात १२०. ईश्वराचें यथार्थ अपरोक्ष ज्ञान उदय न होतां त्याचे पूर्वीं ज्या ईश्वराच्या ध्यासानेंच तन्मयता प्राप्त होते, अशी बोधाची योग्यता त्याला लाभते २१. यास्तव ज्याच्या मनांत मोक्ष प्राप्त व्हावा, अशी इच्छा असेल व त्या करितां अंगानें व्रताचरण करीत असेल, त्यानें स्वधर्माचें परम आस्थेनें आचरण करावें २२.

**अन्वयार्थ**——**स्वनुष्ठितात् परधर्मात्**—उत्तम प्रकारें अनुष्ठिलेल्या परधर्माहून — **विगुणः स्वधर्मः**—गुणहीन स्वधर्म—**श्रेयान्**—अधिक श्रेयस्कर आहे—**स्वभावनियतं कर्म कुर्वन्**—स्वभावानें नियत केलेलें कर्म करणारा—**किल्बिषं**—पापाला—**न आप्नोति**—प्राप्त होत नाहीं ४७.

अरे ! आपला हा स्वधर्म जरी आचरण करण्यास कठीण असला तरी त्यापासून परिणामीं जें मोक्षरूपी मोठे फल प्राप्त

९ मार. १० कसोटीस. ११ धनीण. १२ शिर, डोके. १३ साधली, लावली. १४ इनाम पत्र.

परिणामु । फळेल जेणें ॥ २३ ॥ जैं सुखालागीं आपणपयां । निंबचि आथी धनंजया । तैं कडुवटपणा तयाचिया । उबगिजेना ॥ २४ ॥ फळणया ऐलीकडे । केळीतें पाहातां आस मोडे । ऐसी त्यजिली तरी जोडे । तैसें कें गोमटें ॥ २५ ॥ तेवीं स्वधर्मु सांकडु । देखोनि केला जरी कडु । तरी मोक्षसुखवाडु । अंतरला कीं ॥ २६ ॥ आणि आपुली माये । कुब्जे जरी आहे । तरी जीये तें नोहे । स्नेह कुन्हें कीं ॥ २७ ॥ येरी जिया पराविया । रंभेहूनि बरविया । तिया काय कराविया । बाळकें तेणें ? ॥ २८ ॥ अगा पाणियाहूनि बहुवें । तुपीं गुण कीर आहे । परी मीना काय होये । असणें तेथ ॥ २९ ॥ पैं आघविया जगा जें विख । तें विख कीडियाचें पीयूख । आणि जगा गुळ तें देख । मरण तया ॥ १३० ॥ म्हणौनि जे विहित जया जेणें । फिटे संसाराचें धरणें । क्रिया कठोर तऱ्ही तेणें । तेचि करावी ॥ ३१ ॥ येरा पराचारा बरविया । ऐसें होईल टेंकलेया । पायांचें चालणें डोइया । केलें जैसें ॥ ३२ ॥ यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥ ३३ ॥ आणि स्वधर्मुचि पाळावा । परधर्मु तो गाळावा । हा नेमुही पांडवा । न कीजेचि पैं गा ? ॥ ३४ ॥ तरी आत्मा दृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां ठाये ? । आणि करणें तेथ आहे । आयासु आधीं ॥ ३५ ॥

सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् । सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

म्हणौनि भलतिये कर्मीं । आयासु जऱ्ही उपक्रमीं । तरी काय स्वधर्मीं । दोषु सांगें ? ॥ ३६ ॥ आगा उजू वाटा चालावें । तऱ्ही पायचि शिणवावे । ना आडरानें धांवावें । तऱ्ही तेंचि । ॥ ३७ ॥ पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया । परी जें वाहतां विसांवया । मिळिजे तें घेपे ॥ ३८ ॥ एऱ्हवीं कणा आणि भूसा । कांडितांही सोसु सरिसा । जेंचि रंधन श्वान मांसा । तेंचि हवी ॥ ३९ ॥ दधी जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा । वाळुवे तिळा घाणा । गाळणें एक ॥ १४० ॥ पैं नित्य होम देयावया । कां सैरा आगी सुवावया । फुंकितां धू धनंजया । साहणें तेंचि ॥ ४१ ॥ परी धर्मपत्नी धांगडी । पोसितां जरी एकी वोढी । तरी कां अपरवडी । आणावी आंगा ? ॥ ४२ ॥ हां गा पाठीं लागला घाई । मरण न चुकेचि पाहीं । तरी समोरला काई । आगळें न कीजे ? ॥ ४३ ॥ कुलस्त्री दांड्याचे घाये । परघर रिगालीही जरी साहे । तरी स्वपतीतें वायें । सांडिलें कीं ॥ ४४ ॥ तैसें आवडतेंही करणें । न निपजे शिणल्याविणें । तरी विहित बा रे कोणें । बोलें भारी ? ॥ ४५ ॥ वरी थोडेंचि अमृत घेतां । सर्वस्व वेंचो कां पंडुसुता ।

होणार त्या परिणामावर लक्ष ठेविलें पाहिजे २३. हे धनंजया ! कडुलिंबाचें सेवन केलें असतां जर आपल्याला तो निंबच सुखकर होत असेल, तर त्याच्या कडुपणास कंटाळूं नये २४. केळ विण्याचे पूर्वी तिच्या झाडाकडे पाहिले तर आशा भंग [ निराशा ] होतो आणि तशा स्थितींतच जर तीं झाडें तोडून, उपटून टाकिली, तर तिजपासून उत्तम, चांगली फळें कोठून प्राप्त होणार ? २५. त्याप्रमाणें स्वधर्म आचरण्यास कठीण आहे असें पाहून तो कडू केला म्ह० त्याचा त्याग केला तर तो मोक्षसुखाला अंतरलाच नाहीं कां ! २६. आणि समज आपली आई जरी कुरूप, कुबडी असली तरी ज्या तिच्या प्रेमामुळें आपण जगतों, तें तिचें प्रेम कांहीं खरोखर वांकडे नाहीं २७. एऱ्हवीं इतर दुसऱ्या स्त्रिया जरी रंभेहूनहि सुस्वरूप अशा असल्या तरी त्या बालकाला त्या घेऊन काय करावयाच्या आहेत ? २८. अरे ! पाण्यापेक्षां तुपांत पुष्कळ गुण आहेत, हें अगदीं खरें; पण त्या तुपांत माशाला ठेवून काय उपयोग ? तो जगेल तरी कां ? २९. हें पहा ! जें [ बचनाग ] सर्व जगाला विष आहे, तेंच विष त्यांतील किड्याला अमृत-जीवन आहे; आणि गूळ जो साऱ्या जगाला गोड आहे, तोच त्या किड्यांना मृत्यु-मारक आहे ! ९३०. म्हणून शास्त्रानें ज्याला जें विहित कर्म सांगितलें आहे व ज्याच्या आचरणानें संसाराचें धरणें फिटतें-बंधन तुटतें, ते विहित कर्माचरण कितीहि कष्टसाध्य असलें तरी त्यानें तेंच विहित कर्माचरण करावें ३१. आपल्या विहित कर्मावांचून इतर दुसऱ्याचा धर्म उत्तम म्हणून जर त्याचें आचरण केलें तर, पायानें चालण्याचे काम डोक्यानें करावें त्याप्रमाणें होईल [ उलट तें दुःखाला मात्र कारण होईल ] ३२. याकरितां आपल्या जातिस्वभावानुसार आपल्या वाट्यांस आलेले जें कर्म आपले आहे त्याचें जो आचरण करतो, त्यानेंच कर्मबंधाला जिंकलें; असें समज ३३. आणि म्हणूनच अर्जुना ! परधर्माचा त्याग करावा व स्वधर्माचेंच आचरण करावें असा नियम नको का करावयाला ? ३४. जर असा नियम न केला तर आत्मा जोपर्यंत यथार्थ अनुभूतिदृष्ट्या, दृष्ट झाला नाहीं तोपर्यंत कर्म करण्याचें राहिल काय ? तर नाहीं, म्हणून तें स्वकर्म अवश्य केलेंच पाहिजे आणि कोणतेहि कर्म करणें म्हटलें तरी त्यांत आरंभीं सायास-कष्ट हें आहेतच ३५.

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा अर्जुना !—**सहजं कर्म**—जन्मतःच प्राप्त झालेलें कर्म—**सदोषम् अपि**—सदोष जरी असलें, तरी—**न त्यजेत्**—टाकूं नये—**हि**—कारण—**सर्वारंभाः**—सर्व कर्मे—**धूमेन अग्निः इव**—धुरानें जसा अग्नि, तशीं—**दोषेण**—दोषानें—**आवृताः**—आच्छादित असतात ४८.

याचकरितां, कोणतेंहि कर्म केलें तरी त्यांत जर प्रारंभीं आयास आहेतच तर मग स्वधर्माचें आचरणांत काय दोष आहे ? स्वधर्माचरणानें दोष कां लागेल ? सांग बरें ! ३६. अरे ! सरळ वाटेनें चालावयाचें झालें, तरी पायच शीणवावे लागतात आणि आडरानांत धांवत भटकावयाचें झालें, तरी तेथेंहि तीच स्थिति [ पायच शिणवावे लागतात ] ३७. अर्जुना ! दुसरें असें कीं, प्रवासास जातांना पदरांत शिळा किंवा शिदोरी [फराळाचें] हीं दोन्हीं जरी बांधली तरी ओझ्याचा भार सारखाच होतो; परंतु जें ओझें वाहिल्यानें विसाव्याचें-मुक्कामाचें ठिकाणीं सुखकर होईल, तेंच ओझें घ्यावे, हें बरें ! ३८. सहज विचार करून पाहिलें तर धान्य कांडणें आणि भूस कांडणें त्यांत कांडतांना श्रम सारखेंच पडतात; अथवा श्वानाचे मांस शिजविण्याकरितां जितके श्रम होतात, तितकेंच श्रम होमाकरितां पुरोडाशादि आहुती-साठीं शिजविण्याचे अन्नासहि [ सारखेंच ] आहेत, ३९. हे विचक्षणा ! दह्याच्या किंवा पाण्याच्या घुसळण्याला लागणारे श्रम सारखेंच आहेत, अथवा वाळू किंवा तीळ घाण्यांत गाळण्याचे श्रमहि सारखेच आहेत ९४०. हें बघ अर्जुना ! नित्य होम करण्याकरितां किंवा आग लावण्या-करितां विस्तव फुंकून पेटविण्याचे वेळीं धूर हा दोषासहि सोसावा लागणें हे सारखेंच आहे ४१. अथवा लग्नाची बायको किंवा एखादी ठेवलेली स्त्री या दोघींनाहि पोषण करण्यांत जर सारखाच खर्च लागतो, तर मग एखादी स्त्री जवळ ठेवून अपकीर्तीचा डाग कां लावून घ्यावा ? ४२. अरे ! क्षत्रियास पाठीकडच्या बाजूला लागलेल्या घावामुळें जर मरण चुकत नाहीं, तर शत्रूसमोर उभे राहून युद्ध करून पराक्रम कां करूं नये ? ४३. कुलस्त्री दुसऱ्याच्या घरांत शिरूनहि जर ती दांडक्याचे तडाखे सहन करीत असेल तर तिनें आपल्या [ लग्नाच्या ] पतीला व्यर्थ सोडलें, असें नाहीं कां होत ? ४४. त्याप्रमाणें पाहिजे ते कर्म केलें तरीहि तें श्रमल्याविना [ दुःख सोसल्याविना ] उत्पन्न होत नाहीं; तर बापा ! विहित स्वधर्माचरण करणें कठीण आहे, असें कोणत्या तोंडानें [ शब्दानें ] म्हणतां येईल ? ४५. हे पंडुसुता ! ज्याच्या सेवनानें जीवीतास अमरत्व प्राप्त होते, असें जें 'अमृत' तें अल्प, अगदीं थोडेच प्राप्त

१ त्रासूं नये, कंटाळू नये. २ विण्याचे पूर्वी. ३ आशा. ४ उत्तम फळ. ५ सुख. ६ कुरूप. ७ ज्याच्या योगानें वांचावें.

जेणें जोडे जीविता। अक्षयत्व॥ ४६॥ येर काह्यां मोलें वेंचूनि। विष पियावे घेऊनि। आत्महत्येसि निमोनि। जायिजे जेणें ॥ ४७ ॥ तैसें जाचूनियां इंद्रियें । वेचूनि आयुष्याचेनि दिये। सांचलें पापीं आन आहे। दुःखावांचूनि?॥ ४८ ॥ म्हणौनि करावा स्वधर्मु। जो करितां हिरोनि घे श्रमु। उचित देईल परमु। पुरुषार्थराजु ॥ ४९॥ याकारणें किरीटी । स्वधर्माचिये राहाटी। न विसंबिजे संकटीं। सिद्धमंत्र जैसा ॥ १५० ॥ कां नाव जैसी उदधीं। महारोगी दिव्यौषधी। न विसंबिजे तया बुद्धी। स्वकर्म येथ ॥ ५१ ॥ मग ययाचि गा कपिध्वजा। स्वकर्माचिया महापूजा। तोषला ईशु तमरजा। झाडा करुनी ॥५२॥ शुद्धसत्त्वाचिया वाटा। आणी आपुली उत्कंठा। भव स्वर्ग काळकूटा। ऐसें दावी ॥ ५३ ॥ जियें वैराग्य येणें बोलें। मागां संसिद्धी रूप केलें। किंबहुना तें आपुलें। मेळवी खागें॥ ५४॥ मग जिंतिलिया हे भोये। पुरुष सर्वत्र जैसा होये। कां जालाही जें लाहे। तें आतां सांगों॥ ५५॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

तरी देहादिक हें संसारें। सर्वही मांडलेंसे जें गुफिरें। तेथ नातुडे तो वागुरें। वारा जैसा ॥ ५६ ॥ पैं परिपाकाचिये वेळे। फळ देठें ना देठु फळें। न धरे तैसें स्नेह खुळें। सर्वत्र होय॥ ५७॥ पुत्र वित्त कलत्र। हें जालियाही स्वतंत्र। माझें न म्हणे पात्र। विषाचें जैसें॥ ५८ ॥ हें असो विषयजाती। बुद्धि पोळली ऐसी माघौती। पाउलें घेऊनि एकांतीं। हृदयाच्या रिगे ॥ ५९ ॥ ऐसया अंतःकरण। बाह्य येतां तयाची आण। न मोडी समर्था भेण। दासी जैसी॥ १६०॥ तैसें ऐक्याचिये मुठी-। माजिवडें चित्त किरीटी। करूनि वेधीं नेहटी। आत्मयाच्या॥ ६१॥ तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे। निमणें जालेंचि आहे। आगी दडपलिया धुयें। राहिजे जैसें ॥ ६२ ॥ म्हणौनि नियमिलिया मानसीं। स्पृहा नासौनि जाय आपैसीं। किंबहुना तो ऐसी। भूमिका पावे ॥ ६३ ॥ पैं अन्यथा बोधु आघवा। मावळोनि तया पांडवा। बोधमात्रींचि जीवा। ठावो होय ॥ ६४ ॥ धरवणी वेंचें सरे। तैसें भोगें प्राचीन पुरे। नवें तंव नुपकरे। कांहींचि करूं ॥ ६५ ॥ ऐसीं कर्मे साम्यदशा। होय तेथ वीरेशा। मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा॥ ६६ ॥ रात्रीची चौपाहरी। वेंचलिया अवधारीं। डोळयां तमारी। मिळे जैसा ॥६७॥ कां येऊनि फळाचा घडु।

करून घेण्यासाठीं सर्वस्व खर्च झालें तरी, तें होईना कां ? ४६. आणि जें प्यालें [ सेवन केलें ] असतां [ सर्व सुखाचा नाश होऊन ] आत्महत्या करून मरून जावें लागतें, तें विष मुद्दाम द्रव्य खर्च करून विकत घेऊन कशाला प्यावें ? ४७. त्याप्रमाणें इंद्रियांना शीण देऊन व आयुष्याचे दिवस खर्च करून निषिद्ध कर्माचरणानें पापाचा संचय केला असतां त्यास दुःखावांचून दुसरें फल आहे काय ? ४८. म्हणून ज्या स्वधर्मांचेंच आचरण केलें असतां तो आपल्या श्रमांचा परिहार करून, उचित आणि परमपुरुषार्थरूप सर्वश्रेष्ठ असा जो मोक्ष त्याची जो प्राप्ति करून देईल त्या स्वधर्माचें आचरण करावें ४९. याकरितां, ज्याप्रमाणें संकटसमयीं सिद्धमंत्रास विसरूं नये, त्याप्रमाणें स्वधर्माचें आचरणालाहि विसरूं नये ९५०. अथवा समुद्रांत पडलेल्यानें नावेला विसरूं नये किंवा महारोग्यानें दिव्यौषधीला विसरूं–त्यागूं नये, त्याच विचारानें या जागीं स्वकर्माचें आचरण करण्यास विसरूंच नये ५१. मग हे कपिध्वजा ! याच विहितसत्कर्मरूप स्वकर्माच्या महापूजेनें संतुष्ट झालेला ईश्वर [ चित्तांतील ] तम व रज या गुणांचा नाश करून ५२. आपली [ स्वकर्माचरण करणाराची ] उत्कंठा शुद्ध सत्त्वगुणाच्या मार्गाला आणितो आणि संसार व स्वर्ग हे काळकूट विषाप्रमाणें आहेत, असें वाटावयास लावितो. नंतर ५३. किंबहुना ! ! पूर्वीं [ श्लोक ४९ ] यांतील 'संसिद्धि' या पदाचें वैराग्यरूपानें जें वर्णन केलें, तें आपलें वैराग्यरूपस्थान ईश्वर प्रसादानें तो मिळवितो ५४. मग ही वैराग्यभिमूका जिंकल्यावर तो साधक [ जी त्याची योग्यता होते ]सर्वत्र जसा होतो व तसा झाला म्हणजे त्यास अर्थात् पूर्णत्वास पावलेल्या त्या पुरुषाला जे लाभते–प्राप्त होते तें आतां सांगतो ५५.

**अन्वयार्थ**—**सर्वत्र**–पुत्र, स्त्री, धन इत्यादि सर्वांमध्यें–**असक्तबुद्धिः**–ज्याचें अन्तःकरण आसक्त झालेलें नसतें–**जितात्मा**–ज्यानें आपल्या अंतःकरणाला जिंकिलें आहे–**विगतस्पृहः**–ज्याची देह, जीवित, भोग या विषयींचीहि स्पृहा नाहींशी झालेली आहे असा आत्मज्ञ–**संन्यासेन**–यथार्थ–दर्शनरूप संन्यासानें किंवा ज्ञानपूर्वक सर्वकर्म-संन्यासानें–**परमां नैष्कर्म्यसिद्धिं**–सर्वोत्कृष्ट निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थारूप सिद्धीला – **अधिगच्छति** – प्राप्त होतो ४९.

अरे ! वारा जसा पारध्याच्या जाळ्यांत इकडून तिकडे जातांना अडकत नाहीं, तसा तो साधक देह आदिकरून पसरलेला जो संसाररूपी पाश त्यांत तो असूनहि सांपडत नाहीं ५६. हें पहा, जसें पिकण्याचें वेळीं फळ देंठास धरीत नाहीं, किंवा देंठहि त्या फळास धरीत नाहीं. तसें संसारादिकांवरील सर्व स्नेह–ममता निर्जीव होतें [ ममता ढिली पडतें ] ५७. ज्याप्रमाणें जें विषाचें पात्र आहे, त्याला 'हे माझें आहे' असें कोणी म्हणत नाहीं, त्याप्रमाणें पुत्र, वित्त व स्त्री ही जरी आपल्या इच्छेप्रमाणें, आपल्या आज्ञेंत वागत असलीं तरी तीं विषाप्रमाणें माझा नाश करणारी आहेत असें समजून 'माझी आहेत' असें म्हणत नाहीं ५८. हे असूं दे. जसा कढत पदार्थाच्या योगें हाताला चटका बसतांच मनुष्य हात एकदम मागें घेतो, तशी त्याची बुद्धि सर्व विषयांपासून एकदम मागें परतून–अंतर्मुख होऊन हृदयाच्या एकांतांत प्रवेश करते. [ आत्मविचाराकडे लागते ] ५९. ज्याप्रमाणें राजानें दासीस शपथ घातली असतां ती स्वामीच्या भीतीनें त्याची ती शपथ–आज्ञा मोडीत नाहीं त्याप्रमाणें या साधकानें अंतःकरणास शपथ घातली आहे कीं, 'तूं बाह्य विषयाकडे जाऊं नकोस, तुला माझी शपथ आहे ?' त्या शपथेस भिऊन तें अंतःकरण विषयाकडे बाहेर येऊन त्या साधकाची शपथ मोडीत नाहीं ९६०. तसें अर्जुना ! ऐक्याच्या मुठीमध्यें चित्त धरून [ चित्त एकाग्र–स्थिर करून ] त्याला आत्म्याच्या छंदास प्रयत्नानें लावतो ६१. त्या वेळेस, जसा अग्नि राखेंत पुरला–दडपून ठेवला असतां म्हणजे धूर आपोआप राहतो, तशी इहपर अनुकूल विषयांची जी इच्छा ती सहजच नष्ट होते ६२. म्हणून निग्रहपूर्वक अन्तर्मुख झालेल्या मनांतून इच्छाहि आपोआपच नाहींशी होतें, फार काय सांगावें ! ! अशा उपर्युक्त भूमिकेला तो साधक प्राप्त होतो ६३. हें बघ अर्जुना ! देहादि प्रपंच सत्य असल्याचा विपरीत बोध सगळा मावळून त्याचे अंतःकरणांत खरा आत्मबोधाचा निश्चय दृढ होतो ६४. जसें सांचविलेलें पाणी रोज खर्च केलें म्हणजे तें संपतें, तसें प्रारब्ध-कर्म हें भोगांतीं सरतें आणि अहंकर्तृत्वभावना, रागद्वेष-मूलकता नसल्यामुळें नवीन क्रियमाण कांहींच करण्यास उपयोगी पडत नाहीं [ कर्तृत्वबुद्धि नसल्यामुळें त्या कर्माचा असंश्लेष–असंबंध होतो ] ६५. अर्जुना ! अशा प्रकारें कर्मांची साम्यअवस्था प्राप्त होते तेव्हां मग श्रीगुरु आपण होऊन सहजच खात्रीनें भेट देतातच ६६. हें पहा ! रात्रीचे चार प्रहर संपले म्हणजे मग अंधकाराचा नाश करणारा जो सूर्य तो दृष्टीस पडतच असतो ६७. अथवा, फळाचा वढ येऊन तो ज्याप्रमाणें केळीची वाढ खुंटवितो त्याप्रमाणें

पारुषवी केळीची वाढु । श्रीगुरु भेटोनि करी पाडु । बुभुत्सु तैसा ।। ६८ ।। मग आलिंगिला पूर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा । तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ।। ६९ ।। तेंव्हां अबोधुमात्र असे । तो तंव तया कृपा नासे । तेथ निशी- सवें जैसें । आंधारें जाय ।। १७० ।। तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ।। ७१ ।। तैसेंचि अबोधनाशा- सवें । नाशे क्रियाजात आघवें । ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ।। ७२ ।। येणें मूळाज्ञानसंन्यासें । दृश्याचा जेथ ठावो पुसे । तेथ बुझावें तें आपैसें । तोचि आहे ।। ७३ ।। चेइलियावरी पाहीं । स्वप्नींचिया तिये डोहीं । आपणयातें काई । काढूं जाइजे ? ।। ७४ ।। तें मी नेणें आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न । जाला ज्ञातृज्ञेयाविहीन । चिदाकाश ।। ७५ ।। मुखाभासेंसीं आरिसा । परौता नेलिया वीरेशा । पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता ठाके ।। ७६ ।। तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें । मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रचि ।। ७७ ।। तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया । म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ।। ७८ ।। तें आपुलें आपणपें । असे तोंचि होऊनि हारपे । तरंगु कां वायुलोपें । समुद्रु जैसा ।। ७९ ।। तैसें न होणें निफजे । ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे । सर्वसिद्धींत सहजें । परम हेचि ।। १८० ।। देउळाचिया कामा कळसु । परम गंगेसी सिंधु प्रवेशु । कां सुवर्ण- शुद्धी कसु । सोळावा जैसा ।। ८१ ।। तैसें आपुलें नेणणें । फेडिजे का जाणणें । तेंही गिळूनि असणें । ऐसी जे दशा ।। ८२ तियेपरतें कांहीं । निपजणें आन नाहीं । म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ।। ८३ ।।

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे । समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ।। ५० ।।

परी हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि । श्रीगुरुकृपालब्धि- । काळीं पावे ।। ८४ ।। उदयतांचि दिनकरु । प्रकाशुचि आते आंधारु । कां दीपसंगें कापुरु । दीपुचि होय ।। ८५ ।। तया लवणाची कणिका । मिळतखेंवो उदका । उदकचि होऊनि देखा । ठाके जेवीं ।। ८६ ।। कां निद्रितु चेवविलिया । स्वप्नेंसि नीद वायां । जाऊनि आपणपयां । मिळे जैसा ।। ८७ ।। तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्यश्रवणाचि सवें । द्वैत गिळोनि विसंवे । आपणया

श्रीगुरु हे जिज्ञासूला भेटून तसाच प्रकार करतात [जिज्ञासूची भ्रांति निवृत्त करून कर्मकर्तृत्वच बंद करतात] ६८. मग पौर्णिमेनें आलिंगिलेला चंद्र ज्याप्रमाणें आपल्या स्वरूपावरील कलेचा कमीपणा मुळींच राहूं देत नाहीं, त्याप्रमाणें हें श्रेष्ठ वीरा! श्रीगुरुकृपा झाली म्हणजे त्यामुळें जिज्ञासूला कोणतीहि उणीव न राहतां पूर्णत्वच लाभते ६९. त्यावेळीं अज्ञान म्हणून जेवढें असतें, तेवढें सर्व त्यांच्या कृपेनेंच नष्ट होतें, आणि रात्रीं बरोबरच जसा अंधार नाहींसा होतो ९७०. त्याप्रमाणें अज्ञानाचा नाश झाला म्हणजे त्याबरोबर अज्ञानाच्याच पोटांत असणारी जीं कर्ता, कर्म आणि कार्य ही त्रिपुटी असते तीहि नाश पावते. जशी गर्भिणी मारली असतां पोटांतील गर्भास निराळें मारावें लागत नाहीं, तर तो गर्भ आपोआपच मरतो ७१. तसा अज्ञानाचा नाश झाला म्हणजे त्याबरोबरच तत् कार्यरूप सर्व कर्मांचाहि नाश होतो. अशा प्रकारें सर्व कर्मांचा समूळ-अज्ञानासहवर्तमान नाश होणें हाच 'संन्यास' म्हणजे समूळ कर्मत्याग संभवतो ७२. असा सर्व कर्मांस कारणीभूत अशा मूळ अज्ञानाच्या त्यागानें जेव्हां सर्व दृश्य पदार्थांचा ठाव ठिकाण नष्ट म्ह० बाधित होतो, तेव्हां मग जें जाणावयाचें तें [अधिष्ठान आत्मतत्त्व] तो आपण स्वतःच असतो ७३. असें पहा! मनुष्य झोंपेंतून जागा झाल्यानंतर आपण डोहांत बुडत असल्याचा जो त्याला स्वप्नांत भ्रम झाला होता, तो सत्य मानून त्या स्वप्नांतील डोहांतून आपण आपल्याला काढण्याविषयींच्या खटपटीस जाणें आवश्यक आहे काय? ७४. त्याप्रमाणें मी [आपलें आत्मस्वरूपास] जाणत नव्हतों आतां मी [आपलें यथार्थ स्वरूप] जाणेन हें त्याचें दुःस्वप्न, अनिष्ट स्वप्न सदाचेच संपलें आणि ज्ञेय व ज्ञाता अशा भेदाविना केवळ चिदाकाश म्हणजे दृङ्मात्र स्वरूपच तो होतो ७५. अर्जुना! आपल्या मुखाच्या प्रतिबिंबासहित आरसा दूर नेला असतां ज्याप्रमाणें पहाणारा हा पहातेपणाशिवाय रहात असतो ७६. त्याप्रमाणें अज्ञान जें गेलें तें एकटें न जातां त्याचे नाशक व सापेक्ष अशा यथार्थ ज्ञानालाहि घेऊन गेलें. मग केवळ निष्क्रिय असें स्वरूपभूत शुद्ध ज्ञान मात्र उर्वरित राहतें ७७. अर्जुना! या नैष्कर्म्य भूमिकेच्या ठिकाणीं म्ह. आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्वभावतः कोणतीच क्रिया नाहीं, म्हणून त्या निर्विशेष [स्वरूप] स्थितीला 'नैष्कर्म्य' असें म्हणतात ७८. जसा वायूच्या उपाधीमुळें उत्पन्न होणाऱ्या लाटा वायु वाहण्याचा थांबल्यावर आपोआप मूळच्या समुद्ररूपानें राहतात; तें आपलें मूळचें स्वरूप होऊन आपलेंच ठिकाणीं राहतो म्हणजे [तें वस्तुतः आपलें स्वरूपच असून अज्ञानामुळें तें आपलें स्वरूप नाहीं, असा भ्रम झाला होता तो गुरुकृपेनें निवृत्त होऊन आत्मबोध होतो, तोहि अज्ञानसापेक्ष असल्यामुळें अधिष्ठानरूप होतो. मग केवळ शुद्ध आत्मस्वरूपाचा असणेंपणा मात्र राहतो] ७९. त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचें कोणतेंहि कर्म न होणें अशी जी स्थिति सिद्ध होते तिलाच 'नैष्कर्म्यसिद्धि' म्हणतात आणि हीच स्वभावतः सर्व सिद्धींत मुख्य व श्रेष्ठ सिद्धि होय ९८०. देवळाच्या कामाला कळस बसणें, हीच अखेरीची मर्यादा होय अथवा गंगेस समुद्रास प्राप्त होणें, हीच शेवटची सीमा होय. पुढें तिचा प्रवाह संपतो किंवा सोनें शुद्ध करीत असतां सोळावा कस लागला म्हणजे तो सोन्याच्या शुद्धपणाचा शेवटचा कस असून सुवर्णशुद्धीची परम सीमा होते ८१. त्याप्रमाणें आपलें आत्मस्वरूपाचें अज्ञान, जें ज्ञान नाहींसें करतें तें ज्ञानहि गिळून-नाहींसे होऊन जें असणें, अशी जी नैष्कर्म्यस्थिति ती प्राप्त होते ८२. त्या नैष्कर्म्यस्थितीपेक्षां इतर दुसरें या जगीं कांहींहि प्राप्तव्य-मिळविण्याचें राहतच नाहीं, म्हणून सर्व सिद्धींत ही 'परमसिद्धि' होय असें म्हटलें जाते. ८३.

**अन्वयार्थ**--**हे कौंतेय**-हे कुंतीपुत्रा! **सिद्धि प्राप्तः**-ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होणें; एतद्रूप सिद्धीला प्राप्त झालेला पुरुष-**यथा**-ज्या प्रकारें-**ब्रह्म**-ब्रह्माला-**आप्नोति** प्राप्त होतो-**तथा**-तो प्रकार-**मे**-माझ्या तोंडून-**समासेन एव**-संक्षेपतःच-**निबोध**-निश्चयानें जाण-**या**-कीं जी-**ज्ञानस्य**-ज्ञानाची-**परा निष्ठा**-पराकाष्ठा आहे ५७.

पण जो कोणी एखादा मोठा भाग्याचा जणुं केवळ ठेवाच असतो त्याला श्रीगुरूंच्या कृपेची जेव्हां प्राप्ति होते तेव्हांच हीच 'आत्मसिद्धि' त्यास प्राप्त होते ८४. सूर्य उगवतांचक्षणीं जसा अंधकाराचा प्रकाशच होतो, किंवा दिव्याच्या संगतीनें ज्योतीस कापूर लागतांच तो दिवाच होतो ८५. अथवा हे पहा!! मिठाचा खडा पाण्यांत मिळतांच क्षणीं जसा जलरूपच होऊन राहतो ८६. किंवा निजलेल्या मनुष्यास जागें केलें असतां मिथ्या स्वप्नासह झोंप नाहींशी होऊन तो आपल्या जागृतींतील मूळस्वरूपाप्रत प्राप्त होतो ८७. तशी दैवयोगानें ज्या कोणाला श्रीगुरूंनीं केलेल्या तत्त्वमस्यादि महावाक्योपदेश श्रवणाबरोबर द्वैत--[भेद] नाहींसें-बाधित होऊन वृत्ति आपल्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं

वृत्ती ॥ ८८ ॥ तयासि[1] मग कर्म करणें । हें बोलिजैल[2]चि कवणें । आकाशा येणें जाणें । आहे काई ? ॥ ८९ ॥ म्हणौनि तयासी कांहीं । त्रिशुद्धि[3] करणें नाहीं । परी ऐसें जरी हें कांहीं । नव्हे जया ॥ ९० ॥ कानावचना[4]चिये भेटी- । सरिसाचि[5] पैं किरीटी । वस्तु[6] होऊनि उठी । कवणि एकु जो ॥ ९१ ॥ एऱ्हवीं स्वकर्मा[7]चेनि वन्ही[8] । काम्यनिषिद्धा[9]चिया इंधनीं[10] । रजतमें कीर दोन्ही । जाळिलीं आधीं ॥ ९२ ॥ पुत्र वित्त परलोकु । यया तिहींचा अभिलाखु[11] । घरीं होय पाइकु[12] । हेंही जालें ॥ ९३ ॥ इंद्रियें सैरा पदार्थी । रिगतां[13] विटाळलीं[14] होतीं । तियें प्रत्याहार[15] तीर्थी । न्हाणिलीं[16] कीर ॥ ९४ ॥ आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि सकळ । घेऊनि केलें अढळ[17] । वैराग्यपद ॥ ९५ ॥ ऐसी आत्म[18]-साक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उंजरी[19] । ते सामुग्री कीर पुरी । मेळविली ॥ ९६ ॥ आणि तेचि समयीं । सद्गुरु भेटले पाहीं । तेवींचि तिहीं कांहीं । वंचिजेना[20] ॥ ९७ ॥ परी वोखद[21] घेतखेंवो । काय लाभे आपुला ठावो[22] ? । कां उदयजतांचि दिवो[23] । मध्यान्ह[24] होय ? ॥ ९८ ॥ सुक्षेत्रीं आणि वोलटें[25] । बीजही पेरिलें गोमटें[26] । तरी आलोट[27] फळ भेटे । परी वेळे[28] कीं गा ॥ ९९ ॥ जोडला मार्गु प्रांजळु[29] । मिनला[30] सुसंगा[31]चाही मेळु । तरी पाविजे वांचूनि वेळु । लागेचि कीं ॥ १००० ॥ तैसा वैराग्यलाभु[32] जाला । वरी सद्गुरुही भेटला । जीवीं अंकुरु फुटला[33] । विवेकाचा ॥ १ ॥ तेणें ब्रह्म एक आथी[34] । येर आघवीचि भ्रांती । हेंही कीर प्रतीती[35] । गाढ[36] केली ॥ २ ॥ परी तेंचि जें परब्रह्म । सर्वात्मक[37] सर्वोत्तम । मोक्षाचेंही काम । सरे जेथ ॥ ३ ॥ यया तिन्ही[38] अवस्था पोटीं । जिरवी जें गा किरीटी । तया ज्ञानासिही मिठी[39] । दे जे वस्तु ॥ ४ ॥ ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंदकणु[40]ही विरे । कांहींचि नुरोनि उरे । जें कांहीं गा ॥ ५ ॥ तिये ब्रह्मीं ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें । तें क्रमेंचि

१ त्या पुरुषाला. २ सांगावें. ३ मुळींच. ४ शिष्याचा कान व गुरुवचन याची भेट. ५ बरोबर. ६ ब्रह्मस्वरूप. ७ स्वधर्मरूपी. ८ अग्नींत. ९ काम्य व निषिद्ध कर्मरूपी. १० काष्टांत. ११ इच्छा. १२ नोकर. १३ आचरण करून. १४ भ्रष्ट. १५ ब्राह्माकारतारूप तीर्थांत. १६ स्नानें केली. १७ निश्चित. १८ ब्रह्मापरोक्ष ज्ञान. १९ उत्कर्ष दशा. २० प्रतारणा केली जात नाहीं. २१ औषध. २२ पूर्व प्रकृति. २३ दिवस. २४ दुपार. २५ ओलसर भूमीत. २६ चांगले. २७ अत्यंत. २८ योग्यवेळीं. २९ सुलभ. ३० झाला. ३१ साधुसंगतीचा. ३२ वैराग्याचा लाभ. ३३ उदय झाला. ३४ आहे. ३५ ज्ञान. ३६ बळकट. ३७ सर्वव्यापी. ३८ तीन. ३९ आलिंगन. ४० आनंदाचा अंशहि.

स्थिर होते ८८. मग त्याला कांहीं एक कर्म करण्याचे उरतच नाहीं; उरतें असें कोणी म्हणावें ? पहा कीं, आकाश सर्वत्र व्यापक भरलेलें असल्यामुळें त्याला इकडून तिकडे जाणें व तिकडून इकडे येणें या क्रिया घडतात काय ? ८९. म्हणून ज्यास आत्मसिद्धि प्राप्त झाली आहे, त्याला खरोखरच निश्चयेंकरून कांहीं एक कर्तव्य उरत नाहीं; पण ज्या मंदप्रज्ञ अधिकाऱ्यास [ महावाक्य श्रवणाबरोबर ] ज्यास अशी वस्तुस्वरूप स्थिति प्राप्त होत नाहीं. [ श्रीगुरुवाक्यश्रवणानंतर मंदप्रज्ञ अधिकाऱ्यास जर कांहीं असंभावना–संशय विपर्ययादि ज्ञान–प्रतिबंधक दोष असतील तर त्या दोष निवारणार्थ मनन, निदिध्यासन करण्यास सांगितलें आहे ] ९९०. [ पण ज्याचा पूर्वाधिकार सिद्ध आहे, ज्यास संशय–विपर्ययादि कोणताच ज्ञानप्रतिबंधक दोष नाहीं, आपाततः श्रवणानें ज्याचें मन परोक्षज्ञान संस्कार संपन्न झालें आहे, महावाक्यांतील तत्त्वंपदाची वृत्ति अखंडैकरस परब्रह्म याच अर्थांत आहे, असें ज्ञात आहे. ] असा उत्कृष्ट अधिकारी, श्रोत्रिय–ब्रह्मनिष्ठ श्रीगुरुचरणांची शरणागति पत्करून श्रीगुरुमुखानें 'तत्त्वमस्या'दि महावाक्योपदेशाचा उच्चार झाल्याबरोबर काना वचनाची भेट होऊन, 'श्रवणाचि सर्वे', 'सरिसाचि', 'अहंब्रह्मास्मि'त्याकारक वृत्तीवर आरूढ होऊन अर्थात् जीवब्रह्मैक्य ज्ञान होऊन, ब्रह्मात्मैक्य स्वरूप विषयक अज्ञान निवृत्त होऊन, ब्रह्मवस्तूचा आत्मत्त्वानें साक्षात्कार होऊन राहतो; पण असा वस्तुस्वरूप होणारा उत्कृष्ट अधिकारी " कवणि एकु जो " म्हणजे असा उत्कृष्ट अधिकारी विरळा ! ! ही गोष्ट निराळी ! ! ९१. [ पण तसा ज्याचा पूर्वाधिकार सिद्ध नसेल, ज्ञान–प्रतिबंधक दोष असतील त्यानें ] स्वकर्मरूपी अग्नीमध्यें काम्य व निषिद्ध कर्मरूपी सरपण घालून तद्द्वारां [ अंतःकरणावरील रज व तम [ विक्षेप व मल ] हे दोष अगोदर जाळलें आहेत ९२. याशिवाय पुत्र, वित्त [ द्रव्य ] स्वर्गादि लोक या तिन्हींच्या विषयींचा काम [ इच्छा ] ज्याच्या स्वाधीन होऊन, घरीं जणुं काय आज्ञाधारक सेवक झाला आहे, हेंहि त्याजकडून झालेलें आहे ९३. पूर्वी इंद्रियांनीं अविचारानें भिन्न भिन्न, उचितानुचित विषयांचे ठायीं स्वैर प्रवेश केल्यामुळें तीं इंद्रियें जीं विटाळलीं होतीं, त्या इंद्रियांना अष्टांगयोगांतील प्रत्याहाररूपी तीर्थांत खरोखर स्नान घातले व तीं ज्यानें पवित्र केलीं आहेत ९४. आणखी स्वधर्माच्या आचरणानें प्राप्त होणारें सर्व फल ईश्वरास अर्पण करून त्याच्या मोबदल्यांत त्याच्याच प्रसादानें नाश न पावणारें अ-भंग वैराग्य बळ घेऊन वैराग्यपद अढळ केलें ९५. अशा प्रकारें, आत्मसाक्षात्काररूप जें ज्ञान, तें होण्याला जीं साधनें पाहिजेत, ती सर्व सामुग्री त्यानें खरोखर मिळविली आहे ९६. आणि हे पहा ! तशांत सद्‌गुरूंची गांठ पडली व [ त्यांनींहि ज्ञानोपदेशाचे बाबतींत प्रतारणा केली नाहीं तर सम्यग्ज्ञानाचा उपदेशच केला ] त्याचप्रमाणें त्यानेंहि ज्ञानाविषयीं विचारणा करण्याचे बाबतींत संकोचहि केला नाहीं ९७. [ तथापि आत्मसिद्धि प्राप्त होण्यास कांहीं काळ लागणारच यांस दृष्टान्त सांगतात] परंतु औषध घेतांक्षणींच तत्काळ रोगाची निवृत्ति होऊन, आपलें मूळचे प्रकृतीचे आरोग्य प्राप्त होते काय ? अथवा प्रातःकाळीं सूर्य उगवतांचक्षणीं मध्यान्हकाळ होतो काय ? ९८. उत्तम जमीन असून पर्जन्यवृष्टि चांगली झाल्यानें ओल झाली व त्यांत उत्तम बीजहि पेरलें म्हणजे त्यास पुष्कळ पीक येतें हे खरें; परंतु अर्जुना ! त्यालाहि कांहीं वेळ लागतो एवढेच ९९. उत्तम सोपा मार्ग मिळाला व त्यांत सुसंगतीचाहि त्याला जुळूनच लाभ झाला, तरीसुद्धां ज्या मुक्कामाच्या ठिकाणीं आपल्यास जावयाचें आहे तेथें पोचणें होईलच; तरीपण जाण्यासहि कांहीं वेळ हा लागावयाचाच १०००. त्याप्रमाणें वैराग्यही प्राप्त झाले, यांत सद्‌गुरूंचीहि भेट झाली व नित्यानित्य विवेकाचा चित्तांत अंकुर फुटला म्ह. ज्ञानप्राप्ति करून घेण्याचीहि अंतःकरणांत तीव्र इच्छा निर्माण झाली १. मग त्यांच्या उपदेशानें अर्थात् ब्रह्मच एकमेव सत्य आहे व त्यांवाचून इतर सर्व प्रपंच भ्रांतिरूप आहे हीहि [असा उपदेश ऐकून साधकाचाहि त्याप्रमाणें ] अनुभूति–निश्चयहि दृढ केला २. परंतु असें तेंच परब्रह्म जें सर्वव्यापक व सर्वोत्तम, श्रेष्ठ आहे. जेथें [ परब्रह्माचें अनुभूतींत ] वस्तुतः मोक्षाचेहि [ शब्दहि ] प्रयोजन नाहींसे होतें ३. अर्जुना ! जें ज्ञान आपल्या पोटांत साध्य, साधक व साधन ही त्रिपुटी किंवा जाग्रदादि तीन अवस्था नाहींशा करते, अशा त्या ज्ञानालाहि नाहींसे–अधिष्ठानरूप करणारी जी [ परब्रह्मवस्तु ] ४. जेथें ऐक्याचा [ द्वैतसापेक्ष ] एक-पणाहि संपतो. [ 'अहंब्रह्मास्मि'या वृत्तीनें प्रथमक्षणीं होणारा विषयनिरपेक्ष आनंद तोही ] आनंदसुखाचा लेशहि सदाचाच विराम पावतो व जेथें अनात्मपदार्थ विशेष असें कांहींहि न उरतां, स्वरूपानें जें कांहीं [ सत्‌सामान्य निर्विशेष चित् ] उरते ५. असें जें परब्रह्म त्या ब्रह्माच्या ठिकाणीं ब्रह्मच होऊन

करूनि तेणें। पाविजे पैं ॥ ६ ॥ भुकेलियापासीं। वोगरिलें षड्रसीं। तो तृप्ति प्रतिग्रासीं। लाहे जेवीं ॥ ७ ॥ तैसा वैराग्याचा वोलावा। विवेकाचा तो दिवा। आंबुथितां आत्मठेवा। काढीचि तो ॥ ८ ॥ तरी भोगिजे आत्मऋद्धी। येवढी योग्यतेची सिद्धी। जयाच्या आंगीं निरवधी। लेणें जाली ॥ ९ ॥ तो जेणें क्रमें ब्रह्म। होणें करी गा सुगम। तया क्रमाचें आतां वर्म। आईक सांगों ॥ १०१० ॥

बुद्धया विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च । शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥

तरी गुरु दाविलिया वाटा। येऊनि विवेकतीर्थतटा। धुऊनियां मळकटा। बुद्धीचा तेणें ॥ ११ ॥ मग राहूनें उगळिली। प्रभा चंद्रें आलिंगिली। तैसी शुद्धत्वें जडली। आपणयां बुद्धि ॥ १२ ॥ सांडूनि कुळें दोन्ही। प्रियासी अनुसरे कामिनी। द्वंद्वत्यागें स्वचिंतनीं। पडली तैसी ॥ १३ ॥ आणि ज्ञाना ऐसें जिव्हार। नेवों नेवों निरंतर। इंद्रियीं केलें थोर। शब्दादिक जे ॥ १४ ॥ ते रश्मिजाळ काढलेया। मृगजळ जाय लया। तैसें वृत्तिरोधें तयां। पांचांही केलें ॥ १५ ॥ नेणतां अधमाचिया अन्ना। खादलिया कीजे वमना। तैसीं वोकविली सवासना। इंद्रियें विषयीं ॥ १६ ॥ मग प्रत्यगावृत्ती चोखटें। लाविलीं गंगेचेनि तटें। ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें। केलीं येणें ॥ १७ ॥ पाठीं सात्त्विकें धीरें तेणें। शोधारलीं तियें करणें। मग मनेंसीं योगधारणें। मेळविलीं ॥ १८ ॥ तेवींचि प्राचीनें इष्टानिष्टें। भोगेंसीं येउनी भेटे। तेथ देखलियाही वोखटें। द्वेषु न करी ॥ १९ ॥ ना गोमटेंचि विपायें। तें आणूनि पुढां सूये। तयालागीं न होये। साभिलाषु ॥१०२०॥ यापरी इष्टानिष्टीं। रागद्वेष किरीटी। त्यजूनि गिरिकपाटीं। निकुंजीं वसे ॥ २१ ॥

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः । ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥

गजबजा सांडिलिया। वसवी वनस्थळिया। अंगाचियाचि मांदिया। एकलेया ॥ २२ ॥ शमदमादिकीं खेळे। न बोलणेंचि चावळे। गुरुवाक्याचेनि मेळें। नेणे वेळु ॥ २३ ॥ आणि आंगा बळ यावें। नातरी क्षुधा जावें। कां जिभेचे पुरवावे। मनोरथ ॥ २४ ॥ भोजन करितांविखीं। यया तिहींतें न लेखी। आहारीं मिती संतोषीं। माप न सूये ॥ २५ ॥ अशनाचेनि पावकें। हारपतां प्राणु पोखे। इतुकियाचि भागु मोटकें। अशन करी ॥ २६ ॥ आणि परपुरुषें

ऐक्यपणानें राहणें ते म्ह. ती ब्रह्मस्थिति त्या साधकाकडून मंदाधिकारत्वामुळें एकदम न मिळवितां हळूं हळूं क्रमानेंच मिळविली जाते ६. भुकेलेल्या पुढें षड्रस पक्वान्नांचें ताट वाढून ठेवलेलें असलें तरी तो एकदम तृप्त न होतां क्रमानें म्ह. प्रत्येक घासाबरोबर तृप्ति वाढत जाऊन शेवटल्या घासाला तो पूर्ण तृप्त होतो ७. त्याप्रमाणें तो साधक वैराग्यरूपी तेल भरण–आश्रय मिळाला असतां विवेकरूप दीप प्रज्वलित होतो. त्याच्या प्रकाशानें आत्मरूपी ठेवा तो हळूं हळूं क्रमानें काढितोच ८. आतां अशा प्रकारचें आत्मरूप–ऐश्वर्य भोगावें एवढ्या योग्यतेची [ उत्कृष्ट अधिकाराची ] सिद्धि म्हणजे ज्या साधकाच्या अंगावर निरंतरचा राहणारा जणुं अलंकारच झाला आहे ९. तो ज्या क्रमानें ब्रह्मरूप होणें सुलभ करून घेतो, त्या क्रमाचें वर्म तुला सांगतों, ऐक १०१०

**अन्वयार्थ—विशुद्धया बुद्धया युक्तः**–अत्यंत शुद्ध निष्कपट बुद्धीनें युक्त होऊन–**च धृत्या आत्मानं नियम्य**–आणि धैर्यानें शरीरेन्द्रियसंघाताचें नियमन करून-त्याला आपल्या वश करून–**शब्दादीन् विषयान् त्यक्त्वा**–शब्द–स्पर्शादि विषयांचा त्याग करून–**रागद्वेषौ व्युदस्य च**-आणि राग द्वेष यांचा परित्याग करून ५१.

तर श्रीगुरूनीं दाखविलेल्या वाटेनें विवेकरूपी तीर्थाच्या तीरावर येऊन तेथें त्या साधकानें आपल्या बुद्धीचा मळ धुवून टाकला आहे त्यामुळें ११. मग ज्या प्रमाणें राहूनें ग्रासलेली चंद्राची प्रभा त्यानें आपल्यांतून बाहेर सोडल्यावर ती प्रभा चंद्राकडून आलिंगिली जाते त्याप्रमाणें ती बुद्धि आपल्या शुद्धपणाणें युक्त होऊन आपल्या मूळच्या स्वरूप स्थितीस प्राप्त होते १२. कुलस्त्री जशी सासर व माहेर या दोन्ही कुळांचा अभिमान टाकून केवळ आपल्या प्रियपतीलाच अनुसरते तशी बुद्धि ही द्वंद–द्वैतभावना सोडून केवळ आत्मचिंतनांतच रत होत असते १३. ज्ञानासारखी [ जीवनात्मक ] जिव्हाळ्याची वस्तु असतांना तिला निरंतर बाहेर विषयाकडे नेऊन इंद्रियांनीं शब्दादिक जें विषय त्यांना नसतेंच महत्त्व देऊन थोर केलें १४. सूर्य किरण समुदाय बाजूस काढून घेतला [ नाहींसा झाला ] असतां म्हणजे मृगजळ जसें आपोआप नाहींसे होतें, तसें धैर्यानें इंद्रियांच्या वृत्तीचा निरोध केला म्हणजे त्यानें शब्दादि पांचहि विषयांचा आपोआपच निरास केला १५. न कळून भ्रष्ट मनुष्यानें अन्न खाल्लें असतां तें जसें ओकून टाकावें, त्या प्रमाणें ज्यानें वासनासह विषय, इंद्रियाकडून ओकविलें. [ इंद्रियांकरवीं त्याग करविला आहे ] १६. मग विषयापासून परावृत्त झालेलीं इंद्रियें प्रत्यगात्म्याकडे लावून आत्माकारवृत्तिरूप गंगेच्या तीरावर आणिलीं व त्यांच्याकडून उत्तम चित्त शोधक प्रायश्चित्तेंहि करविलीं १७. नंतर तीं सर्व शुद्ध केलेलीं इंद्रियें सात्त्विक धैर्याच्या बळानें मनासह योगाभ्यास करण्याकडे लाविलीं १८. त्याचप्रमाणें अशा स्थितींत पूर्वकर्माच्या योगानें चांगल्या किंवा वाईट भोगांची प्राप्ति झाली असतां त्यांतील वाईट भोगांविषयीं द्वेष करीत नाहीं १९. अथवा प्रारब्धानें सहज चांगला अनुकूल भोग्यविषय समोर आणून ठेविला तरीहि त्याविषयीं चित्तांत अभिलाषहि धरीत नाहीं. १०२०. याप्रमाणें अर्जुना! इष्ट किंवा अनिष्ट भोगांविषयींचा राग–द्वेष, खेद टाकून, देऊन पर्वताच्या गुहेंत अथवा निर्जन वनांत–एकांतात वास करितो २१.

**अन्वयार्थः—विविक्तसेवी**–वन, पर्वत, गुहा इत्यादि एकांतस्थानाचें सेवन करण्याचें ज्यांचें शील आहे, असा–**लघ्वाशी**–हितकर, परिमित व हलकें–पवित्र अन्न खाण्याचे ज्याचे शील आहे, असा–**यतवाक्कायमानसः**–वाक्, शरीर व मन यांचे ज्यानें नियमन केलें आहे असा–**नित्यं ध्यान योगपरः**–सतत ध्यान व योग यांत तत्पर झालेला–**वैराग्यं समुपाश्रितः**–ऐहिक व पारलौकिक विषयांविषयीं विरक्त झालेला–वैराग्याचा आश्रय केलेला ५२.

[ **विविक्तसेवी** ] ज्या ठिकाणीं लोकांची गजबज नाहीं अशा अरण्यांतील जागेंत केवळ एकट्या आपल्याच शरीराच्या अवयवसमुदायासह वस्ती करतो २२. इंद्रियें व मन यांच्या निग्रहद्वारांच तो खेळत असतो. [ तोच अभ्यास करतो ] न बोलणें हेंच त्याचें बोलणें. कारण, गुरुवाक्याचें मननामुळें, अर्थात् त्या यौक्तिक चिंतनांत वेळ किती गेला, हें कांहीं तो जाणत नाहीं २३. [ **लघ्वाशी** ] आणि आपलें अंगांत शक्ति यावी किंवा क्षुधा–भूक नाहींशी व्हावी किंवा जिव्हेचें मनोरथ–लाड पुरते पुरवावेत २४. भोजन करण्याचे बाबतींत तिन्हीं गोष्टि लक्षांत घेत नाहीं वा त्याची पर्वा करीत नाहीं, अल्प आहारांत संतोषी असतो. माप घालीत [ पोट अगदीं तुडुंब भरणें हें त्याच्या संतोषाचें मापच ] नाहीं २५. अन्न पचविणाऱ्या जठराग्नीस कांहींच आहार न दिल्यामुळें त्याच्या प्रदीप्त होण्यानें नाहींसा होणारा असा जो प्राण, तो ज्या आहार सेवन करण्यानें जीव धरून राहील [ प्राण रक्षण होईल ] इतक्याच बेतानें थोडेसे अन्न सेवन करितो २६. [ **यतवाक्कायमानसः** ] आणि परपुरु-

१ षड्रसान्न वाढिलें. २ आश्रय. ३ उजळितां, पेटला असतां. ४ आत्मानात्मज्ञानरूपी तीर्थाच्या कांठीं. ५ मळ.

कामिली । कुळवधू आंग न घाली । निद्रालस्या न मोकली । आसन तैसें ॥ २७ ॥ दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं हन अंग लागे । वांचूनि येर नेघे । राभस्यें तेथ ॥ २८ ॥ देहनिर्वाहापुरतें । राहाटवी हातांपायांतें । किंबहुना आपैतें । सबाह्य केलें ॥ २९ ॥ आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखों नेदी वीरा । तेथ कें वाग्व्यापारा । अवकाशु असे ॥ १०३० ॥ ऐसेनि देह वाचा मानस । हे जिणौनि बाह्यप्रदेश । आकळिलें आकाश । ध्यानाचें तेणें ॥ ३१ ॥ गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला । न्याहाळी हातीं घेतला । आरिसा जैसा ॥ ३२ ॥ पैं ध्याता आपणचि परी । ध्यानरूप वृत्तिमाझारीं । ध्येयंत्वें घे हे अवधारीं । ध्यानरूढी गा ॥ ३३ ॥ तेथ ध्येय ध्यान ध्याता । ययां तिहीं एकरूपता । होय तंव पंडुसुता । कीजे तें गा ॥ ३४ ॥ म्हणौनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला दक्षु । परी पुढां सूनि पक्षु । योगाभ्यासाचा ॥ ३५ ॥ आपानरंध्रद्वयां- । माझारीं धनंजया । पार्ष्णी[१२] पिडूनियां । कांवरुमूळें ॥ ३६ ॥ आकुंचूनि अध । देऊनि तिन्ही बंध । करूनि एकवद । वायुभेदी ॥ ३७ ॥ कुंडलिनी जागवूनि । मध्यमा विकाशूनि । आधारादि भेदूनि । आज्ञावरी ॥ ३८ ॥ सहस्रदळाचा मेघु । पीयूषें वर्षोनि चांगु । तो मूळवरी वोघु । आणूनियां ॥ ३९ ॥ नाचतया पुण्यगिरी । चिद्भैरवाच्या[२३] खापरीं । मनपवनाची[२४] खीच पुरी । वाढूनियां ॥ १०४० ॥ जालिया योगाचा गाढें । मेळावा सूनि हा पुढां । ध्यान मागिलीकडां । स्वयंभ केलें ॥ ४१ ॥ आणि ध्यान योग दोन्ही । इये आत्मतत्त्वज्ञानीं । पैठी होआवया निर्विघ्नीं । आधींचि तेणें ॥ ४२ ॥ वीतरागतेसारिखा । जोडूनि ठेविला सखा । तो आघवियाचि भूमिका- । सवें चाले ॥ ४३ ॥ पहावें दिसे तंववरी । दिठीतें न संडी दीप जरी । तरी कें आहे अवसरी । देखावया ॥ ४४ ॥ तैसें मोक्षीं प्रवर्तलया । वृत्ती ब्रह्मीं जाय लया । तंव वैराग्य आथी तया । भंगु कैचा ॥ ४५ ॥ म्हणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु । करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥ ४६ ॥ ऐसी वैराग्याची आंगीं । बाणूनियां वज्रांगीं । राजयोगतुरंगीं । आरूढला ॥ ४७ ॥ वरी आड पडिलें दिठी । सानें थोर निवटी । तें बळीं विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें ॥ ४८ ॥ ऐसेनि संसाररणाआंतु ।

केली असतां कुलस्त्री जशी त्याला वश न होता आपले शरीर त्याचे स्वाधीन करीत नाहीं, तसें तो साधक निद्रेला किंवा आळसाला वश होऊन आपलें आसन ढळूं देत नाहीं; २७. श्रेष्ठांना दंडवत् करण्याचा प्रसंग आला असतां त्याचवेळीं काय तें त्याचे अंग भूमीला लागतें त्याखेरीज अविचारानें ह्वें तेव्हां भूमीवर अंग टाकून लोळत पडत नाहीं २८. शरीरनिर्वाहापुरता जो हातापायांची हालचाल वा उपयोग करितो; फार काय सांगावें ! ! ज्यानें अंतःकरण व बाह्य शरीरेंद्रियें आपल्या स्वाधीन ठेविलीं आहेत २९. आणि अर्जुना ! जो आपल्या वृत्तीला मनाचा उंबरा देखील पाहूं देत नाहीं. [ संकल्प विकल्प करूं देत नाहीं ] अशा स्थितींत बोलणें वगैरे वाणीच्या [ उपलक्षणानें कर्मेंद्रियांच्या ] व्यापारास वाव कोठून मिळणार ? १०३०. [ **ध्यान** ] अशा प्रकारें शरीर, वाणी व मन हीं सर्व अर्थात् यांच्या बाह्य प्रवृत्तीस जिंकून ज्यानें ध्यानाकाश आपल्या स्वाधीन करून घेतलें ३१. ज्याप्रमाणें आरसा हातीं घेतला असतां त्यांत आपलें स्वरूप, प्रतिबिंब स्वच्छ पाहतो, त्याप्रमाणें गुरुवाक्योपदेशाच्या योगानें जागृत झालेल्या बोधरूप आरशाचे ठिकाणीं तो आपल्या आत्मस्वरूपाचा निश्चय पाहतो. [ मी ब्रह्मरूप आहें, असा निश्चय करतो ] ३२. तो ध्यानाचा प्रकार सांगतों ऐक. ध्यान करणारा ध्याता, आपणच स्वतःला; पण आपली जी ध्यानरूपी वृत्ति व त्यामध्यें ज्याचें ध्यान करावयाचें त्या ध्येयपणानें घेतो अर्थात् ही त्रिपुटी आपल्या आत्मस्वरूपाचें ठिकाणींच पाहातो ३३. हे पंडुसुता ! असें ध्यान करीत असतां ध्येय, ध्यान व ध्याता या तिहींची एकरूपता होईपर्यंत तें ध्यान करावें लागतें ३४. [ **योगपरः नित्यं** ] म्हणून तो तीव्र मोक्षेच्छु आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याविषयीं तत्पर होतो. तो योगाभ्यासाचा पक्ष पुढें करून म्ह. योगाची साह्यता घेऊन प्रवृत्त होतो ३५. अर्जुना ! गुद व शिश्न या दोन द्वारांच्या मध्यभागीं जी शिवण आहे तिचा मध्य पायाच्या टांचेनें दाबून प्रथम मूळबंध करितो ३६. अधोभाग अकुंचन करून मूळबंध, ओढियाणबंध व जालंधरबंध, असें तीन बंध देऊन आणि प्राणापानादि वायूचे भेद मोडून त्यांना एकत्रित करून ३७. अर्थात् अशा प्रकारें प्राण निरोधपूर्वक कुंडलिनी जागी करून मध्यमा म्हणजे सुषुम्ना नाडीचा मार्ग मोकळा-विकसित करून आणि आधार चक्रापासून तों आज्ञाचक्रापर्यंत या सर्व चक्रांचें भेदन करून ऊर्ध्व जातो ३८. मग ब्रह्मरंध्रांतील सहस्रदलकमलरूपी मेघापासून चांगलीच अमृतवृष्टि होऊन त्याचा तो ओघ सुषुम्नानाडीनें मुलाधार चक्रापर्यंत खालीं आणून ३९. मग आज्ञाचक्ररूपी कैलास पर्वतावर नाचत फिरत असलेल्या चैतन्यरूपी भैरवाच्या खापरांत [ भिक्षा पात्रांत ] मन व प्राण ह्यांची जणुं खिचडी वाढून १०४०. अशा प्रकारें हा योगसाधनांचा बळकट मेळावा पुढें करून म्हणजे दृढयोगाभ्यासाचें साह्य घेऊन त्याचे मागील बाजूस-पोषक, उपयुक्त ध्यान निश्चित सिद्ध करतो ४१. [ **वैराग्यं** ] आणखी ध्यान व योग हे दोन्ही निर्विघ्नपणें आत्मज्ञानाच्या ठिकाणीं प्राप्त होण्यासाठीं त्या अगोदरच त्यानें ४२. वैराग्यासारखा जो परममित्र जोडून ठेवलेला असतो, तो [ सुरुवातीपासून-ब्रह्मस्थितिपर्यंत ] ज्या ज्या भूमिकेवर साधक प्राप्त होईल त्या त्या सर्व भूमिकांवर प्रतिबंधाचा नाश करण्याकरितां त्याजबरोबरच असतो ४३. आपल्याला जी वस्तु पहावयाची आहे ती दिसेपर्यंत जर दिव्यानें डोळ्याची सोबत सोडली नाहीं तर मग ती वस्तु दिसण्यास किती बरें उशीर लागणार ? ४४. त्याप्रमाणें, मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून मोक्षमार्गांत प्रवृत्त झालेल्या साधकाची वृत्ति ब्रह्मस्वरूपाचें ठिकाणीं पूर्ण विलीन होईतोपर्यंत जर वैराग्याची सोबत असेल, तर त्याच्या मोक्षप्राप्तीस भंग वा प्रतिबंध कसला ? ४५. म्हणून तो भाग्यवान् पुरुष वैराग्ययुक्त होऊन ज्ञानाचा अभ्यास करून, तोच आत्मलाभाला योग्य झाला ४६. [ हेंच रूपकानें सांगतात ] असें ज्यानें वैराग्याचें वज्रकवच, चिलखत अगांत घातलें आहे व जो राजयोगरूप घोड्यावर स्वार झाला आहे ४७. याशिवाय जें जें दृश्य दृष्टीस पडेल त्यांतील लहान-मोठें इत्यादि भेद निवारण करणारी ध्यानरूपी तीक्ष्ण धारदार तलवार विवेकरूपी मुठींत बळकटपणें घेऊन ४८. आणि अशा प्रकारें

१ इच्छिली. २ अविचार. ३ वागवितो. ४ स्वाधीन. ५ बोलण्याला. ६ जिंकून. ७ ज्याचें ध्यान करावयाचें त्याला. ८ शहाणा. ९ पुढें करून. १० प्रकार. ११ गुदशिश्नछिद्रांच्या मधोमध. १२ खोटेनें दाबून. १३ गुदशिश्नांस सांधणाऱ्या रेषाकृतीचें मूळ, मूळबंध. १४ आकर्षण करून. १५ नाभिस्थानस्थ कुंडलिनी नामक शक्ति. १६ सुषुम्ना मार्ग. १७ प्रफुल्लीत मोकळीं करून. १८ आधार चक्रापासून आज्ञाक्रापर्यंत सर्व चक्रांचा भेद करून. १९ पूर्व मार्गांतील शेवटचें सातवें चक्र २० गुदस्थित मूलाधार चक्रापर्यंत. २१ अग्निचक्ररूपी कैलास पर्वतावर नाचत असलेल्या. २२ चैतन्यरूप. भैरवाच्या भिक्षापात्रांत. २३ मन व प्राणवायू यांची खिचडी. २४ बळकटी. २५ वरील समुदाय पुढें करून. २६ पश्चिम.

आंधारीं सूर्य तैसा असे जातु । मोक्षविजयश्रीये बरैतुं । होआवयांलागीं ॥ ४९ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् । विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

तेथ आडवावया आले । दोषवैरी जे धोपटिले । तयांमाजीं पहिलें । देहाहंकारु ॥ १०५० ॥ जो नै मोकली मारुनी । जीवीं नेदी उपजवोनि । विचंबवी खोडां घालुनी । हाडांचिया ॥ ५१ ॥ तयाचा देहदुर्ग हा थारा । मोडूनि घेतला तो वीरा । आणि बळ हा दुसरा । मारिला वैरी ॥५२॥ जो विषयाचेनि नांवें । चौगुणेंही वरी थांवे । जेणें मृतावस्था धांवे । सर्वत्र जगा ॥ ५३ ॥ तो विषय विषाचा अथावो । आघविया दोषांचा रावो । परी ध्यानखड्गाचा घावो । साहेल कैंचा ? ॥ ५४ ॥ आणि प्रिय विषयप्राप्ती । करी जया सुखाची व्यक्ती । तेचि घालूनि बुंथी । आंगीं जो वाजे ॥ ५५ ॥ जो सन्मार्गा भुलवी । मग अधर्माच्या आडवीं । सूनि वाघां सांपडवी । नरकादिकां ॥ ५६ ॥ तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि घातला दर्पु । आणि जयाचा अहा कंपु । तापसांसी ॥ ५७ ॥ क्रोधा ऐसा महादोखु । जयाचा देखा परिपाकु । भरिजे तंव अधिकु । रिता होय जो ॥ ५८ ॥ तो कामु कोणेच ठायीं । नसे ऐसें केलें पाहीं । कीं तेंचि क्रोधाही । सहजें आलें ॥ ५९ ॥ मुळाचें तोडणें जैसें । होय कां शाखोद्देशें । कामु नाशलेनि नाशे । तैसा क्रोधु ॥ १०६० ॥ म्हणौनि काम वैरी । जाला जेथ ठाणोरी । तेथ सरली वारी । क्रोधाचीही ॥ ६१ ॥ आणि समर्थु आपुला खोडा । शिसें वाहवी जैसा होडा । तैसा भुंजौनि जो गाढा । परिग्रहो ॥ ६२ ॥ जो माथांचि पालाणवी । अंगा अवगुण घालवी । जीवें दांडी घेववी ममत्वाची ॥ ६३ ॥ शिष्यशास्त्रादिविलासें । मठादिमुद्रेचेनि मिसें । घातले आहाती फांसे । निसंगा जेणें ॥ ६४ ॥ घरीं कुटुंबपणें सरे । तरी वनीं वन्य होऊनि अवतरे । नागवीयाही शरीरें । लागला आहे ॥ ६५ ॥ ऐसा दुर्जयो जो परिग्रहो । तयाचा फेडूनि ठावो । भवविजयाचा उत्साहो । भोगीतसे जो ॥ ६६ ॥ तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणाचे जे मेळावे । ते कैवल्यदेशींचे आघवे । रावो जैसे आले ॥ ६७ ॥ तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया । राणिवा उगाणूनि तया । परिवारु होऊनियां । राहत आंगें ॥ ६८ ॥ प्रवृत्तीचिये राजबिदीं ।

सूर्य जसा अंधारांत निःशंकपणें शिरतो अशा थाटानें जणुं तो साधक मोक्षरूपी विजयश्रीला वरणारा होण्याकरितां जन्ममरणात्मक संसाररूपी समरांगणांत निःशंकपणें निघाला आहे, असा जातो ४९.

**अन्वयार्थ**—**अहंकारं**-देहादिकांच्या ठिकाणीं असलेला जो अहंभाव, त्याला–**बलं**–काम–रागादिप्रयुक्त सामर्थ्याला–**दर्पं**–मदाला–**कामम्**-इच्छेला–**क्रोधं**–द्वेषाला–**परिग्रहं**–व शरीर धारण किंवा धर्माचरण यांनाही अवश्य असलेल्या परिग्रहाला – **विमुच्य** – टाकून–**निर्ममः**–ममत्व माझेंपणा सोडून ममत्वरहित झालेला–**शान्तः**–त्यामुळें अतिशय शांत असा यति–**ब्रह्मभूयाय**–ब्रह्म बनण्यास–**कल्पते**–समर्थ होतो, ब्रह्म होतो ५२.

[ **अहंकारं** ] अशा थाटानें जात असतां तेथें त्याला अडविण्याकरितां आलेले जे दोषरूपी वैरी त्यांना त्यानें मारलें. त्यांपैकीं पहिला मुख्य वैरी म्हणजे 'देहाहंकार' हा होय १०५०. जो अहंकार मनुष्याला नुसते मारून सोडीत नाहीं, तर पुनः उत्पन्न करतो व जन्माला घालून सुखानें जगूंहि देत नाहीं [ तर पुनः मारतो ] फक्त जीवाला देहाच्या सांपळ्यांत घालून नेहमीं कुचंबवीत ठेवितो ५१. [ **बलं** ] अर्जुना ! त्या अहंकाराचें राहण्याचें ठिकाण म्हणजे हा देहरूप किल्ला होय. तो फोडून साधकानें हस्तगत करून घेतला [ देहाहंकाराचा विचारानें बाध–निरास केला ] तसाच [ राग सामर्थ्य ] 'बल' हा जो दुसरा वैरी त्याचाहि नाश करितो ५२. जो [ विषयोपभोगाचे ] बलरूपी शत्रू विषयांचें नांव ऐकल्याबरोबर चौपटीपेक्षांहि अधिक वाढतो सर्व जगाला [ विषयांशिवाय इतर वस्तूंचें भान राहूं देत नाहीं ] ज्यामुळें जणुं मृतावस्था प्राप्त होतें; ५३. तो बलरूपी शत्रू विषयरूपी विषाचा केवळ अगाध डोह असून सर्व दोषांचा राजा आहे. तरीपण त्याला ध्यानरूपी खड्गाचा घाव कसा सहन होणार ? ५४. [ **दर्प** ] आणि प्रिय विषयांची प्राप्ति ही ज्या सुखाची अभिव्यक्ति करते, त्याच विषयानंदाची जो अंगावर खोळ घालतो [ जीवाच्या यथार्थ आत्मस्वरूपाला आच्छादन करितो ] व गर्जनाहि करतो ५५. जो सन्मार्गाविषयीं भूल पाडून चुकवितो व अधर्मात्मक रानांत घालून नरकादिरूप वाघांच्या तावडींत अचूक नेऊन घालतो ५६. असा जो विश्वासघातकी 'दर्परूप शत्रू' त्यास त्यानें मारून टाकले. [ **कामं** ] आणि अहा ! ज्या कामाला भिऊन तापसी लोकांसहि थरकांप होतो ५७. क्रोधासारखा भयंकर दोष हा ज्या कामाचा परिपाक आहे; आणि कामाचे जों जों लाड पुरवावें, तों तों काम अपूर्ण राहतो म्हणजे अधिकाधिक वाढतो ५८. असें ज्या कामाचें स्वरूप आहे, तो कोणत्याहि ठिकाणीं नाहीं, असें केलें. [ निपटून नाहींसा केला ] [ **क्रोधं** ] क्रोधाचीहि आपोआप तीच वाट होते, असें समज ५९. झाडाचें ळ तोडून टाकलें म्हणजे त्याच्या खांधांचा नाश जसा आपोआप होतो, तसा कामाचा नाश केला म्हणजे क्रोधाचाहि नाश सहजच होतो १०६०. म्हणून जेव्हां 'काम' रूपी शत्रू मारला गेला तेव्हांच क्रोधाचेहि येणेंजाणें सहज संपते ६१. [ **परिग्रहं** ] आणि राजा जसा आपला खोडा ज्याला [ गुन्हेगाराच्या पायांत ] घालावयाचा असेल, त्याच्याच डोक्यावर देऊन तो प्रतिष्ठेनें वहावयास लावतो, तसा जो 'परिग्रह' भोग देऊन मनुष्याच्या मनांत विषय संग्रहाची तीव्र इच्छा उत्पन्न करितो ६२. जो परिग्रह वैराग्यशीलाचें नांव ऐकल्याबरोबर त्याचा पराजय करण्याकरितां प्रतिष्ठेप्रमाणें अभिमानानें मान हालवून त्या वैराग्यशील पुरुषाच्या डोक्यावर आपलें खोगीर देऊन, अंगांत संचार करून अवगुण उत्पन्न करितो व 'हें माझें' अशा अभिमानाची कांठी जीवाकडून घेववितो–विषयासक्तींत गुंतवितो ६३. ज्या परिग्रहरूप शत्रूनें 'हा माझा मठ, हें माझे शिष्य, हें ग्रंथ माझे आहेत' इत्यादि चिन्हांच्या निमित्तानें वैराग्यशील, निसंग पुरुषासहि संगरूपी पाशांत घातलें आहे ६४. जो परिग्रह वैराग्यशील पुरुष प्रथम कुटुंबादि संसाराचा त्याग करून वनांत जातो, म्हणून घरांतील कुटुंबरूपानें संपतो; परंतु जो परिग्रह त्याजकडून तेथील वन्य पदार्थावरील ममत्वाच्या रूपानें अवतीर्ण होतो. सारांश, अगदीं शरीरानें उघडा असला तरी त्यालाहि जो आपल्या पाशांत गुतविण्यासाठीं लागला आहे ६५. असा जिंकण्यास अति कठीण शत्रू जो 'परिग्रह' त्याचा साधक वैराग्याच्या बळानें ठावठिकाण नाहींसा करून तो साधक पुरुष संसार जिंकल्याचा आनंद भोगतो ६६. [ **निर्ममः** ] अशा स्थितींत त्याच्या भेटीला अमानित्वादिक ज्ञानगुणाचें समुदाय, हेंच सामोरे येतात; म्हणजे तेंच कोणी मोक्षरूपी देशाचें जणुं मांडलिक राजेच त्याजपाशीं येतात ६७. तेव्हां यथार्थ ब्रह्मात्मैक्यज्ञान हेंच कोणी एक सार्वभौम राज्य त्या साधकाला अर्पण करून, ते सद्गुण आपण स्वतः त्याचे परिवार होऊन राहतात ६८. प्रवृत्तिरूपी

१ वरण्याकरितां. २ सोडीत नाहीं. ३ जगूं देत नाहींत.

४ कुचंबवितो, हाल करतो. ५ त्या अभिमानाचा.

अवस्थाभेदप्रमदीं । कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण ।। ६९ ।। पुढां बोधाचिये कांबीवरी । विवेकु दृश्याची मांदी सारी । योगभूमिका आरती करी । येती जैसिया ।। १०७० ।। तेथ ऋद्धिसिद्धींचीं अनेगें । वृंदें मिळती प्रसंगें । तिये पुष्पवर्षीं आंगें । नाहातसे तो ।। ७१ ।। ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखें । स्वराज्य येतां जवळिकें । झळंबित आहे हरिखें । तिन्ही लोक ।। ७२ ।। तेव्हां वैरियां कां मैत्रियां । तयासि माझें म्हणावया । समानता धनंजया । उरेचिही ना ।।७३।। हें ना भलतेणें व्याजें । तो जयातें म्हणे माझें । तें नोडेवेचि कां दुजें । अद्वितीय जाला ।। ७४ ।। पैं आपुलिया एकी सत्ता । सर्वही कवळूनिया पंडुसुता । कैंहीं न लगती ममता । धांडिली तेणें ।। ७५ ।। ऐसा जिंतिलिया रिपुवर्गु । अपमानिलिया हें जगु । अपैसा योगतुरंगु । स्थिर जाला ।। ७६ ।। वैराग्याचें गाढलें । अंगीं त्राण होतें भलें । तेंही नावेक ढिलें । तेव्हां करी ।। ७७ ।। आणि निवटी ध्यानाचें खांडें । तें दुजें नाहींचि पुढें । म्हणौनि हातु ओसुडे । वृत्तीचाही ।। ७८ ।। जैसें रसौषध खरें । आपुलें काज करोनि पुरें । आपणही नुरे । तैसें होतसे ।। ७९ ।। देखोनि ठाकिता ठांवो । धांवता थिरावे पावो । तैसा ब्रह्मसामीप्यें थावो । अभ्यासु सांडी ।। १०८० ।। घडतां महोदधीसी । गंगा वेगु सांडी जैसी । कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ।। ८१ ।। नाना फळतिये वेळे । केळीची वाढी मांटुळे । कां गांवापुढें वळे । मार्गु जैसा ।। ८२ ।। तैसा आत्मसाक्षात्कारु । होईल देखोनि गोचरु । ऐसा साधनहतियेरु । हळूचि ठेवी ।। ८३ ।। म्हणौनि ब्रह्मेंसीं तया । ऐक्याचा समो धनंजया । होतसे तैं उपाया । वोहटु पडे ।। ८४ ।। मग वैराग्याची गोंधळुकें । जे ज्ञानाभ्यासाचें वार्धक्य । योगफळाचाही परिपाक । दशा जे कां ।। ८५ ।। ते शांति पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा । तैं ब्रह्म होआवयाजोगा । होय तो पुरुषु ।। ८६ ।। पुनवेहुनी चतुर्दशी । जेतुलें उणेपण शशी । कां सोळे पाऊनि जैसी । पंधरावी वानी ।। ८७ ।। सागरींही पाणी वेगें । संचरे तें रूप गंगे । येर निश्चळ जें उगें । तें समुद्र जैसा ।। ८८ ।। ब्रह्म आणि ब्रह्महोतिये । योग्यते तैसा पाडु आहे । तेंचि शांतीचेनि लवलाहें । होय तो गा ।। ८९ ।। पैं तेंचि होणेंनवीण । प्रतीती आलें जें ब्रह्मपण । तें ब्रह्म होती जाण । योग्यता येथ ।। १०९० ।।

प्रवृत्तिरूपी राजमार्गानें त्याची स्वारी चालली असतां जागृदादि निरनिराळ्या तीन अवस्थारूपी तरुण स्त्रिया येऊन त्याच्यावरून पदोपदीं आपापल्या सुखाचें लिंब-लोण उतरून टाकीत आहेत ६९. त्या सार्वभौम राज्याच्या पुढें विवेकरूपी चोपदार हा बोधरूप सोन्याची काठी हातांत घेऊन तद्वारां दृश्य पदार्थांची गर्दी दूर करीत चालतो, आणि योगभूमिका या जणुं काय हातांत आरत्याच घेऊन त्यास ओंवाळण्यास येतात १०७०. तेव्हां त्या प्रसंगीं ऋद्धिसिद्धींचे अनेक समुदाय मिळून येतात व त्यांनीं केलेल्या पुष्पवृष्टीच्या योगानें तो स्वतः जणुं नाहातच असतो ७१. अशा प्रकारें ब्रह्मैक्यासारखें स्वराज्य [ प्राप्त होण्याची वेळ जों जों ] जवळ येते, तों तों त्याला त्रैलोक्य आनंदानें भरून टाकीत असल्याचें दिसतें ७२. त्यावेळीं अर्जुना ! हा 'अमुक एक आपला वैरी आहे' किंवा 'हा आपला मित्र आहे' असें म्हणावयास त्यास समानता झाल्यामुळें द्वैत असें उरतच नाहीं ७३. इतकेंच नव्हे, तर कोणत्याहि निमित्तानें तो ज्याला 'माझें' असें म्हणेल, इतकें सुद्धां द्वैत किंवा दुसरें असें कांहींच त्याच्या समोर येत नाहीं. कारण, तो अद्वितीय ब्रह्मरूपच झालेला असतो ७४. हे बघ अर्जुना ! त्यानें आपल्या त्या एकसत्तेनें सर्व विश्व व्यापून ममतेचा मळ लागूं न देतां 'माझें' असें म्हणण्यास कोठेंहि अवकाश नसल्यामुळें सहजच ममत्वास त्यागिलेलें असते ७५. [ शांतः ] याप्रमाणें सर्व अहंकारादि रिपुवर्ग जिंकून व हे सर्व जगत् आपणच आहोत, असें समजल्यावर राजयोगरूपी घोड्याची धांव आपोआपच बंद होते ७६. आणि मग अंगांत जें वैराग्याचें बळकट कवच–चिलखत घातलेलें होतें तेंहि तो त्या वेळीं क्षणभर सैल करतो ७७. आणखी ध्यान खड्गाच्या योगें ज्याचा नाश करावा असें जें द्वैत तें त्याच्या पुढें कांहींच उरलें नसल्यामुळें, तें ध्यानखड्ग धारण करणाऱ्या वृत्तीचाहि हात आसुडतो व उगारलेलें शस्त्र मागे घेतो, म्ह० ध्यानाची जरूरी राहात नाहीं ७८. जसें एखादें खरें रसायन आपलें काम पुरें [ रोगाचा नाश ] करून आपणहि शिल्लक राहात नाहीं, तशी त्या ध्यानाची स्थिति होते ७९. किंवा जेथें पोहचावयाचें तें मुक्कामाचें ठिकाण पाहिल्याबरोबर जसें धांवणारे पाय, मंदावत जातात. तसें ब्रह्मप्राप्ति जवळ आली असें समजल्यावर अभ्यासहि आपोआप बळ टाकीत असतो म्ह. अभ्यासहि मंदावतो १०८०. गंगा समुद्रास मिळाल्यावर आपला वाहण्याचा वेग जसा टाकते किंवा कामिनी स्त्री आपल्या पतिपाशीं जशी स्थिर–शांत होते ८१. अथवा केळीला फळाचे घड आलें म्हणजे तिची वाढ खुंटते, किंवा गांव येतांच ज्याप्रमाणें मार्गहि वळतो–संपतो ८२. त्याप्रमाणें आपल्याला आत्मसाक्षात्कारात्मक ध्येय–अनुभूति समीप आली, असें दृष्टीस पडतांच तो साधक साधनरूपी हत्यारें हातांतून हळूंच खालीं ठेवतो. [ म्ह० साधनांची आवश्यकताच रहात नाहीं ] ८३. अर्जुना ! ब्रह्माशीं त्याचे ऐक्य होण्याची वेळ येते तेव्हां त्याचे सर्व उपाय हळूं हळूं मागें परतूं लागतात ८४. वैराग्यरूपी गोंधळीक लग्नाची वेळ, किंवा ज्ञानरूपी अभ्यासाचें जें वृद्धपण, अथवा योगरूप फळाची जी परिपक्वदशा ८५. अशी जी शांति, ती अर्जुना ! त्याच्या ठिकाणीं जेव्हां संपूर्ण प्राप्त होते. तेव्हां तो पुरुष ब्रह्मरूप होण्यास योग्य अधिकारी होतो ८६. पौर्णिमेपेक्षां चतुर्दशीचें दिवशीं जितका चंद्राच्या कलेंत उणेपणा असतो; किंवा सोन्यांतील सोळा आणे–पूर्ण कसापेक्षां पंधरा आणे कसांत जितकी कमतरता असते ८७. किंवा सागरांत वेगानें जे पाणी जात असते व तसा गंगेनें प्रवेश केल्यावरहि तिचा तो वेग जेथपर्यंत दृष्टीस पडतो, तेथपर्यंत तें गंगेचेंच स्वरूप आहे व जेथें तो वेग थांबतो, तें स्थिर पाणी म्हणजेच समुद्राचें स्वरूप होय ८८. तसें शुद्ध ब्रह्म व ब्रह्मरूप होणारा देहधारी जीवन्मुक्त यांत अंतर असते. ते अंतर शांतीच्या योगें त्याच्या दृष्टीनें लागलीच नाहींसें होऊन तो ब्रह्मच होतो ८९. कारण, ब्रह्म होण्यावांचून आपण मूळचेंच ब्रह्मरूप आहोंत, असें जें त्यांच्या प्रतीतीला आलेलें असते, हीच, त्याची ब्रह्मरूप होण्याची योग्यता–पात्रता आहे, असें तूं समज १०९०.

१ जागृति, स्वप्न इत्यादि अवस्थारूपी स्त्रियांनीं. २ पदोपदीं. ३ धनुष्यानें. ४ गर्दी. ५ दूर करतो ६ पुष्पवृष्टीनें. ७ आनंदानें उसळत. ८ साम्यता. ९ निमित्तानें. १० प्राप्त होत नाहीं. ११ दुसरेपणानें. १२ वेष्टन. १३ कधीं. १४ दूर केली. १५ शत्रुसमुदाय. १६ आपोआप. १७ योगरूपी घोडा. १८ बळकट. १९ कवच. २० नाहींसें करी, मोडून टाकितो. २१ खड्गानें. २२ आवरी. २३ रसायन. २४ विश्रांतिस्थान. २५ थांबतो. २६ अभ्यासाचा वेग. २७ खुंटते. २८ साधनरूपी शस्त्र. २९ समय. ३० तूट. ३१ श्रम. ३२ वृद्धपण. ३३ परिणाम. ३४ मग्यवंता. ३५ कस. ३६ प्रकार. ३७ त्वरेनें. ३८ अनुभवाला. ३९ ब्रह्म होण्याची.

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति । समः सर्वेषु भुतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥

ते ब्रह्मभावयोग्यता । पुरुषु तो मग पंडुसुता । आत्मबोधप्रसन्नता- । पदीं बैसे ॥ ९१ ॥ जेणें निपजे रससोय । तो तापुही जैं जाय । तैं ते कां होय । प्रसन्न जैसी ॥ ९२ ॥ नाना भरतिया लगबगा । शरत्काळीं सांडिजे गंगा । कां गीत रहातां उपांगा । वोहटु पडे ॥ ९३ ॥ तैसा आत्मबोधीं उद्यमु । करितां होय जो श्रमु । तोही जेथें समु । होऊनि जाय ॥ ९४ ॥ आत्मबोधप्रशस्ती । हे तिये दशेची ख्याती । ते भोगीतसे महामती । योग्यु तो गा ॥ ९५ ॥ तेव्हां आत्मत्वें शोचावें । कांहीं पावावया कामावें । हें सरलें समभावें । भरितें तया ॥ ९६ ॥ उदया येतां गभस्ती । नाना नक्षत्रव्यक्ती । हारवीजती दीप्ती । आंगिकां जेवीं ॥ ९७ ॥ तेवीं उठतिया आत्मप्रथा । हे भूतभेदव्यवस्था । मोडीत मोडीत पार्था । वास पाहे तो ॥ ९८ ॥ पाटियेवरील अक्षरें । जैसीं पुसतां येती करें । तैसीं हारपती भेदांतरे । तयाचिये दृष्टी ॥ ९९ ॥ तैसेनि अन्यथा ज्ञानें । जियें घेपती जागरस्वप्नें । तियें दोन्ही केलीं लीनें । अव्यक्तामाजीं ॥ ११०० ॥ मग तेंही अव्यक्त । बोध वाढतां झिजत । पुरलां बोधीं समस्त । बुडोनि जाय ॥ १ ॥ जैसी भोजनाच्या व्यापारीं । क्षुधा जिरत जाय अवधारीं । मग तृप्तीच्या अवसरीं । नाहींच होय ॥ २ ॥ नाना चालीचिया वाढी । वाट होत जाय थोडी । मग पातला ठायीं बुडी । देऊनि निमे ॥ ३ ॥ कां जागृति जंव जंव उद्दीपे । तंव तंव निद्रा हारपे । मग जागीनलिया स्वरूपें । नाहींच होय ॥ ४ ॥ हें ना आपुलें पूर्णत्व भेटे । जेथ चंद्रासीं वाढी खुंटे । तेथ शुक्लपक्षु आटे । निःशेषु जैसा ॥ ५ ॥ तैसा बोध्यजात गिळितु । बोधु बोधें ये मज आंतु । मिसळला तेथ साद्यंतु । अबोधु गेला ॥ ६ ॥ तेव्हां कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचें पेंडवळें । मोडूनि भरलें जळें । आब्रह्म जैसें ॥ ७ ॥ नाना गेलिया घट मठ । आकाश ठाके एकवट । कां जळोनि काष्ठें काष्ठ । वन्हीचि होय ॥ ८ ॥ नातरी लेणियांचे ठसे । आटोनि गेलिया मुसे । नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें ॥ ९ ॥ हेंही असो चेइलया । तें स्वप्न नाहीं जालिया । मग आपणचि आपणयां । उरिजे जैसें ॥ १११० ॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं । हे चौथी भक्ति पाहीं । माझी तो लाहे ॥ ११ ॥ येर आर्तु जिज्ञासु अर्थार्थी ।

**अन्वयार्थ**––**ब्रह्मभूतः** – वर सांगितल्याप्रमाणें ब्रह्मभूत झालेला – **प्रसन्नात्मा**–त्यामुळें आत्मानंदाला प्राप्त झालेला पुरुष–**न शोचति न कांक्षति**–शोक करीत नाहीं–व आकांक्षा करीत नाहीं. **सर्वेषु–भूतेषु समः**–सर्व भूतांमध्यें सम असतो–**परां मद्भक्ति**–माझ्या श्रेष्ठ–ज्ञानरूप भक्तीला–**लभते**–प्राप्त होतो ५४.

अर्जुना ! तो ब्रह्मभावाच्या योग्यतेस पावलेला पुरुष मग आत्मबोधप्रसन्नतेच्या पदावर सहजच बसतो ९१. ज्या अग्नीच्या उष्णतेमुळें स्वयंपाक तयार होतो, त्या अग्नीची त्या स्वयंपाकामधील असह्य उष्णताहि जेव्हां नाहींशी होतें, तेव्हांच जसें तें अन्न तृप्तीस समाधानकारक होतें ९२. अथवा ज्याप्रमाणें शरदृऋतूमध्यें वर्षाकालांत दररोज येणारी भरती व ओहोटी ही गंगेची लगबग गंगेला सोडते, तेव्हां गंगा स्थिर होते, किंवा गाण्याचा समारंभ संपला म्हणजे उपांगेंहि [मृदंग, तंबोरा वगैरे] मागाहून बंद पडतात ९३. त्याप्रमाणें आत्मज्ञानप्राप्तीविषयीं प्रयत्न करतेवेळीं जे वैराग्यादि साधनांचे श्रम केलें होतें, त्याचीहि ज्या प्रसन्नस्थितीच्या ठिकाणीं ऐक्यता, शांतता होऊन जाते ९४. म्हणजे श्रमांचीहि आठवण रहात नाहीं अशा स्थितीचीच 'आत्मबोध प्रसन्नता' अशा नांवानें प्रसिद्धि आहे. अर्जुना ! ही स्थिति भोगण्यास तोच पुरुष योग्य आहे ९५. तेव्हां ऐक्यभावाचें भरतें आल्यामुळें अमुक एक वस्तु माझी आहे, म्हणून तिच्याकरितां हर्ष विषाद व्हावा अथवा कांहीं प्राप्त व्हावें म्हणून त्यासाठीं इच्छा करावी, या दोन्ही गोष्टी आपोआपच संपत असतात ९६. जसा सूर्य उगवल्याबरोबर सर्व नक्षत्रांस त्यांच्या अंगचें तेजासह लोपवितो ९७. त्याप्रमाणें अर्जुना ! आत्मप्रथा म्ह. आत्मानुभूति अभिव्यक्त झाली असतां जिकडे पाहील तिकडे प्राणिमात्राविषयींचा भेदभाव मोडत मोडत नाहींसा होऊन स्वरूपदृष्ट्या–अभेददृष्टीनेंच तो पाहतो ९८ पाटीवर लिहिलेलीं अक्षरें जशी हातानें पुसतां येतात, तसें याच्या दृष्टीनें सर्व [ उपाधिसंबंधी कल्पित अनेक प्रकारचें ] भेद–द्वैत नाहींसें होतें ९९. त्यायोगें अन्यथा विपरीत ज्ञानामुळें जागृति व स्वप्न या ज्या दोन अवस्था प्रतीत होतात. त्या दोन्हीं अवस्था अव्यक्तांत–अज्ञानामध्यें लीन होतात ११००. मग अन्यथा ज्ञानाला कारण जें अज्ञान तेंहि जसजसा आत्मबोध वाढत जाईल तसतसें झिजतां झिजतां नाहींसें होतें, पूर्णबोधांत तें अज्ञान–संपूर्णतया नाहींसें होतें १. ऐक जशी भोजनास आरंभ केला असतां प्रत्येक घांसानें भूक कमी कमी होत जाते व मग शेवटच्या ग्रासानें तृप्ति झाली त्यावेळीं ती भूक अगदींच नाहींशीं होतें; २. अथवा चालण्याचा वेग क्रमानें जसजसा वाढत जातो तसतशीं वाटहि कमी होतां होतां मग मुक्कामास पोहोंचल्यावर ती वाट संपूर्णतया संपते ३. किंवा जों जों हळू हळू जागृतीचा उदय होत जातो तों तों झोंप कमी कमी होतें व मग पूर्ण जागें झाले म्हणजे निद्राहि स्वरूपानें संपूर्णतया नाहींशी होतें; ४. अथवा हें दृष्टान्त राहूं दे. पौर्णिमेच्या दिवशीं चंद्राला आपलें पूर्णत्व लाभतें. सर्वकला प्राप्त होतात व जेव्हां चंद्राची वाढ खुंटते तेव्हां शुक्लपक्ष निःशेष तया नाहींसा होतो ५. त्याप्रमाणें सर्व बोध्यास–दृश्यास ग्रास–नाहींसें करणारें जें ज्ञान तें बोधानें समोरील अज्ञान कार्य व अज्ञान बाधित झाल्यामुळें जेव्हां त्या ज्ञानानेंच दृङ्मात्र जो मी त्या माझ्या समस्वरूपाशीं ऐक्यतेस येतें तेव्हां [ अज्ञानसापेक्ष वृत्तिज्ञानहि अधिष्ठानरूप होतें अर्थात् ] तत्पूर्वींच अबोध म्ह० सर्व अज्ञान समूळ नाहींसें होतें ६. जसें कल्पांतसमयीं सर्व जलमय होतें, त्या वेळेस ' हा समुद्र, ही नदी ' ही भेद मर्यादा मोडून आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व विश्व पाण्यानेंच भरलेलें असते ७. किंवा घटमठादि उपाधि गेल्या म्हणजे मग फक्त निरुपाधिक एकुलते एक महाकाशच सर्वत्र सारखें; राहते अथवा [ काष्ठांच्या परस्पर घर्षणानें निर्माण झालेला अग्नि ] काष्ठमात्रास जाळून टाकून केवळ अग्निमात्र उरतो ८. अथवा अनेक प्रकारचे दागिन्यांचें आकार मुशींत घालून आटले म्हणजे दागिन्यांचें नांव व रूप [ आकार ] इत्यादि भेद नाहींसे होऊन केवळ सुवर्ण मात्र उरतें ९. हेंहि दृष्टांत राहूं दे. मनुष्य पुरता जागा झाला असतां पडलेलें स्वप्न नाहींसें होतें आणि मग केवळ आपणच आपल्याला उरतो; [ एकटाच असतो ] १११०. त्याप्रमाणें एक मजवांचून त्या पुरुषाला त्याच्याहिसकट भेद–दुसरें असें कांहींहि उरत नाहीं, याच स्थितीला ' चौथी भक्ति ' म्हणतात अर्थात् ही ज्ञानलक्षणात्मक चौथी भक्ति त्यास प्राप्त होते ११. इतर दुसरें जें आर्त, जिज्ञासु आणि अर्थार्थी हे भक्त मला ज्या ज्या पंथानें भजतात त्या तीन मार्गास पाहून त्यांच्या

१ रससोय. २ समाधानकारक. ३ वाढण्याची. ४ मृदंगादि वाद्यें. ५ उद्योग. ६ शांत. ७ त्या ' आत्मबोध–प्रसन्नता ' हें नांव आहे. ८ शोक करावा. ९ इच्छावें. १० सूर्य. ११ आंगच्या. १२ आत्मानुभव. १३ वाट.

हे भजती जिये पंथीं । ते तिन्ही पावोनि चौथी । म्हणिपत आहे ॥ १२ ॥ एऱ्हवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती । पैं माझिये सहजस्थिती । भक्ति नाम ॥ १३ ॥ जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वही सर्वीं भजौनि । बुझावीतसे जे ॥ १४ ॥ जो जेथ जैसें पाहों बैसे । तया तेथ तैसेंचि असे । हें उजियेडें कां दिसे । अखंडें जेणें ॥ १५ ॥ स्वप्नाचें दिसणें न दिसणें । जैसें आपलेनि असलेपणें । विश्वाचें आहे नाहीं जेणें । प्रकाशें तैसें ॥ १६ ॥ ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा । तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ॥ १७ ॥ म्हणौनि आर्ताच्या ठायीं । हें आर्ति होऊनि पाहीं । अपेक्षणीय जें कांहीं । तें मीचि केला ॥ १८ ॥ जिज्ञासु-पुढां वीरेशा । हेचि होऊनि जिज्ञासा । मी कां जिज्ञास्यु ऐसा । दाखविला ॥ १९ ॥ हेचि होऊनि अर्थना । मीचि माझ्या अर्थीं अर्जुना । करूनि अर्थाभिधानों । आणी मातें ॥ ११२० ॥ एवं घेऊनि अज्ञानातें । माझी भक्ति जे हे वर्ते । ते दावी मज द्रष्टयातें । दृश्य करूनि ॥ २१ ॥ येथें मुखचि दिसे मुखें । या बोला कांहीं न चुके । तरी दुजेपण हें लटिकें । आरिसा करी ॥ २२ ॥ दिठी चंद्रचि घे साचें । परी येतुलें हें तिमिराचें । जे एकचि असे तयाचे । दोनी दावी ॥२३॥ तैसा सर्वत्र मीचि मियां । घेपतसें भक्ति इया । परी दृश्यत्व हें वायां । अज्ञानवशें ॥ २४ ॥ तें अज्ञान आतां फिटलें । माझें द्रष्टृत्व मज भेटलें । निजबिंबीं एकवटलें । प्रतिबिंब जैसें ॥ २५ ॥ पैं जेव्हांही असे किडाळ । तेव्हांही सोनेंचि अढळ । परी ते कीड गेलिया केवळ । उरे जैसें ॥ २६ ॥ हां गा पूर्णिमे आधीं कायी । चंद्रु सावयवु नाहीं? । परी तिये दिवशीं भेटे पाहीं । पूर्णता तया ॥ २७ ॥ तैसा मीचि ज्ञानद्वारें । दिसें परी हस्तांतरें । मग द्रष्टृत्व तें सरे । मियांचि मी लाभें ॥२८॥ म्हणौनि दृश्यपथा- । अतीतु माझा पार्था । भक्तियोगु चवथा । म्हणितला गा ॥ २९ ॥

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः । ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥ ५५ ॥

या ज्ञान भक्ति सहज । भक्तु एकवटला मज । मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥ ११३० ॥ जे उभऊनियां भुजा । ज्ञानिया आत्मा माझा । हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ॥ ३१ ॥ ते हे कल्पादीं भक्ति मियां । भागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणौनि धनंजया । उपदेशिली ॥ ३२ ॥ ज्ञानी इयेतें स्वसंवित्ती ।

अपेक्षेनेंच हिला आम्ही 'चौथी भक्ति' म्हणत आहोत १२. वास्तविक विचार केला तर या भक्तीला पहिली, दुसरी, तिसरी व शेवटची, चौथी असें कांहीच म्हणतां येत नाहीं, कारण, केवळ माझी जी सहजस्वरूपस्थिति, तिलाच 'भक्ति' असें नांव आहे १३. जी भक्ति मद्विषयक अज्ञानालाहि प्रकाशित करून मलाच विपरीत भावानें [ जगद्रूप ] दाखवून सर्व लोकांकडून [ आपापल्या कल्पनेनुसार ] माझी भक्ति करवून सर्व लोकांना समजावीत असते १४. कारण, जो भक्त ज्या ठिकाणीं जशीं जशीं कल्पना करून मला पाहील, त्याला तेथें मी तसाच [ त्याच्या कल्पनेप्रमाणें ] दिसतो, हेंहि ज्या माझ्या अखंड सामान्य चित प्रकाशानेंच भासलें-प्रकाशिलें जाते १५. ज्याप्रमाणें आपल्या [ द्रष्ट्याच्या ] अस्तित्वामुळेंच स्वप्नाचें दिसणें-आहेपणा व न दिसणें-नाहींपणा हें दोन्हीं [ अधिष्ठानरूप साक्षीच्या पारमार्थिक सत्तास्फूर्तिवरच अवलंबून असल्यामुळें ] आहे. त्याप्रमाणें विश्वाचेंहि असणें [ उदय होऊन भासणें ] व नसणें-लोप, ज्या परमात्म प्रकाशानें प्रकाशित होते १६. हे कपिध्वजा! असा जो माझा 'सहज प्रकाश' तोच ज्ञानरूप प्रकाश 'उत्तम भक्ति' या रीतीनें बोलला जातो १७. म्हणून आर्त भक्ताच्या ठायीं 'आर्ति'-उत्कट इच्छारूप आपणच होऊन तद्द्वारां ज्या पदार्थांची अपेक्षा करावी, तो अपेक्षित पदार्थहि मलाच बनविला आहे १८. त्याचप्रमाणें अर्जुना! जाणण्याची इच्छा करणाऱ्या जिज्ञासु भक्ताच्या पुढें 'जिज्ञासा'-जाणण्याची इच्छा ही भक्तिच होऊन व मी जिज्ञास्य [ जाणण्याचा विषय ] म्हणून दाखविला गेलों १९. अर्जुना! हीच भक्ति आपणच अर्थ, अर्थप्राप्तीची इच्छा, साधनें व अर्थ प्राप्तीची इच्छा करणारा होऊन माझीच याचना करून मलाच अर्थ या नांवाला आणते ११२०. अशा प्रकारें अज्ञानाचा स्वीकार करून ही माझी भक्ति वागते [ भक्ति व्यवहार करूं लागते तेव्हां ] ती मी जो द्रष्टा-पाहणारा त्या मला पाहण्याची वस्तु-दृश्य करून दाखविते २१. आरशांत पाहिलें तर आपलेंच मुख आपल्यास प्रतिबिंबरूपानें पाहतें, या म्हणण्यांत कांहींहि चूक नाहीं, परंतु प्रतिबिंबरूपानें मिथ्या भासणारा जो दुजेपणा तो मात्र आरसा निर्माण करितो. २२. दृष्टि चंद्रालाच पाहते हें खरें, परंतु डोळ्यामध्यें 'तिमिर' नांवाचा दोष असल्यामुळें तो एवढें मात्र करतो कीं, तत्त्वतः एकच असलेल्या चंद्रास दोन आहेत, असें दाखविते २३. त्याप्रमाणेंच या भक्तिभ्यायोगें मीच सर्वत्र आपल्याला मजकडूनच या भक्तिद्वारां आकलन केला जातो; परंतु त्यांत दृश्यत्व जें दिसतें तें मात्र मिथ्या आहे. कारण, तें अज्ञानाच्या उपाधी संबंधामुळेंच दिसते २४. तें भेद दाखविणारें अज्ञान या भक्तियोगानें नाहींसें झालें म्हणजे ज्याप्रमाणें आरसा इ. उपाधीचा नाश झाल्यावर त्यांत भासणारे प्रतिबिंबहि आपल्या बिंब स्वरूपांत ऐक्य पावतें, त्याप्रमाणें माझें दृश्य सापेक्ष द्रष्टृत्व मला भेटलें. [ माझ्या दृङ्मात्र स्वरूपीं लीन झालें.] २५. हें बघ! ज्या वेळीं सोन्यांत किडाळ हीणकस धातु मिसळलेली असतें, त्यावेळीं देखील तें सोनें आपल्या स्वरूपानें सोनेंच अढळ असतें; परंतु ती हीणकस धातू काढून टाकल्यावर मग जसें केवळ शुद्ध सोनें उरतें २६. अरे! पौर्णिमेच्या अगोदर [ कोणत्याहि तिथीला ] चंद्र सावयव, संपूर्ण नाहीं कीं काय? पण त्या पौर्णिमेच्या दिवशींच जशी त्याची पूर्णता त्याला भेटते. [ असा व्यवहार होतो ] २७. तसा मीच ज्ञानानें अंतःकरणवृत्तिद्वारें मला दिसतो; परंतु अन्य-दृश्यरूपानें दिसतो त्यांत दृश्य द्रष्टृत्वरूप भेद असतो; तोच दृश्य-द्रष्टृत्वभाव सरतो- [ यथार्थ ज्ञानानें बाधित होतो ] माझा मीच मला प्राप्त होतो. [ असा केवळ व्यवहार होतो ] २८. म्हणून पार्था! हा 'भक्तियोग' दृश्य मार्गाहून भिन्न निःसंशय आहे. म्हणून याला मी 'चौथा भक्तियोग' असें म्हटलें आहे २९.

**अन्वयार्थ**--[ **अहं**-मी ] **यावान्अस्मि**-जेवढा आहें **च**-आणि-**यः**-[ **अस्मि** ]-जो आहे तें-**तत्त्वतः**-यथार्थपणें-**भक्त्या**-भक्तीनें-**मां**-मला -**अभिजानाति**-जाणतो-**ततः**-त्यानंतर-**मां**-मला-**तत्त्वतः**-यथार्थपणें **ज्ञात्वा**-जाणून-**तदनंतरं**-त्यानंतर-**विशते**-प्रवेश करतो ५५.

ह्या ज्ञानलक्षणात्मकभक्तीच्या साह्यानें जो माझ्याशीं [ पूर्वसिद्ध ] सहज ऐक्यास पावतो, तो भक्त केवळ मीच आहें [ तो मद्रूपच आहे ] हें तूं ऐकिलेंहि आहेसच ११३०. कारण, अर्जुना! 'ज्ञानी हा माझा आत्मा आहे,' असें मी मागें सातव्या अध्यायामध्यें हात उभारून प्रतिज्ञेनें बोललों आहे ३१. अर्जुना! ती ही भक्ति उत्तम आहे म्हणून मी ती कल्पाच्या आरंभीं भागवताच्या निमित्तानें ब्रह्मदेवाला उपदेशिली ३२. आतां ज्ञानी हिला [ याच चौथ्या भक्तीला ] 'स्वसंवित्ति' म्हणतात, शैव

१ शेवटली. २ ब्रह्मरूप स्थिति. ३ अज्ञान. ४ अन्य प्रकारें ५ भजवून. ६ समजावीत आहे. ७ प्रकाशानें. ८ रीतीनें.

९ पीडिताच्या. १० इच्छा करण्यास योग्य. ११ जाणण्याचा विषय १२ अर्थ या नांवास. १३ पहाणाऱ्याला, सर्व साक्षीला

शैव म्हणती शक्ती । आम्ही परमभक्ती । आपुली म्हणों ॥ ३३ ॥ हे मज मिळतिये वेळे । तयां क्रमयोगियां फळे । मग समस्तही निखिळें । मियांचि भरे ॥ ३४ ॥ तेथ वैराग्यविवेकेंसीं । आटे बंध मोक्षेंसीं । वृत्ती तिये आवृत्तीसीं । बुडोनि जाय ॥ ३५ ॥ घेऊनि ऐलपणातें । परत्व हारपें जेथें । गिळूनि चाऱ्ही भूतें । आकाश जैसें ॥ ३६ ॥ तया परी थडथाद । साध्यसाधनातीत शुद्ध । तें मी होऊनि एकवद । भोगितो मातें ॥ ३७ ॥ घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाडु तया भोगा । अवधारी जो ॥३८॥ का आरिसयासि आरिसा । उटूनि दाविलिया जैसा । देखणा अतिशयो तैसा । भोगणा तिये ॥ ३९ ॥ हें असो दर्पणु नेलिया । तो मुख बोधुही गेलिया । देखलेंपण एकलेया । आस्वादिजे जेवीं ॥ ११४० ॥ चेइलिया स्वप्न नाशे । आपलें ऐक्यचि दिसे । तें दुजेनवीण जैसें । भोगिजे का ॥४१॥ तोचि जालिया भोगु तयाचा । न घडे हा भावो जयांचा । तिहीं बोलें केवीं बोलाचा । उच्चारु कीजे ॥ ४२ ॥ तयांच्या नेणों गांवीं । रवी प्रकाशी हन दिवी । कीं व्योमालागीं मांडवी । उभिली तिहीं ॥४३॥ हां गा राजन्यत्व नव्हतां आंगीं । रावो रायपण काय भोगी ? । का आंधारु हन आलिंगी । दिनकरातें ? ॥ ४४ ॥ आणि आकाश जें नव्हे । तया आकाश काय जाणवे ? । रत्नाच्या रूपीं मिरवे । गुंजांचें लेणें ? ॥ ४५ ॥ म्हणौनि मी होणें नाहीं । तया मीचि आहें केहीं । मग भजेल हें कायी । बोलों कीर ॥ ४६ ॥ यालागीं तो क्रमयोगी । मी जालाचि मातें भोगी । तारुण्य कां तरुणांगीं । जियापरी ॥ ४७ ॥ तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं । नाना अवकाश नभीं । लुंठतु जैसा ॥ ४८ ॥ तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । अलंकारु का सहजें । सोनयातें जेवीं ॥ ४९ ॥ का चंदनाची द्रुती जैसी । चंदनीं भजे अपैसी । का अकृत्रिम शशीं । चंद्रिका ते ॥११५०॥ तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे । हे अनुभवाचिजोगें नव्हे । बोलाऐसें ॥ ५१ ॥ तेव्हां पूर्वसंस्कार छंदें । जें कांहीं तो अनुवादे । तेणें आळविलेनि वो दें । बोलतां मीचि ॥ ५२ ॥ बोलतया बोलताचि भेटे । तेथें बोलिलें हें न घटे । तें मौन तंव गोमटें । स्तवन माझें ॥ ५३ ॥ म्हणौनि तया बोलतां । बोली बोलतां मी भेटतां । मौन होय तेणें तत्त्वतां । स्तवितो

हिला 'शक्ति' म्हणतात तसेंच आम्हीं आपली 'परमभक्ति' म्हणतों ३३. ही भक्ति त्या क्रमयोग्याला माझ्याशीं ऐक्य होतेवेळीं फलद्रूप होते; आणि मग त्याला हें सर्वहि विश्व केवळ माझ्याच अधिष्ठान स्वरूपानें ओतप्रोत भरलेलें आहे, [ असें अनुभवास येतें ] ३४. तेव्हां वैराग्य, विवेकासह नाहींसें होतें, बंध, मोक्षासह नाहींसा होतो आणि ब्रह्माकार वृत्ति ही आवृत्तिसह नाहीशीं होते. कारण, नाश करण्यास कांहींच राहिलेलें नसतें ३५. जसें आकाश हें पृथ्वी, आप, तेज व वायु या भूतांना व्यापून शेष राहतें, त्याप्रमाणें ज्या ज्ञानलक्षणात्मक पराभक्तीच्या योगानें अलिकडीलपणासह पलिकडीलपणा [ श्रेष्ठ–कनिष्ठभाव ] हा भेद नाहींसा होतो ३६. तसें अलिकडील कांठ, मध्यभाग, पलिकडील कांठ, याप्रमाणें साध्य, साधन व साधक या त्रिपुटीहून पलिकडील जें शुद्ध स्वरूप, त्याच्याशीं ऐक्यपावून तो भक्त मला भोगतो [ माझें भजन करतो ] ३७. सिंधूच्या अंगाला स्पर्श केल्यावर म्हणजे समुद्राला मिळाल्यावर गंगा जशी समुद्ररूप होऊन शोभते, [ समुद्रत्वास भोगते ] तसाच प्रकार जो माझ्याशीं ऐक्य पावला आहे, त्याच्या भोगाचा आहे [माझ्या भक्तिद्वारां विलक्षण सुखाचा उपभोग घेतो ] ३८. किंवा दोन आरसे स्वच्छ करून एकापुढें एक ठेवून दाखविलें असतां, त्यांत द्रष्टेपणाचाच भर असतो [ पाहणारा व पाहण्याचा विषय दोघे आरसेच–द्रष्टेच ] तसाच त्या ज्ञानलक्षणात्मक होणाऱ्या भक्तींत होणाऱ्या सुख व्यवहाराचा प्रकार असतो ३९. इतकेंच नव्हे; परंतु आरसा, पाहणाऱ्याच्या समोरून बाजूस नेला असतां व त्यांतील मुखाचें–प्रतिबिंबाचें दिसणेंहि गेलें असलें; तरीसुद्धां पाहणारा आपल्या एकट्याकडून आपल्या मुख स्वरूपाचा आनंद भोगला जातो ११४० जागे झाल्यामुळें स्वप्न नाहींसें होतें व आपल्या स्वरूपाचा एकपणाच अनुभवास येतो मग तो आपला एकपणा जसा द्वैतावांचून अनुभविला जातो ४१. या सिद्धांतावर कोणी द्वैतवादी अशी शंका करील कीं, तोच झाल्यावर–ऐक्य पावल्यावर त्रिपुटीचा नाश होतो. मग भक्ताला त्याचा भोग कसा घेतां येईल ! तर शक्य नाहीं. अशा शंकाकारास श्रीज्ञानेश्वर महाराज उपहासपूर्वक प्रश्न विचारून उत्तर देतात. अहो ! 'शब्द' या शब्दाचा तुम्हीं शब्दानेंच कसा उच्चार करितां ! ४२. यावरून, उपर्युक्त शंका घेणाराचें गावांत कदाचित् सूर्य हा दिव्याकडून प्रकाशित होत असला वा तशी सूर्यास दिव्यानें पाहण्याची चाल असेल तर न कळे ! अथवा त्यांनीं आकाशाला मांडव उभारला आहे कीं काय, हेंहि कळत नाहीं ! ! ४३. अरे ! ज्याचे अंगीं राजेपण नाहीं; तो राजेपणा भोगूं शकेल काय ? [ त्याला राजा राजेपणाचें काय सुख भोगतो हें कसें समजणार ? ] किंवा सूर्याला अंधार आलिंगन देऊं शकेल काय ? ४४. आणि जो स्वतः आकाश [ झाला ] नाहीं त्याला आकाश वा आकाशाची व्याप्ति म्हणजे तरी काय आहे, हें कसें समजेल ? व गुंजांचे दागिनें रत्नांच्या दागिन्यांमध्यें शोभतील काय ? ४५. म्हणून जो मी म्ह. मद्रूप झाला नाहीं, त्याला मीच कोठें आहे ? [ माझें स्वरूपच ज्ञात नाहीं ] मग तो माझीं भजन–भक्ति करील, असें तरी कसें म्हणतां येईल ? [ खरोखर असें सांगणेंच नको ] ४६. अतएव ज्याप्रमाणें तरुण स्त्री तरुणपणींच आपल्या तारुण्याचा उपभोग घेऊं शकतें, त्याचप्रमाणें तो क्रमयोगी मत्स्वरूप होतो तेव्हांच माझ्या स्वरूपाचा उपभोग घेतो ४७. पाण्याच्या लाटा जशा सर्वांगांनीं–सर्व बाजूंनीं पाण्याचेंच सेवन करतात; किंवा प्रभा ही जशी बिंबाशीं एकरूप होऊन बिंबरूपानेंच सर्वत्र शोभत असते. अथवा पोकळी जशी आकाशांत सर्वत्र आकाश होऊन–व्यापून लोळत असते ४८. जसा अलंकार स्वतः सोन्याला भजतो. [ अलंकारानें सोन्याशीं अभिन्न अनन्य असणें हेंच त्याचें नित्य भजन ] तसा तो भक्त मद्रूप होऊन कोण त्याहि क्रियेविना मला भजतो. [ त्यानें माझ्याशीं अभिन्न असणें, हेंच त्याचें मला भजणें आहे. कारण तेथें कोणतीच क्रिया संभवत नाहीं ] ४९. चंदनाचा सुगंध जसा चंदनाला सहजच भजतो किंवा चंद्राची प्रभा जशीं चंद्रालाच सहज स्वभावीन भजत–अनन्य असतें ११५०. त्याप्रमाणें त्या अद्वैत स्थितींत खरोखर क्रिया सहन होत नाहीं. तथापि अद्वैतांत भक्ति आहे व ही गोष्ट स्वतःच्या अनुभवानेंच कळण्यासारखी, पटण्यासारखी आहे, बोलून दाखवितां येण्यासारखी नाहीं. [ कारण, ती ज्ञानरूप अवाच्य स्थिति आहे ] ५१. अशा योग्यतेस आलेला मनुष्य देह असेंपर्यंत पूर्व संस्कारवशात् जें कांहीं बोलेल, त्यानें मला आळविल्यामुळें, अर्थात् त्यानें हांक मारतांक्षणींच त्याला ओ–देऊन बोलणारा मीच आहे; पण तो हांक मारणाराहि मीच आहे, हें विसरूं नकोस ५२. त्या बोलणाऱ्याला जेव्हां स्वतः बोलणाराच भेटतो तेव्हां तो पूर्वीप्रमाणें 'बोलेल' म्हणजे मला हांक मारील, असा व्यवहार घडणें शक्य नाहीं; अशा प्रकारचें जें मौन तीच माझी उत्तम स्तुति होय ५३. म्हणून तो बोलत असतां त्याच्या बोलण्यांत

मातें ॥ ५४ ॥ तैसेंचि बुद्धी का दिठी । जें तो देखों जाय किरीटी । तें देखणें दृश्य लोटी । देखतेंचि दावी ॥ ५५ ॥ आरिसया आधीं जैसें । देखतेंचि मुख दिसे । तयाचें देखणें तैसें । मेळवी द्रष्टें ॥५६॥ दृश्य जाउनियां द्रष्टें । द्रष्टयासीचि जैं भेटे । तैं एकलेपणें न घटे । द्रष्टेपणही ॥ ५७ ॥ तेथ स्वप्नींचिया प्रियां । चेवोनि झोंबों गेलिया । ठायिजे दोन्ही न होनियां । आपणचि जैसें ॥ ५८ ॥ का दोहीं काष्ठांचिये घृष्टी- । माजीं वन्हि एक उठी । तो दोन्ही हे भाष आटी । आपणचि होय ॥ ५९ ॥ नाना प्रतिबिंब हातीं । घेऊं गेलिया गभस्ती । बिंबताही असती । जाय जैसी ॥ ११६० ॥ तैसा मी होऊनि देखतें । तो घेऊं जाय दृश्यातें । तेथ दृश्य ने थितें । द्रष्टृत्वेंसीं ॥ ६१ ॥ रवि आंधारु प्रकाशिता । नुरेचि जेवीं प्रकाश्यता । तेवीं दृश्यीं नाहीं द्रष्टृता । मी जालिया ॥ ६२ ॥ मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते तें दर्शन माझें । साचोकारें ॥ ६३ ॥ तें भलतयाही किरीटी । पदार्थाचिया भेटी । द्रष्टृदृश्यातीता दृष्टी । भोगितो सदा ॥ ६४ ॥ आणि आकाश हें आकाशें । दाटलें न ढळे जैसें । मियां आत्मेन आपणपें तैसें । जालें तया ॥ ६५ ॥ कल्पांतीं उदक उदकें । रुंधिलियां वाहों ठाके । तैसा आत्मेनि मियां येकें । कोंदला तो ॥ ६६ ॥ पावो आपणपयां वोळघे ? । केवीं वन्हि आपणपयां लागे ? । आपणपां पाणी रिघे । स्नाना कैसें ? ॥ ६७ ॥ म्हणौनि सर्व मी जालेपणें । ठेलें तया येणें जाणें । तेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ६८ ॥ पैं जळावरील तरंगु । तरी धांविन्नला सवेगु । तरी नाहीं भूमिभागु । क्रमिला तेणें ॥ ६९ ॥ जें सांडावें कां मांडावें । जें चालणें जेणें चालावें । तें तोयचि एक आघवें । म्हणौनियां ॥ ११७० ॥ गेलियाही भलतेउता । उदकपणें पंडुसुता । तरंगाची एकात्मता । न मोडेचि जेवीं ॥७१॥तैसा मीपणें हा लोटला । तो आघवेंयाचि मजआंतु आला । या यात्रा होय भला । कापडी माझा ॥ ७२ ॥ आणि शरीर स्वभाववशें । कांहीं येक करूं जरी बैसे । तरी मीचि तो तेणें मिषें । भेटे तया ॥७३॥ तेथ कर्म आणि कर्ता । हें जाऊनि पंडुसुता । मियां आत्मेनि मज पाहतां । मीचि होय ॥ ७४ ॥ पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलिया होय

त्या बोलल्याला बोली बोलविणारा जो मी तो भेटलों असतां सहजच त्याचें तें बोलणें मौन होतें, आणि त्या मौनानेंच तो मला तत्त्वतः स्तवितो. असें जाणावें ५४. तसेंच हे किरीटी! त्याचे बुद्धीनें अथवा दृष्टीनें जें जें तो जाणील अथवा पाहील, तें जाणणें व पाहणें, जाणण्याची किंवा पाहण्याची दृश्य वस्तु एकीकडे सारून [त्यांत अधिष्ठान रूपानें समव्याप्त असलेल्या ]जाणणारालाच व पाहणारालाच दाखवितें ५५. आरसा समोर येण्याचें पूर्वींच असलेलें जें आपलें मुख तेंच पाहणारें असतें व तेंच आरसा हा उपाधि समोर आला म्हणजे प्रतिबिंब रूपानें आपल्यासच-मुखालाच पाहतें, तद्वत् उपर्युक्त स्थितींत दृश्याच्या निमित्तानें द्रष्टयाचेंच द्रष्टयाला दर्शन घडतें ५६. पाहाण्याची दृश्य वस्तु जाऊन [ दृश्यत्वाचा निरास होऊन ] पाहणाराच-द्रष्टाच जेव्हां पाहणराच्या-द्रष्टयाच्या स्वरूपाला जाऊन भेटतो. तेव्हां एकत्वामुळें एकटा द्रष्टाच राहील्यामुळें त्याचा द्रष्टेपणाहि-पाहणेपणाचा धर्महि उरत नाहीं; [दृङ्मात्र स्वरूप उरते] ५७.स्वप्नांत पाहिलेल्या स्त्रीला जागें होऊन मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊं गेलें असतां स्वप्नांतील आलिंगन देणारा व अलिंगन देण्याची वस्तु हीं दोन्हीं नाहींसे होऊन जसें एकटे आपणच जापल्या जागीं शिल्लक असतो ५८. अथवा दोन लांकडांच्या घर्षणामध्यें जो एक अग्नि उत्पन्न होतो; तो अग्नि दोन्ही लांकडांस जाळून लांकडें ही भाषा; हे नांव नाहींसें करून आपणच एकटा राहतो ५९. अथवा सूर्य आपलें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब स्वतः हातानें वेरूं गेला असतां त्याचें प्रतिबिंब तर नाहींसें होऊन जातेच; पण त्याचें प्रतिबिंब-सापेक्ष जे बिंबत्व तेंहि जसें जातें ११६०. त्याप्रमाणें, जो द्रष्टा मद्रूप होऊन दृश्य वस्तु पाहण्यास जातो, त्यास तीं दुसरी दृश्य वस्तु म्हणून तर वेगळे असें कांहीं उरत नाहींच; परंतु त्याचा दृश्यसापेक्ष असलेला द्रष्टपणाहि-द्रष्टृत्वहि नाहींसें होतें ६१. सूर्य अंधाराला प्रकाशित करावयाला गेला असतां, 'प्रकाश्य' असा जो तो अंधकार जर उरत नाहींच; उलट सूर्याचा प्रकाशकपणा हा धर्महि [ प्रकाश्य प्रकाशक-भावहि ] उरत नाहीं; त्याप्रमाणें दृश्य वस्तु जर मीच झालों आहें, त्यामुळें आपल्याहून दृश्य वस्तु भिन्न नाहींच; तर मग दृश्यसापेक्ष द्रष्टेपणाहि सहजच उरत नाहीं; [ पण शून्य नसून भरीव ज्ञान मात्र स्वरूप उरतें ] ६२. यावर पहाणें व न पाहाणें या एतद्विवर्जित जी सहजस्थिति, प्राप्त होते तेच माझें खरोखर दर्शन होय ६३. हे अर्जुना! वाटेल त्या पदार्थाच्या भेटीमध्यें, तो क्रमयोगी द्रष्टा दृश्य या परस्परावलंबी सापेक्ष भावाहून विवर्जित, द्वैतनिरपेक्ष, सहज, अखंड असलेल्या [ दृङ्मात्र दर्शन स्थितीला ] आपल्या दृष्टीनें सदाच अनुभवीत असतो. [ तें माझें साचोकार दर्शन त्यास होतें ] ६४. आणि आकाश हें स्वस्वरूपानें ओतप्रोत सर्वव्यापक, भरून राहिलें असल्यामुळें त्याला जसें ढळणें-क्रियात्मक हालचाल मुळींच नाहीं, तसा मी जो आत्मा, तोच तो झाल्यामुळें अधिष्ठान रूपानें सर्वत्र त्याचीच व्याप्ति झाली आहे ६५. कल्पांतकाळीं पाण्यानें पाण्याला प्रतिबंध केल्यामुळें, ओतप्रोत उदकच भरल्यामुळें जसें उदकाचें वाहण्याचेच थांबतें. तसें मी जो एकमेव आत्मा त्यानें सर्व विश्व कोंदलें, व्यापिलें आहे [ त्यामुळें त्याला आत्म्यावांचून दुसरा पदार्थच उरत नाहीं, व उरेल कसा ? ] ६६. पाय आपणच आपल्यावर चढेल काय ?अग्नि स्वतः अग्नीसच लागेल कसा ?पाणी हेंच स्नानासाठीं पाण्यांतच कसें प्रवेश करील ? ] ६७. म्हणून सर्वत्र माझीच ओतप्रोत व्याप्ति झाल्यामुळें त्याचें येणें जाणें बंद पडतें व अद्वय-द्वैतरहित असा जो मी परमात्मा, त्या माझी हीच यात्रा करणें होय. [ या त्याच्या बोधांतच यात्रेचें सर्वश्रेय अंतर्भूत आहे ] ६८. तसेंच, पाण्यावरील लाट मोठ्या वेगानें जरी धांवली तरी तिनें पाण्यास सोडून भूभागीचें आक्रमण केलें, असें मात्र होत नाहीं ६९. म्हणून त्या लाटेनें जें स्थळ सोडावयाचें तें किंवा ज्या स्थलास जावयाचें तें स्थळ, चालणारा तरंग, त्याचें चालणें व ज्यानें चालावयाचें ते पाय हें सर्व एक उदकच आहे. म्हणून ११७०. ती लाट पाहिजे तितकी व हवी तिकडे धांवत गेली तरीहि हे पंडुसुता! ती उदक स्वरूपच असल्यामुळें तिची एकात्मता केव्हांहि मोडतच नाहीं ७१. त्याप्रमाणें हा भक्त सर्वतोपरी मद्रूप झाल्यावर मी [ परमात्म ] पणानें सर्वत्र भरलेला असून तो सर्वतोपरी माझ्याकडेच [मत्स्वरूपीं]आला. असें होणें,हीच कोणी माझी यात्रा, होय. त्या यात्रेनेंच तो माझा चांगल्या रीतीचा यात्रेकरूच झाला, असें समज ७२. आणि त्याचें शरिराचे स्वभाववशात् तो कांहीं एक कृत्य करण्यास बसला, कृत्य आरंभिलें तरी त्या कृत्याचे निमित्तानें मीच त्याला भेटतो ७३. हे पंडुसुता! अशा स्थितींत हें कर्म व कर्ता हा भेद जाऊन मी जो आत्मा त्याशीं एकरूप होऊन आत्मत्त्वेंकरून मला पाहिलें असतां मद्रूपच [ म्ह. पूर्वी असतोच फक्त अबोध जातो. ] होतो ७४. हें पहा, ज्याप्रमाणें आरशानें आरशाला

न पहाणें । सोनें झांकिलिया सुवर्णें । न झांकें जेवीं ॥७५॥ दीपातें दीपें प्रकाशिजे । तें न प्रकाशणेंचि निपजे । तैसें कर्म मियां कीजे । तें करणें कैंचें ?॥ ७६ ॥ कर्मही करितचि 'आहे । जें करावें हें भाष जाये । तैं न करणेंचि होये । तयाचें केलें॥७७॥ क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें । तेयाचि नांवें पूजणें । खुणेचें माझें ॥ ७८ ॥ म्हणौनि करीतयाही वोजां । तें न करणं हेंचि कपिध्वजा । निफजे तिया महापूजा । पूजी तो मातें ॥ ७९ ॥ एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥ ११८० ॥ तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा । तो असे तेचि कपिध्वजा । समाधी माझी ॥ ८१ ॥ जैसें कनकेंसीं कांकणें । असिजे अनन्यपणें । तो भक्तियोगें येणें । मजसीं तैसा ॥ ८२ उदकीं कल्लोळु । कापुरीं परिमळु । रत्नीं उजाळु । अनन्यु जैसा ॥ ८३ ॥ किंबहुना तंतूंसीं पटु । का मृत्तिकेसीं घटु । तैसा तो एकवटु । मजसीं माझा ॥ ८४ ॥ इया अनन्यसिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं । मज आपणपेंया सुमती । द्रष्टयातें जाण ॥ ८५ ॥ तिन्ही अवस्थांचेनि द्वारें । उपाध्युंपहिताकारें । भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥ ८६ ॥ तें हें आघवेंचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा । अनुभवाचा सुभटा । धेंडा तो नाचे ॥ ८७ ॥ रज्जु जालिया गोचरु । आभासतां तो व्याळाकारु । रज्जुचि ऐसा निर्धारु । होय जेवीं ॥ ८८ ॥ भांगारापरतें कांहीं । लेणें गुंजहीभरी नाहीं । हें आटुनियां ठायीं । कीजे जैसे ॥ ८९ ॥ उदका येकापरतें । तरंग नाहींचि हें निरुतें । जाणोनि तया आकारातें । न घेपे जेवीं ॥ ११९० ॥ नातरी स्वप्नविकारां समस्तां । चेऊनियां उमाणें घेतां । तो आपणयापरौता । न दिसे जैसा ॥ ९१ ॥ तैसें जें कांहीं आथी नाथी । येणें होय ज्ञेयस्फूर्ती । तें ज्ञाताचि मी हे प्रतीती । होऊनि भोगी ॥ ९२ ॥ जाणे अजु मी अजरु । अक्षयो मी अक्षरु । अपूर्वु मी अपारु । आनंदु मी ॥ ९३ ॥ अचळु मी अच्युतु । अनंतु मी अद्वैतु । आद्यु मी अव्यक्तु । व्यक्तुही मी ॥ ९४ ॥ ईश्य मी ईश्वरु । अनादि मी अमरु । अभय मी आधारु । आधेय मी ॥ ९५ ॥ स्वामी मी सदोदितु । सहजु मी सततु । सर्व मी सर्वगतु । सर्वातीतु मी ॥ ९६ ॥ नवा मी पुराणु । शून्यु मी संपूर्णु । स्थुलु मी अणु । जें

पाहिलें असतां तें न पाहणेंच होत असतें किंवा सोन्यानें सोनें झांकलें तर तें न झांकणेंच होत असतें ७५. दिव्यानें दिव्याला प्रकाशिलें असतां तें प्रकाशन न करणेंच होय, त्याप्रमाणें मद्रूप होऊन कर्म करणें, तें कर्म करणें कसें होईल ? ७६. तो कर्म करीत असतो, तरीपण मी कर्ता असून अमुक एक कर्म मला कर्तव्य आहे, असा अभिमान जेव्हां नाहींसा होतो तेव्हांच त्याचें तें सर्व करणें, न करणेंच होत असतें ७७. त्याला सर्व क्रिया मी [ मत्स्वरूप ] झाल्यामुळें, त्या सर्व क्रिया म्हणजे जे कांहींच न करणें होते व त्याचेंच नांव माझें 'खुणेचें' मार्मिकतेचे पूजन होय ७८. म्हणून हे कपिध्वजा ! तो ज्या ज्या यथासांग क्रिया करतो; तरीपण तें न करणेंच [ न केल्याप्रमाणें ] निर्माण होते. त्या महापूजेनें तो माझी पूजा करीत असतो ७९. याप्रमाणें तो जें जें बोलेल ती माझी स्तुति आहे, तो जें पाहील तें माझें दर्शन आहे तो चालेल तीच अद्वय जो मी त्या माझी यात्रा होय ११८०. हे कपिध्वजा ! तो जीं कर्में करील तीं त्या माझी पूजा होय, तो जी कल्पना करील तो माझा जप आहे व तो ज्या स्थितींत असेल तीच माझी समाधि-अवस्था होय ८१. जसें सुवर्णाशीं सुवर्णाचें कंकण सदाचेंच अभिन्न असतें, तसा तो या चौथ्या [ ज्ञानलक्षणात्मक ] भक्तियोगानें माझ्याशीं नेहमीं अनन्य-अभिन्न असतो ८२. पाण्यांत जशी लाट, कापुराचे ठिकाणीं जसा परिमळ व रत्नाचे ठिकाणीं जसें तेज भिन्न नाहीं ८३. फार काय सांगावें ! ! जसा तंतूंशीं पट, किंवा मृत्तिकेशीं जसा घट नेहमीं ऐक्यरूपानें असतो, तसा तो माझा भक्त नेहमीं माझ्याशीं अभिन्न-ऐक्यरूप असतो ८४. अर्जुना ! या एकनिष्ठ, स्वयंसिद्ध, अशा अभेद भक्तीच्या योगानें, या यच्चयावत् दृश्यमात्रांमध्यें तो ज्ञानी भक्त [ दृश्यत्वादि नामरूपाचा बाध करून, त्यास अधिष्ठानस्वरूप जो मी द्रष्टा ] त्या मला-द्रष्ट्याला आत्मत्वानें जाणतो ८५. [ जागृति, स्वप्न व सुषुप्ति या ] तिन्ही अवस्थांच्या द्वारानें स्थूल, सूक्ष्म व कारण ] या तीन उपाधींच्या व [ विश्व, तेजस व प्राज्ञ या ] तीन उपहितांच्या आकारानें-रूपानें, भावरूपानें [ जागृति-स्वप्न या उभयावस्थेंत वा कार्य वर्गांत 'आहेपणानें' ] व अभावरूपानें [ सुषुप्त्यवस्थेंत, अव्यक्त, कारणरूपानें 'नाहींपणानें' ] जे कांहीं स्फुरते म्ह. प्रत्ययास येतें तें [ सर्व कार्यात्मक अखिल विश्व आणि तत् कारण अज्ञान हीं चिद्भास्य, साक्षीभास्य असल्यामुळें ] दृश्य आहे ८६. हे सुमते अर्जुना ! तें हें सर्वच [ अधिष्ठानरूपानें ] मी द्रष्टा आहे, अशा या बोधाच्या [ अपरोक्षानुभूतीच्या ] भरांत तो ज्ञानी भक्त जणुं अनुभवाचा धेंडा होऊनच नाचूं लागतो ८७. दोर आपल्या स्वरूपानें दृष्टीस पडल्यावर त्यावर भासणारा सर्पाकार [ बाधित होऊन ] तत्त्वतः दोरच आहे, असा जसा निश्चय होतो ८८. अलंकार हे सोन्याहून वेगळे, असें गुंजभरसुद्धां नाहींत [ सुवर्णाहून स्वतंत्र अशीं अलंकारास सत्ता नाहीं ] असा दृढ-निश्चय अलंकार आटून केला जातो [ वा तसा विचार केला म्हणजे सर्व अलंकाराची आटणी झाल्यासारखीच होते ] ८९. पाण्यावर येणारे तरंगांत एका उदकाविरहित दुसरें कांहींच नाहीं, असें पक्कें समजून त्यांच्या आकाराला जो [स्वतंत्र अस्तित्व नसल्याचें जाणून] भुलत नाहीं ११९०. अथवा जसें स्वप्नांतील पाहिलेल्या सर्व विकारांची-व्यवहारांची जागे झाल्यावर मोजमाप पाहूं गेलें असतां त्यास आपलेविरहित दुसरें कांहींहि अनुभवास येत नाहीं ९१. तसें [ व्यवहारांत ] आहे व नाहीं, या रूपानें [ भावाभावरूपानें ] जी कांहीं ज्ञेयाची स्फूर्ति होते व ती सर्व मीच,-ज्ञाताच आहे, अशी प्रत्यक्षानुभूति येऊन, तो भक्त त्याचा उपभोग घेत असतो ९२. मी अनुत्पन्न स्वरूपाचा, जन्मरहित आहें. मी जराराहित आहें, मी नाशरहित आहे, मी व्ययरहित, मी ज्याच्या पूर्वी कांहीं नाहीं असा आहे, मी अनंत आहे व आनंदमय असा आहे, असें समजतो ९३. मी न चळणारा, स्वस्वरूपापासून च्युत न होणारा, त्रिविध परिच्छेदरहित अद्वैत, सर्वांचा मूळ आद्यकारण; निराकार आहे व साकारहि मीच आहें ९४. मी ज्याचें नियमन करावयाचें ते नियम्य, सर्वांचा नियामक उत्पत्तिरहित अमर, अभय, सर्वांचा आधार आहे व त्यावरील आधेय, आश्रित असणारे सर्वहि मीच आहें ९५. मी सर्वांचा अधिपति व सदाच असणारा सहज व सतत सर्वव्यापी आहें व सर्वत्र अधिष्ठान रूपानें भरून असणारा आणि सर्वांच्या पलीकडला असाहि मीच आहें ९६. सर्वांत नवा व जुना आहे, अत्यंत निर्विशेष व संपूर्ण मीच आहें, सर्वांहून मोठा व ज्यापक अणुरेणू-

१ करीत असून. २ त्याचेंच नांव. ३ रीतीनें, निमित्तानें. ४ सोन्याशीं कंकणानें. ५ कांति, तेज. ६ या अद्वैती भक्तीनें.

७ जागृती, स्वप्न व सुषुप्ति. ८ उपाधि व उपाधियुक्त क्षेत्र व क्षेत्रज्ञ या रूपांनीं, व शरीर व शरीराचा चालक यांच्या योगानें.

कांहीं तें मी ॥९७॥ अक्रियु मी येक्कु । असंगु मी अशोकु । व्यापु मी व्यापकु । पुरुषोत्तमु मी ॥ ९८ ॥ अशब्दु मी अश्रोत्रु । अरूपु मी अगोत्रु । समु मी स्वतंत्रु । ब्रह्म मी परु ॥ ९९ ॥ ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें । आणि याही बोधा जाणतें । तेंही मीचि जाणें ॥ १२०० ॥ पैं चेइलेयांनंतरें । आपुलें एकपण उरे । तेंही तोंवरी स्फुरे । तयाशींचि जैसें ॥ १ ॥ कां प्रकाशतां अर्कु । तोचि होय प्रकाशकु । तयाही अभेदा द्योतकु । तोचि जैसा ॥ २ ॥ तैसा वेद्यांच्या विलयीं । केवळ वेदकु उरे पाहीं । तेणें जाणवें तया तेंही । हेंही जो जाणे ॥ ३ ॥ तया अद्वयपणा आपुलिया । जाणती ज्ञप्ती जे धनंजया । ते ईश्वरचि मी हे तया । बोधासि ये ॥ ४ ॥ मग द्वैताद्वैतांतीत । मीचि आत्मा एकु निभ्रांत । हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ॥ ५ ॥ तेथ चेइलियां येकपण । दिसे जे आपुलया आपण । तेंही जातां नेणों कोण । होइजे जेवीं ॥ ६ ॥ कां डोळां देखतिये क्षणीं । सुवर्णपण सुवर्णीं । नाटितां होय आटणी । अळंकाराचीही ॥ ७ ॥ नाना लवण तोयें होये । मग क्षारता तोयत्वें राहे । तेही जिरतां जेवीं जाये । जालेपण तें ॥ ८ ॥ तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं ॥ ९ ॥ आणि तो हे भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं ॥ १२१० ॥ जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे । मग उभयंतातीत उरे । आकाश जेवीं ॥ ११ ॥ कां धाडलिया एका एकु । वाढे तो शून्य विशेखु । तैसा आहे नाहींचा शेखु । मीचि मग आथी ॥ १२ ॥ तेथ ब्रह्मा आत्मा ईशु । या बोला मोडे सौरसु । न बोलणें याही पैसु । नाहीं तेथ ॥ १३ ॥ न बोलणेंहीं न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरुनी । जाणिव नेणिव नेणोनि । जाणिजे तें ॥ १४ ॥ तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें । सुखावरी नुसधें । सुखचि भोगिजे ॥ १५ ॥ तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा । विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥१६॥ शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांति आला । अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें ॥१७॥ किंबहुना ऐसें निखळ । मीपण जोडे तया फळ । सेवूनि वेली वेल्हाळ । क्रमयोगाची ते ॥ १८ ॥ पैं क्रमयोगिया किरीटी । चक्रवर्तीच्या

हून लहान-सूक्ष्म जें कांहीं आहे तें मी आहें ९७. मी क्रियारहित व स्वगतादि भेदरहित आहें, मी संगरहित व शोकरहित आहें, व्याप्य व व्यापक मी आहें कार्यकारणोपाधिरहित उत्तम पुरुष मी आहें ९८. मी शब्दातीत व कर्णरहित आहे, मी रूपरहित, कुळ-गोत्ररहित आहे, मी सर्वत्र सारखा-समव्याप्त व स्वतंत्र आहे, सर्वांहून श्रेष्ठ जें परब्रह्म तेंहि मीच आहें ९९. अशा मला एकाला अद्वयभक्तिद्वारां आत्मत्वानें, यथार्थ-पणानें [ द्वैतनिरपेक्ष एकत्वानें ] जाणतो व याहि बोधाला जाणणारा [ उपजीव्यभूत स्वयंप्रकाश असा ] जो मी परमात्मा, तोही आपणच आहें असें तो समजतो १२००. मग जसें स्वप्नांतून जागें झाल्यावर [ स्वप्नांतील अनेकता जाऊन ] आपलें जें एकत्व उरतें व हेंहि जसें ज्याचें त्यालाच कांहीं वेळपर्यंत स्फुरत असतें १. सूर्य स्वतः प्रकाशरूप असून तोच स्वतःचा प्रकाश होतो आणि प्रकाशक प्रकाश्य या दोहोंमधील अभेदहि दाखविणारा तोच असतो [ त्याच्या कडूनच अभेदहि जाणला जातो ] २. तसा वेद्याचा, ज्ञेयाचा-जाण्यास योग्य वस्तूचा विलय झाला असतां केवळ वेदक-द्रष्टा-ज्ञाता-जाणारा उरतो, हेंहि ज्याच्या प्रकाशाच्या साह्यानें जाणलें जाते तोहि मीच आहें. असें जो समजतो ३. त्याला अर्जुना ! आपल्या अद्वयपणास-अभेदपणास जाणणारें जें ज्ञप्तिमात्र [ उपजीव्यभूत ज्ञानकला ] स्वरूप आहें, तोच ईश्वर आहे, तोच मीहि आहें, हे त्याचें प्रत्ययास येते ४. द्वैत व अद्वैत या [ सापेक्ष भावांहून ] पलीकडील जो एकमेवाद्वितीय आत्मा आहे, तो निःसंशय मीच आहें असें समजून मग तें ज्ञानहि तेथेंच [ त्या अनुभूतींतच ] विलीन होतें ५. तेव्हां जागें झाल्यावर जें आपल्याला आपलें एकपण-स्वरूप जसें दिसतें, तेंहि नाहींसें होऊन कोणती स्थिति प्राप्त होते तेंहि जसें कांहीं कळत नाहीं ६. किंवा सोन्याचे अलंकाराकडे सोनेंपणाच्या दृष्टीनें पाहातांक्षणींच अलंकाराची आटणी न करतांहि आटणी केल्याप्रमाणेंच होतें ७. अथवा पाण्याच्या संबंधानें मिठाचें पाणी होतें, परंतु त्या मिठाचा खारटपणा पाण्याच्यारूपानें रहातो; तोहि खारटपणा जिरून गेल्यावर हे मीठाचें पाणी झालें असा व्यवहारहि जसा संपलेला असतो ८. तसा पूर्वी मी देव व तो भक्त हा भेद असतो, तोहि पूर्ण स्वानंदानुभवाच्या ऐक्यानें एकत्र कालवून माझ्याच स्वरूपीं प्रवेश करतो ९. आणि 'तो' ही भाषा जेथें नाहींशी होते, तेथें तत्सापेक्ष 'मी' हा शब्द तरी कोठें व कोणाच्या अपेक्षेनें उरणार ? असा जेथें मीहि नाहीं व तोहि नाहीं जसें जें माझें रूप, त्या माझ्या स्वरूपीं तो ऐक्यरूपानें सामावतो १२१०. कापूर जाळण्याचा संपतांक्षणींच जशी अग्नीचीहि समाप्ति होतें व मग कापूर व अग्नि या उभयांहून भिन्न जें आकाश तेंच एकमात्र उरतें ११. किंवा एकांतून एक वजा केला असतां बाकी जशी केवळ शून्य उरते, तसा आहे व नाहीं या सापेक्ष भावाची वजाबाकी केली असतां बाकी जें उर्वरित राहतें तें मीच आहें १२. अशा स्थितींत हें एक ब्रह्म, हा एक आत्मा, हा एक ईश्वर, अशा शब्दाला- बोलण्याला अवकाशच रहात नाहीं, व तत्सापेक्ष कांहीं न बोलणें यालाहि तेथें आवकाश रहात नाहीं १३. न बोलणें हेंहि न बोलून मग तें तोंडभरून बोलावे, तसें जाणीव-ज्ञान व नेणीव-अज्ञान या दोन्हींचें भान [ कल्पना ] टाकून तें [ दृङ्मात्र स्वरूप ] आहे असें जाणावें १४. तशा स्थितींत बोधानेंच बोध जाणावा, आनंदानेंच आनंद भोगावा आणि सुखानेंच केवळ सुखाचा अनुभव घ्यावा १५. तसेंच लाभाला लाभाची प्राप्ति झाली, प्रभा ही प्रभेकडूनच आलिंगिली गेली व आश्चर्यांत आश्चर्यच उभेच्या उभेंच बुडालें १६. शम शमाला प्राप्त झाला, विश्रामहि विश्रांतीस आला व अनुभव हा अनुभवानेंच वेडा झाला [ संकोच पावला ] १७. फार काय सांगावें ! ! असें शुद्ध मीपण, हेंच कोणी फळ तें त्या क्रमयोग्याला क्रमयोगाच्या सुंदर विस्तारलेल्या वेलीचें सेवन केल्यामुळें [ क्रमयोगानुष्ठानामुळें ] [ मद्रूप प्राप्तीचें सुंदर फळ ] मिळालें १८. हे किरीटी ! क्रमयोगरूपी

१ क्रियारहित. २ शब्दातीत. ३ सत्यतेनें. ४ जागृतीनंतर. ५ सूर्यच स्वतःला प्रकाशक व प्रकाशित. ६ दर्शक. ७ जाणण्यायोग्य पदार्थाच्या नाशानंतर. ८ जाणणारा. ९ ज्ञानकला. १० दोहोंच्याहि पलीकडे. ११ जागें झाल्यावर. १२ आटविल्यावांचून. १३ मीठ पाणी होऊन जातें. १४ निजानंदाचे भरांत एकत्र होऊन. १५ शब्द बोली. १६ नाहींसा होतो. १७ दोहींहून भिन्न. १८ गोडी, प्रेम, अभिप्राय. १९ अवकाश. २० जाणावा. २१ सुखावर सुख लोळतें. २२ प्रभेनें, प्रकाशानें २३ नवल, आश्चर्य. २४ विश्रांति पावला. २५ गोंधळला, भ्रमला, संकल्प पावला.

कांहीं तें मी ॥९७॥ अक्रियु मी येकु । असंगु मी अशोकु । व्यापु मी व्यापकु । पुरुषोत्तमु मी ॥ ९८ ॥ अशब्दु मी अश्रोत्रु । अरूपु मी अगोत्रु । समु मी स्वतंत्रु । ब्रह्म मी परु ॥ ९९ ॥ ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें । आणि याही बोधा जाणतें । तेंही मीचि जाणें ॥ १२०० ॥ पैं चेइलेयांनंतरें । आपुलें एकपण उरे । तेंही तोंवरी स्फुरे । तयाशींचि जैसें ॥ १ ॥ कां प्रकाशतां अर्कु । तोचि होय प्रकाशकु । तयाही अभेदा द्योतकु । तोचि जैसा ॥ २ ॥ तैसा वेद्यांच्या विलयीं । केवळ वेदकु उरे पाहीं । तेणें जाणवें तया तेंही । हेंही जो जाणे ॥ ३ ॥ तया अद्वयपणा आपुलिया । जाणती ज्ञप्ती जे धनंजया । ते ईश्वरचि मी हे तया । बोधासि ये ॥ ४ ॥ मग द्वैताद्वैतांतीत । मीचि आत्मा एकु निभ्रांत । हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ॥ ५ ॥ तेथ चेइलियां येकपण । दिसे जे आपुलया आपण । तेंही जातां नेणों कोण । होइजे जेवीं ॥ ६ ॥ कां डोळां देखतिये क्षणीं । सुवर्णपण सुवर्णीं । नाटितां होय आटणी । अळंकाराचीही ॥ ७ ॥ नाना लवणें तोयें होये । मग क्षारता तोयत्वें राहे । तेही जिरतां जेवीं जाये । जालेपण तें ॥ ८ ॥ तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं ॥ ९ ॥ आणि तो हे भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं ॥ १२१० ॥ जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे । मग उभयंतातीत उरे । आकाश जेवीं ॥ ११ ॥ कां धाडलिया एका एकु । वाढे तो शून्य विशेखु । तैसा आहे नाहींचा शेखु । मीचि मग आथी ॥ १२ ॥ तेथ ब्रह्म आत्मा ईशु । या बोला मोडे सौरसु । न बोलणें याही पैसु । नाहीं तेथ ॥ १३ ॥ न बोलणेंहीं न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरुनी । जाणिव नेणिव नेणोनि । जाणिजे तें ॥ १४ ॥ तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें । सुखावरी नुसधें । सुखचि भोगिजे ॥ १५ ॥ तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा । विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥१६॥ शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांति आला । अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें ॥१७॥ किंबहुना ऐसें निखळ । मीपण जोडे तया फळ । सेवूनि वेली वेल्हाळ । क्रमयोगाची ते ॥ १८ ॥ पैं क्रमयोगिया किरीटी । चक्रवर्तीच्या

हून लहान-सूक्ष्म जें कांहीं आहे तें मी आहें ९७. मी क्रियारहित व स्वगतादि भेदरहित आहें, मी संगरहित व शोकरहित आहें, व्याप्य व व्यापक मी आहें कार्यकारणोपाधिरहित उत्तम पुरुष मी आहें ९८. मी शब्दातीत व कर्णरहित आहे, मी रूपरहित, कुळ-गोत्ररहित आहे, मी सर्वत्र सारखा-समव्याप्त व स्वतंत्र आहे, सर्वांहून श्रेष्ठ जें परब्रह्म तेंहि मीच आहें ९९. अशा मला एकाला अद्वयभक्तिद्वारां आत्मत्वानें, यथार्थ-पणानें [ द्वैतनिरपेक्ष एकत्वानें ] जाणतो व याहि बोधाला जाणणारा [ उपजीव्यभूत स्वयंप्रकाश असा ] जो मी परमात्मा, तोही आपणच आहें असें तो समजतो १२००. मग जसें स्वप्नांतून जागें झाल्यावर [ स्वप्नांतील अनेकता जाऊन ] आपलें जें एकत्व उरतें व हेंहि जसें ज्याचें त्यालाच कांहीं वेळपर्यंत स्फुरत असतें १. सूर्य स्वतः प्रकाशरूप असून तोच स्वतःचा प्रकाश होतो आणि प्रकाशक प्रकाश्य या दोहोंमधील अभेदहि दाखविणारा तोच असतो [ त्याच्या कडूनच अभेदहि जाणला जातो ] २. तसा वेद्याचा, ज्ञेयाचा-जाण्यास योग्य वस्तूचा विलय झाला असतां केवळ वेदक-द्रष्टा-ज्ञाता-जाणारा उरतो, हेंहि ज्याच्या प्रकाशाच्या साह्यानें जाणलें जाते तोहि मीच आहें. असें जो समजतो ३. त्याला अर्जुना! आपल्या अद्वयपणास-अभेदपणास जाणणारें जें ज्ञप्तिमात्र [ उपजीव्यभूत ज्ञानकला ] स्वरूप आहें, तोच ईश्वर आहे, तोच मीहि आहें, हे त्याचें प्रत्ययास येते ४. द्वैत व अद्वैत या [ सापेक्ष भावांहून ] पलीकडील जो एकमेवाद्वितीय आत्मा आहे, तो निःसंशय मीच आहें असें समजून मग तें ज्ञानहि तेथेंच [ त्या अनुभूतींतच ] विलीन होतें ५. तेव्हां जागें झाल्यावर जें आपल्याला आपलें एकपण-स्वरूप जसें दिसतें, तेंहि नाहींसें होऊन कोणती स्थिति प्राप्त होते तेंहि जसें कांहीं कळत नाहीं ६. किंवा सोन्याचे अलंकाराकडे सोनेंपणाच्या दृष्टीनें पाहातांक्षणींच अलंकाराची आटणी न करतांहि आटणी केल्याप्रमाणेंच होतें ७. अथवा पाण्याच्या संबंधानें मिठाचें पाणी होतें, परंतु त्या मिठाचा खारटपणा पाण्याच्यारूपानें रहातो; तोहि खारटपणा जिरून गेल्यावर हे मीठाचें पाणी झालें असा व्यवहारहि जसा संपलेला असतो ८. तसा पूर्वी मी देव व तो भक्त हा भेद असतो, तोहि पूर्ण स्वानंदानुभवाच्या ऐक्यानें एकत्र कालवून माझ्याच स्वरूपीं प्रवेश करतो ९. आणि 'तो' ही भाषा जेथें नाहींशी होते, तेथें तत्सापेक्ष 'मी' हा शब्द तरी कोठें व कोणाच्या अपेक्षेनें उरणार? असा जेथें मीहि नाहीं व तोहि नाहीं जसें जें माझें रूप, त्या माझ्या स्वरूपीं तो ऐक्यरूपानें सामावतो १२१०. कापूर जाळण्याचा संपतांक्षणींच जशी अग्नीचीहि समाप्ति होतें व मग कापूर व अग्नि या उभयांहून भिन्न जें आकाश तेंच एकमात्र उरतें ११. किंवा एकांतून एक वजा केला असतां बाकी जशी केवळ शून्य उरते, तसा आहे व नाहीं या सापेक्ष भावाची वजाबाकी केली असतां बाकी जें उर्वरित राहतें तें मीच आहें १२. अशा स्थितींत हें एक ब्रह्म, हा एक आत्मा, हा एक ईश्वर, अशा शब्दाला- बोलण्याला अवकाशच रहात नाहीं, व तत्सापेक्ष कांहीं न बोलणें यालाहि तेथें आवकाश रहात नाहीं १३. न बोलणें हेंहि न बोलून मग तें तोंडभरून बोलावे, तसें जाणीव-ज्ञान व नेणीव-अज्ञान या दोन्हींचें भान [ कल्पना ] टाकून तें [ दृङ्मात्र स्वरूप ] आहे असें जाणावें १४. तशा स्थितींत बोधानेंच बोध जाणावा, आनंदानेंच आनंद भोगावा आणि सुखानेंच केवळ सुखाचा अनुभव घ्यावा १५. तसेंच लाभाला लाभाची प्राप्ति झाली, प्रभा ही प्रभेकडूनच आलिंगिली गेली व आश्चर्यांत आश्चर्यच उभेच्या उभेंच बुडालें १६. शम शमाला प्राप्त झाला, विश्रामहि विश्रांतीस आला व अनुभव हा अनुभवानेंच वेडा झाला [ संकोच पावला ] १७. फार काय सांगावें!! असें शुद्ध मीपण, हेंच कोणी फळ तें त्या क्रमयोग्याला क्रमयोगाच्या सुंदर विस्तारलेल्या वेलीचें सेवन केल्यामुळें [ क्रमयोगानुष्ठानामुळें ] [ मद्रूप प्राप्तीचें सुंदर फळ ] मिळालें १८. हे किरीटी! क्रमयोगरूपी

१ क्रियारहित. २ शब्दातीत. ३ सत्यतेनें. ४ जागृती-नंतर. ५ सूर्यच स्वतःला प्रकाशक व प्रकाशित. ६ दर्शक. ७ जाणण्यायोग्य पदार्थांच्या नाशानंतर. ८ जाणणारा. ९ ज्ञानकला. १० दोहोंच्याहि पलीकडे. ११ जागें झाल्यावर. १२ आटविल्यावांचून. १३ मीठ पाणी होऊन जातें. १४ निजानंदाचे भरांत एकत्र होऊन. १५ शब्द बोली. १६ नाहींसा होतो. १७ दोहींहून भिन्न. १८ गोडी, प्रेम, अभिप्राय. १९ अवकाश. २० जाणावा. २१ सुखावर सुख लोळतें. २२ प्रभेनें, प्रकाशानें २३ नवल, आश्चर्य. २४ विश्रांति पावला. २५ गोंधळला, भ्रमला, संकल्प पावला.

मुकुटीं । मी चिद्रत्न तें सोटोवाटीं । होय तो माझा ॥ १९ ॥ कीं क्रमयोग-प्रासादाचा । कळसु जो हा मोक्षाचा । तयावरील अवकाशाचा । उँवावो जाला तो ॥ १२२० ॥ नाना संसार आँडवीं । क्रमयोग वाट बरवी । जोडिली ते मदैक्यगांवीं । पैठी जालीसे ॥ २१ ॥ हें असो क्रमयोगबोधें । तेणें भक्तिचिद्गंगें । मी स्वानंदोदधी वेगें । ठाकिला कीं गा ॥ २२ ॥ हा ठायवरी सुवर्मा । क्रमयोगीं आहे महिमा । म्हणौनि वेळोवेळां तुम्हां । सांगतों आम्ही ॥ २३ ॥ पैं देशें काळें पदार्थें । सांधूनि घेइजे मातें । तैसा नव्हे मी आयतें । सर्वांचें सर्वही ॥ २४ ॥ म्हणौनि माझ्या ठायीं । जाँचावें नें लगे कांहीं । मी लाभें इयें उपायीं । साचचि गा ॥ २५ ॥ एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ॥ २६ ॥ अगा वसुंधेच्या पोटीं । निधान सिद्ध किरीटी । वन्हि सिद्ध काष्ठीं । वोहां दूध ॥ २७ ॥ परी लाभें तें असतें । तया कीजे उपायातें । येर सिद्धचि तैसा तेथें । उपायीं मी ॥ २८ ॥ हा फळेंहीवरी उपावो । कां पां प्रस्तावीतसे देवो । हे पुसतां परी अभिप्रावो । येथिंचा ऐसा ॥ २९ ॥ जें गीतार्थाचें चांगावें । मोक्षोपायपर आघवें । आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध ॥ १२३० ॥ वारा आभाळाचि फेडी । वांचूनि सूर्यातें न घडी । कां हातु बाबुळी धाडी । तोय न करी ॥ ३१ ॥ तैसा आत्मदर्शनीं आडळु । असे अविद्येचा जो मळु । तो शास्त्र नाशी येरु निर्मळु । मी प्रकाशें स्वयें ॥ ३२ ॥ म्हणौनि आघवींचि शास्त्रें । अविद्याविनाशाचीं पात्रें । वांचोनि न होतीं स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥ ३३ ॥ तया अध्यात्म-शास्त्रांसीं । जैं साचपणाची ये पुसी । तैं येइजे जया ठायासी । ते हे गीता ॥ ३४ ॥ भानुभूषिता प्राचिया । सतेजा दिशा आघविया । तैसी शास्त्रेश्वरा गीता या । सनाथें शास्त्रें ॥ ३५ ॥ हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागां उपाय बहुवे विस्तारें । सांगितला जैसा करें । घेवों ये आत्मा ॥ ३६ ॥ परी प्रथम-श्रवणासवें । अर्जुना विपायें हें फावे । हा भावो सकणवे । धरूनि श्रीहरी ॥ ३७ ॥ तेंचि प्रमेय एक वेळ । शिष्यीं होआवया अढळ । सांगतसे मुकुल । मुद्रा आतां ॥ ३८ ॥ आणि प्रसंगें गीता । ठावोही हा संपता । म्हणौनि दावी आद्यंता । एकार्थत्व ॥ ३९ ॥ जे ग्रंथाच्या मध्यभागीं । नाना अधिकार-

चक्रवर्ती जो भक्त त्याच्या मुकुटावर असणारें जें ज्ञानरूप रत्न तें मीच शोभतो व तसाच त्या मोबदल्यांत माझें मुकुटावर तो रत्न म्हणून शोभतो १९. किंवा कर्मयोगरूपी देवळाचा हा जो मोक्षरूपी कळस आहे, त्या कळसावरील अवकाशाचा विस्तार तोच होतो १२२०. अथवा संसाररूपी अरण्यांतील क्रमयोगरूपी चांगला राजमार्ग मिळाला व तो मार्ग माझ्या ऐक्यरूपी गांवांत प्रविष्ट झाला आहे २१. हें राहूं दे. क्रमयोगरूपी ओघानें 'भक्ति-चिद् गंगा' ज्ञानलक्षणात्मक भक्तिरूपी गंगा ही अतिवेगानें स्वानंदरूपी समुद्र जो मी, त्या मलाच येऊन गाठते-मद्रूप होते २२. हे मर्मज्ञ अर्जुना! असा या क्रमयोगाचा एवढा मोठा महिमा आहे म्हणून आम्ही या क्रमयोगाचें वर्णन तुझ्याजवळ वारंवार करितों २३. परंतु योग्य देश, योग्य काल व योग्य पदार्थ यांच्या विशेष अनुकूलतेनें मला साध्य करून घेतां येईल, एव्हवीं नाहीं, असा मी नाहीं. कारण, मीच सर्वांचा आत्मा असल्यामुळें स्वतः सिद्ध सर्वांचे सर्वेहि मीच असल्यानें सहज सदाच प्राप्त आहेच २४. म्हणून माझ्या प्राप्तीकरितां कांहीं शिणावें लागत नाहीं. मी या क्रमयोग उपायानें खरोखरच सहज निश्चितपणें प्राप्त होतों २५. एक गुरु व एक शिष्य असा हा जो संप्रदाय खरोखर अनादि असून प्रसिद्धीस आला आहे. तो माझ्या प्राप्तीचा उचित उपाय समजण्याकरितांच होय २६. अरे अर्जुना! पृथ्वीच्या पोटांत द्रव्य-ठेवा आयता सिद्ध आहे, तसाच काष्ठांत अग्नि आयताच आहे व कांसेंत दूध आयतेच आहे, या सर्व गोष्टी पूर्व सिद्ध आहेत २७. परंतु विचारपूर्वक पाहिलें तर या गोष्टी जरी पूर्वसिद्ध आहेत; तरीपण त्या सिद्धवस्तूचा लाभ होण्याकरितां कांहीं उपाय करावे लागतातच. त्याप्रमाणें मीहि स्वतःसिद्ध आहे हें खरें; तरीपण मत्स्वरूप प्राप्त्यर्थ [ फक्त माझ्या आड येणारे पदार्थ दूर करण्यासच ] उपाय केले पाहिजेत २८. ही फलप्राप्ति सांगितल्यानंतरहि पुनः ही उपाय सांगण्याची प्रस्तावना [सूतोवाच] देव कां करीत आहेत, अशी जर कोणी या ठिकाणीं शंका घेईल तर देवाच्या बोलण्याचा अभिप्राय असा आहे २९. कारण, फक्त संपूर्ण गीताशास्त्राचेंच सामर्थ्य असें आहे कीं, जें मोक्षप्राप्तीचें साधन प्राप्त करून देणारे आहे, हा गीतार्थांतील महत्त्वपूर्ण चांगुलपणा. आहे दुसरी कितीहि शास्त्रें असली, तरी तीं प्रमाणसिद्ध मोक्षोपाय सांगणारी नाहींत १२३०. वारा सूर्याचे आड आलेलें ढग दूर-नाहींसे करतो. त्याविना तो नवा सूर्य उत्पन्न करीत नाहीं; किंवा हात पाण्यावर आलेलें गोंडाळ दूर करतो, नवें पाणी उत्पन्न करीत नाहीं, कारण, तें स्वतःसिद्धच आहे, ३१. त्याचप्रमाणें आत्मदर्शनाचे आड आलेला प्रतिबंधक असा जो अविद्येचा मळ म्ह० आवरणरूप प्रतिबंध आहे, तो गीता इत्यादि शास्त्रें नाहींसा करतात एवढेंच. त्याशिवाय मी जो स्वयंप्रकाश निर्मळ असा आहे, त्या माझें आत्मस्वरूप त्यास प्रकाशित करवत नाहीं. कारण, ते स्वतःसिद्ध स्वयंप्रकाशानेंच प्रकाशित-अभिव्यक्त होतें ३२. म्हणून सर्वच शास्त्रें ही अविद्येचा नाश करण्यास मात्र योग्य आहेत त्याविना तीं स्वतःसिद्ध आत्मस्वरूपाचा बोध करून देण्यास स्वतंत्र नाहींत ३३. त्या अध्यात्म ज्ञानप्रतिपादक शास्त्रांना जेव्हां त्यांच्या सत्यत्वाविषयीं प्रमाण काय आहे? असा प्रश्न विचारण्यांत येतो तेव्हां तीं आपला खरेपणा सिद्ध करून दाखविण्याकरितां प्रमाण म्हणून बोट दाखवितात तें हें गीताशास्त्रच होय ३४. सूर्यानें पूर्वदिशा अलंकृत झाली असतां जशा इतर सर्व दिशा प्रकाशमय होतात, त्याप्रमाणें सर्व शास्त्रांना आधारभूत जी शास्त्रश्रेष्ठ गीता, तिच्या योगानें बाकीचीं सर्व शास्त्रें सनाथ झालीं आहेत. ३५. हें असूं द्या! या गीतारूपी शास्त्रेश्वरानें-श्रेष्ठ शास्त्रानें मागील अध्यायांत पुष्कळ उपाय विस्तारानें सांगितलें आहेत कीं, ज्या उपायानें आत्मा आपल्याला हातानें घेतां येईल ३६. परंतु प्रथम-सकृत् श्रवणाबरोबर एकदांच ऐकल्यानें अर्जुनाला हें क्वचितच कळेल [ म्हण होईल न होईल ] हा भाव-अभिप्राय कळकळीनें करुणावंत श्रीहरींनीं मनांत धरून ३७. तोच सिद्धांत अर्थ शिष्याच्या अंतःकरणांत पूर्णपणें दृढ होण्याकरितां श्रीकृष्ण आतां मोकळ्या मनानें थोडक्यांत पुनः एकवेळ सांगत आहेत ३८. आणखी आतां गीता समाप्त होण्याचा प्रसंग ओघानेंच आलेला आहे, म्हणून उपक्रमोपसंहाराची एकरूपता साधण्याकरितां म्ह. गीतेंत आरंभापासून शेवटपर्यंत एकाच अर्थाचें प्रतिपादन केलें आहे, असें दाखवित आहेत ३९. किंवा ग्रंथाच्या मध्यंतरीं निरनिराळ्या अधिकार प्रसंगानें भिन्नभिन्न अनेक सिद्धांत मांडून प्रतिपादन केलें

१ चैतन्य-ज्ञानरूप रत्न. २ अदलाबदलीनें, मोबदल्यानें. ३ अवकाश, विस्तार. ४ अरण्यांत. ५ माझ्याशीं जें ऐक्य तद्रूप गांवांत. ६ प्रविष्ट. ७ भक्तिरूपचिद्गंगेनें. ८ निजानंदरूप समुद्र. ९ एथपर्यंत. १० मर्मज्ञा अर्जुना. ११ आपलासा करून. १२ शिणावें लागत नाहीं. १३ ह्या क्रमयोगानें. १४ पृथ्वीच्या. १५ कांसेंत. १६ फलप्राप्तीपर्यंत. १७ सामर्थ्य.

प्रसंगीं । निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ॥ १२४० ॥ तरी तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत । हें पूर्वापर नेणत । कोण्ही जैं मानी ॥ ४१ ॥ तैं महासिद्धांताचा आंवांका । सिद्धांतकक्षा अनेका । भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे ॥ ४२ ॥ एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादानं फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ ४३ ॥ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारीं । तें आतां दोहीं अक्षरीं । अनुवादावें ॥ ४४ ॥ म्हणौनि उपेयंही होतीं । जाल्यां उपायस्थिती । देव प्रवर्तले तें पुढेंती । येणेंचि भावें ॥ ४५ ॥

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः । मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

मग म्हणे गा सुभटा । तो क्रमयोगिया निष्ठा । मी होउनी होय पैठा । माझ्या रूपीं ॥ ४६ ॥ स्वकर्माच्या चोखौळीं । मज पूजा करूनि भलीं । तेणें प्रसादें आकळी । ज्ञाननिष्ठेतें ॥ ४७ ॥ ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे । तिया भजन समरसें । सुखिया होय ॥ ४८ ॥ आणि विश्वप्रकाशितया । आत्मया मज आपुलिया । अनुसरे जो करूनियां । सर्वत्रता हे ॥ ४९ ॥ सांडूनि आपुला आडळ । लवण आश्रयी जळ । का हिंडोनि राहे निश्चळ । वायु व्योमीं ॥ १२५० ॥ तैसा बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्रऊनि ठाये । तो निषिद्धेंही विपायें । कर्मे करूं ॥ ५१ ॥ परी गंगेच्या संबंधीं । बिदी आणि महानदी । एक तेवीं माझ्या बोधीं । शुभाशुभांसी ॥ ५२ ॥ का बावनें आणि धुरें । हा निवाडु तंवचि सरे । जंव न घेपती वैश्वानरें । कवळूनि दोन्ही ॥ ५३ ॥ ना पांचिकें आणि सोळें । हें सोनया तंवचि आलें । जंव परिसु आंगमेळें । एकवटीना ॥ ५४ ॥ तैसें शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे । जंव येकु न प्रकाशें । सर्वत्र मी ॥ ५५ ॥ अगा रात्री आणि दिवो । हा तंवचि द्वैतभावो । जंव न रिगिजे गांवो । गभस्तीचा ॥ ५६ ॥ म्हणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्व कर्मे किरीटी । जाऊनि बैसे तो पाटीं । सायुज्याच्या ॥ ५७ ॥ देशें काळें स्वभावें । वेंचु जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो ॥ ५८ ॥ किंबहुना पंडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पविजतां । लाभु कवणु असे ॥ ५९ ॥

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः । बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

याकारणें गा तुवां इया । सर्व कर्मा आपुलिया । माझ्या स्वरूपीं धनंजया ।

॥ ४ ॥ म्हणौनि मी होऊनि मातें। सेवणें आहे आयितें। तें करीं हातां येतें। ज्ञानें येणें ॥५॥ मग ताकौनियां काढिलें। लोणी मागौतें ताकीं घातलें। परी न घेपेचि कांहीं केलें। तेणें जेवीं ॥ ६ ॥ तैसें अद्वयत्वें मज। शरण रिघालिया तुज। धर्माधर्म हे सहज। लागतील ना ॥ ७ ॥ लोह उभें खाय माती। तें परिसाचिये संगतीं। सोनें जालया पुढती। न शिविजे मळें ॥ ८ ॥ हें असो काष्ठापासोनि। मथूनि घेतलिया वन्ही। मग काष्ठेंही कोंडोनी। न ठके जैसा ॥ ९ ॥ अर्जुना काय दिनकरु। देखत आहे अंधारु। कीं प्रबोधीं होय गोचरु। स्वप्नभ्रमु ॥ १४१० ॥ तैसें मजसीं एकवटलेया। मी सर्वरूप वांचूनियां। आन कांहीं उरावया। कारण असे? ॥ ११ ॥ म्हणौनि तयाचें कांहीं। चिंतीं ना आपुल्या ठायीं। तुझें पाप पुण्य पाहीं। मीचि होईन ॥ १२ ॥ तेथ सर्वबंध-लक्षणें। पापें उरावें दुजेपणें। तें माझ्या बोधीं वांयाणें। होऊनि जाईल ॥ १३ ॥ जळीं पडिलिया लवणा। सर्वही जळ होईल विचक्षणा। तुज मी अनन्यशरणा। होईन तैसा ॥ १४ ॥ येतुलेनि आपैसया। सुटलाचि आहासी धनंजया। घेईं मज प्रकाशोनियां। सोडवीन तूंतें ॥ १५ ॥ याकारणें पुढती। हे आंधी न वाहे चित्तीं। मज एकासि ये सुमती। जाणोनि शरण ॥ १६ ॥ ऐसें सर्वरूपरूपसें। सर्वदृष्टिडोळसें। सर्वदेशनिवासें बोलिलें श्रीकृष्णें ॥ १७ ॥ मग सांवळा सकंकणुं। बाहु पसरोनि दक्षिणुं। आलिंगिला स्वशरणुं। भक्तराजु तो ॥ १८ ॥ न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें। बोलणें मागौतें। वोसरलें ॥ १९ ॥ ऐसें जें कांहीं येक। बोला बुद्धीसिही अटकें। तें द्यावया मिषें। खेंवांचें केलें ॥ १४२० ॥ हृदया हृदय येक जाले। ये हृदयींचें ते हृदयीं घातलें। द्वैतें न मोडितां केलें। आपणाऐसें अर्जुना ॥ २१ ॥ दीपें दीप लाविला। तैसा परिष्वंगुं तो जाला। द्वैत न मोडितां केला। आपणपें पार्थु ॥ २२ ॥ तेव्हां सुखाचा मग तया। पूरु आला जो धनंजया। तेथ वाडुं तऱ्ही बुडोनियां। ठेला देवो ॥ २३ ॥ सिंधू सिंधूतें पावों जाये। तें पावणें ठाके दुणा होये। वरी रिगे पुरवणिये। आकाशही ॥ २४ ॥ तैसें तयां दोघांचें मिळणें। दोघां नावरे जाणावें कवणें। किंबहुना श्रीनारायणें। विश्व कोंदलें ॥ २५ ॥ एवं वेदाचें मूळसूत्र। सर्वाधिकारैकपवित्र। श्रीकृष्णें

अमंगळ भाषण कानावर ऐकूं देखील येऊं देऊं नकोस हो ! ४. याकरितां मी होऊन मग माझी सेवा-भक्ति करणें हीच माझी सहज भक्ति होय. अशी सहज भक्ति या ज्ञानेंकरून प्राप्त होइल असें कर ५. मंथन करून ताकांतून वेगळें काढलेलें लोणी पुनः ताकांत घातलें; तरीपण तें जसें कांहीं केल्यानें त्या ताकांत मिसळत नाहीं ६. त्याप्रमाणें अद्वितीयत्व बोधानें तूं मला शरण आल्यावर तुला धर्माधर्म हे सहजच मुळींहि [ बाधक ] होणार [ लागणार ] नाहींत ७. लोखंड उभें खुंटीस अलग अडकविलें, तरी त्याला गंज–तांब चढते; पण तेंच लोखंड परिसाच्या स्पर्शानें सोनें झाल्यावर पुनः मातींत पुरून ठेविलें तरी त्याला तांब अजिबात स्पर्शहि करीत नाहीं ८. हे राहूं दे. लांकडाच्या घर्षणापासून काढिलेला अग्नि पुनः जरी लांकडाचे पेटींत कोंडून ठेवला तरी तींत जसा तो कोंडून रहात नाहीं ९. अर्जुना ! सूर्याला कधीं अंधार भेटतो काय ! किंवा जागृत अवस्थेंत आल्यावर स्वप्न-भ्रम दृष्टीस पडतो काय ? तर नाहीं १४१०. तसें माझ्याशीं ऐक्य पावल्यावर सर्वरूप असा जो मी, त्या माझ्यावांचून दुसरें कांहीं उरण्यास कारण आहे काय ? ११. हे पद्मा ! याकरितां तूं आपल्या ठिकाणीं पाप-पुण्याची किंवा धर्माधर्माची चिंता करीत बसूं नकोस. खात्रीनें तुझें पाप व पुण्य मीच होईन १२. सर्व बंधांत घालणारे, वा बंधात्मक, असें जें पाप त्याचें लक्षण म्हणजे माझ्याहून भिन्नपणानें उरणें, हेंच होय, तें [ भेदभावात्मक ] पाप ऐक्यरूप ज्ञानांत नाश पावेल १३. हे विचारशीला अर्जुना ! मीठ उदकांत पडलें म्हणजे आपण नाहींसें होऊन ते सर्व जलरूपच होतें, अनन्यभावानें मला शरण येणारा जो तूं त्या तुला मी त्याप्रमाणें [ तुझें सर्व कांहीं ] होईन १४. हे धनंजया ! एवढ्यानें [ असें झाल्यानें ] तूं आपोआप सर्व बंधापासून सहज सुटलाच आहेस म्हणून तूं मला आत्मत्वानें यथार्थ प्रकाशून–जाणून माझी प्राप्ति करून घे, म्हणजे मग मी सर्व बंधापासून तुला मुक्त करीन. [ असा भ्रम-निवृत्तिनंतर व्यवहार मात्र होईल ] १५. याच कारणास्तव हे सुमते ! या पुढें तूं धर्माधर्माची चिंता मनांत बाळगूं नकोस. एक अद्वितीय जो मी, त्या मला जाणून शरण ये. [ म्हणजे झालें, येथें गीता शास्त्र समाप्त झालें ] १६. याप्रमाणें सर्व रूपें, ज्याचेमुळें रूपवान् होतात, दृष्टीचाहि जो दृष्टि आहे व सर्व देशांचें वसतिस्थान-अधिष्ठान असें जें भगवान् श्रीकृष्ण ते बोललें १७. मग श्यामसुंदर मूर्ति जे भगवान् श्रीकृष्ण त्यांनीं आपला कंकणयुक्त उजवा बाहू पसरून–पुढें करून, आप-ल्यास शरण आलेला भक्तराज जो अर्जुन, त्याला आलिंगन दिलें १८. ज्या स्वरूपाला प्राप्त न होतां शब्द व बुद्धि यांस काखेंत मारून वाचा ही माघारी फिरली १९. असें जें कांहीं एक बुद्धीला व शब्दाला, अनाकलनीय [ परब्रह्म स्वरूप ] तें स्वरूप अर्जुनाला देण्याकरितां देवांनीं जणुं अलिंगनाचें निमित्त केलें १४२०. त्यावेळीं अर्जुनाचें हृदय व देवाचें हृदय एक झालें; देवांनी आपल्या हृदयांतील ज्ञान त्याच्या हृदयांत घातलें आणि देव व भक्त यांचें [ कल्पित उपाधिकृत ] द्वैत न मोडतां अर्जुनास आत्मरूप केलें २१. एका दिव्यानें दुसरा दिवा लावला असतां जसे दिव्याचें प्रतीतीमात्र द्वैत कायम राहून प्रकाश दृष्ट्या ऐक्य मोडत नाहीं; तसाच प्रकार या आलिंगनाचा होऊन द्वैत न मोडतां देवांनी पार्थाला आपलेंस्वरूपीं मिळवून घेतलें २२. मग त्या वेळेस, त्या अर्जुनाला त्या आनंदाच्या सुखाचा जो पूर आला, त्या पुरांत भगवान् जरी सर्वव्यापक, सर्वश्रेष्ठ असलें तरी तेहि बुडून राहिले २३. जेव्हां समुद्रास समुद्र मिळावयास जातो, तें मिळणें एका बाजूस राहते व पाणीच दुप्पट वाढते. याशिवाय पुरवणीला आकाशांत वर वाढते [ आकाश घ्यावे लागते ] २४. तसें श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या अलिंगनाचे मिळणें [ ऐक्य प्रेम ] दोघांनाहि आवरेनासें झालें होते ते कोणी जाणावें ? फार काय सांगावें ! सर्व विश्व नारायणानें ओतप्रोत कोंदून भरलें २५. याप्रमाणें, वेदाचें सूत्ररूपानें असलेलें मूळ आणि ज्याच्या सर्व अधिकारांचें एकमेव पवित्र स्थान म्हणजे श्रवणपठणाचा

१ ताकांतून. २ पुनः. ३ घेतलें जात नाहीं. ४ पुनः. ५ न राहे. ६ जागृतींत. ७ प्रत्यक्ष. ८ चिंतूं नको. ९ सर्वथैव बंधाला कारण अशा. १० व्यर्थ. ११ हे सूज्ञा. १२ स्पष्ट करून, जाणून. १३ मनोव्यथा. १४ सर्व रूपें ज्याच्या योगानें रूपवान् होतात असा. १५ कडें घातलेला. १६ उजवा. १७ केवळ आपल्यालाच शरण आलेला. १८ ज्या वस्तूची प्राप्ति न होतां बोलणें, बुद्धीला काखेस मारून मागोतें–मागें हटतें अशी जी वस्तू. १९ मागें हटलें. २० प्राप्त न होणारें. २१ आलिंगनाचें निमित्त केलें. २२ दोघांचे देह तसेच असतां. २३ आलिंगन. २४ मोठा. २५ पूर्तता करण्यास, साहाय्यास. २६ भरलें. २७ अति शुद्ध असून सर्वांना जेथें अधिकार आहे असें.

गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ २६ ॥ येथ गीता मूळ वेदां । ऐसें केवीं पां आलें बोधा । हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगों ॥ २७ ॥ तरी जयाच्या निःश्वासीं । जन्म झाले वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं[3] । बोलला स्वमुखें ॥ २८ ॥ म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित । आणिकही येकी येथ । उपपत्ति असे ॥ २९ ॥ जें न नशतु स्वरूपें । जयाचा विस्तारु जेथ लपे । तें तयांचें म्हणिपे । बीज जगीं ॥ १४३० ॥ तरी कांडत्रयात्मकु । शब्दराशी अशेखु । गीतेमाजीं असे रुखु । बीजीं जैसा ॥ ३१ ॥ म्हणौनि वेदांचें बीज । श्रीगीता होय हें मज । गमे आणि सहज । दिसतही आहे ॥ ३२ ॥ जे वेदांचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग । भूषणरत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ॥ ३३ ॥ तियेचि कर्मादिकें तिन्ही । कांडें कोणकोणे स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आईक ॥ ३४ ॥ तरि पहिला जो अध्यावो । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्तावो । द्वितीयीं सांख्यसद्भावो । प्रकाशिला ॥ ३५ ॥ मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुलालें दुजीं सूत्र । उभारिलें ॥३६ ॥ मग अज्ञानें बांधलेयां । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ ३७ ॥ जे देहाभिमानबंधें । सांडूनि काम्यनिषिद्धें । विहित परी अप्रमादें । अनुष्ठावें ॥ ३८ ॥ ऐसेनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यावो जो देवें । निर्णय केला तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ ३९ ॥ आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचे आवश्यक । आचरतां मोचक । केवीं होय पां ॥१४४०॥ ऐसी अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षुते आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगितली ॥४१॥ जे देहवाचामानसें । विहित निपजे जें जैसें । तें एक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणितलें ॥ ४२ ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खागें । आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनी ॥ ४३ ॥ तें विश्वरूप अकरावा । अध्यावो संपे जंव आघवा । तंव कर्में ईशु भजावा । हें जें बोलिलें ॥ ४४ ॥ तें अष्टाध्यायीं उघड । जाण येथें देवताकांड । शास्त्र सांगतसे आंड । मोडूनि[4] बोले ॥ ४५ ॥ आणि तेणेंवि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्रदायलब्धें । साचें ज्ञान उद्बोधें । कोंवळें जें ॥ ४६ ॥ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानित्वादिकीं । वाढविजे म्हणौनि

सर्वांना अधिकार आहे, असें पवित्र हें जें गीताशास्त्र तें श्रीकृष्णांनीं प्रगट केलें २६. या ठिकाणीं गीताशास्त्र हें वेदांचें मूळ आहे, असें तुमचे बोधास कसे आले, वाटलें असें म्हणाल; तर ज्या कारणानें आमचें बोधास आलें ती प्रसिद्ध सयुक्तिक कारणें सांगतो, [असें महाराज म्हणतात] २७. तर ज्या ईश्वराच्या केवळ निश्वासांत, श्वासोच्छ्वासापासून वेद राशी [ पूर्वसिद्ध वेदांचें प्रकाशन करतो ] जन्मास आले तो सत्यप्रतिज्ञ ईश्वर स्वमुखानें प्रतिज्ञाकरून बोलला २८. या कारणास्तव गीताशास्त्र हे वेदांना मूलभूत आहे, असें माझें म्हणणें योग्यच आहे; असें म्हणण्याविषयीं आणखीहि एक कारण आहे २९. जें आपल्या स्वरूपानें नाश न पावतां, जेथें त्याचा विस्तार–कार्यवर्ग लीन होऊन सूक्ष्मरूपानें अंतर्भूत होऊन राहतो तें त्याचें 'बीज' होय, असें जगांत म्हणतात १४३०. जसा वृक्ष बीजामध्यें सूक्ष्म–गुप्तरूपानें असतो. तसा कांडत्रयात्मक अशेष वेद [ कर्म, उपासना व ज्ञान ] गीतेमध्यें सूक्ष्म रूपानें आहे ३१. म्हणून वेदांचें मूळ–बीज गीता आहे असें मला वाटतें व ते सहज स्पष्ट दिसतहि आहे ३२. कारण, जसें अलंकारगत रत्नांनीं सर्व अंग सुशोभित होत असतें तशीं वेदांचीं तिन्हीं कांडें गीतेमध्यें चांगलीं स्पष्ट उमटलेलीं आहेत ३३. तीच वेदांचीं कर्मादिक तीन कांडें गीतेमध्यें कोणकोणतें ठिकाणीं [ वर्णिलीं ] आहेत, ती डोळ्यांनीं स्पष्ट दिसतील अशीं आतां दाखवितो, तीं ऐका ३४. तर पहिला जो अध्याय आहे तो गीताशास्त्र केव्हां व कां प्रवृत्त झाले याच्या प्रस्तावनेकरितां असा आहे. दुसऱ्या अध्यायांत सांख्यशास्त्राचा अभिप्रायात्मक विचार म्हणजे ज्ञानविचार थोडक्यांत प्रगट केला आहे ३५. जें हे गीताशास्त्र ज्ञानप्रधान असून तें ज्ञान कर्मादिकांची अपेक्षा न करितां मोक्ष प्राप्त करून देण्याविषयीं एकटेच समर्थ व स्वतंत्र आहे; एवढ्याच विषयांचा द्वितीय अध्यायांत सूत्ररूपानें आरंभ केला आहे ३६. मग स्वस्वरूपविषयक अज्ञानाच्या योगानें बांधलेल्या–बंधांत सांपडलेल्या जीवास मोक्षपदावर बसण्यासाठीं जो धर्मरूपी साधनांचा आरंभींचा उपाय [ कर्माचरण ] तो तिसऱ्या अध्यायांत सांगितला आहे ३७. कारण जें देहाभिमानात्मक बंधनानें बद्ध झाले आहेत, त्यांनीं निषिद्ध व काम्य कर्मांचा त्याग करून विहित कर्मानुष्ठान करावें. तरीपण तें निरभिमानबुद्धीनें न चुकतां करावें ३८. अशा रीतीनें सद्भावनेनें कर्माचें आचरण करावें, असा हा जो देवांनीं तिसऱ्या अध्यायांत निर्णय केला आहे; तो या गीतेंतील 'कर्मकांड' होय असें जाणावें ३९. त्या नित्यनैमित्तिक कर्मांचें आचरण केलें असतां तीं अज्ञानापासून खात्रीनें कशीं सोडविणारी [ अज्ञाननाशक ] होतील ? १४४०. अशी इच्छा झाली असतां व बद्ध हा मुमुक्षुत्वाच्या पायरीला आला असतां [ तीव्र मोक्षेच्छावान् झाला असतां ] त्याच्याकरितां तींच सर्व कर्मे ब्रह्मार्पणबुद्धीनें करावीत, असें देवांनीं सांगितलें आहे ४१. अर्थात् तें असें कीं, काया-वाचा-मन यांच्याद्वारां जीं जीं विहित कर्मे निर्माण होतील, केली जातील. तीं तीं सर्व कर्मे एका ईश्वर प्रसन्नतेकरताच करून ईश्वरार्पण कर, असें देवांनीं सांगितलें ४२. ईश्वराचे ठायीं कर्मयोगानें भजन व उपासना कशी करावी त्याचा प्रकार चौथ्या अध्यायाच्या शेवटींच्या भागांत सांगण्यास आरंभ केला आहे ४३. तो प्रकार चौथ्या अध्यायाच्या अखेरापासून तों थेट विश्वरूपाचा अकरावा अध्याय सर्व संपेपर्यंत, कर्मे ईश्वरास अर्पून तद्द्वारां ईश्वराची भजनभक्ति कशीं करावी, हें जें सांगितलें आहे ४४. तेंच गीतेंत चौथ्या अध्यायापासून अकराव्या अध्यायापर्यंत म्हणजे आठ अध्यायांत [ उपासना कांड ] 'देवता कांड' आहे, असें गीता शास्त्र सांगतें, हें मी सर्व अडचणी, आडपडदा दूर सारून येथें स्पष्ट सांगत आहे ४५. आणि [ ईश्वर प्रीत्यर्थ केलेल्या निष्काम कर्मांनीं तो प्रसन्न होऊन लाभलेल्या त्या ] ईश्वर प्रसादानें व श्रीगुरुसंप्रदायप्राप्त असें जें खरें कोंवळें ब्रह्मात्मैक्याचें ज्ञान उत्पन्न होतें ४६. तें कोंवळें [ अदृढ ] ज्ञान, बाराव्या अध्यायामध्यें "अद्वेष्टा सर्वभूतानां" या श्लोकापासून अथवा तेराव्या अध्यायांतील "अमानित्वम्" इत्यादि श्लोकापर्यंतच्या भागानें दृढ करावें, असे विस्तारानें सांगितलें आहे.

१ सयुक्तिक करण. २ श्वासोच्छ्वासापासून. ३ प्रतिज्ञेवर. ४ कारण. ५ नाश न होतां. ६ कर्म–उपासना–ज्ञानरूप. ७ वेद. ८ झाड. ९ वाटे. १० अशा प्रकारें. ११ निर–भिमान बुद्धीनें. १२ सोडविणारें. १३ प्रश्न. १४ मोक्षेच्छु स्थितीला. १५ ठिकाण. १६ आठ अध्यायांत. १७ उपासनाकांड. १८ प्रतिबंध निवारून. १९ प्राप्तीनें. २० खरें.

लेखीं । बारावा गणूं ॥ ४७ ॥ तो बारावा अध्याय आदी । आणि पंधरावा अवधी । ज्ञानफळपाकसिद्धी । निरूपणासीं ॥ ४८ ॥ म्हणौनि चहूंही इहीं । ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं । ज्ञानकांड ये ठायीं । निरूपिजे ॥ ४९ ॥ एवं कांडत्रयनिरूपणी । श्रुतीचि हे कोडिसवाणी । गीतापद्यरत्नांचीं लेणीं । लेयिली आहे ॥ १४५० ॥ हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । बोभावे जें आवश्यक । ठाकावें म्हणौनि ॥ ५१ ॥ तयाचेनि साधन ज्ञानेंसीं । वैर करी जो प्रतिदिवशीं । तो अज्ञानवर्ग षोडशीं । प्रतिपादिजे ॥ ५२ ॥ तोचि शास्त्राचा बोळावा । घेवोनि वैरी जिणावा । हा निरोपु तो सतरावा । अध्याय येथ ॥ ५३ ॥ ऐसा प्रथमालागोनि । सतरावा लाणी करूनी । आत्मनिश्वास विवरूनी । दाविला देवें ॥ ५४ ॥ तया अर्थजातां अशेषां । केला तात्पर्याचा आवांका । तो हा अठरावा देखा । कलशाध्यायो ॥ ५५ ॥ एवं सकळसंख्यासिद्धु । श्रीभगवद्गीता प्रबंधु । हा औदार्यें आगळा वेद्दु । मूर्तु जाण ॥ ५६ ॥ वेद्दु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥ ५७ ॥ येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसरू मांडूनियां । राहिला आहे ॥ ५८ ॥ तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेद्दु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥ ५९ ॥ नां हे अर्थु रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं । जपमिषें वदनीं । वसोनियां ॥ १४६० ॥ ॥ ये गीतेचा पाठु जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें । गीता लिहोनि वाहाणें । पुस्तकामिषें ॥ ६१ ॥ ऐसैसा मिसकटा । संसाराचा चोहटां । गवादी घालीत चोखटा । मोक्षसुखाची ॥ ६२ ॥ परी आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया । रविदीप्ती राहाटावया । आवारु नभ ॥ ६३ ॥ तेवीं उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे । कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥ ६४ ॥ यालागीं मागिली कुटी । भ्याला वेद्दु गीतेच्या पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ ६५ ॥ म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पंडुसुता । उपदेशिली ॥ ६६ ॥ परी वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरोद्देशें । जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ ६७ ॥ चातकाचिये कणवे । मेघु पाणियेसि

म्हणून [ आम्ही ] बारावा अध्याय [ अंशतः ] हा ज्ञानकांडाचाच एक भाग गणला आहे ४७. त्या बाराव्या अध्यायाचें आरंभापासून तों पंधराव्या अध्यायाचें अखेरपर्यंत या चार अध्यायांत ज्ञानरूपी फल आणि त्याच्या परिपक्वतेची सिद्धि–पूर्णता याचें निरूपण केलें आहे ४८ म्हणून या चार अध्यायांनीं या गीता ग्रंथांत ' ज्ञानकांड ' सांगितलें आहे ४९. अशा प्रकारें कर्म, उपासना व ज्ञान या कांडत्रयाचें निरूपण करणारी हीं गीता, गीता नसून एक लहानशा आकाराची गोजिरवाणी मूर्तिमंत श्रुतिच आहे; आणि ती जणुं गीतापद्यरूप–श्लोकात्मक रत्नांची लेणींच ल्याली आहे १४५०. हें असो; अशी जी ही कांडत्रयात्मक गीतारूपी श्रुति ' मुमुक्षूनें मोक्षरूपी जें एकच फल तें अवश्य प्राप्त करून घ्यावें ' असा गर्जून–डांगोरा पिटून सांगत आहे ५१. त्या मोक्षाचें साधनीभूत जें ज्ञान, त्या ज्ञानाशीं सदैव वैर करणारा जो अज्ञान वर्ग [ दंभादि दोष समुदाय ] तो सोळाव्या अध्यायांत सांगितला आहे ५२. तो अज्ञानवर्गरूपी जो वैरी तोच [ आपल्या स्वरूपस्थितीच्या अन्तिम साध्यापर्यंत पोचविणारा ] शास्त्ररूपी सांगाती घेऊन जिंकावा, असा हा निरोप देवांनीं जेथें सांगितला आहे, तोच या गीतेंतील सतरावा अध्याय होय ५३. अशा प्रकारें पहिल्या अध्यायापासून तों सतराव्या अध्यायाचें अखेरपर्यंत देवांनीं आपला निश्वासरूप [ श्वासापासून अनायासानें अभिव्यक्त झालेला ] जो वेद तो स्पष्ट विवरण करून दाखविला आहे ५४. त्या सर्व एकूण सतरा अध्यायांतील संपूर्ण अर्थमात्राच्या तात्पर्यार्थाचा विचार सांगितला आहे, तो हा शेवटला अठरावा अध्याय होय. हा सर्व अध्यायांच्या कलशस्थानीं आहे ५५. अशा प्रकारें सातशें श्लोकाच्या संख्येनें सिद्ध–युक्त असलेला असा हा श्रीमद्भगवत्‌गीतारूपी प्रबंध, काव्य ग्रंथ म्ह. औदार्यानें अधिक संपन्न व अधिक श्रेष्ठ होऊन अवतीर्ण झालेला मूर्तिमंत वेदच आहे, असें समज ५६. वेद मूळचा संपन्न तर खराच; परंतु त्याच्यासारखा कृपण दुसरा कोणीच नाहीं. कारण, तो [ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या ] तीन वर्णांच्याच कानीं लागला [ म्ह. या तीन वर्णांनींच वेद ऐकावा, अशी त्याची आज्ञा असून शूद्रांना वेदाचा अधिकार नसल्यामुळें त्यांच्याशीं तो बोलतच नाहीं ] ५७. याशिवाय इतर स्त्रीशूद्रादिक जीव कीं, जे संसार व्यथेनें पीडित झालेले आहेत, त्यांना वेदांत [ ज्ञान प्राप्त्यर्थ ] शिवाव होण्याला अधिकारच नाहीं, असें निर्णयानें ठरवून [ ते उणे सोसूनहि ] तो स्वस्थ बसला आहे ५८. त्यावर महाराज म्हणतात–मला तर विचारांतीं असें दिसतें कीं, तो आपला मागील उणेपणा नाहींसा करून आपल्यास सत्कीर्ति मिळावी, वाटेल त्यास सेवन करण्यास योग्य व्हावें या हेतूनें हा वेदच गीतारूपानें प्रगट झाला आहे. ५९. कारण, तो गीतेंत आल्यामुळें वेद आतां सर्वांना सेवन करण्यास सुलभ झाला नाहीं काय ? पहा कीं, गीतारूपी वेद हा अर्थानें मनांत प्रवेश करितो. श्रवणमिषानें कानांत शिरतो व [ पठण ] जपमिषानें मुखांत वास्तव्य करून राहतो १४६०. किंवा या गीतेचा जो नित्यपाठ करणें जाणतो किंवा जो त्या पाठ करणाराच्या संगतीनें असतो; अथवा गीता लिहून ती पुस्तकाच्या मिषानें जवळ बाळगतो ६१. अशा एक ना अनेक निमित्तानें प्राणिमात्रास सरसकट संसाराच्या चव्हाट्यावर विशुद्ध मोक्षसुखाचें सदावर्त [ वेद ] घालीत आहे ६२. आकाशांत वास–विहार करण्याकरितां, पृथ्वीवर बसण्याकरितां; अथवा सूर्याचे दिप्तीचा व्यवहार होण्याकरितां ज्याप्रमाणें या सर्वांना आकाश आधार आहे ६३. त्याप्रमाणें गीता आपलें सेवन करणारांमध्यें उत्तम, अधम ही निवड करीत नाहीं व सरसकट त्या सर्वांना मोक्षपद दान करून त्यानें सर्व जगाला गीता सारखी शांत सुखी करिते ६४. एवढ्याकरितां आपल्या मागल्या निंदेला भ्यालेला जो वेद गीतेच्या पोटांत शिरला त्यामुळें आतां उत्तम कीर्तीला पात्र झाला ६५. म्हणून वेदांचेंच सुसेवन करण्यास, फल प्राप्त करून देण्यास योग्य अशी ही जी मूर्तिमंत श्रीगीता ती स्वतः श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितलेली आहे खरी ६६. परंतु वासराचे प्रीतीमुळें [ गाईचें दूध ] लाभणारे दुभते सर्व घरादाराच्या उपयोगास येतें [ सुख मिळते ] त्याप्रमाणें अर्जुनाच्या निमित्तानें सर्व जगाचा उद्धार झाला ६७. चातकांची कळकळ–दया मनांत बाळगून मेघ पाणी घेऊन धांवून यतो म्ह. वृष्टि

१ गणनेंत. २ पंधराव्या. ३ लहानशीं. ४ गर्जून सांगते. ५ सोवती. ६ जिंकावा. ७ शेवट. ८ वेद हे प्रभूच्या निःश्वासापासून झाले. ९ विचार. १० शिखररूप. ११ सर्व अध्यायांची संख्या. १२ श्रीमद्भगवद्‌गीता ग्रंथ. १३ समक्ष. १४ समर्थ. १५ अनुदार. १६ पीडीत झालेले. १७ वर्ज्य. १८ मला [ ज्ञानदेवाला ] असें वाटतें कीं. १९ आकाराला. २० वाटेल त्यानें. २१ नव्हे काय !. २२ मजसहित. २३ चव्हाट्यावर. २४ सत्र. २५ फिरण्याला. २६ अवकाश. २७ मोक्षदानानें. २८ मागल्या निंदेला भ्याला. २९ सेवन करण्याला योग्य. ३० पान्ह्यानें, ममतेनें. ३१ दयेनें.

धांवे । तेथ चराचर आघवें । निवांलें जेवीं ॥ ६८ ॥ कां अनन्यगतीकमळा- । लागीं सूर्य ये वेळोवेळां । कीं सुखिया होईजे डोळां । त्रिभुवनींचा ॥ ६९ ॥ तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें । संसारायेवढें थोर ओझें । फेडिलें' जगाचें ॥ १४७० ॥ सर्वशास्त्ररत्नदीप्ती' । उजळिता हा त्रिजगतीं । सूर्यु नव्हे लक्ष्मीपती । वक्त्राकाशींचा ॥ ७१ ॥ बाप कुळ तें पवित्र । जेथिंचा पार्थु या ज्ञाना पात्र । जेणें गीता केलें शास्त्र । आवोरु जगा ॥ ७२ ॥ हें असो मग तेणें । सद्गुरु श्रीकृष्णें । पार्थाचें मिसंळणें । आणिलें द्वैतां ॥ ७३ ॥ पाठीं म्हणतसे पांडवा । शास्त्र हें मानलें कीं जीवा । तेथ येरु म्हणे देवा । आपुलिया कृपा ॥ ७४ ॥ तरी निधांन जोडावया । भाग्य घडे गा धनंजया । परी जोडिलें भोगावया । विपांयें होय ॥ ७५ ॥ पैं क्षीरसागरायेवढें । अंविरजी दुधाचें भांडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ॥ ७६ ॥ तें सायांसही फळा आलें । जें अमृतही डोळां देखिलें । परी वरिचिली'' चुकलें । जंतनेतें ॥ ७७ ॥ तेथ अमरत्वा वोगंरिलें । तें मरणाचिलागीं जालें । भोगों नेणतां जोडलें । ऐसें आहे ॥ ७८ ॥ नहुषु स्वर्गाधिपंति जाहला । परी राहाटीं भांबावला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ? ॥ ७९ ॥ म्हणौनि बहुत पुण्य तुवां । केलें तेणें धनंजया । आजि शास्त्रराजा इया । जालासि विषयो ॥ १४८० ॥ तरी ययाचि शास्त्राचेनि । संप्रदायें पांघुरौनि । शास्त्रार्थु हा निकेनि । अनुष्ठीं हो ! ॥ ८१ ॥ एऱ्हवीं अमृतमंथना- । सारिखें होईल अर्जुना । जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥ ८२ ॥ गाय धड जोडे गोमटी । तें तैंचि पिवों ये किरीटी । जैं जाणिजे हातवटी । सांजवणीची ॥ ८३ ॥ तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे । परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥ ८४ ॥ म्हणौनि शास्त्रीं जो इये । उचितु संप्रदायो आहे । तो ऐक आतां बहुवें । आदरेंसीं ॥ ८५ ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन । न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

तरी तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना हो ! ॥ ८६ ॥ अथवा तापसुही जाला । परी गुरुभक्तीं जो ढिला । तो वेदीं अंत्यजु वाळिला । तैसा वाळीं ॥ ८७ ॥ नातरी पुरोडाशु

करतो, त्या वृष्टीनें सहजच चराचरात्मक सर्व जग जसें शांत होतें. ६८. अथवा एकनिष्ठ अशा कमलाला प्रफुल्लित करण्याकरितां वारंवार सूर्य उदयास येतो खरा, परंतु तेव्हांनें त्रिभुवनातील सर्व प्राण्यांचे डोळ्यांना सहजच प्रकाश मिळाल्यामुळें सुख होतें ६९. या न्यायानें श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या निमित्तानें गीता प्रकाशून केवळ अर्जुनाचेच नव्हे तर सर्व जगाचे जन्ममरणरूप संसाराएवढें मोठें थोर ओझें दूर केलें १४७०. सर्वशास्त्ररूपी रत्नांचें तेज या तीन लोकात प्रगट करणारा लक्ष्मीपति जो श्रीकृष्ण, त्यांचें मुख हेच कोणी आकाश, त्या आकाशामध्यें गीताशास्त्र हाच कोणी एक सूर्य उगवला नाहीं काय ? ७१. व जो अर्जुन या गीतारूपी ज्ञानाला पात्र झाला व सर्व जगाला ज्या अर्जुनानें गीताशास्त्ररूपी आवार घातले, तो अर्जुन ज्या कुलांत जन्मास आला तें कुळ पवित्र व धन्य होय ७२. हें असूं दे. मग त्या सद्‌गुरु श्रीकृष्णांनीं पार्थ आपल्या स्वरूपामध्यें मिसळून जात होता, तें जें मिसळणें त्यास परत द्वैत भावावर आणिलें ७३. नंतर ज्या आत्मज्ञानाकरितां गीताशास्त्र सांगितलें, तें त्यास कितपत पटलें आहे, हे पाहण्याकरितां अर्जुनास भगवान् म्हणतात कीं "अरे ! तुला जे आम्हीं गीताशास्त्र सांगितलें तें तुझ्या अंतःकरणाला पटलें ना ! म्हणजे यथार्थ समजलें का ! " तेव्हां अर्जुन म्हणाला, " हे देवा ! आपल्या कृपेनें मला हे गीताशास्त्र समजलें " ७४. यापुढें भगवान् गीता शास्त्राचा संप्रदाय सांगतात. " हें धनंजया ! ठेवा-ऐश्वर्य प्राप्त होण्यासाठीं भाग्य असावें लागतें; परंतु जोडलेला ठेवा भोगण्याचे भाग्य क्वचितच असते. [ ऐश्वर्याचा उपभोग कसा घ्यावा हें एखाद्यासच समजतें ] ७५. जोडलेलें ऐश्वर्य प्राप्त होऊन कसे नाहींसें होतें. याविषयीं भगवान् उपपत्ति सांगतात कीं, जसे क्षीरसागराएवढें निरुपम विरजलें न जाणारे दुधाचें भांडें मंथन करीत असतांना देव-दैत्यांना किती तरी श्रम पडलें बरें ! ७६. पुढें त्या केलेल्या श्रमांनाहि फळ आलें ! त्यांतून निघालेलें जें अमृत, तेंहि दृष्टीनें पाहिलें; परंतु त्या अमृताचें जतन करण्यास तें चुकलें ७७. तेथें अमरत्व प्राप्त व्हावें म्हणून जें अमृत वाढलें तेंच राहू दैत्यास मरणास मात्र कारण झालें; तेव्हां प्राप्त झालेल्याचा भोग कसा घ्यावा ही युक्ति जर ज्ञात-कळलेली नसेल तर जोडलेल्या लाभाचा असा उलट परिणाम होतो ७८. नहुष राजा यज्ञादिक कष्टमय आचरण करून स्वर्गाचा अधिपति [ इंद्र ] झाला खरा; परंतु तेथें कसें वागावें अर्थात वागणुकीचीं पद्धत न समजल्यामुळें भांबावून जाऊन तो चुकला व सर्पत्व जातिविशिष्ट योनीस प्राप्त झाला.हे तुला माहीत नाहीं काय ? ७९. म्हणून हे धनंजया ! तूं बहुत पुण्य केलेस, त्यामुळें आज सर्व शास्त्रांचा राजा जे गीताशास्त्र तें [ मला सांगण्यास व ] तूं ऐकण्यास योग्य अधिकारी झाला आहेस १४८०. तर याच शास्त्राचा जो वागण्याचा संप्रदाय आहे, तो स्वीकारून समजून घेऊन मग शास्त्रार्थाप्रमाणेंच तूं त्याचें अनुष्ठान कर हो ! ८१. एऱ्हवीं अर्जुना ! संप्रदायाविना जर या शास्त्रार्थाचे तूं अनुष्ठान करावयास लागशील, तर अमृतमंथनासारखा परिणाम होईल ८२. हे करीटी ! गाय उत्तम धड मिळाली, तरी तिचें दूध तेव्हांच पिता येतें कीं, जेव्हां तिची धार काढण्याची हातवटी माहीत असतें ८३. तसें सद्‌गुरुहि प्रसन्न होतील व त्यांच्या पासून शिष्याला खरोखर विद्याहि प्राप्त होईल, परंतु तिचें अनुष्ठान संप्रदायपूर्वक गुरुसेवा करून केलें तरच ती फलद्रूप होईल [ नाहींतर व्यर्थ होईल ] ८४. म्हणून हें गीताशास्त्र प्राप्त करून घेण्याचा जो योग्य संप्रदाय आहे, तो मी आतां सांगतों, तो अत्यंत आदरानें ऐक ८५.

**अन्वयार्थ**--**इदं**-हें ज्ञान-**ते**-तूं-**अतपस्काय**--तपश्चर्या न करणाराला-**न**-**वाच्यं**-सांगूं नयेस-**अभक्ताय**-तसेंच जो माझा भक्त नसेल त्याला-**कदाचन**-केव्हांहि **न** [**वाच्यं**]-सांगूं नयेस आणि-**अशुश्रूषवे**-जो गुरु, ईश्वर यांची शुश्रूषा करणारा नसेल, त्याला-**न** [ **वाच्यं**-सांगूं नयेस-**च**-आणि-**यः**-जो-**मां**-माझी--**अभ्यसूयति** असूया करतो त्याला--**न**-**च**[**वाच्यं**]-सांगूं नयेस ६७.

हे पार्था ! तुला हें जें गीताशास्त्र आस्थापूर्वकतेमुळें प्राप्त झालें आहे, तें तपोहीन मनुष्यास कधींहि मुळींहि सांगूं नको हो ! ८६. अथवा, एखादा तापसीहि मनुष्य असेल; परंतु तो जर गुरुभक्ति करण्यांत ढिला असेल तर वेदांनीं जसा अंत्यजाचा त्याग केला आहे, तसा त्याचा तूं त्याग कर ८७. अथवा जसा कावळा

१ शांत झाले. २ एकनिष्ठ अशा कमळासाठीं. ३ दूर केलें. ४ तेज. ५ सुखरूप आकाशींचा. ६ भोंवतालची भिंत ७ स्वरूपामध्यें मिळून जाणें. ८ भेददशा. ९ गुप्तधन. १० क्वचित्. ११ न विरजलेलें. १२ धाडस. १३ हातोटी, युक्ति. १४ व्यवस्थेला. १५ वाढविलें. १६ नहुष राजाला कांहीं दिवस स्वर्गाचें अधिपत्य मिळालें.

जैसा । न घापे वृद्ध तरी वायसा । गीता नेदी तैसी तापसा । गुरुभक्तिहीना ॥ ८८ ॥ कां तपही जोडे देहीं । भजे गुरुदेवांच्या ठायीं । परी आकर्णनीं नाहीं । चोंड जरी ॥ ८९ ॥ तरी मागील दोन्हीं आंगीं । उत्तम होय कीर जगीं । परी या श्रवणालागीं । योग्यु नोहे ॥ १४९० ॥ मुक्ताफळ भलतैसें । हो परी मुख नसे । तंव गुणे प्रवेशे । तेथ कायी ? ॥ ९१ ॥ सागरु गंभीरु होये । हें कोण ना म्हणत आहे । परी वृष्टि वायां जाये । जाली तेथ ॥ ९२ ॥ धालिया दिव्यान्न सुवांवें । मग जें वायां धांडावें । तें आर्ती कां न करावें । उदारपण ? ॥ ९३ ॥ म्हणौनि योग्य भलतैसें । होतु परी चाड नसे । तरी झंणें वानिवेंसे । देसी हें तयां ॥ ९४ ॥ रूपाचा सुजाणु डोळा । वोडेंवूं ये कायि परिमळा ? । जेथ जें माने तें फळा । तेथचि ये गा ॥ ९५ ॥ म्हणौनि तपी भक्ति । पाहावे ते सुभद्रापती । परी शास्त्रश्रवणीं अनासक्ती । वोंळावेचि ते ॥ ९६ ॥ नातरी तपभक्ति । होऊनि श्रवणीं आर्ति । आथी ऐसीही आयेंती । देखसी जरी ॥ ९७ ॥ तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळलोकशास्ता । तया मातें सामान्येंता । बोलेल जो ॥ ९८ ॥ माझ्या सज्जनांसिं मातें । पैशून्याचेनि हातें । येक आहाती तयांतें । योग्य न म्हण ॥ ९९ ॥ तयांची येर आघवी । सामग्री ऐसी जाणावी । दीपेंवीण ठाणदिवी । रात्रीची जैसी ॥ १५०० ॥ अंग गोरें आणि तरुणें । वरी लेईलें आहे लेणें । परी येकलेनि प्राणें । सांडिलें जेवीं ॥ १ ॥ सोनयाचें सुंदर । "निर्वाळिलें होय घर । परी सर्पांगना द्वार । रुंधलें आहे ॥ २ ॥ निपजे दिव्यान्न चोखट । परी माजीं काळकूट । असो मैत्री कपट- । गर्भिणी जैसी ॥ ३ ॥ तैसी तपभक्तिमेधा । तयाची जाण प्रबुद्धा । जो माझयांची कां निंदा । माझीचि करी ॥ ४ ॥ याकारणें धनंजया । तो भक्तु मेधावी तपिया । तरी नको बापा इया । शास्त्रा आंतळों देवों ॥ ५ ॥ काय बहु बोलों निंदका । योग्य स्रष्टयाहीसारिखा । गीता हे कवतिका । लागींही नेदीं ॥ ६ ॥ म्हणौनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गोंडोरा । वरी गुरुभक्तीचा पुरा । प्रांसादु जो जाला ॥ ७ ॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंटा सदा उघडा । वरी कलशुं चोखडा । अनिंदारत्नांचा ॥ ८ ॥

वृद्ध असला तरीहि त्याला यज्ञाचा अवशिष्ट प्रसाद भाग [ पुरोडाश ], जसा घालीत नाहींत, तसें हें गीताशास्त्र गुरुभक्तिहीन असेल तो मग कितीहि मोठा तपी असेना, त्या तापसासहि सांगूं नकोस ८८. किंवा एखादा शरीरानें तपहि करीत असेल व गुरु व देव यांचे ठिकाणीं भक्तिभावानें भजतोहि आहे; परंतु श्रवणाची जर त्याला इच्छा नसेल ८९. तर तप व गुरुभक्ति ह्या मागल्या दोन अंगांनीं या जगतांत तो खरोखर योग्यहि असेल; तरीपण श्रवणाची इच्छा नसल्यामुळें तो गीताशास्त्र ऐकण्यास योग्य अधिकारी नाहीं १४९०. मोती हवे तेवढें उत्तम असलें, तरीहि त्यास वेज्ञ पाडलें नसेल तर, त्यांत सूत-[ सोन्याची तार ] प्रवेश करील [ ओवतां येईल ] काय ? ९१. समुद्र गंभीर आहे, हें कोण नाहीं म्हणतो ? परंतु त्या सागरावर पाऊस पडला तर तो व्यर्थ जातो ९२. तृप्त झालेल्या मनुष्याचें पानांत पक्वान्नें वाढून मग ती वायां दवडावीं; त्यापेक्षां तींच पक्वान्नें क्षुधित मनुष्यास उदार वृत्तीनें घालून आपलें औदार्य कां प्रकट करूं नये ? ९३. म्हणून इतर सर्व बाबतींत वाटेल तसा योग्य असो; पण जर श्रवणाची इच्छा नसेल तर हें गीताशास्त्र सहज चुकून कदाचित् त्यास सांगशील; पण सांगूं नकोस हो ! ९४. रूपविषय जाणण्याविषयीं डोळा चांगला शहाणा आहे खरा; परंतु तो फुलाचा सुवास घेण्यास पुढें करून काय [ त्या ज्ञानांत ] उपयोग ! जेथें जें योग्य असेल तेथेंच त्याचा उपयोग होऊन तें फळाला येते ९५. म्हणून हे सुभद्रापते, ज्यास गीताशास्त्र सांगावयाचे तो तपस्वी, गुरु व देव यांची भक्ति करणारा आहे हे तर पहावेच; पण जर शास्त्रश्रवणाविषयीं त्यास तीव्रेच्छा नसेल, तर त्याचा त्याग करावाच ९६. अथवा तपस्वी, गुरु आणि देव यांची भक्ति करणारा असून शास्त्रश्रवणाची तीव्र इच्छा आहे, असा मनुष्य सर्व प्रकारच्या सामुग्रीनें युक्त असलेला जर पाहिलास ९७. तर सकळ लोकांचें नियमन करणारा व गीताशास्त्र निर्माण करणारा जो मी, त्या मला साधारण-यःकश्चित म्हणून जो समजेल; ९८. तसेंच माझी व माझ्या भक्त सज्जनांचीं दुष्टपणानें निंदा करणारे असें जे कोणी असतील, तेहि हें गीताशास्त्र ऐकण्यास योग्य आहेत, असें समजूं नकोस ९९. त्यांची इतर सर्व सामुग्री कशी आहे म्हणशील, तर रात्रींची दिव्याचें ज्योतीशिवाय तेलवातीनें भरलेली ठाणवई जशीं व्यर्थ असते, तशी ती समजावी १५००. ज्याप्रमाणें एखाद्याचें शरीर गोरेपान व तरणें असून त्याशिवाय त्याचें अंगावर दागिनेंहि घातलेलें आहेत; पण तें शरीर फक्त एका प्राणानें-जीवानें रहित असावें १. सोन्याचें सुंदर व स्वच्छ घर निर्माण केलें आहे; पण त्याचें दार नागिणीनें अडविलेलें असावें २. किंवा उत्तम दिव्यान्नें तयार केलेलें आहे. पण त्यांत काळकूट विष मिळविलेलें असावें अथवा अंतःकरणीं कपटानें भरलेली मैत्री असावी [ हें सर्व जसें व्यर्थ आहे. ] ३. त्याप्रमाणें हे बुद्धिमान् अर्जुना ! जो माझी व माझ्या भक्तांची निंदा करितो, त्याचें तप, गुरु भक्ति व धारणाशक्ति हीं व्यर्थ आहेत, असें समज ४. वास्तव हे धनंजया ! तो भक्त बुद्धिमान् असून तपस्वीहि असला, तरीपण [ जर माझी व माझ्या भक्तांची निंदा करील, तर ] बापा ! त्यास या गीताशास्त्रास स्पर्श करूं देऊं नकोस हो ! ५. निंदकाविषयीं आणखी जास्ती काय तुला सांगावें ! ! तो जरी ब्रह्मदेवाप्रमाणें प्रतिसृष्टि करण्याच्या योग्यतेचा असला तरी त्याला कौतुकानेंहि गीताशास्त्र देऊं-सांगूं नकोस ६. म्हणून हे धनुर्धरा ! ज्यानें तपरूपी दगडाचा खालीं बळकट पाया घालून त्यावर गुरुभक्तिरूपी जे देवालय पूर्ण बांधून तयार झालें आहे ७. आणि ज्या मंदिराचा श्रवणेच्छारूपी पुढील दरवाजा नेहमींचाच उघडा आहे व ज्या मंदिरावर अनिंदा रत्नाचा उत्तम पवित्र कळस बसविला गेला आहे ८.

१ श्रवणीं. २ इच्छा. ३ तप व गुरुभक्ति या दोन्ही अंगांनीं. ४ मोती. ५ दोरा. ६ तृप्तीला. ७ वाढावें. ८ दवडावें. ९ क्षुधिताला. १० देऊं नको. ११ कौतुकानें. १२ पुढें करूं येईल. १३ आवड नसलेलें. १४ त्यागावें, बगळावें, १५ सामुग्री. १६ सर्व लोकांना शासन करणारा. १७ साधारण मनुष्याप्रमाणें. १८ दुष्टपणानें, निंदेनें. १९ सुंदर बांधिले. २० नागिणीनें. २१ कोंडलें. २२ तप, गुरुभक्ति, सद्बुद्धि. २३ बुद्धिमान्. २४ स्पर्शो. २५ ब्रह्मदेवासारखा. २६ दगडाचा पाया. २७ देवालय. २८ दरवाजा. २९ कळस.

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

ऐशा भक्तांलयीं चोखटीं । गीतारत्नेश्वरु हा प्रतिष्ठीं । मग माझिया संवसाटी । तुकेसी जगीं ॥ ९ ॥ कां जे एकाक्षरपणेंसीं । त्रिमात्रकेचिये कुशीं । प्रणवु होता गर्भवासीं । सांकडला ॥ १५१० ॥ तो गीतेचिया बाहाळीं । वेदबीज गेलें पाहाळीं । कीं गायत्री फुलींफळीं । श्लोकांच्या आली ॥ ११ ॥ ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता । अनन्यजीवना माता । बाळका जैसी ॥ १२ ॥ तैसी भक्तां गीतेसीं । भेटी करी जो आदरेंसीं । तो देहापाठीं मजसीं । येकचि होय ॥ १३ ॥

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः । भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

आणि देहाचेंही लेणें । घेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवेंप्राणें । तोचि पढिये ॥ १४ ॥ ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां- । माजीं तो येकु गा जैसा । पढिये मज ॥ १५ तैसा भूतळीं आघवा । आन न देखे पांडवा । जो गीता सांगे मेळावा । भक्तजनांचा ॥ १६ ॥ मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें । जो मंडन होय सभे । संतांचिये ॥ १७ ॥ नेत्रपल्लवीं रोमांचितु । मंदानिळें कांपवितु । आमोदजळें वोलवितु । फुलांचे डोळे ॥ १८ ॥ कोकिळा कलरवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें । वसंत का प्रवेशे । मद्भक्त आरामीं ॥ १९ ॥ का जन्माचें फळ चकोरां । होत जैं चंद्र ये अंबरा । नाना नवघन मयूरां । वो देत पावे ॥ १५२० ॥ तैसा सज्जनांच्या मेळापीं । गीतापद्यरत्नीं उमपीं । वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनि ॥ २१ ॥ मग तयाचेनि पाडें । पढियंतें मज फुडें । नाहींचि गा मागेंपुढें । न्याहाळितां ॥ २२ ॥ अर्जुना हा ठायवरी । मी तयातें सूयें जिव्हारीं । जो गीतार्थाचें करी । परगुणें संतां ॥ २३ ॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः । ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

पैं माझिया तुझिया मिळणीं । वाढीनली जे हे कहाणी । मोक्षधर्म का जिणीं । आलासे जेथें ॥ २४ ॥ तो हा सकळार्थप्रबोधु । आम्हां दोघांचा संवादु । न करितां पदभेदु । पाठेंचि जो पढे ॥ २५ ॥ तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया आहुती । तोषविला होय सुमती । परमात्मा मी ॥ २६ ॥ घेऊनि गीतार्थ उगाणा । ज्ञानिये जें विचक्षणा । ठाकती तें गाणावाणा ।

**अन्वयार्थ**––**यः**–जो–**इदं परमं गुह्यं**–हें परम गुह्य ज्ञान–**मद्भक्तेषु**–माझ्या भक्तांच्या ठिकाणीं–**अभिधास्यति**–सांगेल तो–**मयि**–माझ्या ठिकाणीं–**परां भक्तिं कृत्वा**–ज्ञानरूप श्रेष्ठ भक्ति करून–**माम् एव**–मलाच–**एष्यति**–प्राप्ति–होईल–**असंशयः**–याविषयीं मुळींच संशय ठेवूं नको ६८.

अशा उत्तम भक्तरूपी शुद्ध देवालयांत गीतारूप रत्नेश्वराची प्राणप्रतिष्ठापूर्वक स्थापना कर. मग तूं या जगांत माझ्या योग्यतेला प्राप्त होशील ९. कारण, ॐ या एका अक्षराच्या रूपानें 'अ'कार, 'उ'कार व 'म'कार या तीन मात्रांच्या कुशींत जो ओंकार गर्भवासांत अडकलेला होता १५१०. तो वेदांचे बीज जो ओंकार तो गीतारूपी वृक्षाच्या शाखांनीं विस्तार पावला आहे. त्यांतील श्लोक हें गायत्रीरूप फुलांनीं व फळांनीं युक्त झाला आहे ११. ती ही [ गायत्री, प्रणवरूपी ] मंत्राचें रहस्यस्वरूप असलेली गीता जसें आईविना [ स्तनपानाविना ] ज्या बालकास [ स्तनंधयास ] दुसरें जीवन साधन नाहीं, त्या बालकास आईची गांठ घालून द्यावी. तसेंच माझ्या भक्तांना भेटवितो. [ उपदेशितो; गीता परिचय करून देतो ] १२. तशी माझ्या भक्तांची जो आदरानें गीतेशीं भेट करून देतो, तो देहपातानंतर मद्रूपच होतो १३.

**अन्वयार्थ**––**च मनुष्येषु**–व मनुष्यामध्यें–**क्वचित्**–कोणी–**तस्मात्**–त्या शास्त्रसंप्रदाय चालविणाऱ्या मनुष्याहून–**मे**–माझें–**प्रियकृत्तमः**–अधिक प्रिय करणारा–**न**–[ **अस्ति** ]–नाहीं–**च**–आणि–**भुवि**–या भूलोकीं–**तस्मात् अन्यः**–त्याहून दुसरा कोणी–**मे**–मला–**प्रियतरः**–अधिक प्रिय–**न भविता**–होणारहि नाहीं ६९.

आणि हे देहरूपी अलंकार धारण करूनहि जो [ भक्त ] देहोपाधिदृष्ट्या माझ्याहून वेगळेपणानें असतो. तेव्हांहि जीवानें व प्राणानें मला तोच अत्यंत प्रिय आहे १४. ज्ञानी, कर्मठ व तपस्वी ही जरी मला जाणणारी अंतरंग व निरनिराळ्या अधिकाराचीं माणसे आहेत, तरी त्या सर्वांत तोच एक [ गीतार्थ जाणणारा ] मला जसा अत्यंत आवडतो १५. हे पांडवा ! जो माझ्या भक्तजनांच्या समुदायांत गीताशास्त्र सांगतो, त्याच्याप्रमाणें या संपूर्ण पृथ्वीतलावर मला दुसरा कोणीहि प्रिय दिसत नाहीं १६. केवळ ईश्वर जो मी त्या माझ्या प्रीतीनेंच निरभिमानानें आपलें मन स्थिर करून जो हे गीताशास्त्र माझ्या भक्तास सांगतो; तो संतजनांच्या सभेला भूषणच होतो १७. श्रोत्यांच्या अंगावर, झाडास फुटणाऱ्या कोंवळ्या नवपल्लवांप्रमाणें रोमांच उभे करीत, मंद वाहणाऱ्या वाऱ्यामुळें हालणाऱ्या झाडाप्रमाणें त्याचें अंग–शरीर आनंदभरानें डोलवीत आणि मकरंद सुगंधोदकानें फुलें जशीं स्रवतात त्याप्रमाणें डोळे आनंदाश्रूंनीं भरून आणीत १८. कोकीळ पक्षाच्या सुमधुर [ पंचम ] स्वराप्रमाणें अंतःकरण व कंठ दाटून येऊन भगवन्नामघोष करवीत जणुं काय माझ्या भक्तरूपी उपवनांत हा गीताशास्त्र व्याख्यातारूपी वसंतच प्रवेश करतो १९. आपल्या जन्माचें सार्थक झालें, फळलाभ झाला, असें त्या चकोर पक्षाला वाटवीत चंद्र जसा आकाशांत उगवत असतो. किंवा नवनवीन मेघ मोरांना जणुं 'ओ' देतच प्राप्त होतात १५२०. तसा माझ्या प्राप्तीचा उद्देश अंतःकरणांत ठेवून जो संत सज्जनांच्या समुदायांत गीतापद्य–श्लोकरूपी रत्नांचा पुष्कळ वर्षाव करितो २१. अर्जुना ! मग मागे होऊन गेलेले भक्त व पुढें होणारें भक्त यांचा विचार करून पाहिलें असतां त्यामध्यें मला तो [गीता सांगणारा] भक्त जितका आवडतो तितका दुसरा कोणीहि निश्चयानें आवडत नाहीं २२. अर्जुना ! याप्रमाणें जो गीतेच्या अर्थाची संतजनांस मेजवानी करितो, तो मला इतका आवडतो कीं, त्याला मी आपलें हृदयांत धारण करून ठेवितो २३.

**अन्वयार्थ**––**च यः**–आणि जो–**आवयोः इमं धर्म्यं संवादम्**–आम्हां दोघांच्या या धर्मरूप संवादाला–**अध्येष्यते**–पठण करील, म्हणजे त्याचें अध्ययन करील–**तेन**–त्याच्याकडून–**ज्ञानयज्ञेन**–ज्ञानयज्ञानें–**अहम् इष्टः**–मी पूजलेला असा–**स्याम्**–होईन–**इति**–**मे**–**मतिः**–असा माझा निश्चय आहे ७०.

माझ्या व तुझ्या समागमांत जी ही संवादरूप कथा [ गीता ] वाढली ती या पृथ्वीवर मोक्षसाधनें जगण्याकरितां व तद्द्वारां मोक्ष मिळवून देण्याकरितांच आली आहे २४. तो हा सकल अर्थ प्राप्त करून देणारा आपला दोघांचा संवाद त्यांतील पदांचा अर्थ विचार न करितां जो केवळ आवर्तनच–पठण करतो २५. हे सुमते अर्जुना! त्यानें ज्ञानरूपी प्रज्वलित अग्नींत मूळ अविद्येची आहुति देऊन मी जो परमात्मा त्या मला संतोषित केल्याप्रमाणें होतें २६. अर्जुना ! गीतेच्या अर्थाचा आदावा–अनुभव घेऊन,

---

१ भक्तिरूपी देवालयांत. २ स्थापन कर. ३ बदलीस, साम्यतेस. ४ योग्य होशील. ५ ॐ या एक अक्षरानें. ६ अकार, उकार व मकार या तीन मात्रांच्या. ७ ओंकार. ८ शास्त्रांनीं. ९ ओंकार. १० विस्तारिलेलें. ११ वृक्षरूपानें उंच गेलें. १२ अत्यंत प्रिय. १३ समुदायाला. १४ स्थिर चित्तानें. १५ भूषणरूप. १६ मंद वाऱ्यानें. १७ सुगंधोदकानें

गीतेचा तो लाहे ॥ २७ ॥ गीता पाठकासि असे । फळ अर्थज्ञाचि सरिसें । गीता माउलियेसि नसे । जाणें तान्हें ॥ २८ ॥

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः । सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनि आस्था पैं शुद्धा । गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ २९ ॥ तयाच्या श्रवणपुटीं । गीतेचीं अक्षरें जंव पैठीं । होतीना तंव उठाउठीं । पळेचि पाप ॥ १५३० ॥ अंटवियेमाजीं जैसा । वन्हि रिघतां सहसा । लंघिती का दिशा । वनौकें तियें ॥ ३१ ॥ कां उदयाचळकुळीं । झळकतां अंशुमाळी । तिमिरें अंतराळीं । हारपती ॥ ३२ ॥ तैसा कानाच्या महाद्वारीं । गीता गजर जेथ करी । तेथ सृष्टीचिये आंदीवरी । जायचि पाप ॥ ३३ ॥ ऐसी जन्मवेली धुवट । होय पुण्यरूप चोखट । याहीवरी अचाट । लाहे फळ ॥ ३४ ॥ जें इये गीतेचीं अक्षरें । जेतुलीं का कर्णद्वारें । रिघती तेतुले होती पुरे । अश्वमेध कीं ॥ ३५ ॥ म्हणौनि श्रवणें पापें जाती । आणि धर्म धरी उन्नंती । तेणें स्वर्गराज संपत्ती । लाहेचि शेवीं ॥ ३६ ॥ तो पैं मज यावयालागीं । पहिलें पेणें करी स्वर्गीं । मग आवडे तंव भोगी । पाठीं मजाचि मिळे ॥ ३७ ॥ ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया । फळे महानंदें मियां । बहु काय बोलों ॥ ३८ ॥ याकारणें हें असो । परी जयालागीं शास्त्रांतिसो । केला तें तंव तुज पुसों । काज तुझें ॥ ३९ ॥

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा । कच्चिदज्ञान संमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

तरी सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांतु आघवा । तुज एकचित्तें फावो । गेला आहे ? ॥ १५४० ॥ आम्हीं जैसें जया रीतीं । उगाणिलें कानांच्या हातीं । येरीं तैसेंचि तुझ्या चित्तीं । पेठें केलें कीं ? ॥ ४१ ॥ अथवा माझारीं । गेलें सांडिविखुरी । किंवा उपेक्षेवरी । वाळूनि सांडिलें ॥ ४२ ॥ जैसें आम्हीं सांगितलें । तैसेंचि हृदयीं फावलें । तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥ ४३ ॥ तरी स्वाज्ञानजनितें । मागिलें मोहें तूतें । भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ? ॥ ४४ ॥ हें बहु पुसों काई । सांगें तूं आपल्या ठाईं । कर्माकर्म कांहीं । देखतासी ? ॥ ४५ ॥ पार्थु स्वानंदैकरसें । विरेल ऐसा भेददशे । आणिला

जें शोधक ज्ञानी आहेत, ते जेथें [ ब्रह्मस्वरूपास ] पावतात, तीच योग्यता, तेंच फल गीतेचें केवळ गायन, पठण करण्यानें वा वर्णन करण्यानें त्यांनाहि प्राप्त होते २७. गीतेचा पाठ करणाऱ्यांस गीतेचा अर्थ जाणणाऱ्यां-प्रमाणेंच ज्ञान प्राप्तिद्वारां फलप्राप्ति होते. कारण, गीतामाउलीजवळ जाणतें [ मूल ] व नेणतें मूल असा भेद नाहीं २८.

**अन्वयार्थ**—**यः**–जो–**श्रद्धावान्**–श्रद्धाळु–**च अनसूयः**–आणि असूया न करणारा–**नरः**–मनुष्य [ हा आमचा संवाद ]–**शृणुयात्**–**अपि**–नुसता ऐकेलहि–**सः अपि**–तोहि–**मुक्तः**–पापापासून मुक्त होऊन–**पुण्यकर्मणां**—पुण्यवानांच्या–**शुभान् लोकान्**–शुभ लोकांना–**प्राप्नुयात्**–प्राप्त होईल ७१.

आणि [ परमार्थांतील ] सर्व मार्गांची निंदा करणें सोडून शुद्ध आस्थेनें जो गीतेच्या श्रवणावर श्रद्धा ठेवून राहतो २९. त्याच्या कानांत गीतेचीं अक्षरें प्रविष्ट होतात न होतात तोंच पातकें सत्वर पळून जातात १५३० जसा अरण्यांत अग्नि एकदम, सहज शिरला म्हणजे तेथील वनचरें व पशुपक्ष्यादिक वाट सांपडेल त्या दिशांस पळून जातात ३१. अथवा उदयाचलावर सूर्य झळकल्याबरोबर जसा आकाशांत अंधार पार नाहींसा होतो ३२. तसा गीतेचा गजर–घोष कानरूपी महाद्वारानें अंतःकरणांत गेल्यावर सृष्टीच्या आरंभा-पासूनची पापें नाहींतशीं होऊन जातात ३३. अशा रीतीनें पुढील जन्म परंपरात्मक वेली सर्व कुल पवित्र स्वच्छ होऊन ती केवळ पुण्यरूपच होते. याहिपेक्षां त्याला अलोट फळ प्राप्त होते ३४. कारण, या गीतेचीं जितकीं जितकीं अक्षरें कर्णद्वारानें अंतःकरणांत प्रवेश करतील तितके पूर्ण अश्वमेध [ केल्याचें पुण्य लाभतें ] होतात ३५. म्हणून गीतेच्या श्रवणानें पापें नाहींतशीं होऊन जातात व धर्माची वृद्धि होते व त्या योगानें शेवटीं स्वर्गाचें राज्य–ऐश्वर्य उपभोगावयास मिळतेंच मिळते ३६. असा जो पुरुष तो माझ्या प्राप्तीस येण्यासाठीं पहिला मुक्काम स्वर्गलोकीं करतो, मग तेथें त्याला वाटेल तोंपर्यंत भोग्य सुख भोगतो आणि नंतर मलाच येऊन मिळतो ३७. हे धनंजया ही गीता ऐकणारास व गीतेचा पाठ–पारायण करणारास महानंदस्वरूप जो मी, तें मद्रूप फल गीता ही त्याला प्राप्त करून देते. यावर बहुत काय बोलूं ! ! ३८. यास्तव या गोष्टी राहूं दे; परंतु ज्या कारणाकरितां हा गीताशास्त्रविस्तार तुला सांगण्यास मी आरंभ केला, तें तुझें काम झालें काय ? ते विचारूं ३९.

**अन्वयार्थ**- -**पार्थ**–हे अर्जुना !–**त्वया**–तूं–**एतत्**–हें मीं सांगितलेलें–**एकाग्रेण चेतसा**–एकाग्र–चित्तानें **श्रुतं**–**कच्चित्**–ऐकलेंस का–! **धनंजय**–हे धनंजया ! **ते**–तुझा–**अज्ञानसंमोहः**–अज्ञानामुळें झालेला अविवेक–**प्रनष्टः कच्चित्**–सर्वथा नाहींसा झाला का ? ७२

तर अर्जुना ! ह्या गीताशास्त्रांतील हा सिद्धांत एकाग्र चित्तानें ऐकलास कां ? ते ऐकल्यावर तो तुझ्या मनांत पूर्णपणें ठसला आहे किंवा नाहीं ? ते सांग बरें ! १५४०. आम्हीं जसा व ज्या रीतीनें हा शास्त्रसिद्धांत [ शास्त्र विशेष ] कानांच्या स्वाधीन केला तसाच त्यांनीं तुझ्या चित्तांत आणून स्वाधीन केला कीं नाहीं ? ४१. अथवा मधल्यामध्येंच लक्ष नसल्यामुळें सांडण्या लवंडण्यावारी फुकट गेले कीं काय ? किंवा तूं अनादरानें चालढकल करून तें झुगारून दिलेस ? ४२. जसे आम्हीं ते तुला सांगितले, तसेच जर तुझ्या अंतःकरणांत त्यांनीं पोंचते केलें असतील तर जें मी तुला आतां पुसेन, तें सत्वर सांग पाहूं ४३. अरे ! अर्जुना ! स्वस्वरूपाच्या अज्ञानापासून मागें उत्पन्न झालेल्या मोहानें तुला मुलविलें–भ्रमांत पाडलें होते [कर्तव्य पराङ्मुख केलें होतें ] तो मोह [ तुझ्याजवळ ] अजूनहि [ उर्वरित ] आहे, किंवा नाहीं ? ४४. फार किती विचारीत बसूं ! तूं आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं अद्यापहि कांहीं पापपुण्य पूर्वीप्रमाणें [ कर्ता वा अकर्ता यांपैकीं कांहीं स्वतःस ] जाणतो आहेस काय, एवढें सांग म्हणजे झालें ४५. अर्जुन हा निजानंदैक्यरूपी रसानें

१ जाणतें व नेणतें. २ प्रविष्ट. ३ दाट आरण्यांत. ४ वनचरें, पशुपक्ष्यादि. ५ सूर्य. ६ अंधकार. ७ अगोदरचे. ८ जन्माची परंपरारूप वेल. ९ मोठें. १० वाढ, उत्कर्ष. ११ शेवटीं. १२ मुक्काम. १३ शास्त्रविस्तार. १४ समजु तीस आला का ? १५ पदरीं घातलें. १६ सांडण्यालवंडण्या–वारी. १७ चालढकलीवर. १८ झुगारून दिलें. १९ प्रविष्ट झालें. २० सत्वर. २१ स्वकीय अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या. २२ पुण्य व पाप. २३ निजानंदरूप सामरस्यानें.

येणें मिषें। प्रश्नाचेनि ॥ ४६ ॥ पूर्णब्रह्म जाला पार्थु । तरी पुढील साधावया कार्यार्थु । मर्यादा श्रीकृष्णनाथु । उलंघों नेदी ॥ ४७ ॥ एऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणें ? । परी केलें पुसणें । याचि लागीं ॥ ४८ ॥ एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणूनियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ॥ ४९ ॥ मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजु मंडितु । निवडे जैसा न निवडितु । पूर्णचंद्रु ॥ १५५० ॥ तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे । हेंही सांडी तरी विरे । ब्रह्मपणही ॥ ५१ ॥ ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥ ५२ ॥ मग कांपतां करतळीं । दडपूनि रोमावळी । पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां ॥ ५३ ॥ प्राणक्षोभें डोलतया । आंगा आंगचि टेंकया । सूनि स्तंभु चाळया । भुलौनियां ॥ ५४ ॥ नेत्रयुगुळाचेनि वोतें । आनंदामृताचें भरितें । वोसंडत तें मागुतें । काढूनियां ॥ ५५ ॥ विविधा औत्सुक्यांची दाटी । चीप दाटत होती कंठीं । ते करूनियां पैठी । हृदयामाजीं ॥ ५६ ॥ वाचेचें वितुळणें । सांवरूनि प्राणें । अक्रमाचें श्वसणें । ठेंऊनि ठायीं ॥ ५७ ॥

अर्जुन उवाच :—

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत । स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो । तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपुला ॥ ५८ ॥ पासीं येऊनि दिनकरें । डोळ्यांतें अंधारें । पुसिजे हें कायि सरे । कोणे गांवीं ? ॥ ५९ ॥ तैसा तूं श्रीकृष्णराया । आमुचिया डोळ्यां । गोचर हेंचि कायिसया । न पुरे तंव ॥ १५६० ॥ वरी लोभें मायेपासूनी । तें सांगसी तोंड भरूनी । जें कायिसेनिही करूनी । जाणूं नये ॥ ६१ ॥ आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें ॥ ६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त जालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ ६३ ॥ मी तुझेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें । मोहाचे तया कांदे । नेदीच उरों ॥ ६४ ॥ आतां करणें कां न करणें । हें जेणें उठी दुजेपणें । तें तूं वांचूनि नेणें । सर्वत्र गा ॥ ६५ ॥ येविषयीं माझ्या ठायीं । संदेहाचे नुरेचि कांहीं । त्रिशुद्धी कर्म जेथ नाहीं । तें मी जालों ॥ ६६ ॥ तुझेनि मज मी पावोनी । कर्तव्य गेलें

पूर्ण विरघळून जाईल, म्हणून देवांनी या प्रश्नाच्या निमित्तानें त्यास भेदबुद्धीच्या अवस्थेंत आणला ४६. कारण, पार्थ पूर्ण ब्रह्मस्वरूप झाला; तरीपण आपले पुढील कार्यार्थ साधण्यासाठीं म्हणून श्रीकृष्णनाथ त्याला [ कल्पित उपाधिकृत ] भेद दशेची मर्यादा उल्लंघू देत नाहीं ४७. एऱ्हवीं, सर्वज्ञ जो श्रीकृष्ण, त्याला आपल्या उपदेशाचे करणें [ परिणाम ] समजत नव्हतें काय ? परंतु या वरील सांगितलेल्या कारणाकरितांच देवानें अर्जुनास प्रश्न केला ? ४८. याप्रमाणें प्रश्न करून नसतेच [ बाधित झालेलें ] अर्जुनपण आणून अर्जुन पूर्णदशेस आला त्याचे पूर्णपण हें त्याच्याकडून देवानीं स्वतः बोलविलें ४९. मग क्षीरसागरास सोडून [ क्षीरसागरातून बाहेर निघून ] आकाशांत पूर्णचंद्र आपल्या किरण समुदायानें युक्त होऊन क्षीरसमुद्राहून तत्त्वतः स्वरूपानें वेगळा न होतां [ त्याचाच एक अंश असून ] जसा वेगळा झालेला, असा दिसून शोभतो १५५०. तसा 'मी ब्रह्म आहें' हें क्षणामध्यें विसरून मग 'सर्व जग ब्रह्मत्वानें भरून गेलें आहे. अशी स्थिति होते. नंतर हेंहि विसरून क्षणांत ब्रह्मपणहि आपोआप आपल्याच स्वरूपीं विराम पावते ५१. अशी त्याची कधीं 'मी ब्रह्म आहें' अशी स्थिति व्हावी व पुनः क्षणमात्रांत ती स्थिति, स्फूर्ति नाहींशी व्हावी तो या देवाच्या प्रश्नामुळें 'मी अर्जुन आहे' या नांवानें, मोठ्या कष्टानें देहाच्या सीमेवर म्ह. देहभानावर उभा राहिला–आला ५२. मग थर थर कांपणाऱ्या तळ हातानीं अंगावरील उभे राहिलेले रोमांच दडपून सर्व अंगावर आलेलें घामाचे बिंदु जिरवून ५३. प्राणवायूच्या क्षोभात्मक वाढण्यानें डोलत असलेल्या अंगास अंगाचाच टेका देऊन व कंठ सद्गदित झाला होता, तो हे सर्व विकार व हालचाल विसरून स्तब्ध राहिला ५४. दोन्ही नेत्रांच्या कडांतून वाहात चाललेल्या प्रेमाश्रुधारा–लोट त्यांस आवरून [ मग पुसून टाकल्या ] ५५. नानाप्रकारच्या उत्कंठांच्या भरानें कंठांत चीप दाटत होती; त्या उत्कंठा हृदयांत दाबून ५६. व वाचा जी वितळली विस्कळित झाली होती ती सांवरून, प्राणक्षोभ झाला होता तोहि सांवरला; आणि श्वासोच्छ्वासाची गति क्रमविरहित विपरीत झाली होती, ती पूर्ववत जागच्या जागीं नीट सांवरून ५७.

अन्वयार्थ––अच्युत–हे श्रीकृष्णा !– मोहः नष्टः–माझा मोह पार नाहींसा झाला–त्वत्प्रसादात्–तुझ्या कृपेमुळें–मया–मी–स्मृतिः–आत्मतत्त्वाविषयींची आठवण लब्धा–मिळविली–गतसंदेहः स्थितः अस्मि–मी सर्व संदेहांनीं रहित होऊन आतां राहिलों आहे–तव वचनं करिष्ये–तुझें म्हणणें मी मानेन म्हणजे तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी वागेन ७३.

मग अर्जुन म्हणाला कीं, देवा ! तुम्हीं मला 'तुला मोह आहे असें अर्जुनहि वाटते कीं काय ? असें मोठ्या प्रेमानें विचारलें, तर तो मोह माझ्यापासून आपल्या कुटुंबासह ठावठिकाण [ अज्ञानासहवर्तमान ] सोडून गेला ! ५८. सूर्यानें डोळ्याच्या अगदीं जवळ येऊन 'अंधार दृष्टीस पडतो काय ? असें डोळ्याला विचारलें तर विचारणें कोणत्यातरी गांवीं सरते होईल [ शोभेल ] काय ! ५९. तसें हे श्रीकृष्णराया ! तुम्हीं आमच्या डोळ्यांस प्रत्यक्ष दर्शन दिल्यावर तेंच एक [ मोह नाशादि ] कोणत्याहि कार्यास पुरेसें होणार नाहीं काय ? १५६०. तशांत तुम्हीं आईपेक्षांहि अतिप्रेमानें जें इतर कोणत्याहि प्रयासानें, साधनानें दुसरें कोणापासूनहि जाणता येणार नाहीं, तें ज्ञान तोंड भरून विस्तारपूर्वक सांगतां ६१. आतां माझ्या ठिकाणीं मोह अद्याप आहे किंवा नाहीं ! असें आपण काय विचारता ? मी आपल्या स्वरूपाशीं ऐक्य होऊन आज कृतकृत्य, [ शोक विमुक्त ] कृतार्थ झालों आहे ६२. काय माझी पूर्वींची स्थिति 'मी अर्जुन आहें' अशा अभिमानानें–देहात्मत्वभ्रांतीनें मोहांत गुंतलों होतों, तो आपल्या रूपाशीं ऐक्य पावून त्यामुळें [ पाश विमुक्त ] मुक्त झालों, म्हणून आतां आपण पुसणें किंवा मी सांगणें या दोन्हीं गोष्टी आपोआपच उर्वरित राहिल्या नाहींत ६३. तुमच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या आत्मबोधानें [ आत्मविज्ञानामुळें ] मी आपल्या ठिकाणीं त्या मोहाचें मूळ [ अज्ञान ] शिल्लक राहूं देणार नाहीं ६४. आतां ज्या द्वैतामुळें अमुक एक क्रिया करणें अथवा अमुक एक क्रिया न करणें हें मात्र उत्पन्न होत होते, तें द्वैत मी [ सत्यत्वानें ] जाणत नसून या जगांत सर्वत्र तुझ्याशिवाय दुसरें कांहींहि जाणत नाहीं ६५. या विषयीं माझ्या ठिकाणीं आतां संशयाचें कांहींच उर्वरित राहिलें नाहीं, तर खरोखर जेथें स्वरूपानें कर्म उरतच नाहीं [ ते ब्रह्मस्वरूप ] मी झालों आहे ६६. तुझ्या कृपेच्या योगानें मला माझें आत्मस्वरूप प्राप्त होऊन [ आत्मस्वरूप संपत्तीमुळें ] माझें कर्तव्य समूळ–निःशेषतया नाहींसें झालेंच; परंतु आतां प्रभो !

निपटूनी । परी आज्ञा तुझी वांचोनि । आन नाहीं प्रभो ॥ ६७ ॥ कां जें दृश्य दृश्यातें नाशीं । जें दुजें द्वैतातें ग्रासी । जें एक परी सर्वदेशीं । वसवी सदा ॥ ६८ ॥ जयाचेनि संबंधें बंधु फिटे । जयाचिया आशा आस तुटे । जें भेटलेया सर्व भेटे । आपणपांचि ॥ ६९ ॥ तें तूं गुरुलिंग जी माझें । जें येकलेपणींचें विरजें । जयालागीं वोलांडिजे । अद्वैतबोधु ॥ १५७० ॥ आपणाचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्यांचें काम । मग कीजे का निःसीमा । सेवा जयाची ॥ ७१ ॥ गंगा सिंधू सेवूं गेली । पावतांचि समुद्र जाली । तेवीं भक्तां सेल दिधली । निजपदाची ॥ ७२ ॥ तो तूं माझा जी निरुपचारु । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरु । मा ब्रह्मतेचा उपकारु । हाचि मानीं ॥ ७३ ॥ जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ ७४ ॥ तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा । करीन देईं अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥७५॥ यया अर्जुनाचिया बोला । देवो नाचे सुखें भुलला । म्हणे विश्वफळा जाला । फळ हा मज ॥ ७६ ॥ उणेनि उमचला सुधाकरु । देखुनी आपला कुमरु । मर्यादा क्षीरसागरु । विसरेचिना ? ॥ ७७ ॥ ऐसें संवादाचियां बहुलां । लग्न दोघांचियां आंतुलां । लागलें देखोनि जाला । निर्भरु संजयो ॥ ७८ ॥ तेणें म्हणतसे संजयो । बाप कृपानिधी रावो । तो आपुला मनोभावो । अर्जुनेंसी केला ॥ ७९ ॥ तेणें उचंबळलेपणें । संजय धृतराष्ट्रातें म्हणे । जी कैसें बादरायणें । रक्षिलों दोघे ? ॥ १५८० ॥ आजि तुमतें अवधारा । नाहीं चर्मचक्षूही संसारा । कीं ज्ञानदृष्टिव्यवहारा । आणिलेती ॥ ८१ ॥ आणि रथींचिये राहाटी । घेई जो घोडेयासाठीं । तया आम्हां या गोष्टी । गोचरा होती ॥ ८२ ॥ वरी जुंझाचें निर्वाण । मांडलें असे दारुण । दोहीं हारीं आपण । हारपिजे जैसें ॥ ८३ ॥ येवढा जिये सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥ ८४ ॥ ऐसें संजय बोलिला । परी न द्रवे येरु उगला । चंद्रकिरणीं शिवतला । पाषाणु जैसा ॥ ८५ ॥ हें देखोनि तयाची दशा । मग करीचिना सरिसा । परी सुखें जाला पिसा । बोलतसे ॥ ८६ ॥ भुलविला हर्षवेगें । म्हणोनि धृतराष्ट्रा सांगे । एऱ्हवीं नव्हे तयाजोगें । हें कीर जाणें ॥ ८७ ॥

संजय उवाचः—

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः । संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥**

यावज्जीवपर्यंत तुमच्या आज्ञेशिवाय मला कांहींएक कर्तव्य करावयाचें, असें उरलें नाहीं ६७. कारण, पूर्वी जिज्ञासावस्थेंत जी ब्रह्मवस्तु दृश्य नसून जिला दृश्य म्हणून पाहिलें; पण विचारपूर्वक पाहिलें तर, त्याच्या ठिकाणचा दृश्यभावच नष्ट होतो. तसेंच त्याला द्वितीयत्वानें पाहिलें तर, त्याचा [ उपाधिकृत ] द्वैतात्मक गुरु शिष्यभावच नाहींसा करतें, असें जें ब्रह्म तें एकच असून सर्व देश व्यापून, सर्वकाळ अबाधित राहतें ६८. ज्याचा आपल्याशीं आत्मत्वानें संबंध झाला असतां संसारबंध नाहींसा होतो, ज्याच्या आशेनेंच इतर सर्व आशा नाहींशा होतात व जे भेटलें असतां आपलें आत्मस्वरूपाचे ठिकाणीं सहजच सर्व भेटते ६९. ते तुम्हीं माझी सद्गुरुमूर्ति आहांत, कीं जी एकत्वभावाला साह्य करते व जिच्याकरितां तिच्यावरून अद्वैत बोधाचेंहि उल्लंघन करावें लागते असें वाटते १५७०. [ हे कृष्णा ! ] ज्याच्या कृपेनें शिष्य आपल्याच स्वरूपानें ब्रह्मरूप झाला असतां, त्याची पापपुण्यात्मक सर्व कर्में [ कृत्याकृत्याचें प्रयोजनच ] नाहींशीं केलीं असतां, अशा स्थितींत त्यानें बोधानंतरहि [ विधी किंकरत्व नसलें, तरीहि बाधितानुवृत्तीनें ] गुरूच्या मनोगताप्रमाणें त्यांची निःसीम सेवा करावी, एवढेंच त्याचें कर्तव्य उरतें ७१. गंगा समुद्राचा उपभोग घेण्यास गेली असतां समुद्राची व तिची गांठ पडल्याबरोबर ती जशी समुद्ररूपच होते. त्याप्रमाणें ज्यांनीं आपल्या भक्तांना आत्मपदाचाच आपला शेलका वांटा दिला ७२. तो तूं हे श्रीकृष्णा, भेदरहित बुद्धीनें व निर्निमित्त सेवा करण्यास योग्य असाच माझा सद्गुरु आहेस; तर मग हाच मला ब्रह्मरूपता देण्याचा मजवर आपला उपकार आहे, असें समजा ७३. कारण, पूर्वी तुमच्या व माझ्या एकरूपतेच्या आड मिथ्या भेदाचे प्रतिबंधक कवाड होतें, तें तुम्ही नाहींसें करून उत्तम असें सेवासुख गोड केलेत [ तें मला मिळवून दिलें ] ७४. तर सर्व देवांचे राजे जे तुम्ही, ते मला जी आज्ञा कराल ती मी पाळीनच पाळीन. फार काय पण ! वाटेल ते करण्याविषयीं मला आज्ञा दिली तर तीहि मी पाळीन ७५. हें अर्जुनाचें भाषण ऐकून त्यामुळें देव सुखानें-अति हर्षानें मुळून प्रेमानें नाचूं लागले आणि म्हणाले कीं, या विश्वाचें फळ साध्य जो मी त्या मला अर्जुन हेंच एक मनासारखें फळ लाभलें आहे ७६. पूर्णकलेनें युक्त असा आपला मुलगा जो चंद्र, त्याला पाहून क्षीरसागर आपली मर्यादा विसरतच नाहीं काय ? [म्हणजे भरती येत नाहीं काय ? तर येतें ] ७७. असें संवादरूपी बोहल्यावर हृदयस्थ खुणेनें श्रीकृष्ण भगवान् व अर्जुन या दोघांचें लग्न लागलेलें [स्वरूपैक्यतेला] पाहून संजयहि आनंदानें तल्लीन झाला ७८. त्यामुळें संजय म्हणतो कीं, राजा ! धन्य आहे ! देवांनीं आपला मनोभाव अर्जुनाजवळ व्यक्त केला ७९. अशा रीतीनें प्रेमाचा गहिंवर आल्यामुळें संजय धृतराष्ट्र राजास म्हणाला कीं, हे राजन् ! केवढें आपलें दोघांचें नशीब थोर आहे हो ! श्रीव्यासांकडून आपण, अशा समयास कसें रक्षिलें गेलों म्ह० [व्यासांनीं आत्मज्ञान प्राप्त करून दिलें त्यामुळें अनर्थ परंपरेंतून मुक्त झालों ] १५८०. ऐका आज जगांतील पदार्थ पाहण्याकरितां लागणारें असें चर्मचक्षुहि नाहींत, अशा स्थितींत तुम्हाला अतींद्रिय विषयक जी ज्ञानदृष्टि ती भोगण्याच्या व्यवहारांत-योग्यतेंत सहज आणलें आहे ८१. आणि माझ्याबद्दल विचार केला तर रथ चालविण्याकरितां जे घोडे लागतात, त्या घोड्यांची परीक्षा करण्याकरितां म्हणून तुम्ही ज्या मला ठेविलें त्या मजला आज कृष्ण व अर्जुन यांचा संवाद ऐकण्याचा लाभ झाला ८२. त्यांतहि वेळ कोणती म्हणाल तर युद्धाचा-आणीबाणीचा घोर प्रसंग सुरू झाला आहे व दोन्हीं पक्षांकडील योद्धे आज आपण नष्टच झालों आहों, अशा वीरश्रीनें युद्धास तयार झालेले असून जय व अपजय कोणाचाहि झाला तरी तो आपलाच होय ८३. एवढ्या युद्धासारख्या संकटसमयीं मजवर केवढा महान् अनुग्रह हा कीं, ज्यामुळें आज ब्रह्मानंद उघड उघड [ निष्प्रत्यूहपणें आपल्याकडून ] भोगवीत आहे. [ आपल्यास उपभोग घ्यावयास सापडत आहे ] ८४. असें हे संजय बोलला परंतु दगडावर चंद्राचें किरण पडले, तरी जसा त्याला पाझर फुटत नाहीं, तसा धृतराष्ट्र राजाच्या अंतःकरणावर मुळींच परिणाम झाला [ द्रव आला ] नाहीं, तर तो स्वस्थच बसला ८५. अशी त्या धृतराष्ट्र राजाची स्थिति पाहून मग संजय त्या संवादविषयक बोलणें करीच ना; तरीपण तो सुखाचें भरानें वेडा झाला असल्यामुळें तो तसाच पुढें बोलत राहिला ८६. संजय ब्रह्मनंदाच्या भरानें मुळून गेल्यामुळें तो धृतराष्ट्राला संवाद वृत्त सांगत होता. एऱ्हवीं तें धृतराष्ट्राजोगे [अर्थात ऐकण्याची राजाची योग्यता ] नाहीं, असें तो निश्चयानें जाणतच होता ८७.

**अन्वयार्थ—इति**-याप्रमाणें-**अहं**-मी-**वासुदेवस्य**-वासुदेवाच्या-**च**-आणि-**महात्मनः पार्थस्य**-महात्म्या अर्जुनाच्या-**इदम् अद्भुतं रोमहर्षणं संवादं**-या आश्चर्य कारक, अंगावर रोमांच उभे करणाऱ्या संवादाला-**अश्रौषम्**-ऐकिलें ७४.

मग म्हणे पैं कुरुराजा । ऐसा बंधुपुत्र तो तुझा । बोलिला तें अधोक्षजा । गोड जालें ॥ ८८ ॥ अगा पूर्वापर सागर । यया नामसीचि सिनार । येर आघवें तें नीर । एक जैसें ॥ ८९ ॥ तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगाचिपासीं[४] दिसे । मग संवादीं जी नसे । कांहींचि भेदु ॥ १५९० ॥ पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होती सन्मुखें । तेथ येरी येर देखे । आपणपें जैसें ॥ ९१ ॥ तैसा देवेसीं पंडुसुतु । आपणपें देवीं देखतु । पांडवेंसीं देखे अनंतु । आपणपें पार्थीं ॥ ९२ ॥ देवें देवो भक्तालागीं । जिये विवरूनि देखे आंगीं । येरुं तियेचेही भागीं । दोन्ही देखे ॥ ९३ ॥ आणिक कांहींच नाहीं । म्हणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांदताती ॥ ९४ ॥ आतां भेदु जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर कां घडे? । ना भेदुचि तरी जोडे । संवादसुख कां ? ॥ ९५ ॥ ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैत गिळणें । तें ऐकिलें बोलणें । दोघांचें मियां ॥ ९६ ॥ उटूनि दोन्ही आरसे । वोडविलीया सरिसे । कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ? ९७ ॥ कां दीपासन्मुखु । ठेविलया दीपकु । कोण कोणा अर्थिकुं । कोण जाणें ॥ ९८ ॥ नाना अर्कापुढें अर्कु । उदयलिया आणिकु । कोण म्हणे प्रकाशकु । प्रकाश्य कवण ? ॥ ९९ ॥ हें निर्धारूं जातां फुडें । निर्धारासि ठेंक पडे । ते दोघे जाले एवढे । संवादें सरिसे ॥ १६०० ॥ जी मिळतां दोन्ही उदकें- । माजीं लवण वीरूं ठाके । कीं तयासींही निमिखें[१४] । तेंचि होय ॥ १ ॥ तैसं श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं । धरितां मजही वीनी । तेंचि होतसे ॥ २ ॥ ऐसें म्हणे[१५] ना मोटकें । तंव हिरोनि सात्त्विकें । आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥ ३ ॥ रोमांच जंव फरके । तंव तंव आंग सुरके । स्तंभ स्वेदांतें जिंके । एकला कंपु ॥ ४ ॥ अद्वयानंदस्पर्शें । दिठी रसमयें जाली असे । ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वचि ॥ ५ ॥ नेणों काय न माय पोटीं । नेणों[२३] काय गुंफे कंठीं । वाँगर्था पडत मिठी । उसासांचिया ॥ ६ ॥ किंबहुना सात्त्विकीं आठां । चांचरु मांडतां उमेठां । संजयो जालासे चोहटां । संवादसुखाचा ॥ ७ ॥ तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती । मग पुढती देहस्मृती । लाधली तेणें ॥ ८ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् । योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

मग संजय म्हणाला कीं, हे धृतराष्ट्र राजा! तुझ्या भावाचा मुलगा जो अर्जुन, तो असें बोलला ते ऐकून श्रीकृष्णास परम-आनंद झाला ८८. राजा! पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र या नाममात्राचाच काय तो वेगळेपणा आहे, बाकी उदकाचे दृष्टीनें ते दोन्ही समुद्रांतील पाणी जसे एकच आहे ८९. तसे श्रीकृष्ण व अर्जुन हे देहोपाधीच्या दृष्टीनें भिन्न आहेत; परंतु त्यांच्या झालेल्या संवादांत तो भेद मुळींच उरला नाहीं [ तत्त्वतः त्यांत भेद नाहींच ] १५९०. आरशापेक्षांहि स्वच्छ असें दोन पदार्थ एकमेकासमोर ठेवल्यावर जसें एकमेकांत एकमेक आपण आपल्याला पाहतात ९१. तसा देवांसह अर्जुन, आपल्याला देवाच्या स्वरूपांत पाहूं लागला व अर्जुनासह देव आपल्याला अर्जुनाच्या स्वरूपांत पाहूं लागले होते ९२. तो देवाचा देव, हा भक्ताकरितां विचार करून ज्या आपल्या स्वरूपांत पाहत होता, तर एकीकडे अर्जुनाहि आपल्या स्वरूपांत आपल्याला व देवाला अशा दोघांनाहि पाहात होता ९३. शिवाय द्वैतमात्र असा मुळींच उरला नाहीं म्हणून श्रीकृष्ण भगवान् व अर्जुन हे दोघेहि एकपणानें-अद्वय बोधानें नांदत आहेत पहा! ९४. आतां दोघांमधील भेद जर स्वरूपतः नाहींसा झाला तर दोघांचीं प्रश्नोत्तरें कसें घडतील? [ तर घडणारच नाहींत ] किंवा तो भेदच जर [ वास्तवरूप सत्य ] राहात असेल तर संवादाचें सुख कसें मिळणार? [ कारण, वस्तुतः भेद नसून जर आभासमात्र भेद असेल तरच कोणासहि संवादांत सौख्य लाभत असते ] ९५. असें आभासमात्र द्वैतपणाचें चाललेलें भाषण ऐकलें असतां बुद्धींतील द्वैत नाहींसें म्ह. बाधित होते, असें तें श्रीकृष्ण भगवान् व अर्जुन या दोघांचें भाषण मी ऐकलें ९६. दोन आरसे स्वच्छ करून समोरासमोर ठेवले असतां कोण कोणाला पहातो म्हणून कल्पना करावी? ९७. अथवा एका दिव्यासमोर दुसरा दिवा ठेवला असतां कोणता प्रकाशक व कोणता प्रकाश्य आहे हें कोणी जाणावें? ९८. किंवा एका सूर्यासमोर दुसरा सूर्य उगवला असतां अमुक एक प्रकाशक व अमुक एक प्रकाश्य आहे, असें कोण म्हणेल? ९९. या उपरिनिर्दिष्ट गोष्टींचा ठाम निश्चय करूं गेल्यास तो निश्चय कुंठित होतो, तसा श्रीकृष्ण व अर्जुन हे संवादाच्या भरांत इतक्या ऐक्यास पावले कीं, त्याचा विचार करूं लागलें असतां तो जागचे जागीं बंद राहतो १६००. दोन नद्यांचे प्रवाह मिळत असतांना त्या दोहोंना मिळण्याचें थांबवून बाजूस करण्याकरितां जर मीठ मध्यें उभे राहिले तर त्या मधल्या मिठाचें एका क्षणांत जसें पाणीच होईल १. तसें श्रीकृष्ण व अर्जुन यांचें जें संवादात्मक भाषण झालें, तें ऐकून ध्यानांत धरतांना माझीहि तशाच प्रकारची स्थिति झाली आहे २. असें इतकें संजय कांहींसें म्हणतो न म्हणतो तोंच अष्टसात्त्विक भावांनीं त्याचा संजयपणाचा आठव हिरावून कोठे नेला ते कळेना ३. अंगावर जों जों रोमांच उभे राहात होते, तों तों शरीर संकोचित होत होते. सुरकुत्या पडल्या, स्तब्धपणा आला, घाम सुटला, त्यास जिंकून त्याहिपेक्षां एकटा कंप विशेष वाढत होता ४. अद्वयानंदाच्या स्पर्शानें -भरानें दृष्टि ब्रह्मानंदमय-जलमय झाली ते अश्रु नव्हेत तर डोळ्यांना जणुं काय प्रेमाचें पाझरच फुटलें आहेत ५. त्यांचें पोटांत काय मावेनासें झालें होते कोणास ठाऊक? कंठांत काय अडकत होते? कंठ कां दाटून आला? हें कांहीं माहित नाहीं, पण हुंदक्यामुळें-श्वासोच्छ्वासामुळें तोंडांतुन वाणीनें शब्द बाहेर पडण्याचें बंद पडले होते ६. फार काय, सांगावें!! अष्टसात्त्विक भावांच्या योगानें संजयाची अतिशय बोबडी वळली; आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादसुखाचा संजय हा जणुं चव्हाटाच झाला आहे ७. त्या सुखाची अशी जात आहे कीं, त्याच्या योगानें आपोआपच शांति धरते. म्हणजे त्याचे भरते आपण होऊन ओसरते. म्हणून संजय पुढें सहजच पुनः देहभानावर आला ८.

**अन्वयार्थ**---**अहं**-मी-**एतत् परं गुह्यं योगं**-या अत्यंत गुह्य योगाला-**व्यासप्रसादात्**-भगवान् व्यासांच्या कृपेनें-**कथयतः योगेश्वरात् कृष्णात्**-सांगत असलेल्या योगेश्वर कृष्णाच्या तोंडून-**स्वयं साक्षात्**-स्वतः आपल्या कानांनीं-**श्रुतवान्**-ऐकिलें ७५.

---

१. पुतण्या [ अर्जुन ]. २ पूर्वपश्चिम. ३ वेगळेपणा. ४ देहभिन्नतेच्या दृष्टीनें. ५ देवांचा देव. ६ विचार करून. ७ संजय. ८ ऐक्यसुख. ९ एकरूपतेंत. १० समोरासमोर ठेविलें असतां. ११ प्रकाशक. १२ स्तब्धता. १३ निवारण करण्यास, बाजूस करण्यास. १४ क्षणांत. १५ तऱ्हा, प्रकार. १६ थोडें बोलतो न बोलतो तों. १७ अष्टसात्त्विक भावांनीं. १८ उभारे. १९ संकोच पावे. २० स्तब्धता व घाम यांस. २१ ब्रह्मानंदमय. २२ पाझरच. २३ गुंतलें, अडकलें. २४ शब्दार्थाला. २५ श्वासोच्छ्वासांनी. २६ आठ सात्त्विक भावांनीं. २७ बोबडी वळली असतां. २८ अतिशय.

तेव्हां बैसतेनि आनंदें । म्हणें जी जें उपनिषदें । नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ॥ ९ ॥ ऐकतांचि ते गोठी । ब्रह्मत्वाची पडिली मिठी । मीतूंपणेंसीं दृष्टी । विरोनि गेली ॥ १६१० ॥ हे आघवेचि का योग । जया ठाया येती मार्ग । तयाचें वाक्य सवंग । केलें मज व्यासें ॥ ११ ॥ अहो अर्जुनाचेनि मिषें । आपणपेंचि दुजें ऐसें । नटोनि आपणया उद्देशें । बोलिलें जें देव ॥१२॥ तेथ कीं माझें श्रोत्र । पाटांचें जालें जी पात्र । काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचें ॥ १३ ॥

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् । केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

राया हें बोलतां विस्मित होये । तेणेंचि मोडावलों ठाये । रत्नीं कीं रत्नकिळा ये । झांकोळित जैसी ॥ १४ ॥ हिमवंतींचीं सरोवरें । चंद्रोदयीं होती कांश्मीरें । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये ॥ १५ ॥ तैसा शरीराचिया स्मृती । तो संवादु संजय चित्तीं । धरी आणि पुढती । तेंचि होय ॥ १६ ॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः । विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

मग उठोनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहसी ? ॥ १७ ॥ न देखणेंनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । विसरें आठवे तें कैसें । चुकऊं आतां ॥ १८ ॥ देखोनि चमत्कारु । कीजे तो नाहीं पैसारु । मजहीसकटें महापूरु । नेत आहे ॥ १९ ॥ ऐसा श्रीकृष्णार्जुन- । संवाद-संगमीं स्नान । करूनि देतसे तिळदान । अहंतेचें ॥ १६२० ॥ तेथ अंसंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं स्फुंदें । श्रीकृष्ण म्हणे सद्गदें । वेळोवेळां ॥ २१ ॥ या अवस्थांची कांहीं । कौरवांतें परी नाहीं । म्हणौनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव ॥ २२ ॥ तंव जाला सुखलाभु । आपणपां करूनि स्वयंभु । बुझाविला अवष्टंभु । संजयें तेणें ॥ २३ ॥ तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी । रावो म्हणे संजया परी । कैशी तुझी गा ? ॥ २४ ॥ तेणें तूंतें येथें व्यासें । बैसविलें कासया उद्देशें । अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ? ॥ २५ ॥ रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया । कां रात्री होय पाहलया । निशाचरां ॥ २६ ॥ जो जेथिंचें गौरव नेणें । तयासि तें भिंगुळवाणें । म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥ २७ ॥ मग म्हणे सांगें प्रस्तुत ।

तेव्हां ओसरत, स्थिरावत असलेल्या आनंदानें संजय म्हणतो कीं, महाराज! उपनिषदांनाहि जें गुह्य टाऊक नाहीं, तें श्रीव्यासांच्या प्रसादानें मी आज ऐकलें ९. ती गुह्य गोष्ट ऐकण्याबरोबर ब्रह्मभावाची मिठी पडली–ऐक्य झालें. मी व तूं या भावासहवर्तमान अज्ञानदृष्टि पूर्णतया मालवून [ बाधित होऊन ] गेली १६१०. हे सर्वच योग, उपाय ज्या ठिकाणीं येऊन मिळणारे मार्ग आहेत असा जो श्रीकृष्ण भगवान् त्याचें वाक्य श्रीव्यासांचे कृपेनें मला सवंग, सुलभ केलें आहे ११. अहो! अर्जुनाच्या निमित्तानें भगवान् श्रीकृष्ण आपणच दुसरें [ अर्जुनरूप ] असे होऊन आपल्यालाच उद्देशून जे बोललें १२. महाराज! ते बोलणें ऐकण्यासाठीं माझे कान अधिकारास पात्र झाले; तर श्रीगुरूंच्या स्वतंत्र अद्भुत सामर्थ्याचें मी काय वर्णन करूं? १३.

**अन्वयार्थ**––**राजन्**–हे राजा धृतराष्ट्रा!–**केशवार्जुनयोः**–कृष्ण व अर्जुन यांच्या–**इमम् अद्भुतं पुण्यं संवादं**–या अद्भुत व पुण्यप्रद संवादाला–**संस्मृत्य संस्मृत्य च**–पुनः पुनः आठवून–**मुहुः मुहुः**–मी पुनः पुनः–**हृष्यामि**––आनंदित होतों ७६.

ज्याप्रमाणें रत्नाची प्रभा रत्नाच्या आकार विशेषात्मक मूळ रूपाला झांकीत येते. [ प्रभेमुळें आकार चट्कन् लक्षांत येत नाहीं ] त्याप्रमाणें संजय, धृतराष्ट्राला हें बोलत असतां तो आश्चर्यचकित झाला, त्यामुळें त्याचा संजयपणाचा आठवहि मोडला व आपल्या स्वरूपांतच लीन होऊन राहिला १४. पण हिमालय पर्वतावरील सरोवरें चंद्रोदय होतांच गोठून तीं जशीं स्फटिक मण्यासारखीं घट्ट–स्वच्छ झालेलीं दिसतात, नंतर मग सूर्योदय झाला म्हणजे विरघळून त्यांना पुनः पूर्वीप्रमाणें द्रवत्व येतें १५. त्याप्रमाणें संजय पुनः देहभानावर आल्यावर श्रीकृष्णार्जुनाचा तो संवाद आठवून चित्तांत आणी व पुनः तो त्याच सुखांत निमग्न होत होता. [ देह विस्मृतीची स्थिति होत होती ] १६.

**अन्वयार्थ**––**च**–आणि–**हे राजन्**–हे धृतराष्ट्रा!–**तत् हरेः अद्भुतं रूपं**–तें हरीचें अतिशय अद्भुत रूप–**संस्मृत्य संस्मृत्य**–पुनः पुनः आठवून–**मे महान् विस्मयः**–मला मोठा विस्मय वाटतो–**च पुनः पुनः हृष्यामि**–आणि वारंवार मी हृष्ट–संतुष्ट होतों ७७.

मग त्या आनंदाच्या भरांत उभा राहून संजय धृतराष्ट्रास म्हणाला कीं. हे राजा! श्रीहरीच्या विश्वरूपाला पाहूनहि तुला आनंद न होतां तूं स्वस्थ कसें बसूं शकतोस? १७. जें विश्वरूप न पहातांहि दिसतें, जें नाहींपणानें नाहीं म्हटलें तरी ज्याचें अस्तित्व आहे व जें विसरूं म्हटलें तरीहि आठवतें, तें आतां कसें चुकवूं? १८. श्रीहरीचें विश्वरूप पाहून त्या विषयीं 'काय' हा चमत्कार आहे! असें म्हणण्यास देखील अवकाश उरला नाहीं. तो विश्वरूपाच्या [आनंदाचा] महापूर माझेंपणाच्या आठवासह वाहून घेऊन जात आहे १९. या प्रकारेंकरून श्रीकृष्णार्जुनसंवादरूपी संगमांत स्नान करून संजयानें अहंतेला तिलांजली देऊन तिचा संबंध तोडला आहे १६२०. त्या न सावरणाऱ्या आनंदांत मोठा–दीर्घ श्वासोच्छ्वास टाकून, अलौकिक गहिंवरानें कंठ सद्गदित होऊन "हे श्रीकृष्णा! हे श्रीकृष्णा!" असें संजय वारंवार म्हणूं लागला २१. ही संजयाची अष्टसात्त्विक भावांची अवस्था पाहून, त्यांतील कोणत्याहि गोष्टीचा गंध वा परिणाम धृतराष्ट्रराजास कधींच[ज्ञात] नव्हता. मग त्या आनंदाची कांहींशी कल्पना तरी राजास कशी येणार? तो कांहीं कल्पना करणार २२. इतक्यांत संजयानें आपल्याला झालेला जो सुखाचा लाभ तो अष्टसात्त्विक भावांचा फुंज आपलेच ठिकाणीं दाबून–स्थिर करून पुनः देहभानावर आला २३. त्यावेळीं धृतराष्ट्रराजा त्यास म्हणतोः–संजया! माझा वेळ जावा म्हणून तो घालविण्यासाठीं तुला व्यासांनीं येथें बसविलें असून त्या युद्धापैकीं कांहीं एक गोष्ट न सांगता ती बाजूस सारून हा तूं काय प्रकार मांडला आहेस? २४. त्या व्यासमुनींनी तुला येथें कोणत्या उद्देशानें बसविलें? आणि मध्येंच प्रसंग नसतां हीं भलती, भाषणें काय बोलतोस? २५. [ह्या धृतराष्ट्राच्या बोलण्याचा चमत्कार वाटून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात] अहो! रानांत राहणाऱ्या रानटी मनुष्यास एखादे मोठे महालांत नेले असतां त्याला जशा दाही दिशा उदास वाटतात किंवा उजाडलें असतांहि जशी निशाचरांस रात्र होते २६. जेथचें–ज्या गोष्टीचें महत्त्व माहित नसतें त्याला ती गोष्ट भयंकर किंवा विपरीतच वाटत असतें. म्हणून त्या चांगल्या गोष्टीस तो वाईट किंवा अप्रसंग म्हणणारच. [ त्यांत नवल तें काय! तें तसें पाहिलें तर योग्यच होय ] २७. मग धृराष्ट्रराजा म्हणाला, ऐक बा संजया! सध्या जें युद्ध

१ संभाषण, उपनिषत्सारसंवाद. २ हरपली. ३ योग्यतेचें, अधिकाराचे. ४ अद्भुत. ५ लीन होऊं लागे. ६ रत्नकांति, रत्नदीप्ति. ७ स्फटिकाप्रमाणें. ८ अवकाश. ९ माझेंपणाच्या, आठवाह. १० न सावरणाऱ्या.

उदयलेसें जें उत्कळित । तें कोणासि बा रे जैतें । देईल शेखीं ? ॥ २८ ॥ एऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जे दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ॥ २९ ॥ आणि येरांचेनि पाडें । दळही याचें देव्हडें म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें ? ॥ १६३० ॥ आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें ज्योतीष कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ ३१ ॥

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'मोक्षसंन्यासयोगो'नाम अष्टादशोऽध्यायः ॥१८॥

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें मी नेणें । परी आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ ३२ ॥ चंद्रु तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ ३३ ॥ रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ ३४ ॥ दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ ३५ ॥ वसंतु तेथें वनें । वन तेथें सुमनें । सुमनीं पालिंगनें । सारंगांचीं ॥ ३६ ॥ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥ ३७ ॥ भाग्य तेथ विलासु । सुख तेथ उल्लासु । हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥ ३८ ॥ तैसें सकल पुरुषार्थ । जेणें स्वामी का सनाथ । तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ ३९ ॥ आणि आपुलेनि कांतेंसीं । ते जगदंबा जयापासीं । अणिमादिकीं काय दासी । नव्हती तयातें ? ॥ १६४० ॥ कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तें जयो लागवेगें । तेथेंचि आहे ॥ ४१ ॥ विजयो नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । श्रियेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ॥ ४२ ॥ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी । न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ? ॥ ४३ ॥ ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें कां नोहावे ? । तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ? ॥ ४४ ॥ तयाचिया गांवींचिया । नदी अमृतें वाहाविया । नवल कायि राया । विचारीं पां ॥ ४५ ॥ तयाचे बिसाट शब्द । सुखें म्हणों येती वेद । सदेह सच्चिदानंद । कां न व्हावे ते ? ॥ ४६ ॥ पैं स्वर्गापवर्ग दोन्ही । इयें पदें जया अधीनीं । तो श्रीकृष्ण बाप जननी । कमळा जया ॥ ४७ ॥ म्हणौनि जिया

सुरू झालें आहे, तें शेवटीं कोणाला जय देईल ? २८. सहज विचार करून पाहिलें तर बहुतेक विशेषेंकरून आमची अशी मनोकल्पना आहे कीं, दुर्योधनाचाच प्रताप नेहमीं जास्ती असतो २९. आणि पांडवांचें मानानें पाहिलें असतां या दुर्योधनाचे सैन्यहि दिढीनें जास्त आहे; म्हणून तें सैन्य खरोखर, निश्चयानें जय मिळवून आणील ना ? १६३०. आम्हांला तर असें वाटतें, मग तुझें भविष्य कसें काय असेल ते असो; ते आम्हांस कळत नाहीं ! तर संजया, तुझें भविष्य-भाकीत जसें असेल तसें सांग ? ३१.

**अन्वयार्थ**—**यत्र**-ज्या पक्षामध्यें-**योगेश्वरः कृष्णः**-योगेश्वर कृष्ण आहे-[ **च** ]-व-**यत्र**-ज्या पक्षामध्यें-**धनुर्धरः पार्थः**-धनुर्धर पार्थ आहे-**तत्र**-तेथें-त्या पक्षामध्यें-**श्रीः**-संपत्ति **विजयः** विजय-**भूतिः**-ऐश्वर्य-**च**-आणि-**ध्रुवा नीतिः**-नित्य न्याय आहेत-**इति मम मतिः**-अशी माझी दृढ भावना आहे ७८.

हें राजाचें भाषण ऐकून संजय म्हणाला कीं, महाराज ! त्यांचें परस्परांचें काय होईल ? त्या दोघांपैकीं कोणाला जय येईल, हें मी जाणत नाहीं; परंतु जेथें आयुष्य आहे तेथें जगणें आहे. हें खास आहेच ३२. चंद्र तेथें चांदणें असावयाचेंच, शंकर तेथें पार्वती असावयाचीच, संत तेथें सारासार विचार असावयाचाच, या गोष्टी जशा निश्चित असावयाच्याच ३३. किंवा राजा तेथें सैन्य, सौजन्य तेथें मैत्री-संबंध, अग्नि तेथें दाहकतेचें सामर्थ्य हें असावयाचेंच ३४. दया तेथें धर्म, धर्म तेथें सुखप्राप्ती व जेथें सुख तेथें पुरुषोत्तम, या गोष्टी जशा असावयाच्याच ३५. वसंत तेथें [ झाडांना नवीन पालवी वगैरें ] वनश्री, वनश्री तेथें फुलें, आणि फुलें तेथें भ्रमरांचे समुदाय असावयाचेच ३६. गुरु तेथें ज्ञान, जेथें ज्ञान तेथें आत्मदर्शन आणि जेथें आत्मसाक्षात्कारात्मक दर्शन तेथें समाधान, हें असावयाचेंच ३७. भाग्य तेथें विलास, सौख्य, सुख तेथें उल्हास-प्रसन्नता असावयाचीच हें असो; जेथें सूर्य तेथें प्रकाश हा असावयाचाच, ३८. त्याप्रमाणें सर्व पुरुषार्थ [ धर्म, अर्थ, काम व मोक्ष, ] ज्या स्वामीच्या योगानें सनाथ झाले आहेत, तो भगवान् श्रीकृष्णराव जेथें आहे, तेथें लक्ष्मी असावयाचीच; आणि ३९. ज्याच्याजवळ आपल्या पतीसह ती जगन्माता लक्ष्मी आहे, त्याच्याजवळ जगदंबेच्या दासी आणिमादिक अष्टसिद्धि याहि असणार नाहींत काय ? १६४०. आपल्या अंगानें विजय-स्वरूप जो श्रीकृष्ण तो ज्या पक्षाकडे स्वतः उभा राहिलेला आहे, त्या पक्षाला जय शीघ्रतेनें मिळावयाचाच ४१. तसाच अर्जुन स्वतःहि विजय नांवानें प्रख्यात आहे, आणि विजय स्वरूप श्रीकृष्णनाथ भगवान् हा देखील जिकडे आहे; तिकडेच लक्ष्मीहि असणार व जेथें लक्ष्मीसह देव आहे, तिकडे खास जय ठेवलेलाच आहे, असें पक्के समज ४२. ज्या भक्ताला, अर्जुनाला श्रीकृष्ण भगवान् व लक्ष्मी हीं बाप व आई असतां, त्याच्या देशांतील झाडांनीं कल्पतरूला पैजेनें कां जिंकू नये ? ४३. त्या देशांतील सर्व दगड चिंतामणि कां होऊं नयेत ? व तेथील जमिनीला सुवर्णत्व कां येऊं नये ? ४४. त्याच्या गांवच्या नद्या अमृतानें भरून कां वाहूं नयेत ? [ तर वाहतीलच ] राजा ! याचा तूं विचार कर कीं, त्यांत नवल तें काय ? ४५. त्यांच्या [ भक्तांच्या ] तोंडांतून निघणारें जें स्वैर, भलतेहि शब्द त्यांना खुशाल वेद, वेदवाक्य म्हणतां येईल ! मग देहासह [ असतांना ] ते भक्त सच्चिदानंद स्वरूप कां न व्हावेत ? [ अवश्य व्हावेत; नव्हे आहेतच ] ४६. म्हणून स्वर्ग व मोक्ष हीं दोन्ही पदें ज्याच्या अंकित, स्वाधीन आहेत असा, श्रीकृष्ण भगवान् व कमला [ लक्ष्मी ] हीं ज्याला बाप व आई प्राप्त झालीं आहेत ४७. म्हणून ज्या पक्षाकडे लक्ष्मीपति श्रीकृष्ण भगवान् उभे आहेत

---

१ युद्ध, कलह. २ विजय. ३ पांडवांच्या मानानें. ४ सैन्य. ५ दीडपट. ६ गणित, भाकीत. ७ परस्परांचे. ८ चांदणें. ९ पार्वती. १० विचाराला. ११ सैन्य. १२ अग्नि. १३ उष्णता. १४ सुखाचें स्थान. १५ पुष्पें. १६ समुदाय. १७ भ्रमरांची. १८ आत्मानुभव. १९ सुखोपभोग. २० पतीसह. २१ अष्टमहासिद्धि. २२ लक्ष्मीसह. २३ पैजेनें. २४ जिंकावें. २५ चिंतामणी. २६ भलतें, अव्यवस्थित. २७ स्वर्ग व मोक्ष. २८ स्वाधीन. २९ लक्ष्मी.

बांहीं उभा । तो लक्ष्मीयेचा वल्लभा । तेथें सर्वसिद्धी स्वयंभा । येर मी नेणें ॥ ४८ ॥ आणि समुद्राचा मेघु । उपयोगें तयाहूनि चांगु । तैसा पार्थी आजि लांगु । आहे तये ॥ ४९ ॥ कनकत्वदीक्षागुरू । लोहो परिसु होय कीरू । परी जगा पोसिता व्यवहारू । तेंचि जाणें ॥ १६५० ॥ येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसें झणें कोण्ही म्हणे । वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपुला ॥ ५१ ॥ तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि बहुती । परी मांने इये स्तुती । गौरव असे ॥ ५२ ॥ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिराणी । तरी ते शार्ङ्गपाणी । फळा आली ॥५३॥ किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा । तो[१२] जयाकडे साक्षेपा । रीति आहे ॥ ५४ ॥ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो ? । तेथ न ये तरी वांवो । विजयोचि होय ॥ ५५ ॥ म्हणौनि जेथ श्री तेथें श्रीमंतु । जेथ तो पंडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ ५६ ॥ जरी व्यासाचेनि सांचें । धिरे[१३] मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवचि माना ॥५७॥ जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगळाचा ॥ ५८ ॥ या बोला आन होये । तरी व्यासाचा अंकु न वाहे । ऐसें गाजोनि बाहें । उभिली तेणें ॥ ५९ ॥ एवं भारताचा आंवांका । आणूनि श्लोकीं येका । संजयें कुरुनायका । दीधला हातीं ॥ १६६० ॥ जैसा नेणों केवढा वन्ही । परी गुणाग्रीं ठेऊनी । आणिजे सूर्याची हानी । निस्तरावया ॥६१॥ तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत । भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ॥ ६२ ॥ तयाही सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोक शेषींचा । व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गारु जो ॥ ६३ ॥ येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें असकें । अविद्याजाताचें निकें । जिंतलें होय ॥ ६४ ॥ ऐसें श्लोक शतें सात । गीतेचीं पदें आंगें वाहत । पदें म्हणों कीं परमामृत । गीताकाशींचें ॥ ६५ ॥ कीं आत्मराजाचिये सभे । गीते वोडवले हे खांबे । मज श्लोक प्रतिभे । ऐसे येत ॥ ६६ ॥ कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती । मोहमहिषा मुक्ति । आनंदली असे ॥ ६७ ॥ म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥ ६८ ॥ कीं अविद्यातिमिररोखें । श्लोक सूर्यातें पैजा जिंके । ऐसे प्रकाशिले गीतामिषें । रायें श्रीकृष्णें ॥६९॥ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली

तेथें सर्व सिद्धि मूर्तिमंत असावयाच्याच; याशिवाय मी दुसरें कांहीं जाणीत नाहीं ४८. [ आतां सर्व जीवांना अर्जुनाचा उपयोग अधिक आहे, असें संजय सांगतो ] आणि समुद्रापासून उत्पन्न होणारा जो मेघ, तो विशेष उपयोगाच्या दृष्टीनें समुद्राहूनहि अधिक चांगला आहे. तसें [ उपयुक्ततेच्या दृष्टीनें ] श्रीकृष्णापेक्षां पार्थाचा आज विशेष संबंध व उपयोग आहे ४९. लोखंडाला सुवर्णत्वाची दीक्षा [ स्वरूप ] देणारा परिस हा गुरु आहे खरा, परंतु जगाला पोसणारा व्यवहार, तेंच [ सोनेंच ] जाणते म्ह० व्यवहारांत [ सोन्याचाच ] विशेष उपयोग होतो, त्याचीच योग्यता-उपयुक्तता विशेष मानली जाते १५५०. या उदाहरणानें गुरुत्वाला उणेपणा येतो, असें कदाचित कोणी म्हणेल; पण तसें कोणी म्हणूं नये. कारण, अग्नि आपलाच प्रकाश दिव्याच्यारूपानें प्रकाशित करतो. म्हणून दीपाची प्रशंसा केली असतां ती जशी अग्नीचीच होते ५१. तशीं देवाच्याच प्रसाद सामर्थ्यानें पार्थ समर्थ झाला आहे; तरीपण अर्जुन देवाहूनहि विशेष सामर्थ्यवान् आहे. अशीं पार्थाचीच वर केलेली स्तुति देवाला पुष्कळ प्रकारेंकरून आवडते, असें या स्तुतीचें विशेष गौरव आहे ५२. आणि पुत्राकडून मी सर्व गुणांत जिंकला जावा, अशी बापास जी इच्छा असते तीच श्रीकृष्णाची इच्छा परिपूर्ण–सफल झाली आहे ५३. राजा ! फार काय सांगावें ! ! अशा प्रकारच्या कृष्णकृपेनें युक्त जो पार्थ, तो जाणून बुजून निश्चयानें ज्या बाजूला आहे ५४. हे राजा ! तोच विजयाचे ठिकाण आहे. याविषयीं तुला काय संशय आहे ? तेथें त्या पक्षाकडे जर विजय न येईल तर विजयाचें विजयपणच व्यर्थ होईल ५५. याकरितां, जेथें लक्ष्मी तेथें तिचा पति भगवान् श्रीकृष्ण व जेथें पंडुपुत्र अर्जुन हे तीन आहेत, तेथें विजय आहे व सर्व गोष्टींची भरभराटहि तेथेंच आहे ५६. जर श्रीव्यासांच्या बोलण्यावर तुमचा खरा भरंवसा असेल, तर मी जें आतां बोललों तें माझें भविष्य अटळ आहे, असें समजा ५७. जेथें तो लक्ष्मीसहित श्रीकृष्ण आहे व जेथें भक्तकदंब [ अर्जुन ] हे आहेत, तेथें सहजच सुखाचा आणि कल्याणाचा लाभ आहे ५८. या माझ्या बोलण्यांत जर अन्यथा होईल, तर मी व्यासांचा शिष्य म्हणून म्हणविणारच नाहीं, असें हात उभारून मोठ्यानें गर्जना करून संजय बोलला ५९. याप्रमाणें सर्व भारताचा सारांश संजयानें गीतेच्या अठराव्या अध्यायांतील एका शेवटल्या श्लोकांत आणून कुरुनायक जो धृतराष्ट्र राजा त्याचे हातात दिला १५६०. अग्नि किती तरी मोठा आहे ! हें कळत नाहीं; परंतु तो वातीच्या टोकावर ठेवून त्याच्या उजेडानें, सूर्य मावळल्यावर त्याची अनुपस्थिति भरून काढण्यासाठीं [ अंधाराचें निवारणार्थ ] तो आणावा ६१. त्याप्रमाणें, वेद अनंत असून त्याचें सार म्हणून व्यासांनीं सवालक्ष भारत केलें व त्या भारताचा सारांश गीतेच्या सातशें श्लोकांत आणिला ६२. त्याहि सातशें श्लोकांतील हा शेवटला श्लोक सर्व गीतेचा सारभूत असून तो व्यासशिष्य जो संजय, त्याचा पूर्ण उद्गार आहे ६३. या एकाच श्लोकावर जो विश्वास ठेवून त्याचे चिंतन करीत राहील त्यानें अज्ञानाचें मूळच जिंकून टाकले असें होईल ६४. असें गीतेचे सातशे श्लोक जणुं गीतेची पदें [ पाऊलें ] असून गीतेला आपल्या अंगाखांद्यावर वागवीत आहेत किंवा हीं पदें नसून, हे श्लोक म्हणजे ही गीताकाशींचीं अमृतवृष्टीच आहे असें म्हणावें कीं काय ! ६५. किंवा हे श्लोक नव्हेत तर आत्मराजाची सभा जी गीता, त्या गीतारूप सभेचे हें सातशें श्लोकरूपी जणुं खांबच आहेत, असें हे श्लोक माझ्या प्रत्ययास येतात ६६. किंवा गीता ही सप्तशतीच्या मंत्रांनीं [सातशें श्लोकरूपी मंत्रांनीं ] प्रतिपादन करण्यास उचित अशी साक्षात् भगवती देवीच आहे. या देवीनें मोहरूपी महिषासुरास मारून त्याच्या नाशानें ही आनंदाप्रत पावली आहे ६७. म्हणून या गीतारूप देवीचा जो कायावाचामनेंकरून सेवक होईल, त्यास ही गीता स्वानंदरूपी साम्राज्यपटाचा सार्वभौम राजाच करील ६८. किंवा अविद्यारूपी जो अंधकार त्याच्यावर चाल करून, त्याचा नाश करून सूर्यालाहि प्रतिज्ञेनें जिंकणारे असें हे सातशें श्लोक [ म्हणजे जणुं सातशें सूर्यच ] श्रीकृष्णांनी गीतेच्या रूपानें प्रकाशित केलें आहेत ६९. किंवा संसारमार्गानें चालतांना श्रमलेल्यांना, शिणलेल्यांना त्यांचा श्रम–परिहार होऊन विसांवा घेण्याकरितां सातशें

१ ज्या ज्या पक्षाकडे, ज्या भागीं. २ पति. ३ भाग्य. ४ सुवर्णपणा देण्याची दीक्षा देणारा गुरु. ५ लोखंडाला. ६ सुवर्णच. ७ कदाचित्. ८ देवापेक्षां. ९ परंतु. १० मानितो. ११ इच्छा. १२ ज्या बाजूला त्याची मदत आहे; सायास–खटपट, यत्न. १३ विजयाचे विजयत्व व्यर्थ होईल. १४ उत्कर्ष, भरभराट. १५ खरेपणानें. १६ निश्वासें. १७ अढळत्वच, खरेपणा. १८ लक्ष्मीपति. १९ भक्तश्रेष्ठ, भक्तशिरोमणी अर्जुन. २० कल्यानाचा. २१ अंकितपण, शिष्यत्व. २२ असें मोठ्यानें बोलून हात उभारला. २३ मतलब, सार. २४ ‘ यत्र योगेश्वरो ’ या शेवटच्या श्लोकांत.

आहे गीता। संसारपथश्रांता। विसंवावया ॥ १६७० ॥ कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं। केले ते श्लोककल्हारीं। श्रीकृष्णाख्यसरोवरीं। सासिन्नली हे ॥ ७१ ॥ कीं श्लोक नव्हती आन। गमे गीतेचें महिमान। वाखाणिते बंदिजन। उदंड जैसे ॥ ७२ ॥ कीं श्लोकांचिया आवारा। सात शतें करूनि सुंदरा। सर्वांगमें गीतापुरा। वसों आले ॥ ७३ ॥ कीं निजकांता आत्मया। आवडी गीता मिळावया। श्लोक नव्हती बाह्या-। पसरु का जो ॥ ७४ ॥ कीं गीताकमळींचे भृंगें। कीं हे गीतासागरतरंग। कीं हरीचे हे तुरंग। गीतारथींचे ॥ ७५ ॥ कीं श्लोक सर्वतीर्थ संघातु। आला श्रीगीतेगंगे आंतु। जे अर्जुन नर सिंहस्थु। जाला म्हणौनि ॥ ७६ ॥ कीं नोहे हे श्लोकश्रेणी। अचिंत्यचित्तचिंतामणी। कीं निर्विकल्पां लावणी। कल्पतरूंची ॥ ७७ ॥ ऐसिया शतें सात श्लोकां। परी आगळा येकयेका। आतां कोण वेगळिका। वानावें पां ॥ ७८ ॥ तान्ही आणि पारठी। इया कामधेनूतें दिठी। सूनि जैसिया गोठी। कीजती ना ॥ ७९ ॥ दीपा आगिलु मागिलु। सूर्यु धाकुटा वडीलु। अमृतसिंधु खोलु। उथळु कायसा ॥ १६८० ॥ तैसे पहिले सरते। श्लोक न म्हणावे गीते। जुनीं नवीं पारिजातें। आहाती काई? ॥ ८१ ॥ आणि श्लोका पाडु नाहीं। हें कीर समर्थु काई। येथ वाच्य-वाचकही। भागु न धरी ॥ ८२ ॥ जे इये शास्त्रीं येकु। श्रीकृष्णचि वाच्यं वाचकु। हें प्रसिद्ध जाणे लोकु। भलताही ॥ ८३ ॥ येथें अर्थें तेंचि पाठें। जोडे येवढेनि धंटें। वाच्यवाचक येकवटें। साधितें शास्त्र ॥ ८४ ॥ म्हणौनि मज कांहीं। समर्थनीं आतां विषय नाहीं। गीता जाणा हे वाङ्मयी। श्रीमूर्ति प्रभूची ॥ ८५ ॥ शास्त्र वाच्यें अर्थें फळे। मग आपण मावळे। तैसें नव्हे हें सगळें। परब्रह्मचि ॥ ८६ ॥ कैसा विश्वाचिया कृपा। करूनि महानंद सोपा। अर्जुनव्याजें रूपा। आणिला देवें ॥ ८७ ॥ चकोराचेनि निमित्तें। तिन्ही भुवनें संतप्तें। निववविलीं कळावंतें। चंद्रें जेवीं ॥ ८८ ॥ कां गौतमाचेनि मिषें। कळिकाळज्वरितोद्देशें। पाणिढाळु गिरीशें। गंगेचा केला ॥ ८९ ॥ तैसें गीतेचें हें दुभतें। वत्स करूनि पार्थातें। दुभीनली जगा-पुरतें। श्रीकृष्ण गाय ॥ १६९० ॥ येथें जीवें जरी नाहाल। तरी हेंचि कीर होआल। नातरी पाठमिषें तिंबाल। जीभचि जरी ॥ ९१ ॥ तरी लोह एकें अंशें। झगटलिया

श्लोकांच्या अक्षररूपी द्राक्षांच्या वेलीच असून त्या वेलीला गीता ही मांडव झाली आहे व त्यावर त्या वेली पसरलेल्या आहेत १६७०. भाग्यवान् संतरूपी भ्रमरांनी [ मकरंद सेवक करून ] ज्या सातशें श्लोकांना कमळरूपता आणली आहे, अशा श्लोक कमळांनीं युक्त अशा 'श्रीकृष्ण'संज्ञक[किंवा 'श्रीकृष्णास्य'श्रीकृष्णाच्या मुखरूपी] सरोवरांत गीता ही भरास आलेली आहे ७१. किंवा हे श्लोक नव्हेत; म्हणजे मला तर यासंबंधी निराळीच कल्पना येते. हे श्लोक गीतेचा महिमा वर्णन करणारे जणुं काय सातशें स्तुतिपाठकच आहेत ७२. किंवा गीतारूप शहराला भोंवताल्रून सातशें श्लोकांचा सुंदर कोटच आहे. म्हणून सर्व शास्त्रें गीतारूपी शहरांत वास्तव्य करून राहण्यासाठीं आलीं आहेत ७३. किंवा गीता ही आपला पति जो आत्मा त्याला प्रेमानें अलिंगन देण्याकरितां आली असतां तिनें पसरलेले श्लोकरूपी बाहूच नव्हेत काय ? असें वाटतें ७४. किंवा गीतारूपी कमलाचा गंध घेणारे हे श्लोक म्हणजे जणुं भ्रमरच आहेत, अथवा हे श्लोक गीतारूपी सागरावरील लाटाच आहेत किंवा श्रीहरीच्या गीतारूपी रथास जुंपलेलें जणुं हे घोडेच आहेत ७५. किंवा नरावतार अर्जुनरूपी सिंहस्थ पर्वणी आल्यामुळें गीता ही गंगा असून हिच्याठायीं सर्व श्लोकरूपी तीर्थांचा समुदाय, मिळावयास आला आहे. ७६. किंवा ह्या श्लोकांच्या पंक्ति नव्हेत, तर चित्ताला अचिंत्य जें ब्रह्म, त्याची प्राप्ति करून देणारे जणुं चिंतामणीच आहेत; अथवा कल्पनातीत जें ब्रह्म तें प्राप्त करून देणारे हे श्लोकरूपी कल्पतरूच लावलेले आहेत ७७. असे हे सातशें श्लोक आहेत व ते एकापेक्षां एक वरचढ असें [अर्थपूर्ण] आहेत, तर यांत लहान मोठे अशा वेगळेपणानें निवड करून कोणत्या श्लोकांचें निराळें वर्णन करावें७८.कामधेनूच्या दृष्टीनें पाहिलें तर, ही नवीन ही लहान आहे, व्यालेली दुभती आहे, ही पारठी, वयस्कर आहे किंवा ही आटलेली आहे या गोष्टी जशा करतांच येत नाहींत ७९. दिव्यामध्यें अगोदरचा व मागचा असा भेद कसला! व सूर्याकडे पाहिलें म्हणजे धाकटा किंवा वडील कोणता ? हें समजत नाहीं आणि अमृतसमुद्राला खोल किंवा उथळ असा हा भेद कसला ? [ कारण, सर्वांचीं फळें एकच आहेत. ] १६८०. याप्रमाणें, गीतेच्या सातशें श्लोकांत हा पहिला-उत्कृष्ट व हा शेवटला [ अपकृष्ट ] असें म्हणतां येत नाहीं. पहा कीं, [ सुवर्ण ] पारिजातकांच्या पुष्पांत नवी, ताजी व जुनीं, शिळीं असा भेद करतां येईल काय ? ८१. आणि श्लोकांत तात्पर्य दृष्टीनें कमीजास्तपणा असा नाहींच; याविषयीं खरोखर काय समर्थन करावयास पाहिजे ? या गीता शास्त्रामध्यें सांगणारा श्रीकृष्ण व सांगितलेलें गीताशास्त्र या दोघांत भेद करण्यास मुळींहि अवकाश नाहीं. ८२. कारण, या गीताशास्त्रांत एक श्रीकृष्णच वाच्य व वाचक आहे या गोष्टी प्रसिद्ध व सर्वांना ठाऊकहि आहेत ८३. या गीतेंत अर्थापासून जें फल मिळतें तेंच गीतेच्या पाठ करण्यानेंहि निःसंशय मिळते. जसें अर्थज्ञान व पठण फलदृष्ट्या एकाच योग्यतेचें आहे. तसें वाच्य व वाचक यांचे ऐक्यहि सिद्ध करणारें हें गीताशास्त्र आहे ८४. म्हणून मला आतां या गीतेविषयीं जास्त समर्थन करण्यास कांहीं विषयच उरला नाहीं. कारण, गीता ही साक्षात् भगवंताचीच शब्दमय सुंदर सुशोभित मूर्ति आहे; असे समजा ८५. इतर शास्त्रांचें वाचन करून त्या विषयांचें अर्थज्ञानरूपी फलप्राप्ति झाली म्हणजे तें शास्त्र आपण स्वतः नाहींसें होतें ,तसें हें गीताशास्त्र नाहीं, तर हें ओतप्रोत, सगळे परब्रह्मस्वरूपच आहे ८६. देवाचें दयालुत्व काय सांगावें ! अर्जुनाचें निमित्त करून सर्व जगावर कृपा करण्याकरितां श्रीकृष्णांनीं दुर्लभ असा ब्रह्मानंद गीतेंत कसा प्रगट व सुलभ करून ठेवला आहे ८७. जसा पूर्णकलायुक्त चंद्र चकोराच्या निमित्तानें प्रकाशित होऊन त्यानें तापलेल्या तिन्ही लोकांस शांत केलें ८८. अथवा गौतमाच्या निमित्तानें कळिकाळरूपी तापानें तापलेल्या पीडित झालेल्या जीवांच्या दोषांची निवृत्ति करण्याच्या उद्देशानें श्रीशंकरांनीं गंगेचा ओघ या मृत्युलोकीं जसा पाठवून दिला ८९. त्याप्रमाणें पार्थरूपी वत्साचें निमित्त करून श्रीकृष्णरूपी गाईनें हें गीतारूपी दुभते सर्व जगाला पुरेल एवढें दिलें आहे १६९०. या गीतारूपी गंगेंत तुम्ही जीवाभावानें स्नान कराल, तर हेंच म्ह. गीतारूप म्ह. ब्रह्मरूपच तुम्हीं व्हाल; अथवा नित्यपाठ करण्याच्या रूपानें नुसती जीभच ओली कराल, तरीहि गीतारूपच व्हाल ९१. परिसांचें सामर्थ्य असें आहे कीं, त्यानें लोखंडाचे

१ श्लोकरूपी कमळांनीं युक्त. २ कृष्णगीतारूपी पुष्करूपी सिद्ध झाली. ३ स्तुतिपाठक. ४ सर्व वेदशास्त्रें. ५ भ्रमर. ६ घोडे. ७ श्लोकपंक्ति. ८ अचिंत-विरक्त यांच्या चित्ताला चिंतामणी, ब्रह्म. ९ कल्पनातीत ब्रह्म. १० वर्णाचा. ११ पाडशी. १२ दृष्टी देऊन. १३ अगोदरचा व पाठी-मागचा. १४ शेवटलें.

परिसें। येरीकडे अपैसें । सुवर्ण होय ॥ ९२ ॥ तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव वोठीं । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल आंगा ॥ ९३ ॥ ना येणेसीं मुख वांकुडें । करूनि ठाकाल कानवडें । तरी कार्नीहि घेतां पडे । तेचि लेखें ॥ ९४ ॥ जे हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआंरौतें । जैसा समर्थु दाता कोण्हातें । नास्ति न म्हणे ॥ ९५ ॥ म्हणौनि जाणंतया सवां । गीताचि येकी सेवा । काय कराल आघवां । शास्त्रीं येरीं ॥ ९६ ॥ आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चांवळिली जे निराळीं । ते श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ॥ ९७ ॥ बाळकातें वोरसें । माय जैं जेवऊं बैसे । तैं तंया ठाकती तैसे । घांस करी ॥ ९८ ॥ कां अफाटा समीरंणा । आपैतेंपणें शाहाणा । केलें जैसें विंजणा । निर्मूनियां ॥ ९९ ॥ तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविलें ॥ १७०० ॥ स्वातीचेनि पाणियें । न होती जरी मोतियें । तरी अंगीं सुंदरांचिये । कां शोभिती तियें ? ॥ १ ॥ नादु वाद्या न येतां । तरी कां गोचरु होता । फुलें न होतां घेपता । आमोदु केवीं ? ॥ २ ॥ गोडीं न होती पक्कान्नें । तरी कां फावती रसनें ? । दर्पणावीण नयनें । नयनु कां दिसे ? ॥३॥ द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । नं रिगता दृश्यपंथीं । तरी कें ह्या उपास्ती । आकळता तो ? ॥ ४ ॥ तैसें वस्तु जें असंख्यात । तया संख्या शतें सात । न होती तरी कोणा येथ । फावों शकतें ? ॥५॥ मेघ सिंधूचें पाणी वाहे । तरी जग तयातेंचि पाहे । कां जें उंमप ते नोहे । ठाकतें कोण्हा ॥ ६ ॥ आणि वाचा जें न पवे । तें हे श्लोक न होते बरवे । तरी कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ? ॥ ७ ॥ म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वा जाला उपकारु । जे श्रीकृष्ण उक्ती आकारु । ग्रंथाचा केला ॥ ८ ॥ आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहतां पाहतां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ ९ ॥ व्यासादिकांचे उन्मेखें । राहाटती जेथ सशंक । तेथ मीही रंक एक । चांवळी करीं ॥ १७१० ॥ परी गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा । तरी माझिया दूर्वादळा । ना न म्हणे कीं ॥ ११ ॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गेंजघटा । तेथ काय मुरंकुटा । वारिजंत असे ? ॥ १२ ॥ पांख फुटे पांखिरूं । नुडे तरी नभींच स्थिरू ।

एके बाजूस स्पर्श केला असतां, सर्व लोखंडाच्या इतर सर्वहि भागांचे आपोआप सुवर्णच होतें ९२. तशी गीता पाठरूपी वाटींतील एक श्लोकाचें पद मुखाला लावता न लावता, तोंच ब्रह्मत्वाची पुष्टी तुमच्या अंगांत येईल; ९३. अथवा गीतापाठ करण्याविषयीं तोंड वांकडें करून जर नुसतें कुशीवर पडून राहाल, गीतापाठ करणाऱ्याच्या मुखांतील नुसतीं अक्षरें, तुमच्या कानांत जरी पडलीं, तरी तोच हिशेब होतो म्ह० त्यांचेंहि फल मोक्षच मिळतो ९४. कारण, जसा समर्थ दाता कोणालाहि 'नाहीं' म्हणून विन्मुख लावीतच नाहीं. तसें गीतेचें औदार्यच असें आहे कीं, जी आपल्या श्रवणानें, पठनानें व अर्थज्ञानानें मोक्षाशिवाय [ अलिकडील, कमी दर्जाचें ] दुसरें फळच देत नाहीं ९५. म्हणून सूज्ञ पुरुषांच्या समागमानें एका गीतेचेंच सेवन करावें; यावांचून इतर शास्त्रांचें सेवन करून काय करावयाचें आहे ? ९६. व्यासांचे ऐश्वर्य सांगतात—आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं आकाशांत जें नुसतें मोकळे संभाषण केलें. तें श्रीव्यासांनीं तळ हातांत घेतां येईल इतकें सुलभ केलें ९७. जेव्हां आई मुलाला प्रेमानें जेवूं घालण्यास बसते तेव्हां त्या मुलाला जसे गिळतां येतील तसे लहान लहान घांस करिते; ९८. किंवा अफाट जो वायु तो आपल्याला हवा तेव्हां घेतां यावा, म्हणून शहाण्यांनीं जशी पंख्याची योजना करून त्याला आपल्या आधीन केला ९९. तसें शब्दानें जें कळावयाचें नाहीं, ते अनुष्टुप् छंदांत तयार करून स्त्री, शूद्र आदि करून सर्वांच्या बुद्धीला तें कळेल इतकें सुलभ करून ठेवलें १७००. स्वाती नक्षत्राच्या पाण्यापासून जर मोती उत्पन्न झालीं नसतीं तर तीं सुंदर स्त्रियांचीं अंगावर कोठून शोभिवंत झालीं असतीं ? १. नादब्रह्म जर वाद्यांत आलें नसतें, तर नाद आपल्या कानांना कसा कळला असता ? फुलें जर सुगंधयुक्त झालीं नसतीं तर तो सुवास नाकानें कसा घेता आला असता ? २. गोडी जर पक्वान्नें झाली नसती, तर ती जिभेला कशी घेतां आली असती ? आरसा जर नसता, तर डोळ्याला आपलें रूप कसें पाहतां आलें असतें ? ३. आश्रय विषयरहित स्वरूपभूत द्रष्टा जो श्रीगुरु तो जर दृश्यपथांत प्रविष्ट झाला नसतां म्ह. कल्पित दृश्यभावास प्राप्त झाला नसतां, तर तो उपासकांच्या उपासनेनें कसा स्वाधीन झाला असतां ? ४. तसें अगणित, अनंत जें ब्रह्म तें गीतेच्या सातशें श्लोकांच्या मर्यादित रूपानें जर प्रगट झालें नसतें, तर ते ब्रह्म कोणाला तरी प्राप्त होऊं शकलें असतें काय ? ५. मेघ हा समुद्राचेंच पाणी धारण करून वृष्टि करतो, तरी सर्व लोक पाण्याकरितां समुद्राकडे न पाहतां मेघाकडेच दृष्टि देतात. कारण, मेघाच्या पाण्याचाच सर्वांस उपयोग होतो. समुद्र हा अमर्याद असला तरी त्याचा अन्नपानादि व्यवहाराला कोणासहि कांहीं एक उपयोग होत नाहीं ६. म्हणून जें [ ब्रह्म ] वाणीला देखील प्राप्त होत नाहीं तें जर हे उत्तम सातशें श्लोकात्मक रूप धारण करून होते ना ! तर ते कानानें ऐकावयाला किंवा मुखानें तरी वर्णन करावयाला येईल असें का झालें असतें ? ७. याकरितां श्रीकृष्णाच्या संभाषणाला श्लोकरचना करून गीता ग्रंथाचा आकार दिला. असा हा सर्व जगतावर श्रीव्यासांचा मोठा उपकार झाला आहे ८. [ त्या व्यासांच्या गीतेवर आपण व्याख्यान केल्याबद्दल महाराज परिहार देतात ] आणि आतां तोच हा गीता ग्रंथ होय, तो मी व्यासांचीं पदें पाहतां पाहतां शुद्ध मराठी भाषेच्या द्वारां ऐकणाऱ्याच्या मार्गास आणिला आहे. ९. ज्या गीतार्थाचें यथार्थ वर्णन करण्यासाठीं व्यासादिकांची देखील ज्ञानें साशंक होऊनच वावरतात त्या गीतेचें मी एक गरिब अल्पमतीनें व्याख्यान करीत आहे. १७१०. तरीपण गीतारूपी ईश्वर—श्रीशंकर हा अत्यंत भोळा आहे, म्हणून तो जरी व्यासांच्या भाषणरूपी पुष्पमाला धारण करितो तरी माझ्या मराठी ओव्यारूपी दूर्वांकुरांसहि 'नाहीं' म्हणत नाहीं, हें निश्चितच ११. आणि क्षीरसमुद्राचें कांठाला हत्तींचें समुदाय पाणी पिण्यास येतात, तेथें त्यांना तेवढी परवानगी आहे, तेथें चिलटाना तो क्षीरसमुद्र 'येऊं नका' म्हणून माघारी लावतो काय ? १२. नुकतेंच पंख फुटलेल्या पांखराला जरी फार उडतां आले नाहीं, तरी तें

१ एका अंगावर, मुख बाजूला होऊन कान पुढें येईल तर. २ फल. ३ शिवाय. ४ नाहीं. ५ जाणणाऱ्या समवेत. ६ स्वछंद, स्वैर, अवळपवळ. ७ बोलिली. ८ आकाशांत. ९ पान्हा दाटून आल्यानें, अति ममतेनें. १० त्याला सोयीस पडतील तसे. ११ वाऱ्याला. १२ अधीनपण, वश्यता. १३ पंखा. १४ बत्तीस अक्षरांचा छंद—अनुष्टुभ छंद.

१५ स्त्रीशूद्रादिकांच्या अंतःकरणांत. १६ सुगंध. १७ पाहणारा, साक्षी. १८ साकार, दृश्य झाला नसतां. १९ कसा. २० उपासनेला. २१ ब्रह्म. २२ मिळूं शकतें. २३ अगणित. २४ आकळितां येत नाहीं. २५ ज्ञान, ज्ञानोद्गार. २६ अनिर्वारित, शंकित. २७ बडबड. २८ व्यासोक्तिरूप फुलांची माळ. २९ गजसमुदाय. ३० चिटकला. ३१ परतवितो.

गगन आक्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ ॥ १३ ॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शाहाणें । आणिकें काय कोणें । चालावेचिना ? ॥ १४ ॥ जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ? ॥ १५ ॥ दिवटीच्या आंगीं थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ? ॥ १६ ॥ जी समुद्राचेनि पैसें[३] । समुद्रीं आकाश आभासे । थिळँरीं थिळाराऐसें । बिंबेचि पैं ॥ १७ ॥ तेवीं व्यासादिक महामती । वांवरों येती इये ग्रंथीं । मा आम्ही ठाकों हे युक्ती । न मिळे कीर ? ॥ १८ ॥ जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखोनि शंफरें येरें । पोहों न लाहती ? ॥ १९ ॥ अरुण आंगाजवळिके । म्हणौानि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । मुंगी काई ? ॥ १७२० ॥ यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधें गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ॥ २१ ॥ आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलेंची सोये[१३] । बाळ ये तरी न लाहे । पांवों कायी ? ॥ २२ ॥ तैसा व्यासाचा मोंगोवा[१५] घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु । अयोग्यही मी न[१६] पवतु । कें[१७] जाईन ? ॥ २३ ॥ आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुंबगे स्थावर जंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ २४ ॥ जयाचें आंगिकें[२०] आसिकें । तेज लाहोनि अर्कें । आंधाराचें सोंवाइकें[२१] । लोटिजेंत[२२] आहे ॥ २५ ॥ समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ॥ २६ ॥ पवना जयाचें बळ । आकाश जेणें पेंघळ[२३] । ज्ञान जेणें उज्ज्वळ । चक्रवर्ती ॥ २७ ॥ वेद जेणें सुभाषें[२४] । सुख जेणें सोल्हास[२५] । हें असो रूपस[२६] । विश्व जेणें ॥ २८ ॥ तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ॥ २९ ॥ आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठियां[२७] भंगीं । येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥ १७३० ॥ श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें[२८] कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ॥ ३१ ॥ चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें । वसिष्ठें मानिली कीं भोंडें[२९] । भानूसीं शांटी[३०] ॥ ३२ ॥ मा मी तव चित्तांथिला[३१] । आणि श्रीगुरु ऐसा दादुलें[३२] । जो दिठीवेनि[३३] आपुला । बैसवी

आकाशांतच राहातें व सर्व गगनाचें त्वरेनें आक्रमण करणारा गरुडही त्या आकाशांतच राहातो १३. राजहंसाचें मंद [ चालणें गति ] सर्व जगांत उत्तम ठरले असेल म्हणून इतर दुसऱ्या कोणी पृथ्वीवर चालूंच नये कीं काय ? १४. महाराज ! कलशास आपल्या पोकळीप्रमाणें पुष्कळ सांठवण असल्यामुळें त्यास पुष्कळ पाणी घेतां येतें; पण चूळ लहान असली तरी तिच्या पोकळीच्या मानानें तींत पाणी भरून [ निश्चत ] राहत नाहीं काय ? १५. मशालीचा आकार मोठा असतो त्यामुळें ती पुष्कळ प्रकाशास धारण करते आणि वात जरी लहान असली, तरी तिच्या मानानें तिहि प्रकाशास धारण करतेच कीं नाहीं ? १६. महाराज ! समुद्राच्या विस्ताराप्रमाणें त्यांत त्या मानानें आकाशाचें मोठें प्रतिबिंब पडलेले दिसतें, व तें डबक्यांतही डबक्याचे मानानें त्याच्या एवढें आकाश प्रतिबिंब पडतेच १७. त्याप्रमाणें व्यासादिकांच्या विशाल बुद्धींनीं या ग्रंथाविषयीं विचार करावा. मग आम्हीहि आमच्या अल्पबुद्धीप्रमाणें ग्रंथविवरण करावें, ही गोष्ट युक्तीला खरोखर जुळत नाहीं काय ? १८. ज्या समुद्रामध्यें मंदराचलासारखीं मोठ मोठी जलचरें संचार करतात, त्यांचें वैभव पाहून 'शफर' संज्ञक लहान लहान माशांनीं तेथें पोहूंच नये कीं काय ? १९. अरुण हा सूर्याचे अंगाजवळ असतो म्हणून तो सूर्यास पाहातो; मग पृथ्वीवरील जी लहान मुंगी आहे ती सूर्यास पहात नाहीं कीं काय ? १७२०. यास्तव आम्हीं प्राकृत, जनांनीं गीता आपल्या मराठी भाषेंत वर्णन करून आणली तर ही गोष्ट अयोग्य आहे, असें म्हणण्याचें मुळींच कारण नाहीं २१. आणि बाप पुढें चालला असतां त्याच्याच पावलावर पाऊल ठेवून त्याच मार्गानें लहान बालक चालूं लागलें, तर शेवटीं ज्या स्थानाला बाप गेला, त्याच स्थानाला तें बालक पोहचूं शकणार नाहीं काय ? २२. तसा मी व्यासांचा माग घेत घेत आणि भाष्यकारांना [ श्री शंकराचार्यांना ] वाट विचारीत विचारीत चाललों असतां, मी स्वतः जरी अयोग्य असलों तरी तेथें [ व्यास ज्या गीतार्थाच्या ठिकाणीं गेले, त्या ठिकाणाला ] प्राप्त न होतां कोठें जाईल ? २३. आणि ज्याच्या [ परमेश्वराच्या ] क्षमेनें पृथ्वी स्थावरजंगमात्मक विश्वाला कंटाळत नाहीं व ज्याच्या [ परमेश्वराच्या ] अमृतानें चंद्र सर्व जगाच्या तापाची निवृत्ति करून शांत करितो २४. ज्याच्या [परमेश्वराच्या] अंगच्या तेजानें सूर्याला तेज प्राप्त झालें आहे, म्हणून तो सर्व जगाचे अंधारापासून प्राप्त होणारें संकट दूर करतो २५. ज्याच्या [ परमेश्वराच्या ] सत्तेनें समुद्राला उदक मिळालें आहे व पाण्याला माधुर्य लाभले आहे. व माधुर्याला सौंदर्य प्राप्त झालें आहे २६. ज्याच्या [ परमेश्वराच्या ] सत्तेनें वाऱ्याला गतिरूप बल, आहे ज्याच्यामुळें आकाशाला विस्तार आहे व ज्याच्यामुळें ज्ञानाला उज्वल सार्वभौमत्व प्राप्त झालें आहे २७. ज्याच्या सत्तेनें वेद चांगलें [ हितोपदेश ] बोलतो, ज्याच्यामुळें सुखाला आनंदितपणा आहे. हे राहूं द्या. ज्याच्या सत्तास्फूर्तीच्या योगानें सर्व विश्व हें रूपवान् असें झालें आहे २८. तो सर्वोवर उपकार करणारा समर्थ सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथ माझ्या अंतःकरणांत ही प्रवेश करून वागत आहे २९. तेव्हां आतां आयती तयार जी गीता, [ कीं जिचें गूढ ज्ञान श्रीगुरूपासून मला मिळालें ] ती गीता मी जगतांत मराठी भाषेच्या द्वारा सांगण्यास समर्थ झालों आहें, यांत आश्चर्यास अवकाशच कोठें आहे ? १७३०. श्रीगुरूंच्या नांवानें डोंगरावर मातीची [ द्रोणाचार्यांची ] मूर्ति स्थापून त्याची सेवा करून त्यांचेपासून जो धनुर्वेद शिकला त्या एकलव्य कोळ्यानें आपल्या विद्येच्या सामर्थ्याविषयींची कीर्ति त्रिजगतांत सर्वमान्य करून घेतली ३१. चंदनाच्या आसपासची सर्व झाडें चंदनाच्या अंगच्या सुगंधानें चंदनाच्या जोडीचीच होतात व वसिष्ठांनीं स्वीकारलेली छाटी आपल्या तेजानें सूर्याचेबरोबर स्पर्धा करूं लागली ३२. मग मी तर चित्त संपन्न आहे, गीताव्याख्यान करण्याविषयीं उत्सुक आहे, त्यावर जो दृष्टीनें अवलोकन केल्याबरोबर आपलें स्वरूप पदावर बसवितो असा सद्‌गुरुसारखा समर्थ

१ सुंदर. २ घागरीनें. ३ विस्तार. ४ डबक्यांत. ५ विचार करावा. ६ मंदराचलाएवढीं. ७ लहान मासे. ८ सूर्याचा सारथि. ९ अरुण, सूर्याच्या अगदीं जवळ. राहणारा सारथि. १० देश, भाषेच्या, मराठी. ११ अयोग्यपणाला. १२ पाऊल. १३ वाट. १४ पोहचूं. १५ माग. १६ न पावतां. १७ कोणीकडे. १८ सहनशक्तीमुळें. १९ कंटाळत नाहीं. २० आंगचे. २१ सर्व ऐहिक, सर्व कामगिरी, सर्व, सर्व परिणाम २२ दूर करीत आहे. २३ विस्तृत, मोठे. २४ चागलें बोलणारे. २५ आनंदित. २६ रूपाला आलेलें, देखणें. २७ मराठी भाषेनें. २८ एकलव्य नांवच्या कोळ्यानें. २९ भांडूं लागली. ३० छाटी. ३१ सचेतन. ३२ धनी. ३३ दृष्टिमात्रानें.

पदीं ॥ ३३ ॥ आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी । तैं न दिसे ऐसी गोठी । कैंही आहे ? ॥ ३४ ॥ म्हणौनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे । श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३५ ॥ याकारणें मियां । श्रीगीतार्थु मऱ्हाठिया । केला लोकां यया । दिठीचा विषो ॥ ३६ ॥ परी मऱ्हाठे बोलरंगें । कवळितां पैं गीतांगें । तैं गातयाचेनि पांगें । येकाढतां नोहे ॥ ३७ ॥ म्हणौनि गीता गावों म्हणे । तैं गाणिवें होती लेणें । ना मोकळे तरी उणें । गीतांही आणित ॥ ३८ ॥ सुंदर आंगीं लेणें न सूये । तैं तो मोकळा शृंगारु होये । ना लेइलें तरी आहे । तैसें कें उचित ? ॥ ३९ ॥ कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मानविती । अंगेंचि सेंडीं ॥ १७४० ॥ नाना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होती परिमळीं । वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरीं जैसीं ॥ ४१ ॥ तैसा गाणिवेतें मिरवी । गीतेवीणंही रंगु दावीं । तो लाभाचा प्रबंधु ओंवी । केला मियां ॥४२॥ तेणें आबालसुबोधें । ओवीयेचेनि प्रबंधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ ४३ ॥ आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं फुलवरी । पारुखणें जियापरी । लागेना कीं ॥ ४४ ॥ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागेंतखेंवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखांणी । काय व्यसन न लवी ? ॥ ४५ ॥ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषजे । तैं अमृतातें नेणिजे । फावलिया ॥ ४६ ॥ तैसेंनि आइतेपणें । कवित्व जालें हें उपेणें । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥ ४७ ॥ हे स्वानंद-भोगाची सेलें । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ॥ ४८ ॥ चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परी फावे जैसें चांदिणें । भलतयाही ॥ ४९ ॥ तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरंगचि अधिकारिये । परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ १७५० ॥ ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥ ५१ ॥ क्षीरसिंधु परिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ॥ ५२ ॥ तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं गुप्तु । होता तयाचा हातु । पैठें जालें ॥ ५३ ॥ तो मत्स्येंद्र सप्तशृंगी भग्नावयवा चौरंगी । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥ ५४ ॥ मग

साह्य करणारा आहे ३३. अगोदरच उत्तम, निर्मळ दृष्टि आहे, त्यांत त्यास सूर्य पाठीराखा झाला, तर मग त्या दृष्टीला दिसणार नाहीं, अशी गोष्ट कोठें घडली आहे काय? ३४. माझे नित्य नवें नुसतें श्वासोच्छ्वासहि काव्यग्रंथ होतील. कारण, श्रीगुरूंच्या कृपेनें काय एक होणार नाहीं? असें श्रीज्ञानदेव म्हणतात ३५. याकरितां मी गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें सोपा केला आहे कीं, तो लोकांना त्यांच्या नजरेनें पाहण्यास योग्य होईल ३६. परंतु मराठी भाषेंत गीतेचा अर्थ इतका स्पष्ट केला आहे कीं, त्या मराठी शब्दांच्या रंगानें कोणी गीतार्थ समजून घेईल, तेव्हां कोणी सांगणारा नसला तरीहि माझी मराठी नुसती वाक्यें वाचलीं असतां अर्थ संदिग्ध, अपूर्ण न राहतां स्पष्टपणें समजेल. [ त्यांत एकदेशित्व वा अपुरेपणा राहणार नाहीं ] ३७. म्हणून जर कोणी वक्ता संस्कृत गीतेचा अर्थ सांगून माझी मराठी टीका सांगेल तर वक्तृत्व करणाराच्या बोलण्याला माझी टीका भूषणच होईल [ अर्थगांभीर्याचा खुलासा होईल ] वा माझी नुसती मोकळी टीकाच कोणी सांगितली, तरीहि ती मूळ गीतेवरून केल्या जाणाऱ्या अर्थ प्रतिपादनालाहि उणेपणा आणिल—मागे सारील ३८. सुंदर अंगावर अलंकार घातला नाहीं तरी तो अलंकार मोकळा एकाकी स्थितींतहि शोभत असतो, किंवा तो अलंकार सुंदर अंगवार घातला तर त्याच्यासारखी योग्य गोष्ट अन्यत्र कोठें आहे? ३९ किंवा मोत्यांची जातच अशी गुणसंपन्न आहे कीं, तीं सोन्याला अनुकूल होऊन शोभा देतात; कदाचित् सोनें नसलें, तीं मोती मोकळी असली तरीतीं नुसतींसुद्धां आपल्या स्वरूपानें शोभा देतातच १७४०. अथवा वसंत ऋतूंच्या आरंभींच वाटोळी मोगऱ्याची फुलें जशीं गुंफून गजरा केलेली असोत त्यांत वासाच्या दृष्टीनें कमी जास्तपणा नसतो ४१. मूळ गीतेसह माझी मराठी टीका सांगितली तरी त्याला शोभा आणील व संस्कृत गीता न सांगतां केवळ माझी मराठी टीकाच सांगितली तरी स्वतंत्रपणेंहि गीतार्थाची शोभा देणारच, असा सर्व प्रकारें लाभदायक मी हा ओवीबद्ध काव्य ग्रंथ केला आहे ४२. या ग्रंथांत आबालवृद्धांस सहज समजण्याजोग्या ओंवीच्या प्रबंधानें सर्व ब्रह्मरस परिपूर्ण रुचकर, त्याचा आस्वाद घेतां येईल, अशा अक्षरांची मी योजना केली आहे; ४३. चंदनाच्या झाडाजवळ गेल्यावर वास घेण्यास त्याला फुलें नाहींत म्हणून खिन्न होण्याचें किंवा त्याला फुलें येईपर्यन्त वाट पाहात थांबण्याचे कारण नाहीं. कां कीं, त्याचें सर्वांग सुगंधमयच आहे ४४. तसा हा माझा ग्रंथ केवळ श्रवणांत [ कानांवर ] पडतांक्षणींच श्रोत्याला समाधि आणितो व मग त्या टीकेचें व्याख्यान ऐकलें असतां तो पुनः ऐकण्याचें व्यसन लावणार नाहीं काय? ४५. या माझ्या ग्रंथाचा पाठ करीत असतां, त्या निमित्तानें सहजच पांडित्य प्रकाशित होतें [ अर्थावबोध होतो ] व त्याच्या गोडीचा अनुभव लाभला म्हणजे अमृताचीहि आठवण होत नाहीं ४६. तसें हें अमृताहून सुरस आयतें कवित्व श्रीगुरुप्रसादानें उत्पन्न झाले असल्यामुळें याच्या श्रवणानें, मनन व निदिध्यास यांस जिंकिलें आहे. [ म्ह. त्याची जरूरी नाहीं असें केलें ] ४७. हीं माझी टीका वाटेल त्यास आत्मस्वरूपाच्या आनंदाचा शेलका वाटा देईल. व श्रवणेंद्रियाकडून सर्व इंद्रियांचे तृप्तिद्वारां पोषण करील ४८. आपल्या अंगभूत शक्तीनें चकोर पक्षी चंद्राच्या अमृताचा जसा उपभोग घेऊन चतुर ठरला आहे तसा सर्वांना उपभोग घेतां येत नसला तरी चांदण्याच्या शीतलतेचा उपयोग मात्र सर्वांस होतो ४९. तसें या अध्यात्मशास्त्रांत जितेंद्रिय, अंतर्मुख वृत्तीचे झालेलेच अधिकारी आहेत, त्यांनाच खरा आनंद प्राप्त होईल; परंतु इतर सामान्य लोक माझ्या साहित्यात्मक वाक् चातुर्यानें सुखी होतील १७५०. महाराज हें सर्व श्रीगुरु निवृत्तिनाथांचेंच खरें ऐश्वर्य आहे, म्हणून हा ग्रंथ नव्हे तर त्यांच्या कृपेचें वैभवच होय ५१. श्रीगुरु परंपरा सांगतात:—क्षीरसिंधूच्या तीरावर पार्वतीच्या कर्णरूपी गुहेंत श्रीशंकरांनीं जें ज्ञान सांगितलें, पण तें केव्हां सांगितलें तें माहीत नाहीं. ५२. तें ज्ञान क्षीरसमुद्राच्या लाटांमध्यें माशाच्या पोटांत जे मत्स्येंद्रनाथ [ भगवान् विष्णु ] गुप्तरूपानें होते त्यांच्या हातांत सांपडलें ५३. तें मत्स्येंद्रनाथ सहज संचार करितां करितां सप्तशृंगी पर्वतावर गेलें तेथें ज्यांचें हस्तपायादि अवयव भंगलेलें होते, अशा चौरंगीनाथाला भेटले व हे मत्स्येंद्रनाथाचें दर्शन होण्याबरोबर तो चौरंगीनाथ सर्व अवयवांनीं परिपूर्ण झाला ५४. मग त्या अचल अखंड समाधीचा आपल्या-

१ पाठीराखा होतो. २ काव्यग्रंथ. ३ दृष्टीचा, पाहावयाचा. ४ भाषेंत. ५ स्पष्ट केला. ६ गीतेचा अर्थ. ७ अधीनपणानें. ८ एकदेशीत्व, अपूर्ण. ९ वक्तृत्वाला. १० गाणाराला. ११ साधी, नुसती. १२ वसंत ऋतूंतील. १३ गाण्यावांचून. १४ आबालवृद्धांस सुगम. १५ गुंफिली. १६ सुवासासाठीं फूल येण्यापर्यंत. १७ लागण्याबरोबर.

समाधि अव्युत्थेया । भोगावी वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ॥ ५५ ॥ तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तियें पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिला ॥ ५६ ॥ मग तिहीं तें शांभवं । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभवं । श्रीगहिनीनाथा ॥ ५७ ॥ तेणें कळिकळितु भूतां । आला देखोनि निरुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥ ५८ ॥ ना आदिगुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ॥ ५९ ॥ तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जिवां । सर्व प्रकारीं धांवों । करीं पां वेगीं ॥ १७६० ॥ आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू । जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ॥ ६१ ॥ मग आर्ताचेनि" वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥ ६२ ॥ तेथ पुढां मी बापियें । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६३ ॥ एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥ ६४ ॥ वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणें स्वामीची । ऐशिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ? ॥ ६५ ॥ परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ ६६ ॥ तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोललों पुरें उणें । तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो जी ॥ ६७ ॥ शब्द कैसा घडिजे । प्रमेयीं कैसें पां चंढिजे । अळंकारु म्हणिजे । काय तें नेणें ॥ ६८ ॥ सायिखंडेयाचें बाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चाले । तैसा मातें दावीत बोले । स्वामी तो माझा ॥ ६९ ॥ यालागीं मी गुणदोष- । विषीं क्षमाविना विशेष । जे मी संजात ग्रंथेंलों देख । आचार्यें कीं ॥ १७७० ॥ आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणिवेंसी ठाके उभें । तें पूर्ण नोहे तैं लोभें । तुम्हांसीचि कोपें ॥ ७१ ॥ सिवेंतलियाही परिसें । लोहत्वाचिये अंवदसे । न मुकिजे आयसें । तैं कवणा बोलु ॥ ७२ ॥ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तैं तो काय करी ? ॥ ७३ ॥ म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचें मी पाये । पातलों आतां कें लाहे । उणें जगीं ॥ ७४ ॥ अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडुनि तुम्हीं । दिधलेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण जालों ॥ ७५ ॥ पाहा पां मातें तुम्हां सांगडें । माहेर

प्रमाणेंच त्यांनीहि उपभोग घ्यावा या इच्छेनें तें आपलें ऐश्वर्य पूर्ण वर्मे मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथास दिलें ५५. त्या सर्वेश्वर मत्स्येन्द्रनाथांनीं योगरूप कमलिनींचे सरोवर व विषयविध्वंस करण्याविषयीं महाशूर असे जे गोरखनाथ त्याला जणुं काय त्या आपले समाधी योगैश्वर्याचे पदावर बसवून राज्याभिषेकच केला ५६. त्यानंतर त्या गोरक्षनाथांनी शंकरापासून परंपरेनें आलेलें जें अद्वयानंदाचें ऐश्वर्य म्ह. सुख तें श्रीगहिनीनाथांना संपूर्ण सामर्थ्यासह दिलें ५७. मग काल ही खरोखर सर्व भूतांचा ग्रास करीत आलेला आहे, असें पाहून त्या गहिनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा दिली ५८. कीं; आदिगुरु शंकरापासून गुरु शिष्यपरंपरेनें हा जो बोधाचे ऐश्वर्याचा लाभ आमच्यापर्यंत प्राप्त झाला आहे ५९. तो हा सर्व घेऊन तूं कलीनें त्रस्त झालेल्या, गिळल्या जाणाऱ्या जीवांना दुःखापासून सर्वप्रकारें सत्वर मुक्त कर १७६०. अगोदर स्वभावतःच श्रीनिवृत्तिनाथ कृपाळु, त्यांत श्रीगुरूंची आज्ञा झाली. मग काय विचारतां! जशी मेघांच्या क्षोभाला वर्षाकाळाची जोड मिळाली तर जोराची वृष्टि होते. त्याप्रमाणें श्रीगुरूंच्या आज्ञेमुळें ते कृपेचा सर्वत्र वर्षाव करूं लागले ६१. मग पीडित झालेल्या जनांला दुःखापासून सोडवावें या कळकळीनें गीतेचा [ समन्वयात्मक ] अर्थ करण्याचे मिषानें शांतरसाचा जो श्री निवृत्तिनाथांनी वर्षाव केला, तोच हा ग्रंथ होय ६२. त्यावेळीं मी चातकपक्षासारखा श्रीगुरूंचा प्रसाद प्राप्त व्हावा, म्हणून इच्छा करून पुढें येऊन बसलेला होतोच; तेव्हां मी अनन्य शिष्य आहे, असें पाहून त्यांनीं मजवर कृपा केली, म्हणूनच मी या एवढ्या ग्रंथकर्तृत्वाच्या यशास आणिलों गेलों ६३. अशा प्रकारेंकरून गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें आपलें जें समाधिधन तें एके ठिकाणी बांधून माझ्या श्रीनिवृत्तिनाथांनी ग्रंथरूपानें रचना करून मजला दिलें ६४. नाहींतर, मी अध्ययन केलेला नाहीं व कांहीं वाचलें नाहीं व श्रवणहि केलें नाहीं; तसेंच स्वामींची सेवा करण्याचेंहि मला ज्ञान नाहीं, असा जो मी, त्या मला ग्रंथरचना करण्याची योग्यता कोठून असणार? ६५. असें असतां खरोखरच श्रीगुरूंनीं माझें निमित्त करून जो ग्रंथ केला, त्या योगानें सर्व जगाचें संरक्षण केलें आहे, असें समजा ६६. याजकरितां, श्रीगुरूंचा मी पुरोहित म्हणून जें कांहीं न्यूनाधिक बोललों असेन, ते आपण संत जनांनी माऊलीप्रमाणें सहन करावें ६७. शब्दांची रचना कशी करावी व त्यावर इच्छित सिद्धान्ताचा अर्थ कसा आरूढ करावा व साहित्य शास्त्रांतील अलंकार कशाला म्हणावे, हें मला कांहींच माहीतहि नाहीं ६८. [ मग हा ग्रंथ कसा लिहिला, असें विचाराल तर ] कळसूत्री बाहुलें जसें सूत्रधाराच्या सूत्रानें हलविल्याप्रमाणें हालते, चालते तसें मला पुढें करून दाखवित, तें माझें श्रीगुरुच [ अंतःकरणांत प्रकाशित होऊन ] बोलत आहेत ६९. या करणास्तव माझ्या ग्रंथांतील गुणदोषांविषयीं किंवा सहन करण्याविषयीं विशेष असें मी कांहींच म्हणत नाहीं. कारण, माझ्या गुरूंनींच निर्माण केलेला [ मजजवळ जांगड म्हणून ठेवलेलाच ] हा ग्रंथ मीं आपल्यापुढें मांडला आहे १७७०. आणि तुम्हां संतजनांच्या सभेंत एखाद्या गोष्टीची उणीव शिल्लक राहील व ती जर पुरती भरून निघाली नाहीं तर लडिवाळपणें मीच तुमच्यावर रागवेन ७१. परिसाचा स्पर्श होऊनहि लोखंडाची 'लोहस्वरूपी' हीन अवस्था जर सहज नाहींशी होऊन त्या हीन दशेस तें मुकलें नाहीं, तर त्याचा दोष कोणाकडे? ७२. ओहोळानें हें इतकेच करावें कीं, गंगेच्या प्रवाहास जाऊन मिळावें, मग देखील [जर त्याला गंगेनें आपल्यांत स्वीकार करून घेतल्यामुळें देखील ] तो गंगाच [ पवित्र ] झाला नाहीं तर त्या ओहळाकडे काय दोष आहे? त्यास त्यानें काय करावें? ७३. म्हणून महद्भाग्याच्या योगानें मी तुम्हां संतजनांच्या पायांजवळ आलों आहें, तर आतां या जगांत मला काय व कोठे उणें आहे ७४. अहो महाराज काय सांगावें! माझ्या श्रीगुरुस्वामींनी तुम्हां संतजनांची भेट करून दिली, त्या योगानें मी सर्व बाबतींत सर्वतोपरि, परिपूर्ण झालों आहे ७५. कीं, मला

१ निर्विघ्न, उपाधीरहित. २ या वासनेनें, इच्छेनें. ३ ज्ञानमुद्रा. ४ मत्स्येंद्रनाथांनीं. ५ योगरूप कमलिनीचें सरोवर. ६ विषयांचा नाश करणारा महाशूर. ७ शंकरापासून मिळालेलें अद्वयानंद सुख. ८ मुळापासून संपूर्ण. ९ सर्व भूतांना कळिकाळ कवळीत येत आहे. १० खरा. ११ ऐश्वर्य, विस्तार. १२ धांवून रक्षणें. १३ पीडिताच्या पान्ह्यासाठीं. १४ गीतेचा अर्थ करण्याच्या निमित्तानें. १५ चालक. १६ गुरुपरंपरेनें. १७ परस्वाधीनपणानें. १८ क्षमा करा. १९ सिद्धांतांत कसें शिरावें. २० कळसूत्री बाहुली. २१ ग्रंथयुक्त बोललों. २२ कोपूं लागेन. २३ स्पर्शलेल्या. २४ वाईट स्थितीला. २५ लोखंडानें. २६ ओढयानें. २७ तुमच्यासारखें.

तेणें सुरवाडें। ग्रंथाचें आळियोंडें। सिद्धी गेलें ॥ ७६ ॥ जी कनकाचें निखळ। वोतूं येईल भूमंडळ। चिंतारत्नीं कुळाचळ। निर्मूं येती ॥ ७७ ॥ सातांही हो सागरातें। सोपें भरितां अमृतें। डुंवाड नोहे तारांतें। चंद्र करितां ॥७८॥ कल्पतरूचे आरामें। लावितां नाहीं विषमें। परी गीतार्थाचें वर्म। निवडूं न ये ॥ ७९ ॥ तो मी येकु सर्व मुका। बोलोनि मऱ्हाठिया भाखा। करी डोळेवरी लोकां। घेवों ये ऐसें जें ॥ १७८० ॥ हा ग्रंथसागरु येव्हढा। उतरोनि पैलीकडा। कीर्तिविजयाचा धेंडा। नाचे जो कां ॥ ८१ ॥ गीतार्थाचा आवारु। कंळशेंसीं मेंहामेरु। रचूनि माजीं श्रीगुरु-। लिंग जें पूजीं ॥ ८२ ॥ गीता निष्कपट माय। चुकोनि तान्हें हिंडे जें वाय। तें मायपूंता भेटी होय। हा धर्म तुमचा ॥ ८३ ॥ तुम्हां सज्जनांचें केलें। आकळुनी जी मी बोलें। ज्ञानदेव म्हणे थेंकुलें। तैसें नोहें ॥ ८४ ॥ काय बहु बोलों सकळां। मेळविलों जन्मफळा। ग्रंथसिद्धीचा सोहळा। दाविला जो हा ॥ ८५ ॥ मियां जैसजैसिया आशा। केला तुमचा भरंवसा। ते पुरवूनि जी बहुवसा। आणिलों सुखा ॥ ८६ ॥ मजलागीं। ग्रंथाची स्वामी। दुजीं सृष्टी जे हे केली तुम्ही। तें पाहोनि हांसों आम्हीं। विश्वामित्रातेंही ॥ ८७ ॥ जे असोनि त्रिशंकुंदोषें। धातयाही आणावें वोसें। तें नासतें कीजे कीं ऐसें। निर्मावें नाहीं ॥ ८८ ॥ शंभू उपमन्यूचेनि मोहें। क्षीरसागरूही केला आहे। येथ तोही उपमे सेंरी नोहे। जे विषगर्भ कीं ॥ ८९ ॥ अंधकारु निशाचरां। गिळितां सूर्यें चराचरां। धांवा केला तरी खरा। ताउनी कीं तो ॥१७९०॥ तातेंलियाही जगाकारणें। चंद्रें वेंचिलें चांदणें। तया सदोषा केवीं म्हणे। सारिखें हें ॥ ९१ ॥ म्हणौनि तुम्ही मज संतीं। ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं। उपयोग केला तो पुढती। निरुपम जी ॥ ९२ ॥ किंबहुना तुमचें केलें। धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें। येथ माझें जी उरलें। पाईंकपण ॥ ९३ ॥ आतां विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें। तोषोनि मज द्यावें। पसायदान हें ॥९४॥ जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मी रेंती वाढो। भूतां परस्परें पडो। मैत्र जीवाचें ॥९५॥ दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात ॥ ९६ ॥ वर्षत सकळमंगळीं। ईश्वर निष्ठांची मांदियाळी। अनवरत भूमंडळीं। भेटतु या भूतां ॥९७॥ चलां कल्पतरूंचे

तुम्हांसारखें अनुकूल माहेरघर मिळालें आहे, त्यामुळें तर हा ग्रंथ करण्याचा माझा छंद सुखानें सिद्धीस गेला ७६. महाराज ! सर्व पृथ्वी निखळ सोन्याची करितां येईल व कुळाचलप्रमाणें चिंतामणीचे डोंगर निर्माण करितां येतील ७७. सातांहि समुद्रांस अमृतानें भरणें सोपें आहे, ताऱ्यांना चंद्र करणें हेंहि कठीण नाहीं ७८. कल्पतरूंचे बगीचे लावण्यांत कांहीं अडचण अशी मुळींच नाहीं, या सांगितलेल्या सर्व गोष्टी तपाच्या बळानें करितां येतील, परंतु गीतेच्या अर्थाचें वर्म गुरुप्रसादाशिवाय यथार्थ समजावयाचें वा सांगता यावयाचें नाहीं; ७९. तो गीतेचा अर्थ मी एक सर्व प्रकारें मुका असूनहि गुरूंच्या कृपेनें मराठी भाषेंत अशा रीतीनें करीत आहे कीं, तो अर्थ सर्व लोकांना प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहतां येईल म्ह. स्पष्ट समजेल १७८०. व त्यांच्याच कृपेनें एवढा हा ग्रंथरूपी अमर्याद सागर तरून पलीकडे गेल्याचा कीर्तिरूप विजयाचा जो धेंडा नाचतो आहे ८१ गीतेचें अर्थरूपी आवारांत अठरावा अध्यायरूपी कळसासुद्धां महामेरु पर्वत रचून तेथें श्रीगुरूंचे मूर्तीची [ शिवलिंगाची ] स्थापना करून त्यांची पूजा करीत आहे. ८२. गीता ही निष्कपट आई असून मुमुक्षु हीं जी तिचीं लहान पोरें, त्यांची व तिची चुकामूक पडून जीं तीं अहितकर मार्गांत-संसाररूपी अरण्यांत सैरावैरा हिंडतात, त्या गीता मायेची व चुकलेल्या लेंकरांची गांठ घालून देणें हा तुम्हां संतजनांचा कर्तव्यात्मक धर्मच आहे ८३. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं, तुम्हीं संतजनांनीं ही कृपाच केलेली आहे असें जाणून, मी हें जें कांहीं बोललों, तें लहान सहान, सामान्य कृत्य आहे, असें म्हणतां येणार नाहीं ८४. फार काय सांगूं ! ! तुम्हीं जो हा ग्रंथ समाप्तीचा आनंददायक प्रसंग मला दाखविला, त्यामुळें माझ्या सर्व पूर्वजन्मांचें पुण्यफल तुम्हीच प्राप्त करून दिलें आहे ८५. महाराज ! मी तुमच्यावर भरंवसा ठेवून जी जी आशा केली ती सर्व पुरवून आपण मला पूर्ण सुखी केलेंत ८६. हे श्रीगुरो ! तुम्ही माझ्याकरितां जी गीतार्थरूपी ग्रंथाची नवी दुसरी सृष्टी केलीत, तिच्याकडे पाहून आम्हीं विश्वामित्रांसहि हसूं ८७ कारण, मूळची सृष्टि असूनहि जी नाशवंत सृष्टी केवळ त्रिशंकु राजाचे उद्देशानें व ब्रह्मदेवास कमीपणा आणावा, या हेतूनें विश्वामित्रांनीं उत्पन्न केली, ती नाश पावणारी होती; पण तशी ही आपण ग्रंथरूपी सृष्टी नाशपावणारी अशी केली नाहीं [ तर ती शाश्वत आहे ] ८८. शंकरांनीं आपला भक्त उपमन्यु याच्या ममतेनें त्याच्याकरितां क्षीरसागरहि उत्पन्न केला, पण तोहि येथें उपमा देण्यास योग्य ठरत नाहीं. कारण, तो विषगर्भ आहे, म्हणजे त्याचे पोटांत विष आहे ८९. प्राणिमात्राला अंधकाररूपी निशाचर पीडा देत व गिळीत असल्यामुळें त्यांनीं धांवा केला असतां सूर्यानें त्यास त्या संकटांतून सुटण्यासाठीं आपले तेजानें सहाय्यता केली खरी; परंतु त्याच्या तेजाचें उष्णतेनें जीवमात्राला ताप, त्रास देऊन [ हा त्याच्यांत कमीपणा आहे ] १७९०. बरें संतप्त झालेल्या जगांस चंद्रानें आपल्या चांदण्याचा उपयोग करून शांत केलें, खरें; पण तो कलंकानें युक्त असल्यामुळें त्या कलंकयुक्त चंद्रासारखा हा ग्रंथ आहे असें कसें म्हणतां येईल ! ९१. महाराज ! याकरितां तुम्ही संतजनांनीं माझ्याकडून त्रैलोक्याला उपयोग व्हावा म्हणून जो ग्रंथ करविला तो पुनः पुनः विचार केल्यास अनुपम आहे असेंच दिसते ९२. फार काय सांगावें ! ! तुमच्या कृपेनें हें गीतेवरील 'धर्म कीर्तन' म्ह. धर्माचे केलेलें सम्यक् व्याख्यान शेवटास गेलें. आतां या ठिकाणीं माझा सेवकपणाच तेवढा एक, कर्तव्य म्हणून राहिला आहे. [ म्ह. फक्त मी आपली सेवा करावी ] ९३. आतां यावर, विश्वस्वरूपच सद्‌गुरुदेवानें माझ्या या वाग्यज्ञेंकरून संतुष्ट व्हावें व संतुष्ट होऊन मजला असें 'प्रसाददान' द्यावें ९४. कीं, दुष्टांचा कुटीलपणा नाहींसा व्हावा आणि त्यांना सत्कर्माविषयीं प्रीति-आवड उत्पन्न होऊन ती वाढावी व भूतमात्रांची एकमेकांविषयीं जीवाभावापासून मैत्री जडावी ९५. या सर्व विश्वांतून पापरूपी अंधकार पार नाहींसा व्हावा व स्वधर्मरूपी सूर्याचा उदय होऊन त्याचा प्रकाश [ स्वकर्तव्य कर्मविषयक निःसंदेह ज्ञान लाभ ] व्हावा आणि [ अशा स्वकर्तव्य कर्माचरण द्वारां ] प्राणिमात्रांत जो जें इच्छिल तें त्यांस प्राप्त होवो ९६. या भूतलावर अखिल मंगलाचा वर्षाव करीत असणाऱ्या ईश्वरनिष्ठ साधुसंतांच्या समुदायांची या सर्व भूतांना सद्भावेंकरून सदोदित भेट होवो ९७. [ ते भक्तजन कसें आहेत, तर ] चालणाऱ्या कल्पतरूंचे

१ अनुकूलतेनें. २ हट्ट. ३ शुद्ध. ४ पर्वत. ५ कठीण. ६ बाग. ७ कठीण. ८ प्रत्यक्ष. ९ प्रकार. १० कळस. ११ शिखर. १२ व्यर्थ. १३ मातापुत्रांची. १४ त्रिशंकुराजाच्या. हेतूनें. १५ उणें १६ योग्य, बरोबर. १७ तृप्त झालेल्या. १८ सेवकत्व, चाकरपणा. १९ ग्रंथरूप यज्ञानें. २० प्रसाद. २१ वक्रदृष्टि. २२ प्रीति. २३ पातकाचें. २४ भगवज्जनाची.

अरवें । चेतना चिंतामणीचें गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ९८ ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९९ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥ १८०० ॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ १ ॥ तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ॥ २ ॥ ऐसें युगीं परी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या कूलीं । दक्षिणलिंगीं ॥ ३ ॥ त्रिभुवनैक पवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ ४ ॥ तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ ५ ॥ तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तीनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीतें । देशीकार लेणें ॥ ६ ॥ एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ॥ ७ ॥ जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥ ८ ॥ तिये गीतेचा कळशु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥ ९ ॥ पुंढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होईजे ॥ १८१० ॥ शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ॥ ११ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ श्लोक ७८, ओव्या १८११

**श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथ संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या.**

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाहली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओंवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



बागीचे, सजीव चिंतामणीचें गांव, व अमृताचे चालते बोलते समुद्रच होत ९८. जे कलंकरहित जणुं प्रतिचंद्रच, संसाररूपी अंधकार दूर करून शांति-सुख देणारे, उष्णतारहित जणुं प्रतिसूर्यच, असे जें भगवद्भक्त, सज्जन तें सकल जीवांचें सोयरे नेहमीं प्रिय होवोत ९९. फार काय सांगावें ! ! सर्व त्रैलोक्य सर्व सुखानें परिपूर्ण व्हावें आणि प्राणिमात्रांनीं आदिपुरुष श्रीहरींची अखंड भजन-भक्ति करावी १८००. आणि महाराज ! या मृत्युलोकांत विशेषेंकरून ग्रंथांवरच ज्यांचें उपजीवन आहे, नितांत प्रेम आहे, त्यांनीं इहलोकचें व परलोकचें सुखावर विजयी व्हावें १. तेव्हां विश्वाचें प्रभु, असे जे सद्‌गुरु निवृत्तिनाथ प्रसन्न होऊन म्हणाले कीं, "**तुझ्या म्हणण्या-प्रमाणें हा सर्व दानप्रसाद होईल.**" असें वर-प्रदान मिळाल्यानें श्रीज्ञानेश्वरमहाराज फार संतोषित व सुखी झालें २. याप्रमाणें युगांपैकीं कलियुगांत, महाराष्ट्र-देशांत श्रीगोदावरीच्या दक्षिण तीरावर ३. त्रैलोक्यात जे एक पवित्र व अनादि पंचक्रोश क्षेत्र [ नेवासें ] आहे व ज्या ठिकाणीं जगतांतील सर्व जीवाचे जीवनसूत्र चालक श्रीमोहनीराज आहे ४. त्या क्षेत्रांत सकल कलांनीं संपूर्ण पृथ्वीचा धनी व न्यायानें प्रजेचें पालन करणारा यदु-कुलास भूषण देणारा श्रीरामचंद्रराजा राज्य करीत होता, ५. तेथें ज्या श्रीनिवृत्तिनाथमहाराजांची परपरा आदिनाथ-श्रीशंकरापासून आहे त्यांचें परंपरेंत उत्पन्न झालेला श्रीनिवृत्ति नाथसुत-शिष्य जो ज्ञानदेव त्यानें श्रीमद्‌भगवद्गीतेस मराठी भाषेचा व्याख्यानरूपी अलंकार केला ६. याप्रमाणें भारत-रूपी गांवांत प्रसिद्ध अशा भीष्म संज्ञक पर्वांत श्रीकृष्णार्जु-नांनीं जो उत्तम संवाद केला ७. जो संवाद म्हणजे उपनि-षदांचें सार असून, सर्व शास्त्रांचें माहेरघर आहे व जें परमहंसरूपी राजहंसांनीं-साधूंनीं सेवन करण्याचें जणुं मानस सरोवरच होय ८. त्या गीतेचा अठरावा अध्याय हा कळस आहे व तो येथें संपूर्ण झाला आहे; असें श्रीनिवृत्तिमहाराजांचे दास-शिष्य ज्ञानदेव म्हणतात ९. उत्तरोत्तर या ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीद्वारां सर्व भूतांनीं सर्व सुखानें संपूर्ण व्हावें १८१०. शके बाराशेंबारा चालू होते त्यावेळीं ही टीका श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं केली व या टीकेचा सच्चिदानंदबाबा अति आदरानें लेखक झाला १८११.

१. बाग, अंकुर. २ जिवंत. ३ समुद्र. ४ अमृताचे. ५ लांछनरहित. ६ सूर्य. ७ प्रिय. ८ इहपरलोकीं. ९ श्रीगुरु. १० दानप्रसाद. ११ कलियुगांत. १२ दक्षिण भागाच्या तीरीं. १३ पांच कोश विस्तृत, पंचक्रोशींत. १४ मोहनीराज. १५ यदु-जाधव. १६ आदिनाथ परंपरासंभूत, शिवसंप्रदायिक. १७ निवृत्तिनाथांच्या शिष्यानें. १८ मराठी भाषालंकार. १९ कळस. २० उत्तरोत्तर, पुनः पुनः. २१ ज्ञानेश्वरीच्या पाठांत.

## श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरी संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या

शके पंधराशेसहामध्यें तारणनाम संवत्सरांत जनार्दनस्वामींचे शिष्य एकनाथमहाराज यांनीं गीतेवरील टीका जी ज्ञानेश्वरी, तिची प्रत अत्यंत आदर बुद्धीनें शुद्ध केली १. हा ग्रंथ मूळचाच शुद्ध होता, परंतु लोकांच्या पाठभेदामुळें कोठें कोठें अबद्ध झाला होता. तो पाहून संशोधन करून याप्रमाणें ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध तयार केली २. श्रीएकनाथमहाराज म्हणतात ज्यांची गीते-वरील टीका वाचली असतां अति भाविक व गीतार्थ ज्ञानेच्छेनें वाचणाराला गीतेचें संपूर्ण ज्ञान होतें; त्या निष्कलंक श्रीज्ञानेश्वरमहाराजांस माझा नमस्कार असो ३. पुष्कळ कालानें प्राप्त होणारा जो उत्तम कपिला-षष्ठीचा पर्वणीचा योग भाद्रपद वद्य षष्ठी; त्या दिवशीं गोदेच्या तीरावर पैठण क्षेत्रांत ज्ञानेश्वरीचे प्रत शुद्ध कर-ण्याचें काम समाप्त झालें ४. ज्ञानेश्वरीचे पाठांत जो महाराष्ट्र भाषेंत क्षेपक ओंवी करून घालील, त्यानें अमृताचे तांटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल, असें समजावें ५.

श्रीगुरु चरणारविंदार्पणमस्तु

पुंडलीक वरदा हरि विठ्ठल

# अध्याय संगति व अठराव्या अध्यायाचें तात्पर्य

यालागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेऊनि मिस ।
मग उपलविलें दुस । गीतेचें तें ॥ अ. १८–८३
अठरावा अध्यावो नोहे ।
हे एकाध्यायी गीताचि आहे ॥ अ. १८–८४

संपूर्ण अठरा अध्यायांत प्रतिपादिलेल्या विषयांचा विचार करणारा अर्थात् संपूर्ण गीतेचे सारभूत–तात्पर्य सांगणारा व सर्व गीताशास्त्राचा उपसंहार करणारा, हा अध्याय आहे. त्यामुळें कर्म-उपासना म्हणजेच भक्ति आणि ज्ञान यांच्या दुसऱ्या अध्यायापासून सतराव्या अध्यायापर्यन्त केलेल्या महत्त्वपूर्ण सिद्धान्त विवेचनाची उजळणी करून व त्याचा सारांश, त्यांतील रहस्य, किंवा तात्पर्य या अध्यायांत आले आहे. याशिवाय पहिले जवळ जवळ पंचेचाळीस श्लोक कर्मयोगासंबंधी असून त्यांत त्याग, ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि धृति व सुख यांचे सात्त्विक, राजस, तामस असे त्रिविध प्रकार सांगितले आहेत. कर्मोत्पत्तीचीं पांच कारणें, संपूर्ण 'क्रमयोगाचा' विचार असेहि मार्मिक विषय यांत चर्चिले आहेत. अर्थात् निष्काम कर्म, निष्काम भक्ति, ही अंतःकरण शुद्धिद्वारां ज्ञानासच उपकारक आहेत, असें सांगून नन्तर जीवब्रह्मैक्य ज्ञानानें म्हणजे "सोऽहम्, तोच मी आहें" या बोधानें परमेश्वरांशीं अनन्य होणें म्हणजेच वेगळे न राहणें अर्थात् आपण वेगळे न राहतां ईश्वराचे एकत्व जाणणें, यांचेच नांव परमेश्वर शरणागति होय, असें प्रतिपादन केलें आहे. नन्तर अर्जुनाला 'ब्रह्मात्मैक्य बोध' झाला आहे कीं नाहीं? हेहि स्पष्ट शब्दांत विचारून "मला दृढ ब्रह्मात्मैक्य बोध" झाला अशी अर्जुनाची 'पक्की पावती' मिळाल्यावर, गीताशास्त्र–अध्ययनाचा अधिकारी व संप्रदाय सांगून गीताध्ययनाचे 'परमप्रयोजन'–मुख्य फलहि सांगितलें आहे. थोडक्यांत व आटोपत्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे हा अठरावा 'कलशाध्याय' म्हणजे "**हे एकाध्यायी गीताचि आहे**" असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ते प्रथम श्रीगुरूंचें अपूर्वसुंदर, संस्कृतप्रचुर शब्दांत व निरुपम वर्णन करतात ते असे :–

हे श्रीगुरुदेवा ! अविद्यादि मलरहित, निजभक्तांस मंगलकारक, जन्म–वार्धक्यरूपी मेघांच्या फळीचा नाश करण्याचें बाबतींत आपण वायुसारखे आहांत, त्या तुमचा जयजयकार असो, अतिशय सामर्थ्यवान्, अविद्या–तत्कार्य अमंगळ कुळाचा नाश करणाऱ्या, वेदशास्त्ररूपी वृक्षाचें फळ असलेल्या व त्या फलाची प्राप्ति करून देणाऱ्या श्रीगुरुदेवा ! तुमचा जयजयकार असो, हे श्रीगुरुदेवा ! पूर्णरूप असणाऱ्या, विरक्त भक्तांच्या वत्सला ! काळक्रीडेस अंकित ठेवणाऱ्या, अंशरहिता, तुझा जयजयकार असो. हे श्रीगुरुदेवा ! निश्चलरूपा ! चंचल चित्ताच्या प्राशनानें तुंदिल उदर झालेल्या, जगदुत्पत्तिरूप क्रीडा अविरत करणाऱ्या तुझा जयजयकार असो. हे निरवयवा ! अंतःकरणांत विपुल आनंदास स्फूर्ति देणाऱ्या ! ज्याचे ठिकाणीं अखिल मल सर्वतोपरि नसलेल्या ! जगत्कारणरूपा ! तुझा जयजयकार असो. हे स्वयंप्रकाशा ! जगत्रूपी मेघास धारण करणाऱ्या आकाशा ! चौदा भुवनोत्पत्तीच्या मूळ आधारस्तंभा ! भवनाशका ! तुझा जयजयकार असो ! हे अत्यन्त विशुद्धा ! अविद्यारण्य विध्वंसक गजा ! शम–दमेंकरून मदनभय नाशका ! दयासागरा ! तुझा जयजयकार असो. श्रीगुरुदेवा ! एकरूपा ! कंदर्परूपी सर्पाच्या दर्पाचा नाश करणाऱ्या ! भक्तभावरूपी मंदिरांतील दीपा ! त्रिविध तापनाशका ! तुझा जयजयकार असो; हे अद्वितीया ! अधिकार संपन्नावर प्रेम करणाऱ्या ! निजभक्ताधीना ! भजनयोग्या ! मायातीता ! तुझा जयजयकार असो ! हे श्रीगुरुदेवा ! कल्पनारहित म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या परब्रह्म फलास आत्मत्वानें देणाऱ्या कल्पवृक्षा ! 'स्व संवित्' रूप वृक्षाच्या बीजाच्या प्ररोहरण भूमे ! तुझा जयजयकार असो ! [ १ ते १० ].

हे देवा ! आपल्या यथार्थ स्वरूपाचें, यथार्थ वर्णन शब्दद्वारां करतां येणें शक्य नाहीं. ज्या विशेषणांनीं तुझी स्तुति करावी, जें जें दृश्यस्वरूप आहे. तें तें आपलें स्वरूप नव्हे, हे मी जाणतो, "म्हणौनि लाजे वानणां इहीं" बरें ! तूं आई आहेस, तूं बाप आहेस, अशी व्यवहारांतील उपमा द्यावी; पण तसें वर्णनहि निरुपाधिक स्वरूपदृष्ट्या संभवत नाहीं. सारांश, तुझ्या खऱ्या स्वरूपाची स्तुति करण्यासाठीं लागणारी विशेषणें साऱ्या विश्वांत शोधूनहि

सांपडत नाहींत. कारण, आपण मौनावांचून दुसरें लेणें अंगावर घालीतच नाहीं. किंबहुना ! ! कांहीं न बोलणें, ही स्तुति, 'कांहीं न करणें' ही पूजा, सत्सामान्य स्वरूपास सोडून सोपाधिक असें "कांहीं न होणें" ही खरी तुझी जवळीक होय; पण आपण माझ्या 'मी पणा' चा नाश करून "स्तुतिमिषेंच पां पिसें बांधिले वाचे" म्हणून मी केलेली स्तुति, हा अपराध आहे; पण तो 'माऊली, उपासाहे तूं'. माझा मुख्य हेतू हा कीं, माझ्या व्याख्यानावर 'हाच खरा गीतार्थ आहे' असा आपला संमतिदर्शक शिक्का मोर्तब झाला कीं, माझें हे बोलणें सज्जनांच्या सभेंतहि सहजच पसंत पडेल. श्रीगुरु निवृत्तिनाथांची "आज्ञा" मिळाल्यावर श्रीज्ञानेश्वर महाराज अठराव्या अध्यायाची महती सांगतात:- श्रीव्यास महर्षि हे मोठे कुशल शिल्पकार असल्यामुळें त्यांनीं वेदरूपी रत्नांच्या पर्वतावरील उपनिषदार्थरूपी पठार भूमि खणून त्यांतून उत्तम, उत्तम रत्नें काढून हे **'गीतामंदिर'** तयार केलें. त्यांत हा अठरावा अध्याय म्हणजे त्या गीतारत्न मंदिराचा, अर्थरूपी चिन्तामणीचा 'कळस' आहे व त्याच्या दर्शनानें सर्व गीता दर्शनाचे श्रेय-लाभते. लोकांतहि अशी रूढी आहे कीं, देवळाच्या कळसाचें दुरून दर्शन झाले म्हणजे त्या देवालयांतील देवतेचेच दर्शन घेतल्याचें श्रेय मिळतें. त्याप्रमाणें या एकाध्यायी गीतारूप अठराव्या अध्यायाचें अध्ययनानें संपूर्ण गीताशास्त्राध्ययन केल्याचे श्रेय मिळतें. हा अध्याय गीतारत्न मंदिराचे काम संपूर्ण झाले; असें स्पष्ट दाखवितो. कोणी या श्रीहरीच्या गीतामंदीरास गीता पठणाच्या, आवर्तनाच्या रूपानें बाहेरूनच प्रदक्षिणा करतात, तर कोणी गीताश्रवणाच्या निमित्तानें या गीता मंदिराच्या छायेंत बसून राहतात, कोणी पुरते अवधानरूपी विडा पैसा देऊन गीतार्थज्ञानरूपी गीतामंदिराच्या गाभाऱ्यांत प्रवेश करतात, ते सर्व निजबोधानें, श्रीहरीला आत्मत्वानें, उराउरी म्हणजे तात्काळ, प्रत्यक्ष भेटतात व या गीतेच्या पठणानें श्रवणानें, अर्थज्ञानानें एकमेव श्रीहरीचीच प्राप्ति होते. अर्थात् "श्रवणें, अर्थें, पठणें । मोक्षुची लाभे" कारण, गीतेंतील सातशें श्लोक संख्या आहे व अठरा ही अध्याय संख्या आहे, म्हणून श्लोक व अध्याय हे दिसण्यांत जरी निरनिराळे दिसतात तरी **"देवो बोलिले एक । जे दुजे नाहीं"** गीतेंतील सर्व श्लोकांचे व सर्व अध्यायांचे 'प्रमेय,' महासिद्धान्त 'एकच' आहे, तो म्हणजे दुसरें, तिसरे कांहीं नाहीं तर एकमेवाद्वितीय श्रीहरिच होय [ ११ ते ५९ ].

भगवंतांनीं मागील सतराव्या अध्यायाचें शेवटीं असें सांगितले कीं, ब्रह्मनामाविषयीं श्रद्धा सोडून जितकीं कर्में करावीत तीं मोक्षास कारणीभूत न होतां व्यर्थच होतात, कदाचित् त्या कर्मांत कांहीं व्यंग राहिले तरमात्र अधोगति लाभते. ते कर्म चुकून अव्यंग व सांगोपांग होऊन कर्मकर्त्यास ज्ञानाधिकार प्राप्त करून देणारें, हे असें अभावानेंच घडते. अशा कर्मामध्यें एक ना अनेक अडचणीं आहेत. त्यामुळें कर्मठाला मोक्ष प्राप्ति घडणे जवळ जवळ अशक्यच आहे. तेव्हां कर्मपाश, कर्मदारिद्र्य नाहींसें होऊन ज्यामुळें कर्मबाधाचे मुळींहि भय होणार नाहीं व आत्मज्ञानहि स्वाधीन होईल. जे 'ज्ञानाचे आवाहन मंत्र' आहेत, जे ज्ञानाला आकर्षण करणारे सूत्रतंतू आहेत. ते म्हणजे 'त्याग' आणि 'संन्यास' हे होत. म्हणून या दोन्हीचें स्वरूप जाणून घ्यावें म्हणून अर्जुनानें देवास प्रार्थनापूर्वक प्रश्न केला तेव्हां त्याप्रश्नाला उत्तर देण्याकरितां म्हणून श्रीकृष्णांनीं जे भाषण केलें, त्यांत हा अठरावा अध्याय प्रगट झाला, असा जन्यजनक भावानें मागील अध्यायांतून हा अध्याय उत्पन्न झाला आहे.

वास्तविक पाहतां अर्जुनाचा तत्त्वज्ञानाविषयीं यथार्थ दृढ निश्चय झाला होता, पण संवाद जर थांबला तर संवादनिमित्तानें ब्रह्मवस्तूच्या आनंदाभिव्यक्तींत खंड पडेल, मग त्या सुखास लाचावलेल्या अर्जुनास देवाचे स्तब्ध बसणें कसें सहन होईल? म्हणून 'त्याग' व 'संन्यास' या दोन शब्दांच्या अर्थांतील भेद पुसावयाचे निमित्त करून अर्जुनानें देवास गीतारूपी वस्त्र पुनः उलगडावयास लावले [ ६० ते ८९ ]

यावर देव म्हणाले, 'त्याग' व 'संन्यास' या दोन शब्दांनीं एक 'त्यागच' प्रतिपादन केला आहे हे खरें ! तरीपण त्यांत किंचित्, सूक्ष्म भेद आहे. तो असा कीं, अजिबात कर्म न करतां ते टाकणें 'ते सांडणें संन्यासु म्हणिजे' आणि 'कर्म' अनुष्ठान करावयाचे, पण त्याचे 'फल मात्र' टाकावयाचे 'तो त्यागु गा' आतां कोणते कर्म अजिबात करावयाचे नाहीं व कोणत्या कर्माचे, तें कर्म करून फल मात्र टाकावयाचें, हेहि सांगतों ऐक. स्नान-संध्या-वंदनादिक-नित्यकर्में व श्राद्धादि नैमित्तिक कर्में हीं करणें नितान्त आवश्यक आहे, पण त्याचें 'फल' मात्र स्वीकारूं नये. व काम्य कर्में मात्र अजिबात करूं नयेत, असा शास्त्रनिर्णय आहे. काम्यकर्में म्हणजे 'जया कामना एक मूळ' असते. त्याप्रमाणें मनांत फलकामना ठेवून केलीं जाणारी काम्य कर्में, मनांत फलकामना न करतां चुकूनहि घडली तरीं त्याचीं 'फळें' कर्मकर्त्यास भोगावीच लागतात. ज्या

काम्य कर्मांत, अश्वमेध यज्ञ, अग्निहोत्रादि 'इष्ट कर्में' व वापी–कूप व बाग–बगीचें इत्यादि 'पूर्त कर्में' यांचा अन्तर्भाव होतो. त्या काम्य कर्मांत फल देण्याची अंगभूत शक्ति आहे. त्यामुळेंच इच्छा नसतां चुकून जरी काम्य कर्म घडलें, तर कर्मकर्त्यास त्याच्या फळाची इच्छा असो अगर फलेच्छा नसो ती काम्य कर्माची अंगभूत शक्ति फल भोगावयासच लावते [ विश्वांतील हरएक पदार्थांत आपापलें कार्य करण्याची अंगभूत अशी 'वस्तु–शक्ति' असते ती त्या त्या पदार्थांप्रमाणें निरनिराळी असते. सर्व पदार्थांच्या 'शक्ति' सर्व विश्वाचे चरम कारणरूप मायेच्याच अंगभूत आहेत. पदशक्ति ही श्रोत्यास ज्ञात असली तरच शाब्द बोधरूपी कार्य करते. कारण, पदांत, अर्थ प्रकाशनरूपी सामर्थ्य–शक्ति आहे; पण पदार्थ शक्तीची गोष्ट मात्र तशी नाहीं. त्या पदार्थाशीं ज्याचा संबंध होईल त्याजवर अग्न्यादि पदार्थ आपापल्या अंगभूत शक्तिद्वारां दाहादि कार्य करतात–आपल्याशीं संबंधित असणाऱ्या व्यक्तीस आपल्या शक्तींचें ज्ञान आहे किंवा नाहीं. याची त्यास मुळींच जरूरी नसते. अशी "वस्तु–सामर्थ्य–शक्ति' ज्ञात असणाऱ्या किंवा नसणाऱ्या व्यक्तींवर त्या वस्तु आपापल्यामध्यें असणाऱ्या त्या सामर्थ्यरूप शक्तींचें कार्य करितातच ही गोष्ट काम्यकर्म निरूपणाचे प्रसंगीं श्रीज्ञानेश्वर महाराज दृष्टान्तपूर्वक सांगतात ]

'गुळ आहे, तो गोड आहे' असें न जाणतां तो तोंडांत घातला असतां तो जसा आपल्या गोडीचाच अनुभव देतो. किंवा अग्नींत दाह करण्याची अंगभूत शक्ति आहे, हे न जाणतां अग्नीस राखोंडी आहे, असें समजून जरी अग्नीवर पाय दिला तरी तो जसा पोळतोच, त्याप्रमाणें जलाचे ठिकाणीं ओले करण्याची शक्ति आहे, याचा सर्वांस अनुभव आहे. त्याप्रमाणें काम्य कर्मांतहि एक 'सामर्थ्य आथी स्वाभाविक' कीं, जें कर्मकर्त्यास आपलें फळ बांधून भोगावयास लावते. एवढ्याच करितां मुमुक्षूनें हीं काम्य कर्में कौतुकानें चुकूनहि करूं नयेत. किंबहुना!! अशी काम्य कर्में विषाप्रमाणें मारक जाणून सर्वथैव म्हणजे फलेच्छेसह निपटून त्याग करावा. या त्यागास अंतरंगी सर्वद्रष्टे लोक 'संन्यास' असें म्हणतात [ ९० ते १०९ ].

या प्रकारेंकरून काम्यकर्में करूं नयेत, तशी निषिद्ध कर्मेंहि मुळींच करूं नयेत. नित्यनैमित्तिक कर्में हीं अवश्य अनुष्ठेय आहेत. म्हणून शास्त्रमर्यादा न ओलांडता लक्ष्यपूर्वक नित्य नैमित्तिक कर्में करावीत. त्या नित्य नैमित्तिक कर्मासहि फल आहे. पण त्या फलाचा 'त्याग' करणें जरूर आहे या कर्मफलत्यागासच जाणते 'त्याग' म्हणतात.

या निगुतिप्रमाणें त्याग व संन्यास अनुष्ठिलें असतां तें 'आत्मज्ञानी बांधती पाटु' मात्र कोणत्या कर्माचा त्याग करावयाचा याची हातोटी कळली पाहिजे; पण त्याची यथार्थ जाणीव नसतांना केवळ अनुमानानेच कांहींतरी त्याग केला तर, तो त्याग तर होत नाहींच; पण कर्मबंधांतून सुटण्याऐवजीं तसा त्याग करणारा अधिकच गुंताड्यांत पडतो. कित्येकांस कर्मफलाभिलाष टाकणें अशक्य वाटते, म्हणून ते कर्मास बंधक म्हणून तीं कर्मेंच टाकावींत असें म्हणतात; तर कित्येक लोक म्हणतात कीं, यज्ञयागादिक कर्मेंच अवश्य करावीत. कारण, याविना चित्तशोधक असें दुसरें साधनच नाहीं. वास्तविक असें करावे, नित्य–नैमित्तिक कर्में न टाकतां शास्त्राज्ञेप्रमाणें यथासांग करावीत व तीहि कर्तृत्वाचा मद व फलास्वाद टाकून करावीत. त्या कर्माविषयीं उदासीन न होतां आपल्या अधिकारानुरूप यज्ञ–दान–तपादि कर्में अधिक दक्षतेनें आचरावीत. म्हणजे चित्तांतील रज–तम हीं नाहींसें होतात. मल निवृत्तिपूर्वक सत्त्वशुद्धि म्हणजे आत्मज्ञानास योग्य अशी अंतःकरण शुद्धि होते. एवढ्याकरितां आरंभींच फलाशा सोडून निरहंकारतेनें कर्माचा आरंभ करावा. जो संसारबंधानें शिणला आहे व जो त्यांतून मुक्त होण्यासाठीं प्रयत्न करीत आहे त्यानें माझ्या या सांगीखेरीज 'आन न कीजे' [ ११० ते १७७. ]

कर्माचे बंधन, कर्म करण्याच्या विशिष्ट हातवटीनें कर्में करून कर्मानेंच नाहींसें करावे; पण हें वर्म न जाणतां आपणांस प्राप्त असलेल्या उचित, विहित कर्माचाच त्याग केला तर तो 'तामस त्याग' होईल; आणि त्या तामस त्यागाचा तुला विटाळ होईल. पण तूं चुकूनही तसा विटाळ होऊं देऊं नकोस. कारण, त्यांत आळस, प्रमाद, देहात्मत्वबुद्धि अधिकच वाढण्याचा संभव असल्यामुळें तो बंधक आहे. कर्में करण्यास आरंभ करून त्यांत देहांस होणाऱ्या कष्टाला भिऊन, प्राप्त भोग्यसुख भोगावे, या लोलुपतेमुळें त्या कर्माचा त्याग केला तर तो 'राजस त्याग' होईल. त्यांतहि भोगवासना व देहात्मत्व बुद्धि अधिकच वाढण्याचा संभव असल्यानें हाहि बंधकच आहे. देहाच्या लोभानें केलेल्या कर्मत्यागानें खऱ्या त्यागाचें फळ मिळत नाहीं. आतां कोणत्या त्यागानें मोक्षफळ आपण होऊन घरांत घुसतें म्हणजे प्राप्त होते, हेंहि प्रसंगानें सांगतों ऐक. आत्मबोध प्राप्तीसाठीं म्हणून विहित कर्में करावयाची अर्थात सत्त्वसंपन्न मनुष्य वेदविहित कर्में

टाकीत नाहीं. त्यांतील 'कर्तृत्वाचा मद' व 'कर्मफळाचा आस्वाद' हा जो कर्माचा बंध आहे, त्यास तो टाकतो याप्रमाणें 'हें मी करीत आहे' अशी आठवणहि मनांत न होऊं देतां निस्पृहतेनें विहित कर्में केलीं म्हणजे अंतःकरणांतील रजोगुण व तमोगुण नाहींसे होतील. अर्थात् अंतःकरणशुद्धि होऊन शुद्ध सत्त्वगुणानें आत्मज्ञानाचे डोळे उघडतात. त्या वेळीं त्याच्या बुद्धयादिकांपुढें, दृष्टि पुढें असणारा एवढा मोठा विश्वाभास; पण तो पार मावळून जाऊन त्यास तो कोणीकडेच दिसत नाहीं. किंबहुना ! ! सर्वत्र ब्रह्मदर्शनामुळें कर्ता–करण–कर्म हा त्रिपुटीरूप द्वैतभावच मुळांत लयास पावतो. मग हीं शुभ कर्में व हीं अशुभ कर्में असा कर्मांतील भेद तरी कोठून उरणार? म्हणूनच सामान्यांस शुभाशुभ वाटणारी कर्में त्या कर्मयोग्यास तशी दिसत नाहींत व त्यामुळेंच शुभ कर्मापासून सुख व अशुभ कर्मापासून दुःख तेंहि त्यास होत नाहीं. अशी कर्तृत्वाहंकार व कर्मफल त्याग करून टाकली तरच तीं कर्में पूर्णपणें टाकलीं जातात; नाहींतर तीं अधिकच बांधतात. उपरिनिर्दिष्ट रीतीनें ज्या कर्मफळ त्यागानें रज–तम यांचा झाडा देऊन मनुष्य मोक्षाचा अधिकारी होतो त्यास "सात्त्विक त्याग" असें म्हणतात [ १७८ ते २१७ ].

विहित कर्में अवश्य करावीत. कारण, मनुष्य देह हा प्राक् जन्मीय कर्मांचे फळ भोगण्यासाठीं मिळालेला आहे. म्हणून जोंवर देह आहे तोंवर तो कर्में करणारच, त्यास संपूर्णतः व स्वरूपतः कर्में टाकतां येत नाहींत. कर्म हें अटळ, अपरिहार्य आहे. मग मनुष्य फारतर विहित सात्त्विक कर्में, क्लेशकारक म्हणून टाकील; पण त्या ऐवजीं विषयोपभोगाच्या इच्छेनें दुसरीं राजस, तामस कर्में करीलच. या मनुष्य देहांत अशीं रागद्वेषमूलक, देहतादात्म्यपूर्वक जीं शुभाशुभ कर्में करतो म्हणजे त्या रूपानें तो त्यांचीं फळें भोगण्यासाठीं, पुढील अनेक जन्म–जन्मांतरें घेण्याची पूर्व तयारीच करतो. कारण, जोपर्यंत आत्मस्वरूपाचें अज्ञान आहे, तोपर्यन्त भोगवासना ही अंतःकरणांत हटकून राहणारच व त्या भोगाकरितां कर्में ही करावीच लागणार, हें ओघानेंच प्राप्त होते. बरें ! तीं कर्में–विहित–निषिद्ध ज्या स्वरूपाची असतील त्याच प्रकारची त्यांची फळेंहि असतात मनुष्य देहांत स्वैर विषयभोगानें, निषिद्धाचरणानें, कुव्यवहारानें अतिशय पाप कर्म केलें तर त्याचें अनिष्ट फळ भोगण्यासाठीं त्यांस कृमि, कीटक, लोष्ट, अशा निकृष्ट, अधम योनीस जावे लागते. तसें जर या मनुष्य देहांत वेदविहित पुण्यकर्में केलीं तर त्याचे इष्ट फळ भोगण्यासाठीं अर्थात् उत्तम भोगार्थ स्वर्गांतील देवादि योनीस जावे लागते, ज्यावेळीं शुभाशुभ कर्में समान अर्थात् पाप व पुण्य समभागास येतात, तेव्हां त्याचे मिश्रफळ भोगण्यासाठीं मनुष्य योनीस यावे लागते. मनुष्य हा मागील जन्मांतील कर्मांचीफळें भोगीत असतांना जीं शुभाशुभ कर्में करीत असतो. तीं आणखी पुढील अनेक जन्मांस कारणीभूत होईल, अशा कर्मफलान्तरांस उत्पन्न करीत राहतात. याप्रमाणें ही जन्ममरणाची राहाटगाडग्यासारखीं किंवा घटिका यंत्रासारखीं चक्ररूप परंपरा अविरत चालू राहते.

या कर्मांस टाकण्याचा एकुलता एकच प्रकार आहे व तो म्हणजे "कर्म फळ ईश्वरीं अर्पे। तत्प्रसादें बोधुउदीपें" ईश्वरार्पण बुद्धीनें कर्में केली असतां ईश्वर प्रसादानें शुद्ध चित्तांत ब्रह्मात्मैक्य बोध प्रगट होतो. त्या आत्मबोधानें अविद्येसह देहतादात्म्यहि नाहींसें होते. अतएव भोगवासनाहि नष्ट होते. त्याच वेळीं खरा 'कर्मत्याग' होतो व तोच वरील चक्ररूप परंपरेतून सुटतो. [ कर्म स्वरूपतः टाकतां येत नाहीं; पण वेदबाह्य कर्म करतो अगर विहित कर्मफळाशा धरतां येते तशी टाकताहि येते. त्यांत कर्त्याचें स्वातंत्र्य आहे. ] अर्थात् निष्काम कर्म केल्यानें अंतःकरण शुद्धि होऊन श्रीगुरुकृपामृततुषारानें बोध प्रगट झाला कीं, द्वैत दैन्यहि नाहीसें होते. त्यावेळीं भोग्य भोक्ता हेहि मावळलेलें असतात. ज्याप्रमाणें भिंत पडून गेली कीं, भिंतीवर काढलेल्या चित्राचीहि मातीच होते, त्याप्रमाणें ज्ञान फल पर्यवसायी 'त्याग–संन्यासा'नें मूळ अविद्येसच जगणें [ अस्तित्व राहत ] नाहीं, तर मग त्या अज्ञानाचे कार्य जें कर्म तें कोणी करावे वा टाकावे ? असें हे विहित कर्माचरण शेवटीं ज्ञानांत पर्यवसित होते.

'कर्म' ज्या अन्य कारणांमुळें निर्माण होते तीं कारणें पांच आहेत, तीं तूंहि कदाचित् जाणत असशील कारण, तीं 'कारणें' शास्त्रें बाहु उभारून सांगतात. वेदरायाच्या राजधानींत, सांख्य वेदांताच्या मंदीरांत निरूपणात्मक नौबदीच्या ध्वनिद्वारां तीं कारणें गाजत आहेत. "सर्व–कर्म सिद्धीसाठीं" हीं पांचच कारणें मूळ मुद्दल आहेत; त्या कारणामध्यें आत्मराजास उगाच प्रविष्ट करूं नये. अशा बोलाच्या डांगुरटीनें तीं पांच कारणें प्रसिद्धीस आलेली आहेत. म्हणून अर्जुना ! "तुझ्या इन कर्णपुटीं । वसो हे काज". हे सकळ कर्माचे बीजभूत असणारे 'कारण–पंचक' सांगते वेळीं देव मोठ्या प्रेमानें बोलत होते व अर्जुनहि त्या भक्तिरसांत मग्न झाला होता.

तो श्रीगुरु देवांचा व भक्तराजांचा संवाद श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं अपूर्व सुंदर शब्दांनीं चित्रित केला आहे [ २१८ ते ३०३ ].

तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात अर्जुना ! खरोखरच आत्मव्यतिरिक्त ज्या पांच कारणांनीं सर्व कर्मांची उभारणीं होते, तीं कारणें स्पष्ट रीतीनें सांगतो. प्रथम एक गोष्ट लक्षांत ठेव कीं, त्या पंचकारण दळवाड्याहून 'आत्मतत्त्व' उदासीन, अलिप्त आहे. आत्मतत्त्वाच्या सत्तेविना जशीं कर्माची उभारणी होत नाहीं, तसें तें आत्मतत्त्व 'कर्मसिद्धीस' निमित्त कारणहि नाहीं व उपादन कारणहि नाहीं, एवढेंच नव्हे तर कर्म पारपाडण्याच्या कामीं स्वतः आत्मा नुसते साह्यहि करीत नाहीं, कर्मांची तीं पांच कारणें अशीं कीं, पाहिलें कारण म्हणजे 'देह' हे होय. या देहांतच भोक्ता जो जीव तो सुखदुःखादि स्वभोगांसह राहतो. या देहांत मनुष्य आपल्या इंद्रियांच्या साह्यानें पंच विषय, भोग्य विषय ते ज्या साधनांनीं मिळतील त्या साधनांचा अवलंब करून मिळवितो, त्याचा उपभोगहि घेतो. त्याप्रमाणें या देहांतच जर मनुष्यानें खरें मनांत आणले तर बंधमोक्षाची गुंतागुंत उलगडली जाते. जागृति-स्वप्न-सुषुप्ति या अवस्थात्रयास हा देह आधार आहे. याच उद्देशानें देहाला 'अधिष्ठान' असें म्हणतात. कर्मांचें दुसरें कारण म्हणजे 'कर्ता' हे होय. ज्या कर्त्यास चैतन्याचें प्रतिबिंब असें म्हणतात, चैतन्यच आपल्या यथार्थ स्वरूपास विसरल्यामुळें 'देहच मी आहें' असें मानूं लागले, तेव्हां त्यास 'जीव' असें म्हणतात. त्या अज्ञानामुळें प्रकृति जीं कर्में करते, तीं मी केली, असें जीव भ्रमानें म्हणतो. कर्मांचे तिसरे कारण म्हणजे 'पृथग्विध करणें' हे होय. करण म्हणजे ज्ञानसाधन असलेलीं ज्ञानेंद्रियें. एकाच बुद्धिचें ज्ञान श्रोत्रादि इंद्रियांच्या द्वारां बाहेर फाकतें कर्मांचे चौथे कारण म्हणजे निरनिराळ्या 'क्रिया' हे होय. वायुमध्यें अखंड असलेली एकच 'क्रियाशक्ति' पण तिला निरनिराळ्या स्थानभेदामुळें व व्यापार भेदामुळें प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान, अशी निरनिराळीं नांवें व तिचे भेद होतात, हेच कर्मांचे चौथे कारण आहे. कर्मांचें-पांचवे कारण म्हणजे 'दैव' हे होय. कोणत्याहि कर्म सिद्धीला सर्वेंद्रियांवर अनुग्रह करणाऱ्या, अधिष्ठात्रि देववृंदांची अनुकूलता असावी लागते. हे कारण सहजीं लक्षात येण्याजोगे नव्हे; तरीपण कर्मसिद्धीला आपणास अज्ञात असणाऱ्या बऱ्याच कारण सामग्रीची आवश्यकता असते, अशाच कारणांपैकीं 'देववृंद' हे कर्मांचे एक अदृश्य स्वरूपाचे कारण आहे [ ३०४ ते ३९२ ].

ही पांचहि कारणें त्या कर्मांचें 'पांच हेतू' आहेत कीं, ज्यामुळें 'कर्म रचना' होतें, तें कर्म कसें घडतें तें सांगतो. कोणत्याहि कर्मासंबधींचा संकल्प पहिल्यान्दां मनांत निर्माण होतो. त्या संकल्पास 'मन' हेतू आहे. तो कर्मसंकल्प वाचेचा दिवा लावतो म्हणजे वाणीद्वारां उच्चारण-क्रियेनें प्रगट होतो. ती वाचा कर्मांचा मार्ग दाखवितें. त्याप्रमाणें कर्तव्य बुद्धीनें जीव आपल्या शरीरद्वारां आचरण म्हणजे कर्म करूं लागतो. तेव्हां त्यास कर्मांचे कर्तृत्व येतें. याप्रमाणें हेतू व कारण यांच्या साह्यानें जें कर्म उत्पन्न होतें तें जर यथाशास्त्र, शास्त्रसंवादी झालें तर त्यास "न्याय्य" म्हणजे पुण्यकर्म म्हणतात आणि जर कारण व हेतू यांच्यामुळें यदृच्छेनें कर्म होतच राहणार; पण ते कर्म शास्त्रसाह्याविना, शास्त्र-विसंवादी झाले, तर तें 'अन्याय्य' कर्म आहे, असें समजावें. या सर्व कर्मांहून व कर्मकर्त्याहून किंबहुना !! दैवासकट पांच कारण व हेतु याहून 'आत्मा' अलिप्त आहे, त्यांच्याशीं आत्म्याचा मुळींहि संबंध नाहीं; परंतु देहाभिमान मुलीमुळें, ज्याच्या बुद्धीनें 'देहच मी आहें' असा निश्चय केला आहे; त्या आत्मज्ञानविहिनास हें कळत नाहीं. देहाहंकारामुळें आत्म्याच्या सत्य, असंग स्वरूपाचा विसर पडून, बाह्य देखाव्यावरून आत्माच कर्ता आहे, असा भ्रम निर्माण होतो. त्यामुळें ज्यानें चैतन्यास, ईश्वरास, ब्रह्मदेवासहि केवळ देहाच्याच मर्यादेंत आणून ठेविलें आहे, त्याचा आत्माच कर्ता आहे, असाहि तत्त्वतः निश्चय नसतो. देहस्वरूप मीच कर्मकर्ता आहे, असें समजतो. कर्मातीत व सर्व कर्म साक्षीभूत आत्मा मी आहे; ही आपल्या स्वरूपाची यथार्थ स्थिति 'नायकेचि कानीं' असा अज्ञानी जीव देहरूपी बंदीशाळेंत कर्मांच्या वज्रगांठीनें बांधला जातो असें लोक जन्ममरणाच्या चक्ररूपी परंपरेंतून कर्मबंधांतून कल्पकोटीपर्यंत बाहेर निघणें शक्य नाहीं. यांतून सुटण्याचा एकमेव उपाय आहे तो म्हणजे जे कर्में करीत असून कर्मबंधांतून मुक्त झाले आहेत. त्यांचा आदर्श डोळ्यापुढें ठेवून त्याचा विचार केला तर त्या विचार करणारासहि मुक्त होतां येतें. कारण, "मुक्तातें निर्धारितां । लाभे आपुलीच मुक्तता" अज्ञानामुळें हरवलेला, अप्राप्तवत् झालेला आत्मा वा आपली आत्मस्थिति आपणांस प्राप्त व्हावी अशी जर खरी इच्छा असेल तर संतांच्या स्थितीचा विचार केला असतां, आपली आत्मस्थिति सहजच लाभते.

" म्हणौनि वानावे ऐकावे । तेचि सदा. " म्हणून जो सर्व कर्मबंधापासून मुक्त झाला आहे. त्याचें स्वरूप उपपत्तीच्या बाहु उभवून सांगतो [ ३९३ ते ४०२ ].

हा मुक्त पुरुष मुक्त होण्यापूर्वी अविद्येच्या निद्रेंत, या दीर्घ स्वप्नाचा व्यवहार अनादि-कालापासून करीत होता. तो श्रीगुरूंनीं ' तत्त्वमस्या 'दि महावाक्योपदेशाच्या नांवानीं हांका मारून, आपल्या कृपासामर्थ्यानें नुसता त्याच्या मस्तकावर हात ठेवला असें नव्हें, तर त्यांस थापटून जागे केलें म्हणजे यथार्थ-निःसंदेह, साक्षात्कारात्मक ब्रह्मात्मैक्यरूप प्रबोध केला. अर्थात् इतर कार्यान्तराच्या व्यवधाना-अभावीं त्याचक्षणीं विश्वस्वप्नासहित ती मायारूपी निद्रा टाकून देऊन गेली तो मूळच्या अद्वयानंद स्वरूपानें जागा झाला जागृत झाल्यावर जसें दृष्टीला स्वप्न दिसत नाहीं. त्याप्रमाणें त्यास अहम्. ममताहि व वेद्य वेदकपणाहि उरत नाहीं. त्याचे चित्तांत ' मी ब्रह्म आहे ' असें दृढापरोक्ष ज्ञान झाल्यामुळें अर्थात् द्रष्टाच ब्रह्मरूप झाल्यामुळें यच्चयावत् दृश्याचीहि त्यांस ब्रह्मरूपानेंच प्रतीति येऊं लागते, म्हणजे सर्वत्र मीच ओतप्रोत भरून राहिलों आहे, अशी अंतिम साध्यरूप अनुभूति त्यांस येतें. त्या व्यापकानुभूतीमुळेंच कर्ता-करण-कर्म, ही त्रिपुटीहि भिन्नत्वानें राहतच नाहीं, तर मग तो कोणत्या कर्मानें त्या कर्मांचा कर्तेपणा आपलेकडे घेईल ? [ अशा-व्यापकानुभूति संपन्न स्थितींत त्या मुक्त पुरुषाकडून कर्मे घडतात कां । व घडत-असलींच तर तीं कशी घडतात ? याचे उत्तर असें कीं, मुक्तपुरुष व्यवहार दशेंत पूर्वसंस्कार वशात् देहेंद्रियादि उपाधिद्वारा कर्मे करीत असल्याचें दिसले तरी, ' मी आत्मा-ब्रह्मरूप अकर्ता आहे ' अशा दृढ-बोधानें तो कर्मशून्य, नैष्कर्म्य स्वरूपानें असतो. कर्ताच नसतो; म्हणून तो भोक्ताहि होऊं शकत नाहीं. शिवाय " मी ब्रह्म आहें " अशा उपर्युक्त साक्षात्कारानें आवरण शक्ति युक्त-अज्ञानाची निवृत्ति झाली तरी विक्षेपशक्ति युक्त अज्ञान व तत्कार्य देहेंद्रियादि व विश्वप्रपंच अशा अनुक्रमें व्यष्टि व समष्टी-विक्षेपांची प्रतीति, प्रारब्धावशेषभोग संपेपर्यंत राहते. यासच ' बाधितानुवृत्ति 'रूप व्यवहार म्हणतात किंवा " अविद्यालेश " म्हणतात व याच अवस्थेस ' जीवन्मुक्तावस्था ' म्हणतात. या औपनिषदिक सिद्धान्ताचें श्रीज्ञानेश्वरमहाराज नितान्त समर्पक दृष्टान्तद्वारा व अत्यंत मार्मिकपणें विवेचन करतात तें असें ].

असा ज्याच्या दृढ बोधांत देहाहंकृतिभाव बाधित झाला आहे. त्यास ज्या प्राक्जन्मीय कर्मामुळें देह प्राप्त झाला आहे, तें प्रारब्ध कर्म शिल्लक असेंपर्यंत देहहि उभा असतो व देहद्वय संघाताकडून कर्मेंहि घडत असतात. वारा वाहून जरी ओसरला तरी त्या वाऱ्यानें झाडांच्या ठिकाणीं निर्माण केलेला डोल, कंम्प हा क्षणभर उर्वरित राहतो. किंवा कापूर ठेवलेल्या करंडींतील कापूर जरी संपला तरी त्या करंडींत त्याचा वास राहतो. गाण्याचा समारंभ संपल्यावरहि त्या गाण्याच्या रंगाचा मनोवृत्तिवर झालेला परिणाम जात नाहीं जमिनीवर पाणी वाहून गेले तरी ओल उरते. लक्ष्य भेदल्यावर देखील बाणांत जोंवर वेगाचा जोर शिल्लक आहे तोंवर बाण पुढें सारखा जातच राहणार, सूर्यास्त झाल्यावरहि संध्याकाळीं ज्योतिर्दीप्ति कौतुकानें दिसते. चाकावर मातीचे भांडे तयार झाले व ते काढून कुंभारानें बाजूस नेले; तरीपण आधींच्या फिरविण्याच्या गतीमुळें नंतरहि ते चाक तसे फिरतच राहते. त्याप्रमाणें देहाभिमान गेल्यावरहि ज्या प्रारब्धानें देह झाला आहे ते प्रारब्धच त्याला आपोआप कर्म करावयास लावते. प्राचीन शेष संस्कारवशात् कर्तव्यबुद्धिरहित, देहवाचादि हेतुंसहकारणपंचकांकडून अनेक प्रकारचीं कर्मे निर्माण होतात. तो ज्ञानी देहांतच असतो; पण देहाभिमान व देहाकारवृत्ति नसल्यामुळें ' विदेह दृष्टि ' किंवा ' विदेह अवस्थे 'त असतो. एऱ्हवीं चर्मचक्षूनें, स्थूल दृष्टीनें जें त्याला ' देहधारी ' बुद्धीनें पाहतात ते त्यास कर्मकर्ता ' असेंच मानतात. जो दृग्रूप स्वस्वरूप बोधानें जागा झाला आहे व ज्याच्या दृश्य व तत्सापेक्ष द्रष्टा, या दोन्ही भावना नाहींशा झाल्या आहेत ' तो नेणें काय राहटला । इंद्रियग्रामु '? मुक्त पुरुषाचा देह प्रारब्ध संस्कारव शात् हालत-चालत म्हणजे कर्मे करीत असतांना पाहून वेडे-पिसे लोक त्यास ' कर्ता ' म्हणतात. तत्त्वतः त्यास देहतादात्म्य नसल्यामुळें त्यास कर्मांचे बंधन मुळींच घडत नाहीं. कारण, आत्मा कोणत्याहि कर्मास साह्य करीत नाहीं तसा तो कर्माच्या उपक्रमास हातहि लावीत नाहीं व चिद्रूप साक्षी प्रेरणेच्या संकल्पास तरी आपण स्वतः निरोप देतो काय ? तर नाहीं. अज्ञानामुळें ' मी कर्ता आहें ' असा अभिमान धारण करणारासच कर्मबंध होतो. [ श्री ज्ञानेश्वर महाराज कर्म सिद्धांताचा मूलगामी बिचार अपूर्वसुंदर भाषाशैलीनें दृष्टान्तपूर्वक सांगतात. ]

अज्ञानाच्या पटावर अन्यथा ज्ञानाचें चित्र उमटते, तेथें चित्र चित्रित करणारी त्रिपुटी प्रसिद्ध आहे, ती म्हणजे ज्ञाता-ज्ञान व ज्ञेय ही होय. ही त्रिपुटीच जगाचे कारण आहे,या त्रिपुटींतूनच कर्मांची प्रेरणा होते,असे निःसंदेह समज. अज्ञानाच्या पोटीं जीवास विपरीत ज्ञान उपजताक्षणींच आपल्याच तीन ठिकाणीं विभाग करते. ते वृत्तिज्ञान आपल्यापुढें-

ज्ञेयरूप पंच विषयाचा घोडा ऊभारून–विषयाची सिद्धि करून, आपल्या [ वृत्तिज्ञानाचा ] मागल्या बाजूला आश्रयाला ज्ञेयसापेक्ष ज्ञातृत्वाची उभारणी करते. [ म्हणजे विशुद्ध चैतन्याला वृत्तिज्ञानाच्या उपाधीमुळेंच ज्ञातृत्व आहे; त्यास 'ज्ञाता' म्हणतात. वृत्तिज्ञानाबरोबरच उत्पन्न होऊन प्रतीत होणारे दृश्य विषय म्हणजे 'ज्ञेय' होय. दृग्रूप चैतन्याच्या आश्रयावर राहणारी कल्पित अज्ञानजन्य दृष्टि म्हणजे वृत्तिरूप 'ज्ञान' होय. अशी ही त्रिपुटी अनिर्वचनीय तयार होते. कारण, वृत्तिज्ञानापूर्वी दृश्य–ज्ञेयास अस्तित्वच नसते, वृत्तिज्ञानाचा उपाधि नसेल तर ज्ञाता विशुद्ध ब्रह्म कोटींतच अंतर्भूत होतो आणि वृत्तिज्ञानांतहि वृत्तिभाग साक्षीभास्य आहे आणि चिदाभास तत्त्वतः स्वयंप्रकाश चैतन्यरूप आहे. म्हणून उपर्युक्त त्रिपुटी अध्यस्त आहे ] ज्ञाता–ज्ञान–ज्ञेय ही त्रिपुटीच कर्ता–कर्म–करण या रूपांत परिणत होते. ज्ञान हें ज्ञात्याला ज्ञेयरूप विषय किंचित् दाखविते न दाखविते तोंच तो ज्ञाता, तो विषय सुखसाधन, अनुकूल वाटल्यास सत्यबुद्धिपूर्वक होणाऱ्या भोग्यत्व बुद्धीनें त्या प्रिय विषयाच्या प्राप्तीसाठीं किंवा तो विषय दुःखसाधन–प्रतिकूल वाटल्यास त्या अप्रिय विषयाच्या त्यागासाठीं प्रवृत्तच होतो. कारण, तशी त्यास 'प्रेरणाच' निर्माण होत असते. ती प्रेरणा झाल्यावर तो विषय ज्या साधनानें आपणास प्राप्त होईल त्या त्या साऱ्या साधन सामुग्रीचा उपयोग करून तो ज्ञाताच आतां कर्म करूं लागतो. असा हा ज्ञाताच क्रियांमुळें 'कर्ता' या हीनदशेस येतो. असा ज्ञाता आपण 'कर्ता' होऊन ज्ञानास 'करणता' आणतो, तेव्हां ज्ञेय हे स्वभावतःच 'कार्य' म्हणजे क्रियेचें फल होते. सारांश, ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय हे कर्म प्रेरणा देणारें 'कर्माचे प्रवृत्तित्रय'' आहे व कर्ता–करण व कार्य हा 'कर्म संचय' म्हणजेच 'कर्म संग्रह' होय. अर्जुना! जेव्हां हे कार्य, मी कर्ता, असें वाटत असते त्यावेळींहि या समस्त–क्रियांपासून, त्रिपुटीहून आत्मा अलिप्त, सदाचाच मुक्त, दूर, वेगळा, असतो [ ४०२ ते ५१६ ].

ज्ञान, कर्म व कर्ता हें तीन जे आतां तुला सांगितलें तेंच पुनः सत्त्व–रज तम या त्रिगुणामुळें सात्त्विक राजस, तामस असें तीन प्रकारचें होतात, हा गुणभेदाचा विचार सर्व शास्त्राचा नरेंद्र व ज्ञानानें डोळस असणाऱ्या सांख्यशास्त्रांत प्रतिपादन केला आहे, तो असा कीं, सत्त्वादि त्रिगुणांचा महिमा एवढा आहे कीं, त्रिगुणांनीं ब्रह्मदेवा-पासून तों थेट किड्यापर्यंत साऱ्यांचें तीन प्रकार केलें आहेत. ज्ञानाच्या तीन प्रकारांपैकीं सात्त्विक ज्ञान सर्वांत श्रेष्ठ आहे म्हणून तें आधीं सांगतों कारण, दृष्टि निर्मळ केली कीं, भलतेंहि चोख दिसते, तसें शुद्धज्ञानानें सर्व शुद्धच लाभते [ 'ज्ञान' हा व्यावहारिक व विवेकसिद्ध जीवनाचा गाभा आहे. कारण, ज्ञानांतूनच मनुष्य जीवनाचा किंबहुना ! ! अखिल विश्वाचाहि अविष्कार होत असतो. पहिल्यानदां दृग्रूप चैतन्यास वृत्तिज्ञानाच्या उपाधीमुळें ज्ञातृत्व प्राप्त होतें, मग ज्ञात्यास एखाद्या वस्तूचें ज्ञान होतें, त्यांस ज्ञात विषय अनुकूल किंवा प्रातिकूल वाटूं लागतो. अनुकूल विषय प्राप्तीची इच्छा निर्माण होऊन त्याच्या प्राप्त्यर्थ ज्ञाता प्रवृत्तच होतो. तसा प्रतिकूल विषयाच्या त्यागाची इच्छा निर्माण होऊन त्याच्या निवृत्यर्थ तो ज्ञाता प्रवृत्त होतो, त्या दृष्टीनें अवश्य ते कर्म करण्याची प्रेरणा निर्माण होऊन, त्या विषयाच्या प्राप्तीच्या साधनांचा वापर करून, तशी कर्में करूं लागतो. त्रिविध ज्ञानानंतरच त्रिविध क्रिया घडत असते, त्या क्रियेंत म्हणजे आचारांत बदल करावयाचा असेल तर माणसाचें ज्ञान बदललें पाहिजे. ज्ञान परिवर्तनानें जीवनहि पालटते 'वृत्ति ज्ञाना-' नंतरच इच्छा निर्माण होते, मग क्रिया होतें. ज्ञानानंतर इच्छाच निर्माण झाली नाहीं तर क्रियाच घडणार नाहीं. ज्ञानांतून इच्छा निर्माण होऊन तदनुसार कर्में केलीं व तीं यशास आलीं तर त्या विषय लाभानें सुख होतें व लोभ निर्माण होतो. त्यामुळें त्याच विषयाच्या प्राप्त्यर्थ–किंवा भोगार्थ कर्में करण्यास सुरुवात होते. बरें ! कर्में करूनहि तीं यशास न आल्यामुळें, इच्छित लाभ झाला नाहीं, तर दुःख होते व क्रोध निर्माण होतो. वृत्तिज्ञानानुगण असणाऱ्या इच्छेतूनच 'सत्' धारण करण्याची मनाची शक्तिरूप श्रद्धा निर्माण होते. म्हणजे श्रद्धेचे मूल कारणहि 'ज्ञान'च आहे. म्हणून तर 'भक्ति' किंवा 'श्रद्धा' ही वस्तुमहात्म्यज्ञानजन्य आहे; हे म्हणणेहि अन्वर्थच आहे. कारण, कोणत्याहि वस्तूचें महात्म्य कळलें, तर त्या वस्तुविषयीं आदर, आस्था, प्रेम निर्माण होते. हाच अभिप्राय मनांत घेऊन साधुसंतांनीं आपल्या प्रसादपूर्ण, ओजपूर्ण, अनुभूतिगुणसंपन्न वाङ्मयद्वारां प्रामुख्यानें उपदेश करण्याचें कारण म्हणजे जीवास उपदेशाविना सहजीं स्वकल्याणाचें, हितकर धर्मांचें व हिततम-स्वरूप ब्रह्माचें ज्ञान असणें वा होणें संभवनीय नाहीं, हे होय. "परमार्थ, परमार्थ म्हणजे दृष्टीचा बदल" हाहि याच अर्थानें सार्थ आहे. तो दृष्टीचा बदल झाला तर त्याच्या जीवनाचा. चारित्र्याचाच बदल होतो. ज्ञानानुरूपच मनुष्यांत इच्छेची श्रद्धेची, क्रियेची–किंबहुना ! ! जीवनाची आविष्कृति होते. त्रिगुणाची वाढहि ज्ञानानुरूपच होते. याच दृष्टीनें

चारित्र्याचा, व्यावहारिक जीवनाचा, किंबहुना ! ! अज्ञान व तत्कार्य दुःख याहून अतीत असणाऱ्या विवेकसिद्ध जीवनाचा ज्ञान हाच पाया असल्यामुळें श्रीज्ञानेशहि " ज्ञानें शुद्ध व्हाहिजे । सर्वेहि शुद्ध " असे अर्थपूर्ण, महत्त्वपूर्ण जीवनमूल्याचे प्रतिपादन करतात ].

असें सात्त्विक, चोखडें ज्ञान झालें म्हणजे शिवापासून तों थेट तृणापर्यंतच्या भूतव्यक्ति भिन्न भिन्नरूपानें दिसत नाहींत किंबहुना ! ! जाणता, जाणणें आणि जाणावें, हेहि उरत नाहीं. अर्जुना ! राजस ज्ञान हें भेदाची कांस धरून चालते. भूतांच्या वैचित्र्यामुळें जें ज्ञान आपण स्वतः वैचित्र्यास पावून ज्ञात्या जीवास चकवून, बराच भ्रमिष्टपणा आणते. त्यामुळेंच या राजस ज्ञानांत ऐक्यबोधाची कल्पनाच नाहींशी झालेली असते. तामसज्ञान विधिवस्त्रविहीन असतें. तें ज्ञान निषिद्धास सोडावें किंवा विहिताचा आदरानें अंगीकार करावा, हे विषयांचे बाबतींत जाणतच नाहीं. जेवढें म्हणून डोळ्यासमोर येईल, त्यास हे माझें भोग्यच आहे, असें समजून निंद्यानिंद्य न पाहतां त्यांचा स्वैर, यथेच्छ, उपभोग घ्यावा एवढेंच, तें ज्ञान जाणतें. परिच्छिन्न देहाला आत्मा व पाषाण प्रतिमेस ईश्वर समजणारें ज्ञान 'तामस' होय. त्यास केलेल्या क्रियेचे पुढें होणारे दृष्ट दुःख किंवा अदृश्यरूप उत्पन्न होणारे पाप-पुण्य याचा तामस ज्ञानास विचारच नसतो. ते देहासच आत्मा व सर्वस्व समजतें, या देहाव्यतिरिक्त 'आत्मा' म्हणून कोणी एक आहे; याचाहि विचार त्यास कळत नाहीं. त्या तामस ज्ञानाला 'ज्ञान' हें केवळ आडनांव आहे [ ९१७ ते ९८३ ].

त्या प्रकारच्या ज्ञानामुळें जे तीन प्रकारचें कर्म [ क्रिया ] होते. त्यांपैकीं आधीं सात्त्विक कर्मप्रकार सांगतों. स्वाधिकारानुरूप वाट्यास आलेलें जें कर्म, तें यथासांग संतोषानें, निरहंकार वृत्तीनें आणि कर्म फलावर लोभदृष्टि न ठेवतां करतो व ज्याची " उखिती क्रिया पैठी । ब्रह्मींची करी " म्हणजे आपल्या सर्व क्रिया व कर्म फलें हीं सर्वच 'ब्रह्मार्पण' करतो. त्यास 'सात्त्विक कर्म' असें म्हणतात. नित्य नैमित्तिक कर्में, जीं आपणास अवश्य करणीय आहेत, तीं कर्में प्राप्त झालीं असतां, तीं करण्यासाठीं बसलेला उठतहि नाहीं; पण इतर काम्य कर्में करण्याच्या नांवानें धन, देह वगैरें सर्वस्व खर्च करीत असतांहि, आपण फार खर्च केला, असें त्यास वाटत नाहीं. फलाशेनें कठीण असलेली सर्व काम्य कर्मेंहि यथाविधि, नेटकें करीत असतो व तें काम्य कर्म केल्याचें लोकांत दौंडी लावून प्रसिद्ध करतो. अंगीं कर्माहंकार भरतो व तो माता-पिता, गुरु यांना मानीत नाहीं. जें काम्य कर्म अल्पफल देणारें, कष्टकर सक्लेश असें असते. त्यास 'राजस कर्म' म्हणतात क्षणिक देह प्रेरणेनें कर्म करतो; पण त्या कर्मामुळें आपल्यावर व इतरावर होणारा अपाय याचा विचार नसतो. तें कर्म करण्याचें आपल्या अंगीं सामर्थ्य आहे कीं नाहीं, याचाहि त्यांत विचार नसतो कर्माची किंमत व त्यापासून होणारें फल, याचा विचार करीत नाहीं. आपपर पीडाकारक, निषिद्ध कर्म, कृत्याकृत्य सरकटित होणारें जें कर्म तें 'तामस कर्म' होय [ ९८४ ते ६२७ ].

आतां याच तीन कर्मांचे आचरण करणारा, कर्माभिमान धारण करणारा 'कर्ता' जो जीव, तोहि तीन प्रकारचा झाला आहे. वेदविहित कर्में स्वाधिकारानुरूप जीं कर्में तीं कर्तृत्त्वाचा मद व फलास्वाद टाकून परमादरानें यथाशास्त्र करणारा तो "सात्त्विक कर्ता" होय. तो परमात्म्यास समर्पण करण्याजोगा कर्म समुदाय निर्माण करण्याकरितां योग्यकाल, देशशुद्धि साधून, क्रिया निर्णय शास्त्रदृष्टीनें पाहून, मनांत चांगले धैर्य बाळगतो. कर्मानुष्ठान करतेवेळीं देहसुखाची पर्वा करीत नाहीं. आत्म्याएवढ्या प्रियतम वस्तु प्राप्त्यर्थ कर्म करतांना देहाला कितीहि दुःख, कष्ट झालें तरी त्याचा खेद करीत नाहीं. आरंभिलेलें कर्म अव्यंगपणें सिद्धीस गेलें, तर त्या बद्दलचा गर्व-फुंज मिरवीत नाहीं. किंवा कर्मांत कांहीं उणीव राहिली तरी संकोचित, कष्टी होत नाहीं. 'राजस कर्ता' ज्या कर्मांत सोप्यारीतीनें फल मिळण्याची शक्यता दिसते त्याच कर्माचा आदरानें आरंभ करतो. तें कर्म सिद्धीस गेले तर त्या आनंदानें इतर लोकांस वेडावून दाखवितो, बरें ! तें कर्म मध्येंच थांबले किंवा निष्फल झालें, तर शोकग्रस्त होऊन कर्माचाच धिक्कार करतो, तो 'राजस कर्ता' होय. आपपर-घातक अशाच वाईट क्रिया करण्यास आरंभ करतो, तो 'तामस कर्ता' होय. जो स्वैराचारानें तृप्त होऊन फुगतो, ज्याचें मन कपटी असते, वागणूक पक्की चोरटी असते व ज्याची दृष्टिहि कपटीच असते. दुसऱ्याचें बरें झालेलें कळल्यावर ज्याचे कपाळांत तिडीक उठते. जो ऐहिक-पारत्रिक हितकर, असें कर्म आपण होऊन तर करीत नाहींच; पण तसें उचित कर्म करण्याचा प्रसंग आला तर त्यास निद्रा ठेवल्यासारखी येते. प्रमाद, आळस, हेहि त्यास त्यावेळीं नेमके प्राप्त होतात. जो मरेपर्यंत चिन्ताग्रस्त व विषादग्रस्त असतो, असा पापाचा जो मूर्तिमन्त ढिगारा असतो, तो " तामस कर्ता " होय. असें कर्म, कर्ता व ज्ञान यांचें तीन प्रकार व त्यांचीं लक्षणें सांगितलीं.

आतां बुद्धि आणि धैर्य यांचे त्रिगुणामुळें झालेलें तीन तीन प्रकार सांगतों. आत्मप्राप्तिरूप फळाकडे दृष्टि ठेवून, वेदविहित निष्काम कर्म अनिष्ट-जन्मभय-निवृत्तिपूर्वक मोक्षसिद्धि सुलभ करून देणारे आहे, तें कर्म करण्याचा बळकट निश्चय करण्यास लावणारी जी 'बुद्धि' ती 'सात्त्विक बुद्धि' होय. कार्याकार्याचा निर्णय, प्रवृत्ति-निवृत्ति मापानें जाणते ती 'सात्त्विक बुद्धि' होय, असें समज.

जी बुद्धि धर्माधर्मरूप, कृत्याकृत्यें-याची निवड न करतां सरसकट आचरण करीत जाते. कारण, पापकर्म व पुण्यकर्म यांची निवड करण्याचें ती बुद्धि जाणतच नाही. ती बुद्धि 'राजस बुद्धि' होय असें तूं जाण. तामस बुद्धीला शास्त्रविहित म्हणून जेवढे सांगितलें असेल, ते सर्व ज्या बुद्धीला पातकच वाटते, जी बुद्धि गुण ते दोषच मानते, श्रुति प्रतिपादित सर्व गोष्टींना जी, उलटेच जाणते, खरें ते खोटेंच जाणते, ती "तामस बुद्धि" जाणावी. असें बुद्धीचें प्रकार होत. या त्रिविध बुद्धिवृत्तींनें कर्ममात्राचा निश्चय केला म्हणजे त्या बुद्धीला ज्या तीन प्रकारच्या धैर्यानें आधार दिला जातो, त्या धैर्याचेंहि तीन प्रकार आहेत, ते सांगतों [ ६२८ ते ७३२ ].

जे धैर्य अंतःकरणांत उत्पन्न झाल्याबरोबर मन व इंद्रियें बाह्यविषयापासून परावृत्त होऊन अंतर्मुखतेस प्राप्त होतात. ज्या धैर्यामुळें मन संकल्प विकल्पाचें वस्त्र टाकून दिल्यामुळें उघडे होऊन बुद्धीच्याहि मागें जाऊन स्वस्थ बसते. सार्वभौम राजा जो परमात्मा त्याचे आत्मत्वानें ज्ञान होईपर्यंत कठीण समयीं ज्या धैर्याकडून लांच न घेतां निग्रह केला जातो, म्हणजे 'मोक्ष' हेच ज्या इच्छेचे ध्येय आहे, त्यासच 'सात्त्विक धैर्य' म्हणतात. देहच आपण आहोत असें मानून, ऐहिक व पारलौकिक विषय भोगार्थ रात्रंदिवस, अतीव सायास ज्या धैर्यामुळें सहन करतो अर्थात् धर्म-अर्थ-काम, हेंच ज्याचे ध्येय आहे, अर्जुना! त्यास 'राजस धैर्य' असें म्हणतात. तामस धैर्य हे देहासक्तीच्या पलीकडे कांहींच जाणत नाहीं. त्यामुळें निद्रा, आळस, शोक, भय, वयसा-वित्त-यांचा मद इत्यादि विकार वाढतच जातात. जेथें मोक्षाची आशाच संपते अशा धैर्यास 'तामस धैर्य' म्हणतात. याप्रकारें-करून तीन प्रकारच्या बुद्धीनें अगोदर कर्मनिश्चय केला जातो. तो या तीन प्रकारच्या धैर्यानें सिद्धीस नेला जातो. धैर्यानें कर्मनिष्पत्ति झाल्यावर त्या कर्मापासून जें एक फळ निर्माण होते, त्यास 'सुख' असें म्हणतात. तें सुखहि कर्मवशात् तीन प्रकारचें आहे, असें समज. खरें सुख तें कीं जें जीवास आत्म्याच्या भेटींत होत असते. त्या सुखलेश लाभामुळें जीवानें अभ्यास केला असतां, ज्या सुखाचें ठिकाणीं जीवपणाचें दुःख नाश पावते. या सात्त्विक सुखाचा आरंभ शम-दमांच्या समुदायामुळें अवघड असतो. त्यासाठीं इंद्रियांना विषयाचें घर सोडतेवेळीं जणुं मोठा युगान्तच ओढवतो; पण ते वैराग्यसंपन्न वीर सहन करतात. धैर्य शंभूनें वैराग्य वीष प्राशन केलें म्हणजे मग ज्ञानामृतानें आनंद प्रगट होतो. ज्या सुखास मूळ वैराग्य असून जें अद्वयानंदात्मकतेनें अभिव्यक्त होते, त्यास 'सात्त्विक सुख' असें म्हणतात. राजस-सुख विषय व इंद्रियें यांच्या संबंधांत उत्पन्न होते, असे विषयोपभोगानें होणारें सुख क्षणभंगुर असल्यामुळें आरंभीं आनंददायक असतें; पण कधीं आपोआप तर कधीं विषयनाशानें, तें वैषयिक सुख नाश पावते व परिणामीं मात्र विषाप्रमाणें दुःखदायक असते; तें 'राजस सुख' होय. 'तामस-सुख' अपेय-पान, अखाद्य भोजन इत्यादि निषिद्ध स्वैर विषयोपभोगापासून उत्पन्न होते. ज्याच्या आरंभापासून तों थेट शेवटवेरी सदाच दुःख असते व ज्याच्या आरंभीं व शेवटीं स्वस्वरूपाच्या मार्गांविषयीं मुरळ पडते, तें "तामस-सुख" होय [ ७३३ ते ८१० ].

त्रिगुणाची सर्वत्र व्याप्ति आहे. आतांपर्यंत कर्म, कर्ता, बुद्धि, धैर्य, कर्मफळसुख यांचें त्रैविध्य सांगितलें. गुणांनीं देवाच्या मागेहि 'प्रकार' लावले. त्यामुळें ईश्वरहि आपल्या उपाधिभूत मायेच्या तीन गुणामुळें ब्रह्मा-विष्णु आणि रुद्र या तीन प्रकारचा आहे. कारण स्वरूप सत्त्वगुणोपहित 'दृक्-वस्तु' पालन कर्ता 'विष्णु' होय व कारणस्वरूप रजोगुणोपहित 'दृक्वस्तु' सृष्टी कर्ता 'ब्रह्मदेव' होय आणि कारण स्वरूप तमोगुणोपहित 'दृक-वस्तु' संहार कर्ता 'रुद्र' होय तसेंच स्वर्ग-मृत्यु आणि पाताळ, असें तीन लोक केलें व याच तीन गुणांनीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र असें चार वर्ण निर्माण केलें व चार वर्णांना शास्त्रानें चार प्रकारचीं निरनिराळीं कर्मेंहि लावून दिलेलीं आहेत. त्यांत ब्राह्मणांस नऊ प्रकारचे कर्म सांगितलें आहे. शम-अंतःकरण निग्रह, दम-इंद्रिय निग्रह, तप म्हणजे चित्तांत सदा ईश्वर-स्वरूप चिन्तन बाळगणें; शौच म्हणजे आंत निर्विकार मन व बाहेर शुद्धाचरण, क्षमा म्हणजे सर्व सहन करणें, आर्जव म्हणजे प्रतिकूल-जीवांविषयींहि अंतःकरणाचा चांगला सरळपणा असणें. ज्ञान म्हणजे ईश्वर प्राप्ति, याच अंतिम साध्य प्राप्त्यर्थ शास्त्रानुसार साधनानुष्ठान करणें, विज्ञान म्हणजे अंतःकरण शुद्धिपूर्वक,

ध्यानबलानें ईश्वर तत्त्वांत बुद्धिनिश्चयें करून मिळणें. आस्तिक्य म्हणजे वेद–शास्त्राविषयींचे प्रामाण्य व त्याविषयीं असीम आदरभाव असणें [ ८११ ते ८५९ ].

क्षत्रियांस पुढील कर्में करणेस सांगितली आहेत. शौर्य म्हणजे अन्य साह्यनिरपेक्षतेनें आपले हातीं घेतलेलें कार्य तडीस नेणें. तेज म्हणजे आपण स्वतः न घाबरतां आपल्या सामर्थ्यानें व गुणानें साऱ्या जगाला विस्मित करणें, धृति म्हणजे कोणत्याहि प्रसंगीं बुद्धीचें डोळें न झाकतां स्थिर वृत्तीनें असणें, दक्षता म्हणजे हर्ष, भय, शोकादि विकारांचे भेद न करण्याजोगी सावधगिरी बाळगणें, समरांगणीं शत्रूला कधींहि पाठ न दाखविणें. दान म्हणजे अपेक्षेनुसार उदारवृत्तीनें दान देणें, ईश्वरभाव म्हणजे नियमन शक्ति, आपल्या प्रजेचें दक्षतेनें पालन करून ज्या प्रजेमध्यें आपल्याविषयीं प्रेमादराची भावना झाल्यामुळें जी प्रजा याची आज्ञा पालन करते त्या प्रजेचा उपभोग घेणें [ ८५६ ते ८७६ ]. वैश्याचे कर्म म्हणजे शेतकी करून जगणें, गोधने राखून राहणें, स्वस्त वस्तु घेऊन त्यावर उचित नफा घेऊन महाग विकणें होय [ ८७७ ते ८८२ ]. शूद्राचें कर्म म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांची सेवा करणें हें होय [ ८८३ ते ८८४ ].

अशी ही चारवर्णानुगुण चार प्रकारचीं कर्में त्या त्या वर्णास कर्तव्य म्हणून शास्त्रानें सांगितलीं आहेत. ती नीट समजावून घेऊन त्याचे यथाशास्त्र आचरण केलें तर तीं चार वर्णांचीं कर्में आचरण करतेवेळीं निरनिराळीं असली तरी ती त्या त्या सर्व वर्णांना मोक्षासाठींच उपकारक आहेत. विहित कर्में मुळींच न करतां निष्क्रिय राहणें किंवा निषिद्ध कर्में करणें किंवा काम्य कर्में करणें, यांचा त्याग करून जो स्वतः विहित कर्माचरण करतो तो मोक्षाच्या ऐलद्वारीं पैठा होय ! म्हणून कोणीहि आपलें विहित कर्माचा त्याग करूं नये सर्वात्मक सर्वव्यापक परमेश्वराची विहित कर्माचरणानेंच खरी भक्ति होते ती अशी, सर्वात्मक ईश्वरास जे प्रिय, आवडते असेल ते केल्यानें त्याची भक्ति होते. "विहित कर्माचरण करणें हीच माझी सर्वात्मकाची परम सेवा आहे" अर्थात् हाच त्या परमेश्वराचा "**अनन्य ओलावा**" आहे, असें जाणून विहित कर्माचरण करणें, हीच खरी त्याचीं सर्वश्रेष्ठ थोर भक्ति होय. स्वभाव प्राप्त ज्यास जे विहित कर्म शास्त्रानें सांगितलें आहे. त्यानें त्या वर्णाश्रम धर्माप्रमाणें, विहित कर्माचरण करावें, हेंच– "**ईश्वराचे मनोगत**" आहे म्हणून त्या ईश्वर मनोगताप्रमाणें विहित कर्माचरण केल्यानें तो ईश्वर निःसंशय प्राप्त होतोच विहित कर्माचरणाचा त्याग करणें उपरिनिर्दिष्ट ईश्वरमनोगताच्या विरुद्ध वागण्याप्रमाणें आहे. त्या सर्वधारक, सर्व नियामक, सर्वात्मक स्वामीच्या मनोभावाप्रमाणें वागण्यास मुळींहि न चुकणें हीच त्याची 'परमसेवा' होय. या खेरीज दुसरें कांहीं करणें म्हणजे अर्जुना ! देवघेवीची, 'व्यापारी वृत्तीची भक्ति' ही खरी भक्ति नव्हे तर ती 'निव्वळ दुकानदारी' केवळ व्यापार होय.

सारांश, स्वभावप्राप्त विहित कर्तव्याचरणपूर्वक ईश्वराची 'खूण'–आज्ञा पालन करावी म्हणजे त्या सर्वात्मक ईश्वरास स्वकर्म कुसुमांची पूजा केली असतां ती त्याच्या अपार संतोषास कारणीभूत होते. त्या पूजेनें रिझलेल्या आत्मराजाकडून "**वैराग्यसिद्धि**" हा प्रसाद दिला जातो म्हणजे बोधाची योग्यतारूप वैराग्यसिद्धि मिळाल्यानें त्यास सम्यक् ज्ञानोदयापूर्वींच ईश्वराचा वेध व त्या वेधानें तन्मयता प्राप्त होऊन सर्वहि विषय आवडेनासें होतात [ ८८५ ते ९२१ ].

स्वभाव प्राप्त कर्में इतरांपेक्षां आचरण करण्यास कठीण वा कष्टकर वाटलीं तरी तीं न टाकतां मोक्षासाठीं तीं कर्में करणेंच श्रेयस्कर आहे. कडुनिंबाचा कडुवटपणा आपणास आरोग्य प्राप्तिद्वारां सुखकर असेल तर त्याच्या कडूपणास कंटाळून चालणार नाहीं. केळी फळण्याआधीं, केळीला केळी एकदांच येतात असें पाहून ते केळीचे झाड त्याच वेळीं कापून टाकलें तर तशा चांगल्या केळी कोठून मिळतील ? आपली माता कुब्ज असली तरी तिच्या वात्सल्यानें बालक स्वतः जगतें, तें तिचें वात्सल्यस्नेह वांकडे नसते. तिच्याहून इतर स्त्रिया रंभेहूनहि सुंदर असल्या तरी त्यांचा बालकास काय उपयोग ? त्यास त्याची माताच सर्व श्रेष्ठ असते. तुपांत पाण्यापेक्षां पुष्कळ चांगलें गुण आहेत खरें; पण त्याचा माशाला काय उपयोग ? आवविया जगास जें विष ते त्या कीटकांना मात्र अमृततुल्य जीवनच असते. ज्याला जें विहित कर्म असेल व ज्यानें जीवाच्या मागचें जन्ममरणादि संसाराचे धरणें सदाचेच संपतें, तें विहित कर्माचरण, ती क्रिया, कठोर असली तरी तीच केली पाहिजे. स्वभाव प्राप्त विहित कर्म सोडून दुसऱ्याचा धर्म चांगला वाटला तरी त्याचे आचरण करणें म्हणजे पायाचे चालणें, पायाऐवजीं डोक्यानें करावें तसें होईल. कोणत्याहि कर्मांत कांहींना

कांहीं परिश्रम, काठीण्य हे असतेच. म्हणून सर्वच्या सर्व कर्में टाकून देणें योग्य होणार नाहीं. निश्चित फलदायी कर्में कठीण असलीं तरी तीं केलीच पाहिजेत. सरळ किंवा आडवाटेनें चालले तरी पाय शिणवावेच लागतात, मग उजू वाटेनें का न जावे ? दगड किंवा शिदोरी या दोन्हींच्या ओझ्याचा भार वाहण्यास सारखाच तर मग विसाव्याच्या जागीं क्षुधानिवृत्तिद्वारां सुखकर अशा शिदोरीचा भार का वाहूं नये ? कण आणि भुस्सा कांडणें, दही व पाणी घुसळणें, तिळाचा किंवा वाळुचा घाणा गाळणें यांत पडणारे परिश्रम जर सारखेंच आहेत, तर मग जे परिश्रम परिणामीं सुखकर, हितकर होतील तेच करणे उचित ठरेल. त्याप्रमाणें स्वभावतः प्राप्त स्वधर्म,परमपुरुषार्थराज जो मोक्ष त्याची प्राप्ति करून देऊन शेवटीं आपले श्रम परिहार करील, म्हणून स्वधर्मांचेंच अनुष्ठान करावें. या स्वधर्माच्या महापूजेनें ईश्वर संतोषित होतो. असा महापूजेने संतुष्ट झालेला ईश्वर भोग्यविषयाविषयीं "**वैराग्य सिद्धी**" हा प्रसाद देतो. त्यामुळें तो देहादिक संसारांत तादात्म्यभ्रांतीनें बद्ध राहणार नाहीं. संसारांतील सर्व विषय अनुकूल प्राप्त असले तरी "**तैसे स्नेह खुळे । सर्वत्र होय**" पुत्र वित्त, कलत्र, यांचेविषयीं ममत्वभ्रांतीहि रहात नाहीं. त्याची बुद्धि अंतर्मुखतेस प्राप्त होते. विषयाची स्पृहा आपोआप नाहींशी होते. त्याचा अन्यथा बोध पूर्णतया मावळून जाऊन आत्म्याचे अकर्ता, अभोक्ता या रूपानें यथार्थ ज्ञान होतें. अशी कर्माची साम्यदशा होते तेव्हांच "**श्रीगुरु आपण होऊनच**" भेट देतात. मग श्रीगुरुकृपेनें अबोधमात्र नष्ट होऊन त्या अबोधाच्या–अज्ञानाच्या पोटात कर्म–कर्ता–कार्य अशी जी त्रिपुटी होती. तीहि नाहींशी होते; इतकेंच नव्हे तर अज्ञानाच्या समूळ नाशाबरोबर द्रष्टा दृश्य हा भेदहि नाहींसा होतो व निवर्त्य असें कांहींच नसल्यामुळें अज्ञान निवर्तक वृत्तिज्ञानहि न उरता, ज्ञातृ–ज्ञेय विहीन, नुसतें चिन्मात्र म्हणजेच केवळ " निष्क्रिय उरले चिन्मात्रचि " अर्थात् दृङ्मात्ररूपीं कर्म निपटून नाहींच म्हणून यासच "**नैष्कर्म्य स्थिति**" किंवा "**नैष्कर्म्य सिद्धि**" म्हणतात. ही नैष्कर्म्य सिद्धि सर्व सिद्धींत सहजच "**परमसिद्धि**" म्हणजे ज्येष्ठ, श्रेष्ठ आहे. तत्त्वतः ही अवाच्यस्थिति असल्याकारणें "नैष्कर्म्य" म्हणण्याचीहि तेथें सोय नाहीं. अशी ती अत्यंत निर्विशेष सत्सामान्य स्थिति आहे.

[ श्लो. ४६ मधील " सिद्धिम् " शब्दाचा अर्थ श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं " वैराग्य सिद्धि " असा केला आहे शिवाय मूळश्लोकांत श्रीगुरुकृपेचा उल्लेख नसतांना " अबोधु मात्र असे । तो तव तया कृपा नासे । " श्रीगुरु कृपालब्धिकाळी जो कोणी भाग्यनिधि त्यास ही आत्मसिद्धि लाभते, असा श्रीगुरुकृपेचा उल्लेख केला आहे, हे त्यांच्या श्रीगुरुभक्तीचें व त्यांच्या संप्रदायपूर्वक अध्ययनचे फलीभूत होते हे या स्वानुभव गम्यसिद्धांताचें वैशिष्ट्य आहे. यांत चिंतनीय विषय एवढाच कीं, सर्वात्मक ईश्वराची निष्कामकर्म कुसुमांनीं पूजा केल्यावर, त्या पूजेनें संतुष्ट झालेला ईश्वर निष्काम कर्म योगी भक्तास "वैराग्यसिद्धि" देतो. त्यास त्या भक्ताविषयीं करुणा निर्माण होते म्हणून तो परमेश्वर स्वतःच त्याचे गुरुत्व स्वीकारून त्यास ज्ञानोपदेश देतो, पण तसें साक्षात् स्वेच्छामय विग्रह धारण करून ज्ञान देण्यांत आलें नाहीं तर तोच परमेश्वर श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ श्रीगुरूंच्या रूपानें भेटून ज्ञानोपदेश करतो. त्यामुळें " निष्काम कर्मयोगी "हि या " नैष्कर्म्य सिद्धीस " कर्मसाम्यदशा, वैराग्यसिद्धि मिळून श्रीगुरुकृपेनें, ज्ञानोपदेशानें अज्ञान व तत्सापेक्षज्ञान विरहित स्वरूपभूत दृग्रूपतेस प्राप्त होतो. याचाच आतांपर्यंत क्रम सांगितला आहे, असें चिन्तन केल्यास सकृद्दर्शनी वाटणारा विरोध परिहार होतो. याच अभिप्रायानें श्रीज्ञानेशांनीं केलेले हें भाष्य मुमुक्षूस आश्वासक, आणि बोधक आहे ].

ज्या " परमसिद्धि "च्या पलीकडे कांहींहि मिळवावयाचें उरत नाहीं ती स्थिति एखाद्या भाग्यनिधि पुरुषासच अविलंबेंकरून प्राप्त होते. ज्याचा पूर्णाधिकारसिद्ध आहे. त्यास श्रोत्रिय–ब्रह्मनिष्ठ श्रीगुरुंनी उच्चारण केलेल्या "**तत्त्वमस्यादि**" महावाक्यरूप वचनाची व साधन चतुष्टय संपन्न अधिकाऱ्याच्या कानाची भेट होऊन "**गुरुवाक्य श्रवणाचि सवे**" अगदीं त्याच क्षणीं, कालांतर व्यवधानरहिततेनें, द्वैत निवृत्तिपूर्वक वृत्ति आत्मस्वरूपी विसावते व "**अहम् ब्रह्मास्मि**" अशा अनुभवावर जो कोणी एक आरूढ होतो त्यास " परम नैष्कर्म्य सिद्धि " प्राप्त होते; पण " ऐसे जरीं हे कांहीं । नव्हे जया " अर्थात् ज्याचा पूर्वाधिकार सिद्ध नसेल, ज्यास संशय–विपर्यासात्मक ज्ञानप्रातिबंधक दोष असतील अशांस ही " परम नैष्कर्म्य सिद्धि " शीघ्र प्राप्त होत नाहीं. त्यांच्या करितां " अधिकार सिद्धीसाठी " क्रमाक्रमानें साधनामार्ग आक्रमिला असतां ते प्राप्त करून घेतां येतें " पहिल्यान्दां निषिद्ध काम्य कर्मांचा त्याग करून निष्कामबुद्धीनें स्वधर्मानुष्ठान करतो. त्यामुळें ईश्वराच्या प्रसन्नतेनें अढळ वैराग्यपद प्राप्त करून घेतो. अशी आत्मसाक्षात्काराची सर्वच्या सर्व सामग्री मिळवितो. त्याच साधकास श्रीसद्गुरुहि

भेटले, त्यांची कृपाहि झाली; पण कांहींना औषध घेतल्याबरोबर रोगनिवृत्तीचा अनुभव येत नाहीं. जें परब्रह्म एकमेवाद्वितीय आहे, सर्वोत्तम आहे; ज्ञातृ-ज्ञेय विरहित, दृग्रूप आहे. जेथें ऐक्याचें दोनपणाच्या सापेक्ष असले एकपणहि संपते; विशेष असें कांहींच न उरतां 'जे कांहीं सत्-सामान्य उरते' ते 'ब्रह्मचि होऊनी असणे' ते त्या साधकानें, क्रमानेंच आत्मत्वानें मिळविलें पाहिजे [ ९२२ ते १०१० ].

[ यापुढें श्री ज्ञानेश्वर महाराज 'क्रमयोगा' चे व "ध्यान योगाचें" स्पष्ट व मार्मिक विवेचन करतात. त्यांतहि ओवी १०२६ ते १०४७ पर्यन्त कुंडलिनीयोगाचे, राजयोगाचे विवेचन मूळ श्लोकांत त्याचा उल्लेख नसतांना सहाव्या अध्यायाप्रमाणेंच पण थोडक्यांत वर्णन करतात. कारण, श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या 'नाथपंथा'चे आगळे वैशिष्ट्य म्हणून '**कुंडलीनीयोगा**'चे वर्णन केलें आहे. शिवाय त्यांना श्रीगुरु कृपेनें लाभलेला, त्याप्रमाणें त्यांनीं अनुभविलेला, चित्तवृत्तिनिरोधास उपयुक्त जाणून, आवडीचा एक विषय म्हणून त्याचें वर्णन केले आहे, असो].

साधकाचा जर पूर्वाधिकार सिद्ध नसेल तर त्याची बुद्धिवृत्ति ब्रह्मवस्तु स्वरूप होत नाहीं. म्हणून तो श्रीगुरूंनीं सांगितलेल्या विवेकाचा वारंवार अभ्यास करतो व विवेकतीर्थ तटावर येऊन बुद्धीवरील मळ धुवून टाकतो. देहनिर्वाहापुरतेच हातापायांचीं हालचाल करतो त्याची बुद्धि आत्मचिंतनरत होते. इंद्रियनिग्रहपूर्वक विषयवासना विमुक्त होऊन इंद्रियें व मन योगधारणेकडे लावतो. तेव्हां प्रारब्धवशात् होणाऱ्या इष्टानिष्ट विषयप्राप्तीने तो हर्ष-खेदास प्राप्त होत नाहीं. गजबजरहित वनांत एकटाच जाऊन श्रीगुरु वाक्य विचारांत किती वेळ गेला हेहि जाणत नाहीं. "मी ब्रह्म आहें" अशा अपरोक्षानुभूतीवर आरूढ होईपर्यंत ध्यान करीत असतो. त्यानें आरंभापासूनच वैराग्यासारखा सखा जोडून ठेवलेला असतो, कीं जो ब्रह्मप्राप्तिपर्यंतच्या सर्व भूमिकेवर त्याच्याबरोबर चालत असतो. तसेंच योगाभ्यासाचेहि साह्य घेतो; असा तो "राजयोग तुरंगीं' आरूढ होऊन मोक्षप्राप्तीकरितां निघतो. त्यावेळीं त्यास प्रतिबंध करण्यासाठीं आलेल्या शत्रूंचा तो नाश करतो. त्या प्रबळ शत्रूंपैकीं देहाहंकार हा पहिला शत्रू होय, कीं जो जीव गेला तरी सोडीत नाहीं तर पुन्हा जन्मास आणतो व जन्मास आणूनहि जगूं देत नाहीं, असा देहाच्या खोड्यांत घालून जन्ममरण चक्रांतच कुचंबत ठेवतो. हा साधक त्या देहाहंकाराचा व देहाचा विचारानें निरास करून देहाहंकार शत्रूस जिंकतो. दुसरा शत्रु म्हणजे 'बळ' हा होय. जो विषयवासनांस मदत करतो. त्याचा ध्यान खड्गानें नाश करतो. तिसरा शत्रू म्हणजे 'दर्प' हा होय. जो प्रिय विषयप्राप्तीनें होणाऱ्या सुखानें उन्मत्त होतो. चवथा शत्रू म्हणजे 'काम' होय. ज्याचें नांव ऐकतांच तपस्व्यांना थरकांप होतो. कारण, त्या कामानें मोठ-मोठ्यांना आपल्या साधनेपासून भ्रष्ट केले आहे. त्या कामाच्या अपूर्णतेंतच 'क्रोध' शत्रू निर्माण होतो. 'परिग्रह' संज्ञक-शेवटचा शत्रू हा भोग देऊन बलवत्तर होतो. यानें निःसंगासहि शिष्य, शास्त्र विलासानें, मठादि मुद्रेच्या निमित्तानें, पाशांतच घातले आहे. या साही वैऱ्यांना म्हणजे परमार्थविरोधी वृत्तींना जिंकल्यावर अमानित्वादि ज्ञानगुणांचे समुदाय म्हणजे जणुं मोक्ष देशींचें राजेच आहेत. ते सम्यक् ज्ञानाचें राज्य त्या साधकास अर्पण करून तेथें स्वतः त्याचा परिवार होऊन राहातात. विवेकरूपी चोपदार त्याच्यापुढें बोधाच्या कांठीनें दृश्यांची मांदी बाजूस सारतो. या साधनेमुळें "**योगभूमिका**" जणुं त्याची आरती करीतच येतात. ऋद्धिसिद्धींचें अनेक समुदाय त्यास सामोरे येतात. ब्रह्मैक्याचें स्वराज्य जवळ येत असतांना पाहून योगतुरंगाची तो दौड थांबवित असतो म्हणजे अभ्यास मंदावतो. वैराग्याचे बळकट चिलखतहि ढिले करतो. ध्यान खड्गाहि खाली करतो. आतां आत्मसाक्षात्कार लवकरच प्राप्त होईल, असें पाहून तो साधक उपर्युक्त सर्व साधनांचे हत्यार हळूंच खालीं ठेवतो व "मी ब्रह्म आहें" या अद्वैत वृत्तीवर आरूढ होतो. ती अहंब्रह्मास्मित्याकारक वृत्ति मावळून ब्रह्म प्राप्ति होते असा जो साधक त्याच्या अंगीं ज्ञानाची परिपक्वरूप शांति आपण होऊन येते. तेव्हां "ब्रह्म होआवया जोगा होय" पुनवेहुन चतुर्दशीचे दिवशीं चंद्रकलेच्या ठिकाणीं जेवढे उणेपण असते. तेवढेच उणेपण 'ब्रह्म' आणि 'ब्रह्म होणारा' यांत असते. "**पैं तेचि होणेनवीण प्रतीति आले जे ब्रह्मपण**" म्हणजे ते ब्रह्म आपण होण्याविना मूळचेच आहोत अशी त्यास अनुभूति लाभते. हीच प्राप्ताची प्राप्ति होय, सारांश, ब्रह्म होण्याच्या योग्यतेस पावलेला हा ध्यानयोगी आत्मबोध-प्रसन्नतेच्या पदावर बसतो [ १०११ ते १०९० ].

द्वैत निरासपूर्वक माझ्या एकाविना त्याला त्याच्याहिसकट दुसरें असें कांहींच नसते, असा त्यास द्वैत निरपेक्ष अद्वयब्रह्मरूपानें अवस्थानरूप मोक्ष प्राप्त होतो. हीच माझी खरी 'पराभक्ति' होय. यासच चौथी भक्ति म्हणतात. ब्रह्मावस्थानात्मक सहजस्थितिरूप मोक्षांत तत्त्वतः पहिली, दुसरी, तिसरी, चौथी, शेवटली अशी संख्या संभवत नाहीं.

कारण, ब्रह्म स्वगत–सजातीय–विजातीय–भेदरहित एकरूप आहे; आर्त, जिज्ञासु व अर्थार्थि या तीन भक्तींमुळें या पराभक्तीसच चौथी भक्ति म्हटले आहे. निद्रेमुळें स्वप्न पडते व जागे झाले कीं ते नाहींसे होते, तसे माझ्या ब्रह्मस्वरूपाच्या सहज प्रकाशावर विश्वाचा भास तात्पुरता अज्ञानकालीं होतो. व ब्रह्माविना पारमार्थिक सत्तावान् असें दुसरें नाहींच; अशा ज्ञान लक्षणात्मक भक्ति लाभानें तो विश्वाभास नाहींसा होतो; नव्हे नव्हे अशा अद्वयबोधकालीं जगाच्या त्रैकालिकात्यंताभावाचा निश्चय होतो. असा जो माझा " **सहजें प्रकाश** " आहे, त्यासच ' ज्ञानलक्षणात्मक पराभक्ति ', असें म्हणतात. या ज्ञानस्वरूप भक्तीनें माझ्याशीं एकरूप झालेला भक्त मीच होतो. भिन्न रहात नाहीं. या भक्तीसच ज्ञानी " **स्वसंवित्ति** " म्हणतात. शैव ' **शक्ति** ' म्हणतात. आम्ही आपली ' **परमभक्ति** ' म्हणतो. अलंकार जसा सोन्यास किंवा चंदनाचा सुवास चंदनास किंवा चांद्रिका जशी चंद्रास सहज, आपोआप, अकृत्रिम एकरूपतेनें ' भजतात '. त्याप्रमाणें अद्वयब्रह्म स्थितींत भज्य–भजक मात्रापुरतेहि द्वैत नाहीं, तेथें क्रियाहि मुळींच सहन होत नाहीं; तरीपण अद्वैतांत न करतां होणारी ज्ञानलक्षणात्मक सहजभक्ति आहे. ती अनुभवानेंच पटण्याजोगी आहे. ही गोष्ट शब्दानें सांगून समजणारी अशी नाहीं. दृश्य–द्रष्टा–दर्शन–या त्रिपुटीचा निरास करून दृश्यसापेक्ष द्रष्टेपणहि उरत नाहीं; तर दृश्य–द्रष्टयांत समव्याप्त असणारें अधिष्ठान दृङ्मात्र चैतन्यच उर्वरित राहते. अशी ब्रह्मस्थिति लाभलेला, माझ्याशीं एकरूप झालेला भक्त देहेंद्रियोपाधिद्वारां–कर्में करीतच असतो; पण कर्ता–कर्म असला भेद राहिलेला नसल्यामुळें त्याचे कर्म–' न करणेंचि होय–' अकर्मच होते त्याच्या साऱ्या क्रिया मीच झाल्यामुळें विहित, उचित कर्में करूनहि स्वरूपदृष्टया ते कांहींच न करण्यासारखे होते, अशी मत्स्वरूपतेनें, समर्पण भावानें, प्राप्त कर्मांचा अव्हेर न करतां पूर्व संस्कारानुरूप उचित कर्में करणें हेच माझें खरें ' **खूणेचें पूजन** ' होय. व हीच माझी ' **महापूजा** ' आहे. त्यास जन्म–मरण उरतच नाहींत. क्रमयोगरूपी प्रासादाचा मोक्षरूपी कळस आहे. भक्तांचा क्रमयोगरूपीं ओघ भक्ति गंगेस मिळाला म्हणजे मी जो अज, अमर, स्वगतादि भेदरहित स्वानंदरूपी सागर त्या मला वेगानें येऊन मिळतो. एवढी या क्रमयोगाची थोर महिमा असल्यामुळें, तो आम्ही तुला वारंवार सांगतों [ १०५१ ते १२२३ ].

[ यानंतर ' सर्व कर्माण्यपि सदा कुर्वाणोमद्व्यपाश्रयः ' या श्लोकांत पुनः ' कर्मयोग ' रूपी साधन देव कां सांगतात हे सांगून या श्लोकास ' अवतरण ' दिले आहे ते स्वानुभूतिदर्शक व यथार्थ अर्थवाहक पद योजनेनें युक्त आहे. अद्वैत बोध म्हणजे आपल्या नित्य ' स्वरूपाचा ' च आविष्कार असल्यामुळें तो भेद वा कालांतर व्यवधानविहीन असतो. तो बोध श्रीगुरूंनीं उपदेशिलेल्या शब्द प्रमाणरूप महावाक्यानें झालेला असल्यामुळें त्या बोधानें अखंडैकरस चैतन्यकार वृत्ति होते. त्या वृत्तीनें आवरण शक्तियुक्त अज्ञानाची निवृत्ति होते. यासच आवरणसहित चैतन्य " आवरण निवृत्यर्थ " अद्वैत बोधरूप वृत्तीचा विषय आहे म्हणजे तेथें ' वृत्तिव्याप्ति ' संभवते असें म्हणतात. आत्मा–ब्रह्मचैतन्य स्वयंप्रकाश असल्यामुळें वृत्तिस्थ ' आभासा 'स मात्र तो विषय होत नाहीं. म्हणजेच तेथें ' फलव्याप्ति ' संभवत नाहीं, असें म्हणतात. त्या आवरण निवृत्तिबरोबर ' वृत्तिहि ' उर्वरित न राहता निखळ, द्वैतनिरपेक्ष, सोलींव सुखस्वरूप अद्वय स्वरूपभूत, आश्रय विषयरहित, ज्ञानमात्र ब्रह्मच उर्वरित राहते. हीच ब्रह्मस्थिति लाभणें अंन्तिम, ' परम प्रयोजन ' होय. त्याचे आपल्या लडिवाळ, पण अपूर्वसुंदर भाषाशैलींत, समर्पक दृष्टान्तानें श्रीज्ञानेश्वर महाराज वर्णन करतात ].

वारा हा सूर्याच्या आड आलेलें केवळ ढग नाहींसें करतो त्यावांचून तो सूर्यास नवीन उत्पन्न करीत नाहीं हातानें पाण्यावर आलेलें गोंडाळ तेवढें दूर केलें जाते, नवीन पाणी उत्पन्न केलें जात नाहीं. त्याप्रमाणें आत्मदर्शनास अडथळा, प्रतिबंध निर्माण करणारा जो अविद्यारूपी मळ तोच शास्त्रजन्य म्हणजे तत्त्वमस्यादि महावाक्यरूप शब्द प्रमाणजन्य ' **अहम् ब्रह्मास्मि** ' वृत्तीनें निवृत्त होतो एवढेंच. या शिवाय मी जो स्वयंप्रकाश स्वतःसिद्ध तो आपल्याच स्वरूपभूत प्रकाशानें स्वमहिमेंत आहे. तेथें वृत्तिगत चिदाभासाचा कांहींएक उपयोग नाहीं. श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ श्रीगुरूंच्या कळकळीनें केलेल्या तत्त्वमस्यादि उपदेशरूप शब्द–प्रमाणानें दृढ–अपरोक्षरूप ब्रह्मात्मैक्य ज्ञान होतें व त्या ज्ञानानें केवळ आवरण निवृत्ति होतें. सर्व प्रमाणोपजीव्यभूत ' स्वयंप्रकाश ' चैतन्यास, चैतन्याच्या प्रकाशाचें साह्य घेऊन प्रकाशित होणारीं ' प्रमाणें ' कसें प्रकाशन करूं शकतील ? किंबहुना पारमार्थिक चैतन्यदृष्टया–सत् सामान्य निर्विशेष परमात्मा स्वयंप्रकाश असल्यामुळें तो प्रमाण–प्रमेयभावरहित आहे. म्हणूनच ' दृग्रूप ' परमात्मा अज्ञानाचाहि विषय होणें शक्य नाहीं; तसा तत्सापेक्ष ज्ञानाचाहि विषय होऊं शकत नाहीं. अज्ञानाचें आवरण

स्वीकारलें तरीहि आवरण निवृत्त्यर्थच ' वृत्तिव्याप्ति ' संभवते. याच अर्थानें आचार्यांचि शास्त्रें-ही अविद्या विनाशासच पात्र आहेत, ' वांचोनि ' आत्मस्वरूपाचा बोध करून देण्याचें बाबतींत स्वतंत्र नाहींत. अर्जुना ! प्रथम श्रवणाबरोबर हा ब्रह्मात्मैक्यबोध अंतःकरणांत क्वचितच होतो म्हणजे-पूर्णाधिकार सिद्ध असून ज्यास संशय-विपर्याचा प्रतिबंध नाहीं असें अधिकारी फार थोडे ! ! असा अभिप्राय सकरुण-श्रीहरीनें मनांत धरून तेच ' प्रमेय ' शिष्याच्या अंतःकरणांत अढळ होण्यासाठीं थोडक्यांत पुनः एकवेळ सांगत आहेत. शिवाय गीता सांगण्याची संपत असल्यामुळें " **साद्यन्तीं एकर्थस्व** "हि दाखवित आहे. गीतेच्या मधभागीं अधिकार प्रसंगीं, निरनिराळ्या अधिकार परत्वें अनेक साधनांचें प्रतिपादन केलें; तरीपण उपक्रमोपसंहारादि षड्‌लिंगपूर्वक विचार केला तर मुख्य महासिद्धांताच्या अभिप्रायांत अनेक उपसिद्धान्त-सिद्धांत कक्षा आहेत, असें सिद्ध करून ' उपक्रमोपसंहाराची एकवाक्यता करून ग्रंथसमाप्ति करीत आहेत, या गीतेचा ज्ञान प्रतिपादनद्वारां " **अविद्याजालाचा निरास करणे** " हा ग्रंथाचा विषय आहे; मोक्षोपादान-मोक्षलाभ हें त्याचें फळ-' **प्रयोजन** ' आहे. अविद्यानाश व मोक्षप्राप्ति या दोहोंस एकमेव साधन ' **केवळ ज्ञान** ' म्हणजे शास्त्रीय शुद्ध पवित्र अतःकरणांत अभिव्यक्त झालेलें ' **ज्ञान** ' अन्य साधन-निरपेक्षतेनें मोक्षास पर्याप्त आहे.' हाच ' **प्रतिपाद्य विषय** ' नानापरीनें ग्रंथांत विस्तारानें सांगितला आहे. आतां साध्य हातीं आल्यावरहि-मंद प्रज्ञांसाठीं देव थोडक्यांत पुनः साधनस्वरूप सांगतात [ १२२४ ते १२४५ ].

स्वकर्मरूप पवित्र कुसुमांची महापूजा करून ते माझ्या प्रसादानें ज्ञाननिष्ठा प्राप्त करून घेतात. ज्ञाननिष्ठेनंतर माझ्या स्वरूपीं समरस होऊन पूर्व संस्कारवशात कर्तव्यबुद्धि विरहित होणाऱ्या कर्मांनीं माझी भक्ति ' उल्लसित ' होते व त्या भक्तीनें तो भक्त सुखी होतो. तो माझ्याशीं आत्मत्वानें ज्ञान संपादन करून समरस झाल्यामुळें त्याच्या अंगाला शुभाशुभ कर्माचा वा पापपुण्याचा स्पर्शहि होत नाहीं; त्यांस बंधन ती कर्में तर मुळींच करूं शकत नाहींत. कारण, तो भक्त माझें अविनाश आनंदाद्वय पदावर आरूढ झालेला असतो. कर्माची जन्मभूमी जी प्रकृति तीहि त्याच्याहून वेगळी उरत नाहीं. अज्ञान व तत्कार्य सर्व कर्मांचा त्याग होऊन ' मी आत्मा उरें ' अर्जुना ! तूं या स्वरूपीं अनन्य होऊन रहा. चैत्यत्यागपूर्वक चित्त माझ्या स्वरूपीं ठेव. म्हणजे माझ्या प्रसादानें परिच्छिन्नतेची भ्रान्ति वा जीवदशा बाधित होऊन जाईल. मग संसाररूपी बागुलबोवाकडून पीडा कशी होईल ? तर होणार नाहीं, जन्ममरणरूपीं अनर्थांतून सदाचाच तरशील [ १२४६ ते १२७३ ].

पण माझ्या या हितकर उपदेशाकडे सोयिस्कररीत्या दुर्लक्ष करून जर कदाचित देहतादात्म्यभ्रांतीनें स्वदेहास अर्जुन व इतर देहास स्वजन समजून व संग्रमास मलीन पापाचार समजून अहंभाव धारण करशील तर तत्त्वतः तूं अव्यय व नित्यमुक्त-असूनहि देहसंबंधाचें जन्ममरणात्मक घाव-तुझ्या अंगावर निष्कारण आदळतील, मग त्या देह संबंधांत, तादात्म्यभ्रांतींत प्रतिपदीं आत्मघात आहे त्या आत्मघाताचे पाप भोगीत असतां " उसंत कहींचि नाहीं " बरें ! ' मी झुंजणार नाहीं " असा तुझा निश्चयहि टिकणार नाहीं. कारण, तूं मनानें ' न झुंजे ' असा निश्चय करीत आहेस; पण तुझा " क्षात्र स्वभाव " तो या निश्चयाचें उलट करवीलच म्हणजे तुझ्याकडून युद्ध करवीलच. अरे ! या विश्वांत मनुष्यास नको असलेल्या कितीतरी गोष्टी बलवत्तर प्रारब्धामुळें भोगणें अपरिहार्य, अटळ असतात. रोग्यास रोग आवडतो काय ? दरिद्र्याला दारिद्र्य आवडते काय ? पण काय करावें ! बळीया अदृष्टानें या अनिष्ट, गोष्टीहि भोगविल्या जातात. त्या अदृष्टाकडून तूं युद्धाकरितां उठवला जाशीलच; फक्त तूं इतकेंच कर कीं, ते अदृष्ट ज्या ईश्वराच्या आधीन आहे व तो ईश्वरहि तुझ्या हृदयांत आहेच. त्याला तूं शरण जा ! म्हणजे अदृष्टाच्या कचाट्यांतून निरंतरचा सुटशील. ईश्वर सर्वांच्या अंतरांत वास्तव्य करून आहे तसा तो तुझ्याहि हृदयांत वास्तव्य करून आहे ! तो ईश्वर स्वमायेचें आडवस्त्र लावून आंतून एकटाच सूत्र खेळवीत आहे; तो स्थूल दृष्टीला दिसत नाहीं; देहसंबंधी अर्जुनपण न घेतां ' मी-मी ' या रूपानें जे अहर्निश स्फुरण होत असते, तेंच त्याचें तात्त्विक स्वरूप होय. तो ईश्वर सर्व विश्वाचा सत्ताधारी गोसावी आहे, तो या प्रकृतीवर आपली हुकमत चालवितो व ती प्रकृति प्राण्यांकडून इंद्रियद्वारां ज्यांची त्यांचीं कामें करून घेतें कर्म करणें वा न करणें हें प्रकृतीच्याच अधीन असल्यामुळें तूं कर्माचें कर्तृत्व प्रकृतीच्या माथ्यावर सोपवून ती प्रकृति ज्या हृदयस्थ ईश्वराच्या अधीन आहे, त्या ईश्वराला अहं, वाचा, चित्त व शरीर समर्पण करून शरण जा; म्हणजे त्याच्या प्रसादानें सर्वोपशांतिरूप प्रमदेचा कान्त होऊन स्वानंद स्वरूपींच रममाण होशील. त्या निजात्मपदींचा तूं राजा होशील, असें श्रीकृष्ण म्हणाले [ १२७४ ते १३२२ ].

असें हे "गीता" या नांवानें विख्यात असलेल्या सर्व वाङ्मयाचें सार, व ज्यामुळें आत्मारूपी रत्न हस्तगत होईल असें अत्यंत गुह्य "ज्ञान" माझें "गौप्यधन" केवळ तुझ्या प्रेमामुळें तुला दिले आहे. याचाच तूं चांगला विचार कर व विचार करून तुला जे योग्य वाटेल,आवडेल तसें कर.या देवाच्या बोलण्यावर अर्जुन उगाच राहिला त्याच्या या "उगाच" राहण्यावरून देवास असें वाटलें कीं, आपण जे ज्ञान याला सांगितलें तेंच पुन: थोडक्यांत ऐकावे अशी त्यास इच्छा आहे. असें जाणून देव त्यास पुन: ज्ञान संक्षेपानें सांगतात. द्वैताची येरझार बाजूस सारून-त्याचा निरास करून केवळ उर्वरित ऐक्याच्या परीवरी हे रहस्य अनुभवाचें आहे,निरुपचार प्रेमास विषय असते, ते दुसरे कोणीहि नाहीं तर 'आत्मा' आहे असेंच जाणावे. माझ्यांत व तुझ्यांत 'मी तूं पणा' चा भेद आहे काय? तूं माझा जीव कीं प्राण आहेस, म्हणून तुला मी हीं जिव्हाळ्याची गोष्ट सांगत आहे. तो माझा गूढ उपदेश ऐक. तुझ्या देहेंद्रियादि उपाधीकडून जे जे व्यापार होतील त्यांची प्रवृत्ति माझ्याकडेच ठेव. मन मलाच समर्पण कर. आत्मज्ञान संपन्न चोखडी संत मंडळी ही माझीच रूपें आहेत. त्यांचेवर श्रद्धा ठेव. किंबहुना तूं आपल्या ठिकाणीं सेवकपणा ठेवून इतर सर्व जग मत्स्वरूप जाणून, द्वेषरहित, निर्मत्सर होऊन माझी सेवा कर. देहेंद्रियादि वा अविद्यादि उपाधीमुळें तूं एक व आम्ही एक असें जे द्वैत भासत आहे, ते अविद्या व देह या उपाधीचा विचारानें निरास झाला की, तूं मत्स्वरूपच होशील. या माझ्या बोलण्यांत अन्यथा असेल. तर तुझी शपथ. तुझी शपथ घेणें म्हणजे आपली स्वत:चीच शपथ वाहण्यासारखे आहे, 'मी सत्यसंकल्प आहे; शपथ घेणें उचित नाहीं; तरीपण मी तुझ्या प्रेमामुळें माझी देवपणाची सारीं बिरुदें सोडून दिलीं आहेत. मला सर्वत्र भजलें असतां तूं मत्स्वरूप होशील. सर्व कर्में मला समर्पिलीं असतां माझी प्रसन्नता लाभेल. त्या प्रसादानें ज्ञान होऊन साध्य-साधन भावविरहित ब्रह्मस्थिति लाभेल. त्या प्रसन्नतेमुळेंच मी तुला भाळलों आहे. म्हणूनच तुला या युद्ध प्रसंगींहि ज्यामुळें सप्रपंच अज्ञान निवृत्त होऊन एक मीच गोचर होईन असा ज्ञानोपदेश करीत आहे. धर्माधर्माचें मूळ कारण अज्ञान टाकून दे. अरे! कार्यरूप मिथ्या धर्माधर्मास दाखविणारें जें मूळ अज्ञान, त्या अज्ञानाचा त्याग करून सकळ धर्मजातांचा त्याग कर. ज्यामुळें पापपुण्यात्मक, रागद्वेषमूलक कर्में घडतात ते अज्ञानच नाहींसे झाल्यावर आपोआप मीच एकटा शिल्लक राहतो. मज एकावांचून भिन्नभिन्न असें दुसरें कांहींच नाहीं. म्हणून "सोऽहम्" म्हणजे तोच मी आहे, या अभेदबोधानें माझ्या परब्रह्म स्वरूपाशीं अनन्य होणें, आपल्या भेदाविना म्हणजे ईश्वरापेक्षां आपण वेगळें न राहतां ईश्वराचें द्वैतनिरपेक्ष एकत्व जाणणें याचेच नांव मला शरण येणें होय. याप्रकारें माझ्याहून भिन्न न राहतां विश्वेश्वर, सर्वव्यापक असा मीच होऊन, तो राहतो; तो मी भेटून, चित्स्वरूप आत्मा व चिद्भास्य अहंकारादि अनात्मा यांच्याविषयींची एकत्वनिश्चयात्मक'जीवग्रंथी'मात्र सुटत नाहीं. जीव दशेचाजीवपणाचां बाध होत नाहीं, एकत्वनिश्चयांचा बाधरूप 'ग्रंथीभेद'होत नाहीं, असल्या अमंगळ गोष्टी तूं कानांवर देखील येऊं देऊं नकोस हो! मत्स्वरूप व्यापकाभूति संपन्नतेनें '**सहजभक्ति**' होत असते. ती माझी '**सहजभक्ति**' एकमेव सर्वव्यापक ब्रह्माचें परिपक्वज्ञानानें हस्तगत होते. माझ्याशीं ऐक्य पावल्यावर मी जो सर्वरूप आहे. त्या माझ्याविना दुसरे कांहीं उरण्याला कारण आहे काय? तूं मत्स्वरूप झाल्यामुळें तुझ्या देहेंद्रियांकडून माझ्या इच्छेनुसार घडणारीं कर्में तुझी न राहतां तीं माझींच होतील. किंबहुना!! शुभाशुभ कर्मजन्य "तुझें पापपुण्य पाहीं। मीचि होईन" त्यामुळें त्यांतील बरा वाईटपणाहि माझाच होणार. माझ्याशीं "अनन्यशरण" ज्ञानस्वरूप भक्तीनें एकरूप होऊन स्वामीच्या मनोभावानुसार, स्वभावप्राप्त, पूर्वसंस्कारवशात घडणाऱ्या कर्मांच्या चांगल्या वाईटपणाची तुला काळजी करण्याचें मुळींहि कारण नाहीं. याकारणें तूं चित्तांत 'हे आधी न वाहे' म्हणजे चिंता-काळजी वाहूं नकोस. माझ्या सर्वव्यापक स्वरूपास आत्मत्वानें, एकत्वानें जाणून शरण ये म्हणजे प्रेमलक्षणात्मक ज्ञानपूर्वक भक्तिद्वारां ईश्वराशीं समरस होऊन, ज्ञानलक्षणात्मक, ज्ञानोत्तर-अकृत्रिम "**सहज भक्तिद्वारां**" जीवन्मुक्तीचें विलक्षण सुखाची अभिव्यक्ति होते; असा तात्पर्यार्थ आहे. "मी ब्रह्म आहें" अशा 'सोऽहम्' ज्ञानानें सर्वव्यापक परमेश्वराशीं एकरूप होतो, असा "**मामेकं शरणं व्रज**" या पदाचा महत्त्वपूर्ण, स्वानुभवास जुळणारा अर्थ श्रीज्ञानेशांनीं सांगितला आहे अद्वैत पर, ऐक्यपर्यवसायीबोध शिष्यास करून श्रीगुरुदेवानें आपल्या सत्शिष्यास अर्जुनाला अलिंगन दिलें व त्या निमित्तानें "द्वैत न मोडतां केले। आपणा ऐसें अर्जुना" त्यामुळें संपूर्ण विश्वांत कोंदून, ओतप्रोत, घनदाट परमात्माच भरला आहे. अशी व्यापकानुभूति अर्जुनास प्राप्त झाली. [१३२३ ते १४२९].

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, वेदाचे सूत्ररूपानें असलेलें मूळ जे गीताशास्त्र ते श्रीकृष्णानें प्रगट करून

दाखविले. कारण, वेदराशीं ज्याच्या निश्वासांत म्हणजे अनायासानें उत्पन्न झालें. तो सत्यप्रतिज्ञ श्रीकृष्ण पैजेनें, जाणून बुजून, जागृतींत, स्वमुखानें हे गीताशास्त्र बोलला. बीजांत सूक्ष्मरूपानें वृक्ष असतो त्याप्रमाणें ' कांडत्रयात्मक अखिल वेद सूत्ररूपानें गीतेंतच आहे, मी गीतेस 'वेदाचे मूळसूत्र' कां म्हणतो, त्याचे कारण सांगतांना श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ' कर्मकाण्ड ', उपासना काण्ड ' आणि ' ज्ञानकाण्ड ' ही तिन्ही काण्डें गीतेंत कोठें कोठें आली आहेत व प्रत्येक अध्यायांतील प्रतिपाद्य विषय कोणता, याचे सारांशरूपानें कथन केले आहे. पहिला अध्याय म्हणजे गीताशास्त्राची प्रस्तावना आहे. दुसऱ्या अध्यायांत हे गीता शास्त्र ज्ञानप्रधान असून मोक्षदानीं स्वतंत्र आहे, असें सांगून संपूर्ण गीता शास्त्रच सूत्ररूपानें सांगितलें आहे. तिसऱ्या अध्यायांत अज्ञानकृत बंधांतून जीवास मोक्ष प्राप्त्यर्थ साधनांचा आरंभ सांगितला. कारण, देहभिमानानें, बंधानें बद्ध झालेल्या जीवानें काम्य-निषिद्ध कर्म त्यागपूर्वक, अप्रमादानें निष्कामबुद्धीनें, विहित कर्में सद्भावानें करावींत, असा देवानें निर्णय केला. तेच या गीतेंतील " **कर्म काण्ड** " जाणावे. नित्य कर्माचरण केलें असतां तें अज्ञानकृत बंध मोचक कसे होईल ? अशी शंका आली तर बद्ध, निष्काम कर्मानें मल दोषरहित होऊन-' मुमुक्षुते 'स आला असतां. त्यास देवानें काया-वाचा मनानें जें जें विहित कर्म होईल ते ते ब्रह्मार्पणत्वें करून करावें, असें सांगितलें. कर्मयोगानें ईश्वराची भजन सेवा करावी म्हणजेच कर्मयुक्त भक्ति, कर्मांगावबद्ध उपासना कशी करावी, हे चवथ्या अध्यायाचें शेवटीं शेवटीं सांगण्यास आरंभ करून तों विश्वरूपाचा अकरावा अध्याय संपेपर्यंत ' **कर्में ईशु भजावा** ' हेंच सांगितलें. या एकूण आठ अध्यायामध्यें " देवता कांड " म्ह. ' उपासना काण्ड ' आहे, असें मी स्पष्ट सांगतों. त्या कर्मयुक्त भक्तीनें ईश्वर प्रसन्न झाला म्हणजे श्रीगुरुसंप्रदायप्राप्त जें जीव- शिवैक्यरूप, जगत्-ईश्वरैक्यरूप " कोंवळें " अदृढज्ञान प्राप्त-अभिव्यक्त होतें. तें पक्के-दृढरूपानें व्हावें म्हणून अद्वेष्टृत्वादि, अमानित्वादि जी ज्ञानीभक्तांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांचा साधन म्हणून अवलंब केल्यास तो ऐक्यबोधच साक्षात्कारात्मक अनुभूतींत पर्यवसित होतो. त्या, करितां बारावा, तेरावा अध्याय सांगितला. बाराव्या अध्यायापासून तों पंधराव्या अध्यायाच्या शेवटापर्यंतच्या " निरूपणास " " ज्ञानरूप फळांच्या परिपक्वतेची पूर्णता " हाच विषय आहे. बारा ते पंधरा, हे चार अध्याय मिळून " ज्ञानकाण्ड " होय. अशी गीता म्हणजे " कांडत्रय " निरूपणी । श्रुतिच हे कोडीसवाणी होय. त्याचे " मोक्ष " एक परम फल आहे. मोक्ष साधनीभूत ज्ञानाशीं प्रतिदिवशीं वैर करणारा आसुरी संपत्तिरूप अज्ञानवर्ग, सोळाव्या अध्यायांत सांगितला. स्वस्वरूपाच्या मुक्कामावर पोंचविणारा शास्त्ररूपी रक्षक घेऊन, तो अज्ञानवर्गरूपी शत्रू जिंकावा हा निरोप देवांनीं सतराव्या अध्यायांत सांगितला आणि शेवटच्या या उपसंहारात्मक अध्यायांत मागील कर्म, उपासना, ज्ञान याच विषयांचा सारांश सांगण्यांत आला आहे. वेद मूळचा संपन्न खरा; पण त्याचा अधिकार फक्त त्रैवर्णिकांसच असल्यामुळें " कृपणु ऐसा आनु नाहीं " संसार दुःखांत सांपडलेल्या स्त्री, शूद्रादिकांचा उद्धार करणारा कोणी नाहीं; हे जाणून वेदानें मागील उणे फेडण्यासाठीं, वाटेल त्याला आपण सेव्य व्हावें. म्हणून वेदच गीतारूपानें अवतीर्ण झाला. या निमित्तानें शुद्ध मोक्षसुखाचें देवांनीं अन्न छत्रच घातलें आहे. आतां विषयाची स्पष्टता झाल्यामुळें मोक्षाचे द्वार सदाचेच, सर्वांस मोकळें करून ठेवले आहे. अर्जुनाच्या निमित्तानें श्रीहरीनें ग्रंथ प्रगट करून जगाचें जन्म-मरणरूप अनर्थ परंपरेचे एवढे थोर ओझें निरंतरतेचे दूर केलें. " तो अर्जुन ज्या कुळांत उत्पन्न झाला ते कुळ परम पवित्र व धन्य आहे " असें श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात [ १४२६ ते १४७२ ].

अनंत जन्मापासून निष्काम पुण्य केले असेल तरच, चित्तशुद्धीद्वारां, हे गीताशास्त्र श्रवण करण्याला मिळतें. ते नुसते ऐकाव्यास मिळूनहि या शास्त्रार्थाचें ' संप्रदायाविना ' अनुष्ठान करशील तर त्याचा कांहींहि उपयोग होणार नाहीं. श्रीगुरु प्रसन्न होतील, शिष्याला विद्याहि लाभेल; पण " **ते फळे संप्रदाये उपासिलिया** " तो संप्रदाय म्हणजे श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ श्रीगुरूस अधिकार संपन्नतेनें, अधिकार सिद्ध करून शरण जाणें हा होय. त्यांपैकीं फलपर्यवसायी होण्यासाठीं लागणारा एक भाग, अटळ अंगभूत असा 'जो संप्रदाय' म्हणजे याचा ' अधिकारी ' कोण ते सांगतो, ऐक-जो तपस्वी आहे, जो हरिभक्त व गुरुभक्त आहे, श्रवणाची साच चाड बाळगणारा आहे, माझ्याविषयीं ज्यास आदर आहे. माझी किंवा माझ्या भक्तांची निंदा न करणारा आहे, अशा सद्गुणांनीं संपन्न असेल तोच या ग्रंथाचा अधिकारी होय. हे गुण अंगीं नसतील तर तो ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा असला तरी त्याला कौतुकानेंहि हे गीताशास्त्र सांगू नकोस. कारण, त्यास सांगून त्याचा काडीमात्र उपयोग होणार नाहीं. तळांत तपरूपी वळकट पाया असून त्यावर गुरुभक्तीचे पूर्ण मंदीर तयार झाले आहे व ज्या मंदीराचा श्रवणेच्छारूपीं दरवाजा सदा उघडा आहे व ज्या मंदीरावर

अनिंदा रत्नाचा कळस आहे, त्या शुद्ध भक्तालयांत गीता रत्नेश्वराची प्राणप्रतिष्ठा कर म्हणजे त्यासच गीताशास्त्र सांग. अशा पूर्वाधिकार संपन्न मनुष्यास ईश्वराची प्रसन्नता लाभावी. आपल्या ब्रह्मस्थितिप्रत तो पोचावा. याच एका उद्देशानें पराभक्तिसंपन्न, अर्थात् अनुभूतिसंपन्न होऊनहि गीताशास्त्र सांगेल तो परमोच्च, श्रेष्ठतम, परोपकार करणारा वक्ता मला जितका आवडतो, तितका मला दुसरा कोणीहि आवडत नाहीं, हे खास. [ कारण मानवानें 'हिततम' ब्रह्मरूपाचा आत्मत्वानें साक्षात्कार करून घ्यावा, हेंच ईश्वराचें मनोगत आहे. त्याच कार्यास हे ज्ञानीभक्त ब्रह्मज्ञानोपदेशद्वारां सहाय्य करतात. अनुभूति संपन्न पुरुषास जीवाच्या कर्तव्याकर्तव्य व्यवस्थेचें व अंतिम साध्याचें ज्ञान असून त्याच्या उद्धाराची कळकळ असते. तेच निर्दोष, पूर्णस्वरूप साध्याचा व निश्चित फलदायी साधनाचा अधिकारानुरूप उपदेश करूं शकतात. म्हणून हिततम ब्रह्मोपदेश करून जीवाच्या कल्याणांस उपकारक असें ईश्वरकार्यच करितात असें यांतील तात्पर्य आहे. ] जे या गीतेचें पदाचा अर्थ न करतां केवळ आवर्तन करतात. त्यासहि ज्ञानी भक्तास लाभणारी ब्रह्मस्थिति लाभते, जें गीता केवळ श्रवण करतील त्यास पापनिवृत्तिपूर्वक धर्मोन्नतीचा लाभ होतो. सारांश गीता श्रद्धापूर्वक, परमादरानें पठण करणाऱ्यास, श्रवण करणाऱ्यास व अर्थज्ञान संपन्नास, मी जो ब्रह्मानंद, त्याच रूपानें फलद्रूप होतो, असो [ १४७२ ते १५३९ ].

देवांनी [ १ ] तप [ २ ] गुरुभक्ति [ ३ ] सेवा तत्परता [ ४ ] अनिंदा [ ५ ] श्रवणेच्छु या लक्षणांनीं युक्त अधिकारी असावा व अनधिकारी कोण आहे असा गीताशास्त्राचा 'संप्रदाय विधी' व 'फल श्रुति' अर्जुनास सांगून झाल्यावर, असा एक प्रश्न विचारला कीं, मी सांगितलेला शास्त्रसिद्धांत तुझ्या मनांत ठसला किंवा नाहीं सांग बरें ! स्वस्वरूपाज्ञानजनित मोह आहे कीं नाहीं ? असो, मी अमुक कर्म करीन किंवा अमुक एक कर्म करणार नाहीं असा तुझा 'आग्रह', 'आग्रही वृत्ति' राहिली आहे कीं नाहीं ? या प्रश्नाची संगति संत श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात– पार्थ स्वानंदैकरस, पूर्णब्रह्मच झाला होता, 'मी ब्रह्म आहें' हेहि विसरून जगच ब्रह्मरूप दिसते, ते सुटून ब्रह्मपण रहित सहजस्थितीवर होता; परंतु त्याच्या हातून युद्धादिक पुढील कार्यार्थ साधण्यासाठीं श्रीकृष्णनाथांनीं देहस्मृतीची मर्यादा उल्लंघूं न देतां प्रश्न विचारण्याच्या निमित्तानें अर्जुनास देह स्मृतीवर आणले. उपर्युक्त प्रश्नाचें उत्तर अर्जुन देहस्मृतीवर येऊन, अष्टसात्त्विक भावांचा वेग सांवरून देत आहे [ १५४० ते १५५७ ].

देवा ! तो मोह आतां आपले कारण आत्मस्वरूपाचें 'अज्ञान' घेऊन सकुटुंब गेला म्हणजे मोहाची आत्यंतिक निवृत्ति झाली ! महाराज ! आतां माझें ठिकाणीं "मोह असें कीं, नाहीं" असें आपण विचारीत आहां काय ? मी तुझ्या स्वरूप प्राप्तीनें "कृतकृत्य जाहलों" [ अर्जुनानें दिलेलें उत्तर अतिशय चिंतनीय आहे. त्याच्या उत्तरांतील प्रत्येक पदाचा आशय सखोल, अर्थभरित, स्वानुभूतिदर्शक आहे. त्यांत "नष्टो मोहः" म्हणजे अज्ञानकृत मोहरूप विपर्यय निवृत्त झाला. 'शोकादिराहित्यात्मक–अवस्था' मला प्राप्त झाली. 'अशरीरं वावसन्तम् न प्रियाप्रिये स्पृशतः" अर्थात् देहतादात्म्य नाहींसें झालें म्हणजे प्रिय–अप्रिय, शोक मोहादि द्वंद्वें यत्किंचितहि स्पर्श करीत नाहींत. "तरति शोकमात्मवित्" आत्मवेत्ता शोकास तरतो 'तुझेपणे' म्हणजे मला तुझ्या यथार्थ स्वरूपाशीं ऐक्यतेची प्राप्ति झाल्यामुळें, "कृतकृत्य जाहलों" म्हणजे मला नित्यनिरतिशयानंदाची प्राप्ति, रम्य समाधानाचा लाभ झाला. तेथें "तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः" पूर्ण ब्रह्मैकत्वावस्थेची प्राप्ति झाल्यानंतर द्वैत दैन्यच पार मावळून जाते तेथें मोह तरी कसा प्राप्त होणार ! व शोक तरी कसा प्राप्त होणार ? असा अर्जुनानें 'कृतकृत्यतेचा' पूर्णत्वाचा औपनिषदिक सिद्धान्तानुमोदित अनुभवच ठामपणें, लडिवाळपणें, व्यक्तविला आहे. अज्ञानकृत विपर्ययरूप मोह कां गेला याचे कारण, अर्जुन "त्वत् प्रसादात् मयास्मृतिः लब्धा" यांत सांगत आहे ]

मी तुझ्या प्रसादानें लाभलेल्या 'आत्मबोधानें' त्या मोहाचे मूळ अज्ञान शिल्लकच राहूं दिलें नाहीं [ म्हणजे मला 'आत्मविज्ञान', आत्म्याचे अपरोक्षज्ञान झाले म्हणजे 'ब्रह्मवित् ब्रह्मैव भवति' या श्रुतिसिद्धान्तानुसार मी ब्रह्म आहे या ज्ञानाची परिणति मात्र "आत्मैवेदं सर्वम् यत्र सर्वात्मैवाभूत, इदं सर्वं यदयमात्मा, ब्रह्मैवेदं सर्वम्" म्हणजे ज्या एकत्वावस्थेंत सर्व आत्मरूपच आहे. हें सर्व ब्रह्मच आहे अशा व्यापकानुभूतींत झालीं. कारण, प्रमाताच ब्रह्मरूप झाला असल्यामुळें यच्चयावत् प्रमेयांची ब्रह्मरूपतेनें प्रतीति येणें स्वाभाविकच आहे ] किंबहुना ! ! "मी अर्जुन आहे" या देहतादात्म्यभ्रांतीनें गुंतलों होतो. तो तुझ्याशीं ऐक्य पावून "मुक्त झालों" आतां पुसणें सांगणें, दोन्ही नाहीं. 'करणें किंवा न करणें' हें ज्या कर्ता–कर्म द्वैतांमुळें उत्पन्न होतें. तें द्वैतच तुझ्यावांचून सर्वत्र कांहींच नाहीं, असें अभेदज्ञान झाल्यामुळें नाहींसें झालें आहे. जेथें 'कर्म' निश्चयें करून मुळींच संभवत नाहीं. ते

ब्रह्मस्वरूपच मी झालों असल्याकारणें 'कर्तव्य, अकर्तव्य, साध्य-साधन, "ये विषयीं माझ्याठायीं। संदेहाचे नुरेचि कांहीं" मी संदेहरहित झालों आहे. [ "गत संदेहः" माझ्याकडून केल्या जाणाऱ्या युद्धरूपी कर्मांचा मला लेप होईल कां नाहीं, आत्मा कर्ता आहे कां नाहीं. इत्यादि कर्तव्याकर्तव्यतेचा संशय नाहींसा झाला. माझी संदेहात्मक 'पाशहानि' झाली. "ज्ञात्वादेवं सर्व पाशैः विमुच्यते" परब्रह्मास आत्मत्वानें जाणून सर्व पाशांतून मुक्त होतो. शिवाय विजातीय प्रपंच-सत्यत्व ज्ञान व जीव-ब्रह्मांतील भेदसत्यत्व ज्ञान अशा स्वरूपाची विपरीत भावनाहि पूर्णतया निवृत्त झाल्यानें पूर्ण "बंधनिवृत्ति, पाशहानि झाली" असें गतसंदेहः' यांत सूचित केलें आहे. अखंडैकरस परब्रह्माच्या पूर्ण एकत्व ज्ञानाच्या अभावीं प्रमाण-प्रमेयादि अनेक संशय निर्माण होतात. ते सर्व संदेह निवृत्त झाले, असा अर्जुनानें आपला अनुभव व्यक्तविला आहे ]. देवा ! तुझ्या कृपेनें-"**निज मी पावोनि**" म्हणजे माझें यथार्थ स्वरूप मला प्राप्त होऊन अर्थात् तूं आपल्या निजपदाचा वांटा दिल्यानें तुझ्याशीं एकत्व पावून 'अहम्' तत्सापेक्ष कर्तव्य व कर्तव्यबुद्धि, हेहि निःशेषतया गेली आहेत. तुझ्याहून वेगळा स्वतःस समजत होतो, तेव्हां हे कर्म मी करीन अथवा करणार नाहीं. असें द्वैतांत स्फुरत होते. आतां जेथें एकमेवाद्वितीय ब्रह्मस्थितींत कर्ता-कर्माचे द्वैत असें अजिबात नाहीं अशा उच्चतम अवस्थेस पोचलों आहे. आतां तूं जी आज्ञा करशील तीच एकमेव मला प्रमाण आहे. तुम्ही आज्ञा-इच्छा जशी असेल तसें मी करीन.

[गत संदेह होऊन '**स्थितोऽस्मि**' म्हणजे अविद्या तत्कार्य शोक-मोह-विमुक्त होऊन अविक्रिय, नैष्कर्म्य आत्मस्थितींतच मी आहे. यांत अर्जुन म्हणतो कीं, मला "**आत्मस्वरूप संपत्ति**" अर्थात् "स्व-रूपा" ची प्राप्ति झाली मला परब्रह्मस्वरूपाची प्राप्ति झाली आहे. सारांश, या श्लोकांत 'भिद्यते हृदयग्रंथि च्छिद्यन्ते सर्व संशयः। क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे' अर्थात् "मी ब्रह्म आहे" असा दृढापरोक्ष साक्षात्कार झाला असतां, मायातीत ब्रह्म साक्षात् जाणले असतां "हृदय ग्रंथींचा भेद" म्हणजे हृदयांतील चिदचिदैक्य निश्चयात्मक गांठ सुटते, 'संशयांचा छेद' म्हणजे सर्व संशय नाहींसे होतात 'कर्मक्षय' म्हणजे प्रारब्धेतर सर्व कर्मांचा नाश होतो. [मु. २-२-९ ] या श्रुतीच्या अभिप्रायानुमोदितच अर्जुनाचे उत्तर असल्याचें प्रतिध्वनि ऐकूं येतात ].

अर्जुनाच्या या बोलण्याचें आपल्या उपदेशामुळें आपला शिष्य जो अर्जुन त्यास प्राप्त झालेली उच्चतम अवस्था पाहून श्रीगुरुदेव सुखानें मुलून नाचूं लागले व म्हणूं लागलें सदा सफल असणारा, अखिल विश्वाचें फळ असलेला जो मी, त्या मलाहि हा अर्जुन 'फळ' झाला आहे. असा अर्जुन ब्रह्मात्मैक्य स्थितीवर आरूढ झाला. हे सर्व दृश्य पाहून संजय आनंदानें उचंबळला, त्याच्या अंतःकरणांत अष्टसात्त्विकभावाचें भरते आले. मी काय सामान्य यःकश्चित्; पण मला श्रीव्यासांच्या कृपेनेंच हा तत्त्वज्ञानात्मक संवाद ऐकावयास मिळाला, हें माझें परम भाग्य आहे. कारण, ती कथा ऐकतांच माझें ब्रह्मभावाशीं ऐक्य झाले. मी तूं पणासह अज्ञान दृष्टिच नाहींशी झाली. श्रीकृष्णार्जुन संगमांत संजय अहंकाराला तिलांजली देत आहे व सद्गदित कंठानें 'श्रीकृष्ण, श्रीकृष्ण' असें वेळोवेळां म्हणत होता. धृतराष्ट्रास संजयाचे हे हर्षोत्फुल्लतेनें सांगितलेले वर्णन आवडले नाहीं. कारण, तो जसा बाह्यतः चर्मचक्षूंनीं आंधळा तसाच पुत्रस्नेहानें मोहित झाल्यामुळें आंतल्या ज्ञानदृष्टीनेंहि आंधळाच होता. त्यास पुत्रजयाची वार्ता ऐकण्याची उत्कंठा लागली होती. त्यामुळें त्या उपदेशाचा त्याचे मनावर सुपरिणाम होण्याऐवजी संजयावरच रागावून बोलूं लागला. "तुला त्या श्रीव्यासांनीं येथें कशासाठीं बसविलें आहे ? अप्रासंगिक तूं मला हे काय सांगतोस ? युद्ध वृत्तान्त सांगण्याचा सोडून श्रीकृष्णार्जुन संवादाच्या भाकड कथा सांगण्यांत वेळ कां घालवतोस ?" जो जेथीचा गौरव-थोरवी जाणत नाहीं. त्याला तें 'भिंगुळवाणें' विपरीत, वाटणारच; त्यामुळें तो त्यास 'हे अप्रासंगिक आहे असें म्हणणारच; त्यांत नवल तें काय ? त्याच न्यायानें धृतराष्ट्र संजयास म्हणाला. मग धृतराष्ट्र म्हणतो 'अरे ! आतां जे युद्ध सुरू झाले आहे त्यांत शेवटीं विजय कोणाचा होईल ? हे जाणून घेण्याविषयीं मला तीव्र इच्छा निर्माण झाली आहे. आम्हांस स्वतःस तर असें वाटते कीं, विशेषेकरून दुर्योधन, अर्जुनापेक्षां पराक्रमी असून पांडवांच्या मानानें याचे सैन्यहि दीडपट आहे. म्हणून बहुतेक दुर्योधनासच विजय प्राप्त होईल. आम्हाला तर असें वाटते; मग तुझें ज्योतिष कसे आहे. हें नकळे ! तर संजया ! तुझें भविष्य जसें असेल तसें सांग [ १५९८ ते १६३० ].

असें श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं या शेवटच्या श्लोकांस धृतराष्ट्राच्या प्रश्नानें औचित्यपूर्ण 'अवतरण' देऊन जी संगति लावली आहे तीहि अलंकारपूर्ण, सखोल अर्थभरित, नितान्त रमणीय आहे. धृतराष्ट्रास एकदम अर्जुनाचा-विजय होईल, असें सांगितलें तर त्यास तें आवडणार नाहीं, म्हणून तेच उत्तर; पण आकर्षक व सूचक पद,

योजनेनें शब्दांकित करून शेवटीं संजय म्हणतो. ज्या बाजूला विजयस्वरूप श्रीकृष्णनाथ आहे व विजय नांवानें प्रसिद्ध असा अर्जुन आहे. तेथेंच 'श्रियेसी विजयु निश्चित असे.' जेथे श्रीवल्लभ व भक्तकदंब असेल तेथें 'सुख' व परम मंगलाचाहि लाभ असतो. हे माझें भविष्य अटळ माना. या बोलण्यांत जर अन्यथा घडेल तर 'व्यासाचा अंकु न वाहे' असें प्रतिज्ञापूर्वक सांगत आहे [ १६२१ ते १६९८ ].

याप्रमाणें संपूर्ण महाभारताचा "आवांका म्हणजे तात्पर्य या श्लोकांत आणून संजयानें धृतराष्ट्रास दिले." गीतेचे महत्त्व व फल सांगतात. वेदानें गीतेचे अधिकारपरत्वें अनंत प्रमेयाचें कथन केलें आहे. अनंत वेदाचें तात्पर्य सवालक्ष श्लोकात्मक महाभारतांत आणलें आहे. त्या महाभारताचेंहि सारांशरूप मुख्य तात्पर्य या गीतेच्या सातशें श्लोकांत आणलें आहे. त्याहि सातशें श्लोकाचे तात्पर्य म्हणजेच श्रीव्यास शिष्य संजयाचा पूर्णोद्गाररूप हा शेवटचा श्लोक होय. या एकाच श्लोकांवर जो विश्वास ठेवून राहील त्यानें संपूर्ण विद्यामात्राचें खरें स्वरूप हस्तगत केलें, असें होईल. या गीतेचा जो काया वाचा मनेंकरून सेवक होईल तो दुःखसंबंधरहित स्वानंद साम्राज्याचा सार्वभौम राजाच होईल. संसार पथावर श्रमलेल्या जीवांना विश्रांतिसाठीं श्लोकाक्षररूप द्राक्षवेलीला गीता ही मांडव झाली आहे-सभाग्य संतरूपी भ्रमरांनीं सेवन करून ज्या श्लोकांना कमलरूपता आणिली, अशा श्लोक कमलांनीं युक्त असें श्रीकृष्ण मुखरूपीं सरोवरांत ही गीतारूप वेली मरास आली आहे. हे गीतेचे सातशें श्लोक असलें, तरी याचें महत्त्व व प्रमेय निरनिराळे नसून एकच आहे. गीतेचे पठण व अर्थज्ञान ही फलदृष्ट्या सारखेच आहेत. आपले अर्थज्ञानरूपी फल देऊन आपण संपणारें हें गीताशास्त्र नव्हे तर " हे सगळें परब्रह्मचि " यांत वाच्यवाचक इतर शास्त्राप्रमाणें भिन्न भिन्न नसून 'श्रीकृष्णची वाच्य वाचकु' आहे. मला येथें समर्थन करण्यास अन्य विषय नाहीं. गीता जाणा हे " वाङ्मयी श्रीमूर्ति प्रभूची "

संपूर्ण विश्व संसारतापानें संतप्त झालेलें पाहून देवांनीं करुणेनें, अर्जुनाच्या निमित्तानें ब्रह्मानंद सर्वसुलभ केला. या गीतेच्या समन्वयपूर्वक अर्थज्ञानानें जी ब्रह्मरूप प्राप्ति होते. तीच श्रवणानें व गीता पठणानेंहि प्राप्त होते म्हणून श्रोत्रिय ब्रह्मज्ञ, कळकळीनें उपदेश करणाऱ्या संतमहात्म्यांच्या संगतींत राहून दीर्घकाल, निरंतर, आदरपूर्वक एका गीतेचेच सेवन करावें; इतर शास्त्रें घेऊन काय करावयाचें आहे ? सर्वांनीं सर्व सुलभ गीतेचेच पठण, श्रवण व अर्थज्ञान संपादन करावें [ १४९९ ते १६९९ ].

श्रीव्यासांचा उपकार सागतातः—शब्दातीत परब्रह्मविषयक असलेला श्रीकृष्णार्जुनांचा मोकळा संवाद घडला तो श्रीव्यासांनीं वाटेल त्याला तळहातावर घेतां येईल इतका सर्व सुलभ केला. भरीव ज्ञानमात्र द्रष्टा श्रीगुरुमूर्ति जर दृश्य सगुण साकार करुणावंत झाला नसतां तर " का ह्या उपास्ति आकळता तो ? " त्याप्रमाणें अपार परब्रह्म सातशे श्लोक मर्यादेंत आले नसतें तर तें ब्रह्म या जगांत कोणाला प्राप्त होऊं शकलें असतें ? तो—श्रीकृष्णार्जुनांचा संवाद अनुष्टुप् छंदांत बसवून स्त्री, शूद्रादिकांच्या प्रतिभेंत—मंद प्रज्ञेंत उतरेल असें श्रीव्यासांनीं केलें. म्हणूनच " व्यासांचा हा थोरु । विश्वेसी जाला उपकारू " कारण, श्रीकृष्णाच्या मोकळ्या बोलांना सुसंगतवार करून सर्वसुलभ करून " आकारु—ग्रंथाचा केला " तोच हा ग्रंथ. श्रीव्यासांची पदें पाहतां, पाहतां मी आतां मराठी भाषेच्या रूपानें ऐकण्याच्या मार्गास आणला. ज्या गीतेचा अर्थ करतांना श्रीव्यासादिकांच्या मति साशंकपणें वावरतात, तेथें माझ्या सारख्याचा काय लाग लागणार ? 'हें युक्ति न मिळे', पण माझा श्रीगीता माऊलीवर पूर्ण भरंवसा आहे कीं, ती थोर थोर मुनींच्याबरोबर माझाहि स्वीकार करीलच. कारण, मीं व्यासांचा मागोवा घेत घेत व भाष्यकार श्रीशंकराचार्यांना वाट पुसत पुसत, मी अयोग्य असलों, तरी गीतार्थाच्या महातात्पर्य विषयीभूत अर्थास प्राप्त न होतां अन्यत्र कोठें जाईन ? तर जाणार नाहीं; न चुकतां त्याच तात्पर्य विषयीभूत अर्थाप्रत जाईन. महत्त्वपूर्ण कारण म्हणजे सर्वोपकारी समर्थ श्रीगुरु निवृत्तिनाथ माझ्यामध्यें प्रवेश करून वागत आहेत, हें होय. त्यांनींच मजकडून वदविलें आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात श्रीगुरु कृपेनें माझें श्वासोच्छ्वासहि काव्यप्रंथ होतात. कारण गुरुकृपा काय नोहे ? " मी तर चित्तसंपन्न असून सर्वतोपरि समर्थ अशा श्रीगुरुनिवृत्तिनाथांचा अनुग्रहित शिष्य आहे. मग मी गीतेवर रसालंकारपूर्ण, अर्थ गर्भ, विचार गर्भ, तत्त्वस्पर्शयुक्त असें व्याख्यान करीन यांत नवल ते काय ? कांहीं नाहीं. श्रीगुरु निवृत्तिनाथ मज निमित्तेंकरून संस्कृत भाषारूप कठीण किनारे फोडून गीतारूपी गंगेस मराठीं भाषेंतील अपूर्वसुंदर शब्दरूपी पायऱ्यांचा घाट बांधून, अबालसुबोध करून गीता गंगेचे हवे त्यास अवगाहन करतां येईल, अशी सुलभता केली. म्हणून ज्यास संस्कृत ज्ञान नाहीं त्यांची मराठीं वाङ्मयांत विषयाची स्पष्टता करून फार मोठी चांगली सोय झाली आहे. ओवी

छंदांत ' ब्रह्मरस–सुस्वादें ' अक्षरें मी यांत गुंफली आहेत. बरें ज्यांस संस्कृत येते, त्यांनींहि गीतेबरोबर माझें हें मराठी भाषेंतील विवरण वाचलें तर अर्थग्राहक पदयोजना करून मूळ गीतार्थाची, विषयाची स्पष्टता जाणून आनंद होईल इतकी विषयाची केलेली स्पष्टता झाली आहे कीं, याच्या श्रवणानें मनन निदिध्यासन यांस जिंकलें आहे. इतकें करूनहि कृतार्थता न झाली तर अधिकाराचीच उणीव म्हणावी लागेल. कारण या अध्यात्मग्रंथाचें मल–विक्षेप रहित, तीव्र जिज्ञासावान्, सुसंस्कृत मनाचें अंतरंग वृत्तीचेच श्रोतें ' अधिकारी ' आहेत; पण त्याहून इतर सामान्य लोकहि रसालंकार पूर्ण शब्दसौंदर्य, काव्यात्मकता, नादमाधुर्य, इत्यादि आकर्षक बहिरंगाचें, सुबक अशा बाह्यस्वरूपाचें योगानें सुखी होतील. हें श्रीगुरु निवृत्तीनाथांचेच मोठेपण, सामर्थ्य असल्याकारणें हा " ग्रंथु नव्हे, हें ' कृपेचे वैभव ' तये ' [१६९६ ते १७५० ].

श्री ज्ञानेश्वर महाराज आपली संप्रदाय परंपरा सांगतातः—आदिनाथगुरु **' श्रीशंकरांनी '** क्षीर सिंधुपरीसरी जगन्माता **' पार्वती '**च्या कर्णकुहरांत आपलें गुह्यतम ब्रह्मात्मैक्यज्ञान अति प्राचीन काळीं सांगितलें; त्यावेळीं क्षीरसागरांत माशाच्या पोटांत **' श्री मत्स्येंद्रनाथ '** उपस्थित होते. म्हणून त्यांना तें श्रवण करावयास मिळालें तें गुह्यज्ञान श्रीमत्स्येंद्रनाथांनीं **' श्री गोरक्षरायां '**स दिले त्यांनीं श्रीशंकरापासून संपादिलेलें ' अद्वयानंद वैभव ' **" श्रीगहिनिनाथा "**स दिले. श्रीगहिनीनाथांनी मात्र ' एकच गुरु व एकच शिष्य ' असें ' तें ज्ञान ' सीमित न ठेवतां, कलीकडून गिळल्या जाणाऱ्या, जन्ममरणरूप अनर्थ परंपरेंत सांपडलेल्या जीवांसहि त्यांतून सुटून विवेकसिद्ध जीवन जगण्यासाठीं, चिर स्थिर सुख लाभावें म्हणून **" श्री निवृत्तिनाथांना "** देऊन त्यास विशिष्ट देश कालमर्यादेंत न ठेवतां सार्वजनिक, सार्वकालिक, सार्वदेशिक सर्वत्र उपयोग होईल, असा प्रसार करण्याची ' आज्ञा ' केली. त्यामुळें श्री निवृत्तिनाथांनी मला निमित्त करून आदिगुरु शंकरापासून शिष्यपरंपरेनें बोधधन, समाधिधन अखिल विश्वास सुलभ करून दिले. त्यासाठीं श्रीनिवृत्तिनाथांकडून जो ' शान्तरसें वर्षला ' महारसाचा वर्षाव झाला. ' तो हा ग्रंथु. ' एऱ्हवीं मी ' पढेना वाची। ना सेवाहि जाणें स्वामीची ' पण समर्थ श्रीगुरु निवृत्तिनाथांनीं मला निमित्त करून, ग्रंथ रचनेच्या निमित्तानें " जगातें रक्षिलें जाणा " नाहींतर गीतेसारख्या अनन्य साधारण, महत्त्वपूर्ण ग्रंथावर ' भाष्य ', व्याख्यान करण्याची माझी योग्यता नाहीं ! शब्द कसा घडवावा ? प्रमेयांचे कथन कसें करावें ? रसालंकार म्हणजे काय ? ' तें नेणें ' म्हणून मला पुढें करून ते माझे श्रीगुरुच बोलत आहेत. म्हणून मी बहुत भाग्ययोगेंकरून तुम्हां संतांचे पायाजवळ आलों आहे, आतां मला जगामध्यें उणें कोठें आहे ? माझ्या स्वामींनी मला तुम्हां संताची प्राप्ति करून दिली आहे त्यामुळें मीं " सर्व कामीं परिपूर्ण जालों " याप्रकारें गीतेचे अर्थरूपी मंदीर तयार करून त्यावर अठराव्या अध्यायाचा कळस बसवून श्रीगुरुरूपी शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा करून मी पूजा करतों ! कोडिसवाणी श्रुतिच असलेली गीता मनुष्याला अहितापासून काढून हिततम ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून देणारी निष्कपट माउली आहे. त्या गीता मातेस चुकलेली तिचीं तान्हीं मुलें अहितकर, अनिष्ट मार्गांत सुख प्राप्त्यर्थ भटकत आहेत, प्रपंचांत निष्कारण हिंडत आहेत, त्या हिततम ब्रह्माचा, ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा उपदेश करणाऱ्या गीता माऊलीची व तिच्या चुकून हिंडत असलेल्या मुलांची भेट करून देणें हा तुमचा, ब्रह्मज्ञांचा ' धर्म ' होय. आपले ' असाधारण धर्मरूप लक्षण ' होय. किंबहुना ! ! ग्रंथसिद्धीचा हा आनंदकर सोहळा दाखविला. त्यामुळें आपण माझ्या संपूर्ण जन्माचें फल मला मिळवून दिलेंत. आपली ही ग्रंथरूपी सृष्टि " नासते कीजे की ऐसे । निर्मावें नाहीं " अर्थात नाश पावणारी नसून निरंतरची दैदीप्यमान्, भोगनिरपेक्ष आनंदाचा सतत वर्षाव करणारी, सार्वकालिक, सार्वजनिक नितान्त उपयुक्त, चिरस्थिर स्वरूपाची, अशीं आहे. किंबहुना ! ! तुमच्याच कृपेनें केलेलें गीतालंकाररूपी ' ज्ञानेश्वरी ', ' भावार्थदीपिका ' रूपी **' धर्म कीर्तन हे सिद्धी गेले '** अर्थात हें जें ' धर्म कीर्तन ' शेवटास गेले तेथें माझें काय ते फक्त ' पाईकपण ' उरलें आहे [ १७५१ ते १७९२ ].

आपल्या या ' ज्ञानेश्वरी ' ग्रंथास श्रीज्ञानेशांनी " वाग्यज्ञ " म्हटले आहे. या यज्ञाच्या समाप्तीच्यावेळीं विश्वात्मक श्रीगुरुदेवांजवळ त्यांनी जें ' पसायदान ' मागितलें. त्यांत " वाग्यज्ञाचे " परमप्रयोजन म्हणजे समाजांत दैवीसंपत्ति नांदावी व त्याद्वारें सर्वांस नित्य निरतिय सुख प्राप्ति, हे असल्याचे सांगितलें आहे.

हे विश्वात्मक देवा ! माझ्या या ' वाग्यज्ञानें ' संतुष्ट व्हावें व मला असें ' प्रसाद दान ' द्यावें कीं विश्वांतील दुष्टांचा दुष्टपणा नाहींसा होऊन त्यांना सत्कर्माविषयींची आवड निर्माण व्हावी, भूतजातांमध्यें परस्परांविषयीं जीवाभावाची मैत्री जडावी. विश्वांतून दुरितात्मक अंधार पार नाहींसा व्हावा आणि विहित स्वकर्तव्यरूपी सूर्याचा उदय

व्हावा आणि मग स्वधर्मानुष्ठानामुळें जो जें इच्छील ते त्यास मिळावें. सकल मंगलाचा वर्षाव करीत ईश्वरनिष्ठ, सर्वभूतहितरत अशा सत्पुरुषांचा समुदाय सर्वांना सदासर्वकाळ भेटावा. जे चालणाऱ्या कल्पतरूंची राई, सजीव चिंतामणींचे समूह, अमृताचे बोलते सागर, लांच्छनविरहित चन्द्रमे आणि ताप-विहीन असे जें सज्जन तें सर्वांचेच सोयरे व्हावेत. फार काय सांगावें ! ! त्रैलोक्यांतील लोकांनीं सर्वसुखानें परिपूर्ण होऊन जगत्कारण 'आदि पुरुषा' चे, विश्वात्मक देवाचे अखंड भजन करावें. [ हा ग्रंथ सर्वांच्या सुखासाठीं निर्माण केला आहे. किंबहुना ! ! साऱ्या विश्वांत, मराठीच्या नगरींत ब्रह्मविद्येचा सुकाळ व्हावा, विश्वांत सुखाचेच घेणें देणे व्हावे, याच हेतूनें हरएक ग्रंथाची रचना श्रीज्ञानेशांनी केली आहे, आपल्या कोणत्याहि ग्रंथापासून पठण, श्रवण, अर्थज्ञान, अर्थरूपता संपादन करणाऱ्यास सुखाचा आत्मत्वानें लाभ व्हावा. हेच साऱ्या ग्रंथांचें प्रयोजन आहे. ग्रंथारंभी " ओऽम् नमोजी आद्या । वेद प्रतिपाद्या । जयजय स्वसंवेद्या । आत्मरूपा ।। " यात देवाचें तटस्थ व स्वरूप लक्षण सांगून 'देव' या मांगलिक पद योजनेनें व्यापक सुखानुभूति साऱ्यांना लाभावी हेच प्रयोजन सूचित केलें आहे. " आद्या " जगत्कारण हे तटस्थ लक्षण सांगून तो वेदैकगम्य आहे, त्याचें ज्ञान वेदाधारें संपादन करावें, असें ग्रंथारंभीं उपक्रम करून " आदि पुरुखीं अखंडित भजिजो " म्हणजे सर्वांनी आद्यपुरुषाची अखंड भजनभक्ति करून आत्मत्वानें ज्ञान संपादन करावें असें सांगून उपसंहार केला आहे. यांत उपक्रमोपसंहाराची एकवाक्यताच सूचित होते. ]

त्या विश्वात्मक श्रीगुरुदेवांनीं " हा दानप्रसाद मिळेल " असें सांगितलें व त्यामुळें या वरानें श्रीज्ञानदेव सुखी झाले. श्रीज्ञानेश्वरी लेखनाचे स्थळ 'नेवासें' असून तेथें शके बाराशेंबारामध्यें हा ग्रंथ संपूर्ण झाला. व त्याचे लेखक श्रीसच्चिदानंदबाबा हे होत, असें सांगून या ग्रंथाचा समारोप केला आहे.



## पसायदान

**आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ।।**
**जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ।।**
**दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।।**
**वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळी । भेटतु या भूतां ।।**
**चलां कल्पतरूंचे अरव । चेतना चिंतामणीचे गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।।**
**चंद्रमे जें अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।।**
**किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ।।**
**आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ।।**
**येथ म्हणे विश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ।।**



# मंगलाचरण, अनुबंधचतुष्टय व अध्यायसंगति

मंगल म्हणजे नमन. कोणत्याहि कार्यारंभीं 'मंगल' करण्याचा 'शिष्ट-संप्रदाय' आहे. याशिवाय ग्रंथ निर्विघ्नपणें पार पाडावा, 'हा ग्रंथ अस्तिकांचा आहे' असें वाचकांस ज्ञान व्हावें, आणि शिष्यास मंगलचरण करण्याचें वळण लागावें इत्यादि कारणांकरितांहि ग्रंथारंभीं मंगल केलें जाते. मंगलाचरणाचे प्रयोजन, 'फल' काय याचा विचार केला तर "**मंगलादीनिहि शास्त्राणि प्रथन्ते; अध्येतारश्च वृद्धियुक्ता यथास्युरिति**" या श्रीपतंजलि मुनींच्या उक्तीनुसार ज्या शास्त्रांत आरंभीं 'मंगल' केलें जाते, ग्रंथारंभीं मांगलिक शब्दाचे प्रथमोच्चारण केलें तर ती शास्त्रें प्रसिद्धीस प्राप्त होतात व अशा शास्त्राचें अध्ययन करणाऱ्यास सुखाभिवृद्धि होते. उपरिनिर्दिष्ट फलांपैकीं आपल्या कोणत्याहि ग्रंथाच्या पठणानें, श्रवणानें, अर्थ ज्ञानानें, अर्थरूपतेनें मनुष्य मात्रांस किंबहुना ! ! **जगाला सुखलाभ व्हावा** अशीच अपेक्षा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं व्यक्त केल्याचें त्यांच्याच ओव्यांतून स्पष्ट होते ते असे:--

**म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृते येणे । सणु भोगिजे सणे । विश्वाचेनि ।।** "अनुभवामृत"
**तियापरि जो इया । दर्पण करील ओवीया । तो आत्मा येवढीया । मिळेल सुखा ।।** "चांगदेव"

या अनुभवामृत ग्रंथाध्ययनद्वारां अखिल विश्वानें सर्व सुखाचा सुखानें भोग घ्यावा. तसेंच या ओव्यांच ब्रह्मात्मैक्यस्वरूप ज्ञानार्थ जो कोणी आरसा करील तो आत्म्याएवढ्या व्यापक, अपरिच्छिन्न सुखास पावेल. याप्रमाणें इये मराठीचे नगरींत ब्रह्मविद्येचा सुकाळ-विषयस्पष्टता होऊन विश्वांत सुखाचीच देव-घेव व्हावी याच हेतूनें, मुख्य उद्देशानें अंतरंग मुमुक्षु अधिकाऱ्यांसाठीं प्रत्येक ग्रंथ रचलेला आहे. या ज्ञानेश्वरी ग्रंथाच्या शेवटीं धर्मकीर्तन शेवटास गेल्यानंतर 'वाग्यज्ञा'चे शेवटीं विश्वात्मक श्रीगुरुदेवाजवळ जें 'पयासदान' मागितलें त्यांत--

**"किंबहुना सर्वसुखी । पूर्ण होऊनी तिही लोकी ।**
**भजिजो आदि पुरुखी । अखंडित ।।"**

फार काय सांगावें ! ! त्रिभुवनांतील सर्व लोकांनीं सर्व सुखानें परिपूर्ण होऊन सुखरूप असणाऱ्या जगदाद्य-कारणरूप पुरुषाचें-अखंड भजन करावें असें श्रीज्ञानेश म्हणतात.

मंगलाचे मुख्य तीन प्रकार आहेत. एक आशिर्वादरूप दुसरें नमस्काररूप आणि तिसरे वस्तुनिर्देशरूप. वस्तु म्हणजे परब्रह्म त्याचा निर्देश म्हणजे परब्रह्माचे सगुणरूपानें, निर्गुणरूपानें, सगुण निर्गुण उभयरूपानें किंवा परब्रह्माशीं आपला अभेद प्रतिपादन करण्याच्या रूपानें वर्णन करणें यासच '**वस्तुनिर्देशरूप मंगल**' असें म्हणतात.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं या श्रीज्ञानेश्वरी ग्रंथाचे आरंभीं मांगलिक अशा 'ॐ' शब्दाचा प्रयोग करून, '**आद्या**' पदानें परब्रह्माचें जगदाद्यकारणत्वरूप तटस्थ लक्षण व '**स्वसंवेद्या**' पदानें परब्रह्माचें स्वरूपलक्षण सांगून अर्थात् उभयलक्षणलक्षित, अपरोक्षानुभूत ज्ञानस्वरूप आत्मरूपाशीं अभिन्न अशा श्रुतिप्रतिपाद्यरूप परब्रह्माचा निर्देश करून "**वस्तुनिर्देशरूप-मंगल**" केलें आहे. या 'वस्तुनिर्देशात्मक' मंगलाचरणांतच श्रीज्ञानेशांनीं '**अनुबंध-चतुष्टय**' सूचित केला आहे, कारण कोणत्याहि ग्रंथाचे अध्ययन करण्यापूर्वीं या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय काय ? त्यांस अधिकारी कोण ? त्या ग्रंथाचें फल काय ? व त्याचा संबंध काय ? या चार गोष्टी म्हणजेच 'अनुबंधचतुष्टय' कळल्याविना कोणत्याहि विवेकी, सूज्ञमनुष्याची त्या ग्रंथाध्ययनांत प्रवृत्तिच होत नाहीं. म्हणून या चार गोष्टींचे प्रतिपादन करणें जरूर आहे.

उपरिनिर्दिष्ट मंगलाचरणांतच श्रीज्ञानेशांनीं "स्वसंवेद्या । आत्मरूपा" या पदांनीं आत्म्याचे व तत्पदलक्ष्य परब्रह्माचें ऐक्य सांगितले आहे, ते ऐक्य युक्तीनें, प्रमाणानें व स्वानुभवानें करणें हाच या ग्रंथाचा 'प्रतिपाद्यविषय' होय. 'मराठीयेचे नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करी' यांत विषयाची स्पष्टता व्हावी. असें स्पष्ट म्हटलें आहे. मूळ

भगवद्गीता हे एक ' अध्यात्मशास्त्र ' आहे. ' ब्रह्मविद्येचा राजा आहे ' हरएक अध्यायाच्या समाप्तिदर्शक मंत्रांत " इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे " असें म्हटलें आहे. अर्थात् " ब्रह्मात्मैक्य विद्या प्रतिपादन करणें हा ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय " आहे. ग्रंथज्ञानद्वारां अविद्यानिवृत्तिपूर्वक ते एकत्व आत्मत्वानें प्रतीतीस आले म्हणजे तेच या ग्रंथाचे " परमप्रयोजन ", " मुख्य फल " आहे.

एथ अविद्या नाशु हे स्थळ । तेणे मोक्षोपादान हें फळ । या दोन्ही केवळ । साधन ज्ञान ।। अविद्यानाश ही मुख्य भूमि असून नित्यनिरतिशय सुखस्वरूप मोक्षाचा लाभ हे त्याचे " प्रयोजन–फल " होय. या दोन गोष्टी होण्यासाठीं ' ज्ञानच ' हे केवळ ' साधन ' होय. अर्थात् " इतुलेचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारी ".

उपर्युक्त ब्रह्मात्मैक्यरूप, ब्रह्मस्थिति प्रतीति येण्याची तीव्र इच्छा ज्यास असेल तोच या ग्रंथाचा अधिकारी होय. ' अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगुचि अधिकारीये " अर्थात् ' अधिकारी ' व ' प्रयोजन–फल ' यामध्यें प्राप्य-प्रापकभावसंबंध आहे. कारण, अधिकाऱ्यावांचून फलप्राप्ति होत नसते. जगांतील जितके म्हणून व्यवहार चालू आहेत ते सर्वांच्या सर्व व्यवहार अधिकारानुरूपच चालू आहेत. निदानपक्षीं तसे असणें अवश्य आहे. अनधिकारी मनुष्य व्यवहार करील तर त्यास त्या व्यवहाराचे ' उचित ' फल मिळणार नाहीं; ही गोष्ट सर्वानुभव सिद्ध आहे. असा " अनुबंधचतुष्टयहि " या पहिल्या मंगलाचरणांतच सूचित केला आहे.

नमन हे ग्रंथाचे प्रारंभीं करतात, कांहीं ग्रंथकार ग्रंथारंभी, मध्यें आणि अंतीं, असें तीन वेळां नमन करतात. कांहीं ग्रंथकार प्रत्येक प्रकरणाचे आरंभी नमन करताना दिसतात. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी प्रत्येक अध्यायाचे आरंभी नमन केले नाहीं. कारण, अध्याय २, ३, ५, ७, ८, या पाच अध्यायाचे आरंभी नमन केलें नाहीं. त्यांत चौथ्या अध्यायाचें आरंभी स्पष्ट नमन केले नसले तरीसुद्धां त्यांत संतांचा आशिर्वाद प्राप्त झाल्याचे सांगितले असल्यामुळें त्यांत ' नमन केले आहे ' असें म्हणण्यास हरकत नाहीं. बाकींच्या सर्व अध्यायांचे आरंभी श्रीज्ञानेश्वर महाराजांनी स्पष्ट नमन केले आहे.

श्रीज्ञानेश्वर महाराज हे अनुभवी संत असून प्रतिभासंपन्न कवि असल्यामुळे ' अमूर्तचि परि कारुण्याचा मूर्त ' अर्थात् ' गुरु साक्षात् परब्रह्म ' म्हणजे परब्रह्माचे प्रतीक असणारे असे श्रीगुरु निवृत्तिनाथ यांनाच गणपति सूर्य, आई, इत्यादि अनेक रूपकांच्याद्वारां वारंवार नमन केलें आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांची एकनिष्ठ ' गुरुभक्ति ' आपोआपच व्यक्त होते.

श्रीज्ञानेश्वर महाराजांनी अध्यायाचें आरंभीं प्रास्ताविक लिहिण्याकरितां, श्रीगुरुंच्याजवळ कृपाप्रसादाची मागणी करण्याकरितां या नमनाचा उपयोग केला आहे. कांहीं ठिकाणीं तर देवाचे व अर्जुनाचें प्रेम जीवेश्वर जगत् विषयक मतें, श्लोकांतील टीकेंत न सांगता येणारें वेदांतशास्त्रांतील गुह्यतम सिद्धान्त आणि ' अध्याय संगति ' सांगण्याकरितांहि या मंगलाचरणाचा श्रीज्ञानेश्वर महाराजांनी उपयोग केला आहे.

दहाव्या अध्यायाचे आरंभी गीतेतील एकंदर अध्यायाच्या संख्येच्या दृष्टीनें ग्रंथाचे ' पूर्वकाण्ड ' संपून तेथून पुढें ग्रंथाचे ' उत्तर काण्ड ' आरंभ झाला असेंहि प्रतिपादिलें आहे. म्हणून तेथें मागील नऊ अध्यायांतील प्रतिपादिलेल्या विषयांचें ओ. २४ ते ४० पर्यंत थोडक्यांत सिंहावलोकन करून अकराव्या अध्यायांतील ' विभूतिप्रति-विभूतियोग ' हा प्रतिपाद्य विषय सूचित केला आहे.

भगवद्गीतेवरील कांहीं टीकाकारांनी त्या अठरा अध्यायांची वाटणी करून कर्म, उपासना आणि ज्ञान या तीन कांडाचे वर्णन केल्याचे सांगितलें आहे. पहिले सहा अध्याय ' कर्मकांडपर ' दुसरे सहा अध्याय ' उपासना कांडपर ' आणि शेवटचे सहा अध्याय ' ज्ञानकांडपर ' आहेत. अशी ' अध्याय संगति ' सांगितली आहे; परंतु श्रीज्ञानेश्वर महाराजांनी गीतेंतील संपूर्ण ' अध्याय संगति ' पूर्वींच्या गीतेवरील टीकाकारांपेक्षां निराळी व स्वतंत्र सांगितली आहे. ती अठराव्या अध्यायांतील ' सर्व धर्मान् परित्यज्य' या श्लोकावरील टीकेंत सांगितली आहे, ती अशीः–

१. पहिला अध्याय हा ' अर्जुन विषाद ' अर्थात् ' शास्त्रप्रवृत्ति प्रस्ताव ' म्हणजे गीताशास्त्राचें प्रवृत्तिनिमित्त सांगणारा आहे. २. दुसरा अध्याय हा ' सांख्य सद्भाव ' म्हणजे ज्ञानमार्ग सांगणारा आहे, यांत सांख्य योग व

निष्काम कर्मयोग यांतील भेदहि प्रतिपादिला आहे. किंबहुना !! ज्ञानप्रधान व मोक्षदानी स्वतंत्र असणाऱ्या संपूर्ण गीताशास्त्राचे सूत्ररूपानें वर्णन याच अध्यायांत केलें आहे. ३. तिसऱ्या अध्यायांत मोक्ष मार्गांतील " साधनारंभु " प्रतिपादिला आहे. केवळ कर्म प्रतिष्ठिले आहे. अर्थात् काम्यनिषिद्ध कर्मत्यागपूर्वक निष्काम कर्मानुष्ठान परमादरपूर्वक स्वीकारून श्रद्धापूर्वक, अप्रमादे करून सद्भावनेनें करावें असें ' कर्मकांड ' सांगितलें आहे. ४. चवथ्या अध्यायांत " तोचि चतुर्थीं ज्ञानेसी प्रगटिलें " देवे ब्रह्मार्पणत्वें क्रिया सांगितली. चवथ्या अध्यायाच्या अखेरच्या शेष भागांत आरंभ करून तो आधवा अध्याय संपेपर्यंत किंबहुना !! बाराव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकाच्या शेवटपर्यंत ' कर्मे ईशु भजावा हे जे बोलिले " ही अष्टाध्यायी म्हणजेच ' देवताकांड ', ' उपासना कांड ' होत असें सांगितलें आहे. १२. बारावा अध्याय हा भक्तियोगाचाच अध्याय समजला जातो, तथापि ' अद्वेष्टा सर्वभूतानाम् ' या श्लोकापासून राहिलेला भाग तेरावा अध्याय, चौदावा अध्याय आणि पंधरावा अध्याय शेवटपर्यंत ' ज्ञानकांडाचें' वर्णन केलें आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांचे मतानें येथें ' गीताशास्त्र ' संपलें आहे. पुढील सोळावा, सतरावा आणि अठरावा हे तीन अध्याय गीताशास्त्राची पुरवणीवजा आहेत, जीवास जीवब्रह्मैक्यज्ञानानें मोक्ष होतो हे खरें; पण ते मोक्ष साधनीभूत ज्ञान उत्पन्न होणें व उत्पन्न झाल्यानंतरहि टिकणें फार कठीण !! म्हणून त्या ज्ञानास सहाय्यक-पोषक, असणारी अशी ' आसुरी संपत्ति ' याचे वर्णन सोळाव्या अध्यायांत सांगून शेवटीं प्रत्येकास करणीय, आदरणीय काय व निषिद्ध काय हे निश्चित ठरविण्याचे एकमेव साधन ' शास्त्र ' म्हणजे ' वेद ' होय असें सांगितलें. त्या वेदावर जी श्रद्धा ठेवावयाची ती सात्त्विकच असली पाहिजे हे सांगण्याकरितां श्रद्धेचे, यजनाचे, दानाचे प्रत्येकीं तीन तीन प्रकार सतराव्यां अध्यायांत सांगितलें शेवटीं अठराव्या अध्यायांत सर्व गीता शास्त्रांतील विषयांचें संक्षेपानें कथन केलें असल्यामुळें या अठराव्या अध्यायास गीता प्रसादाचा ' कलशाध्याय ' म्हणतात म्हणूनच अठरावा अध्याय म्हणजे ' एकाध्यायी गीताच आहे ' असें श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं म्हटलें आहे.

---

## श्रीनिळोबामहाराजकृत श्रीज्ञानेश्वर महाराजांची आरती

होता कृपा तुमची पशु बोले वेद । निर्जिव चाले भिंती महिमा अगाध ॥
भगवद्गीताटीका ज्ञानेश्वरी शुद्ध । करूनि भाविक लोकां केला निजबोध ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय ज्ञानसिंधु । नामस्मरणें तुमच्या तुटे भवबंधु ॥ धृ० ॥
चौदाशें वरुषांचे तप्ती तीरवासी । येऊनि चांगदेव लागति चरणांसी ॥
करुनी कृपा देवें अनुग्रहिलें त्यासी । देऊनि आत्मज्ञान केलें सहवासी ॥ २ ॥
समाधिसमयीं सकळ समुदाय । घेऊनि सुरवर आले श्रीपंढरिराय ॥
दारीं आजानवृक्ष सुवर्णपिंपळ असुमाये । जाणुनि महिमा निळा चरणातळीं राहे ॥ ३ ॥

---

# श्रीज्ञानेश–स्तुति–सुमनें



ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणें निगमवल्लि प्रगट केली ॥ १ ॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्म विद्येचें दाविलेंसे रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ ३ ॥
छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारिली ॥ ४ ॥
श्रवणाचे मिषें बैसावें येऊनि । सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओंवी अनुभवावी ॥ ६ ॥

भाव धरूनियां वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरी तयावरी ॥ १ ॥
स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु । श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेंसीं ॥ २ ॥
तेचि ज्ञानेश्वरी वाचे वदतां साचें । भय कळिकाळाचें नाहीं तया ॥ ३ ॥
एका जनार्दनीं संशय सांडोनी । दृढ धरीं मनीं ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥

ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करीं तूं सर्वज्ञा । ज्ञानाज्ञानविरहित ब्रह्मप्राप्तीची संज्ञा ।
ज्ञाता ज्ञेय निजांग होय ऐसी प्रतिज्ञा । ज्ञानाग्नीनें पापें जळती हे ज्याची आज्ञा ॥ १ ॥
ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञानदेव देतो । वासुदेवचि होतो अखंड वदनीं वदे तो ॥ धृ० ॥
नररूपें विष्णु अवतरला हा भगवान । नदीनद वापीकूप पहातां उदक नव्हे भिन्न ।
नवल हेंचि पशु म्हैसा करितो वेदाध्ययन । नमन करूनि सद्भावें जपतां होय विज्ञान ॥ २ ॥
देवाधि देव भक्तांप्रति वर दे । देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्म–आनंद कोंदे ।
देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे । देशभाषा ज्ञानदेवी गीतार्थु वदे ॥ ३ ॥
वक्ता श्रोता श्रवणें पठणें पावती समभाव । वर्णूं जातां अघटित महिमा होतो जिव शिव ।
वंदुनी अनन्य एका जनार्दनी धरीं दृढभाव । वर्षति निर्जर ज्ञानदेवनामें पुष्पांचा वर्षाव ॥ ४ ॥

---

### श्रीज्ञानेश्वर महाराजांची आरती

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा । सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ धृ० ॥
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नांव ठेवियलें ज्ञानी ॥ १ ॥
प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामाजनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ॥ २ ॥

★

॥ श्रीगुरु प्रसन्न ॥

# संदर्भासह कांहीं पौराणिक कथानकें

## अध्याय पहिला

कोणत्याहि कार्यारंभीं तें कार्य निर्विघ्नपणें परिसमाप्त व्हावे म्हणून " मंगलानांच मंगलम् " अशा परमात्म्यास 'नमन' करण्याचा वैदिक शिष्ट संप्रदाय आहे. त्या मंगलासाठीं सर्व वैदिकांनी " श्री गणेश " हीच देवता विशेषत्वानें पसंत केली आहे. कारण, "श्री गणेश" ही वैदिक देवता आहे. शिवाय ती गणेश सुखकर्ता, विघ्नहर्ता, बुद्धिदाता व सिद्धिदाता आहे व ती सुखवृद्धि, विघ्ननिवृत्ति व सिद्धि-बुद्धि-प्राप्ति मनुष्यमात्रांस अपेक्षित आहे.

"श्रीगणेशा"ची उपासनाहि वैदिक आहे व ती श्रीगणेशोपासना सर्ववर्ण प्रकृतिस्वरूपानें, ओंकारात्मकतेनें केली जाते. अथर्ववेदांतर्गत " गणपति-अथर्वशीर्ष " हे तर अति प्रसिद्ध आहे. त्यांत श्रीगणेशाचें वर्णन करतांना, हे श्रीगणेशा! तूंच साक्षात् ब्रह्ममय आहेस, जीवस्वरूप आहेस, तूंच जगत्कर्ता, सर्व धर्ता आहेस, तूंच वाङ्मय, चिन्मय, आनंदाद्वय ब्रह्ममय आहेस, असें म्हटले आहे. प्राय: सर्व आस्तिक ग्रंथकर्त्यांनीं आपापल्या ग्रंथांत या श्रीगणेशाचें नमन केल्याचें आढळांत येते. "श्रीगणेशपुराण" हें प्रमुख उप-पुराण असल्याचेहि सर्व प्रसिद्ध आहे. म्हणून कोणत्याहि कार्यारंभीं " सुमुखश्चैक-दन्तश्च " या श्रीगणेश-द्वादश नामोच्चारणपूर्वक त्याची पूजा करण्याचा वैदिकांचा निरंतरचा संप्रदाय रूढ आहे.

महाराष्ट्रांतील श्रीविठ्ठल-भक्ति-मंदिराचा, भागवत्-धर्म मंदिराचा पाया रचणाऱ्या संतसम्राट् श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीहि आपल्या श्रीज्ञानेश्वरी ग्रंथांत श्रीगणेशास नमन केले आहे. त्या नमन करण्यांत त्यांनी आपली " अद्वैताची बैसका " मुळींहि सोडली नाहीं. " एकं संतं बहुधा कल्पयंति " एकाच देवानें ही अवघीं उपाधिकल्पित सोंगें धारण केली आहेत. ही वैदिक अद्वैत-बैसका न सोडतां व न मोडतां त्या त्या प्रवृत्ति निमित्तानुसार, भक्तानुग्रहार्थ स्वेच्छामय विग्रह-रूप अशी अनंत रूपें व अनन्त वेषें धारण करून एकच परमेश्वर अवतीर्ण होतो. त्या त्या अवतार कार्यानुगुण अशी अनंत नामेंहि त्या एकासच प्राप्त होतात. अशा अद्वैताच्या बैसकेवरून शब्दब्रह्मरूपी, संपूर्ण वेदवाङ्मयरूपी श्रीगणेशाचे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी या ग्रंथाचें आरंभीं केलेले अमृतमधुर, रसपूर्ण, तत्त्वस्पर्शयुक्त वर्णन म्हणजे शांतरसपूर्ण असें एक आध्यात्मिक नितांत सुंदर रूपक होय. बाराव्या अध्यायांतहि श्रीहरीच्या स्वरूपाचा परस्परांत तत्त्वबोधक संवाद करणाऱ्या भक्तांचे "संवाद चतुष्पथीचे गणेश" म्हणून वर्णन केले आहे. तेराव्या अध्यायांत श्रीज्ञानेशांनी " आत्मरूप श्रीगणेशा " चे स्मरण केले आहे. तर सतराव्या अध्यायाचें प्रारंभीं श्रीगुरूंनाच " श्रीगणेंद्र " म्हणून नमन केले आहे. या सर्व आध्यात्मिक रूपकांत अद्वैत बैसका यत्किंचितहि चळूं-ढळूं न देतां, ती अद्वैत भूमिका अनेक रूपकांच्याद्वारां स्पष्ट केली आहे. असा यांतील श्रीज्ञानेशांच्या अनन्य साधारण महत्त्वांपैकीं एक विशेष आहे, असें म्हणणें अल्पोक्ति व अतिशयोक्ति उभय दोष विमुक्त आहे हे खास. यतिसम्राट् श्रीशंकराचार्यांनीहि आपल्या स्तोत्रवाङ्मयांत श्रीगणेशाचें नितांत रमणीय वर्णन केले आहे ते असे :—

> **गलद्दान गण्डं मिलद्भृङ्ग खण्डं,**
> **चलच्चारु शुण्डं जगत्त्राण शौण्डम् ।**
> **लसद्दन्त काण्डं विपद्भङ्ग चण्डं,**
> **शिव प्रेमपिण्डं भजे वक्रतुण्डम् ॥ १ ॥**

ज्याच्या गण्डस्थळांतून दानोदक स्रवत आहे. त्या मदामृताच्या सुगंधानें आकृष्ट झालेले भ्रमर समुदाय त्या गंडस्थळाभोंवती सदा गुंजारव करीत आहेत. ज्याची अपूर्व सुंदर सरळ सोंड इकडून तिकडे अशी एकसारखी फिरत आहे. जो जगत् रक्षण करण्यांत कुशल असून सोंडेच्या उभय बाजूस दांत शोभत आहेत, निजभक्तांच्या विघ्ननाशार्थ जो पूर्ण समर्थ आहे, किंबहुना ! ! जो श्रीशंकराचे मूर्तिमंत प्रेमच आहे. त्या वक्रतुंडास मी प्रेमपूर्वक भजत आहे, असे यतिसम्राट् श्रीशंकराचार्य या काव्यात्मक रसपूर्ण 'एक श्लोकीं'त श्रीगणेशाचे वर्णन करतात. " तुजलागीं जे मूढ " म्हणजे वक्र, अमंगळ प्रवृत्तीचें लोक आहेत. त्यास 'तुंडयति' म्हणजे तुडवितो, म्हणून " तयासी तूं वक्रतुंड" पण "ज्ञानीयासी तरी अखंड उजूचि आहासी " असे मोठ्या गौरवपूर्ण व अर्थगर्भ विशेषणांनी सन्तसम्राट् श्रीज्ञानेशांनीहि या श्रीगणेशाचें वर्णन केले आहे, असो.

**१. एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु ।**
**तो बौद्धमत संकेतु । वार्तिकांचा** ॥ अ. १, ओ. १२.

श्रीपरशुराम एकदां श्रीशंकराचें भेटीस आले. त्यावेळीं श्रीशंकर निद्रिस्त होते. त्यावेळीं त्यास श्रीगणेशानें आंत जाण्यास मज्जाव केला. त्यामुळें दोघांत युद्ध झाले. त्यांत श्रीगणेशानें सोंडेंत धरून परशुरामास फिरविले व थोपवून धरिले. त्यांत परशुरामानें अतिशय क्रोधयुक्त होऊन परशु फेकला तो श्रीशंकराचाच होता. म्हणूनच परशुरामानें फेकलेल्या त्या परशूचा वार श्रीगणेशानें आपल्या दांतावर झेलला म्हणून श्रीगणेशाचा एक दांत खंडित म्हणजे तुटलेला आहे. या इतिहासाचा श्रीज्ञानेशांनी "स्वभावता खंडितु" असा उल्लेख करून बौद्धमत स्वभावतःच खंडित असल्याचें सांगितलें आहे.

## २. म्हणौनी जनमेजयाचें 'अवलीळा' । दोष हरले ॥

अ. १, ओ. ३७.

जनमेजय राजानें, आपला पिता परीक्षिति, हा सर्पदंशानें मरण पावला म्हणून, त्याचा सूड उगविण्याकरितां सर्पसत्र आरंभिलें व त्या यज्ञांत सर्पांच्या आहुत्या पडूं लागल्या; पण मुख्य तक्षकाची आहुति पडेना. कारण, त्यास इंद्राचें साहाय्य मिळाले होते. इंद्रानें ब्राह्मणवेष धारण करून जनमेजयाकडे याचना केली व तक्षकाला जीवदान मिळालें.

इंद्रानें अशा रीतीनें आपणास फसविलें म्हणून त्याच्या मनांत सर्व ब्राह्मण वर्गाविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन त्यानें त्यांना राज्यांतून हांकलून दिलें. ही हकीगत व्यासांना कळतांच त्यांना अत्यंत वाईट वाटले. जनमेजयाच्या घराण्याचा व्यासांना फार अभिमान होता व त्या घराण्याचा उत्कर्ष व जयजयकार व्हावा अशी त्यांना फार इच्छा होती; म्हणून त्यांनी आपल्या दोन शिष्यांना जनमेजयाच्या पूर्वजांचा इतिहास ज्याच्यांत आहे, असें भारत त्यास वाचून दाखविण्यासाठीं पाठविलें; परंतु जनमेजयानें उन्मत्तपणानें त्या शिष्यांचा अपमान करून आपल्या पूर्वजांचीच निंदा केली. शिष्यांना त्याचा राग येऊन त्यांनी "या तुझ्या निंदेमुळें तूं कुष्ठरोगानें ग्रस्त होशील" असा त्याला शाप दिला. पुढें खुद्द व्यासांनी त्यास 'तूं एका विशिष्ट दिशेला जाऊं नकोस, तेथें स्त्री भेटेल, तिच्याशीं लग्न करूं नकोस, तिच्या सल्ल्याप्रमाणें वागूं नकोस' वगैरे उपदेश केला. पण त्या उपदेशाविरुद्ध वागून जनमेजयानें विवाह केला; व त्या राणीच्या सल्ल्यानुसार वागूं लागला. राणीनें सांगितल्यावरून पिपीलिका पर्वतावर त्यानें नरयाग आरंभिला व त्या यज्ञांत खुद्द इंद्राचीहि आहुति पडण्याची पाळी आली; तेव्हां इंद्र भगवंताला शरण गेला. भगवंतानें यज्ञ करणाऱ्या अठरा ब्राह्मणांवर मोहनी घातली व त्यामुळें यज्ञकार्य बंद पडून यज्ञकुंडें विझून गेलीं. हा प्रकार राजाराणीस समजतांच तीं दोघें यज्ञ मंडपांत आलीं. पाहतात तों ब्राह्मण निद्रिस्त आहेत असें त्यास दिसलें. राणीच्या सल्ल्यानुसार त्यानें ब्राह्मणांच्या अंगावर थंड पाण्याचें सिंचन केलें; परंतु त्या जलकणांची भयंकर शस्त्रें होऊन त्या शस्त्रांनी ते अठरा ब्राह्मण शतखंड झाले; तो जनमेजय कुष्टरोगानें व्यापिला गेला. तो प्रकार पाहून जनमेजय भयभीत होऊन दुःख करूं लागला व त्यानें व्यासांचा धांवा केला. 'तूं आपल्या पूर्वजांची निंदा केलीस आणि भारत ऐकलें नाहींस म्हणून ही आपत्ति तुझ्यावर आली आहे; तर तूं आतां भगवंतांना प्रसन्न करून घे' असें व्यासांनी त्यास सांगितल्यावरून त्यानें भगवंताचे ध्यान करून त्यास प्रसन्न करून घेतलें.

भगवंतांनी "तूं जनमेजयास भारत वाचून दाखव म्हणजे तो [ केवळ महाभारताच्या श्रवण करण्यानेंच ] ब्रह्महत्येच्या व कुष्ठरोगाच्या आपत्तींतून सहज लीलेनें मुक्त होईल" असें व्यासांना सांगितलें. व्यासांनीं तीं अठरा प्रेतें मंडपांत आ न अठरा हात कृष्णवर्णाचे वस्त्र मध्यें धरून पलिकडे जनमेजयाला बसविलें व वैशंपायन ऋषींकडून त्यास भारत ऐकविल. प्रत्येक पर्वाबरोबर एक एक ब्राह्मण जीवंत होऊन एकेक हात कृष्णवस्त्र पांढरे होत गेलें. अशा रीतीनें संपूर्ण अठरा पर्वे भारत ऐकल्यावर ते अठराहि ब्राह्मण जीवंत झाले. अशा केवळ श्रवणाच्या महान् प्रभावामुळें ते सर्व वस्त्र पांढरें झाले व राजाचा कुष्ठरोग संपूर्ण नाहींसा झाला. यांत महाभारत श्रवणाचें माहात्म्य सांगितलें आहे.

## ३. कीं टिटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं ।

अ. १, ओ. ६८.

एका टिटवीनें समुद्रतीरीं अंडीं घातलीं होती. तीं समुद्राच्या कडेला एका कपारींत नीट ठेवली होती. तीं एका बेडकीनें गिळून, ती समुद्रांत जाऊन बसली. त्यावेळीं टिटवा आणि टिटवी दुःखित होऊन समुद्रापाशीं आपलीं अंडीं परत मागूं लागली. परंतु समुद्र तीं देईना. तेव्हां त्या दोघांना राग येऊन त्या दोघांनीं समुद्र कोरडा करून आपली अंडीं परत मिळविण्याचा चंग बांधला. आपल्या चोचीनें समुद्राचें पाणी तीं उपसू लागलीं. त्यांना या वृथा प्रयत्नापासून परावृत्त करण्याचा फारांनीं प्रयत्न केला; पण त्यांनी आपला प्रयत्न कित्येक दिवसपर्यंत सोडला नाहीं. त्यांचा निश्चय पाहून पक्षीराज गरुडाला त्यांची दया आली. म्हणून गरुडानें धांवून येऊन आपल्या सामर्थ्यानें त्यांची अंडीं त्यास परत आणून देवविली. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं गीताशास्त्र हें समुद्रासारखे अमर्याद असून त्याचा अर्थ करण्याचा आपला प्रयत्न या टिटव्यांनीं समुद्र उपसण्यासारखाच आहे, असें सांगून आपली विनयपूर्णताच दर्शविली आहे.

**४. या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी । जथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारौनी ॥**

अ. १, ओ. ७०.

कैलासांत श्रीशंकर पार्वतीसह बसलें असतां एकदां तेथें नारद व सनत्कुमारादि मुनि आले. त्यांनी गीतेचें महात्म्य वर्णिलें, ते ऐकून पार्वतीनें 'गीतेचें तत्त्व काय आहे?' असा प्रश्न केला. तेव्हा श्रीशंकरांनीं "हे पार्वती! जसें तुझें स्वरूप नित्यनूतन असून अपार आहे, त्याप्रमाणें सर्व उपनिषदांचें सार गीताशास्त्रांत आहे. त्यामुळें गीतेच्या तत्त्वाचें स्वरूप नित्य नवेच असून त्यास जाणणें अवघड आहे" अशी गीतेची थोरवी वर्णन केली.

**५. ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमन्त शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेसीं ॥**

अ. १, ओ. १४१.

एकदां अर्जुन तीर्थयात्रा करण्याचे निश्चित करून तो फिरत-फिरत सेतुबंध रामेश्वरास आला. तेथें रामभक्त हनुमंताची गांठ पडली. तेव्हां त्यास अर्जुन आपल्या धनुर्विद्येच्या गर्वांत म्हणाला "रामचंद्राचा धनुर्विद्येंत प्रभाव कसा होता." त्यावर हनुमंत स्वानुभवानें प्रभूच्या ऐश्वर्याचें वर्णन करूं लागला. पण या भाषणावर अर्जुनाची प्रमाबुद्धि झाली नाहीं. त्यास स्वसामर्थ्याविषयीं गर्व असल्यामुळें संशय निर्माण झाले. तो मारुतीस म्हणाला—मारुते! "मीं स्वर्गापर्यंत बाणांचा सेतू तयार करून इंद्राचा ऐरावत आणला होता, तसें रामाला लंकेंत जातेवेळीं सेतू तयार करतां आला नाहीं. यावरून धनुर्विद्या कोणाची अप्रतीम आहे याचा तूंच विचार कर." हे अर्जुनाचें भाषण ऐकून मारुती हंसून म्हणाला, अर्जुना! तुला आपल्या विद्येचा वृथा अभिमान आहे. बाणांचा सेतू करणें रामाला कांहीं अशक्य नव्हते, पण अठरा पद्में वानर सैन्य जाण्यास तो टिकला नसतां. म्हणून रामानें दगडाचा सेतू बांधला. बाणांचा सेतू असतां तर माझ्या एकट्याच्याच भारानें मोडून गेला असतां. त्यावर अर्जुन म्हणाला, आतां मी बाणांचा सेतू तयार करतों, तो जर तूं मोडून टाकशील तर मी तुझें भाषण खरें मानीन. तेव्हां मारुति प्रतिज्ञापूर्वक म्हणाला कीं, मजकडून सेतू मोडला गेला नाहीं तर तुझ्या रथावर बसून ध्वजस्तंभाचे संरक्षण करीन. कारण, मला मरण येणें शक्य नाहीं, नाहींतर मी अग्निप्रवेश करून प्राणच दिला असतां. अर्जुन म्हणाला, जर तूं माझा सेतू मोडून टाकला तर मी अग्निप्रवेश करून प्राणच देईन. असें ठरल्यावर हनुमंतानें अर्जुनकृत सेतूवर उडी मारून तो मोडून टाकला व अर्जुन ठरल्याप्रमाणें अग्निप्रवेश करण्यास सिद्ध झाला. इतक्यांत भगवान् श्रीकृष्ण विप्रवेष धारण करून त्या ठिकाणीं आले व अग्निप्रवेश करण्याचें प्रवृत्तिनिमित्त विचारूं लागले. तेव्हां सर्व प्रकार त्या ब्राह्मणास अर्जुनानें निवेदन केला. भगवान् श्रीकृष्ण म्हणाले यास साक्षीदार कोण? तो कोणीहि नसल्यामुळें मी हे खरें मानीत नाहीं, तेव्हां हा प्रकार पुनः माझ्या समक्ष करा. तेव्हां अर्जुनानें सेतू केला व त्याखालीं देवानें आपलें सुदर्शनचक्र घातलें. मारुतीनें सर्वशक्ति एकवटून त्यावर उडी घातली; पण सेतू मोडतां आला नाहीं; उलट तोच उसळून दूर पडला. हे पाहून मारुतीस आश्चर्य वाटून हा ब्राह्मण कोणी तरी देवपुरुष असावा असा निश्चय झाला व त्यानें त्याची स्तुती करून आपलें सत्यरूप प्रकट करण्याविषयीं प्रार्थना केली. तेव्हां देवानें त्यास रामरूपांत दर्शन देऊन असें सांगितलें कीं, अर्जुन हा दुष्ट-दमनार्थ जन्मास आला आहे. तेव्हां तूं त्याच्या ध्वजस्तंभावर बसून त्याचे संरक्षण करीत जा. तात्पर्य—भगवंतांनी ध्वजस्तंभाजवळ बसून अर्जुनाचें संरक्षण करण्याविषयीं सांगितलेल्या आज्ञेचा इतिहास सांगून अर्जुनास साक्षात् शंकराचाच अवतार असलेल्या मारुतीचें साह्य असल्याचें यांत सांगितलें आहे.

**६. जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥** अ. १, ओ. २००.

पांडव वनवासांत असतां एकदां अर्जुन पाशुपत अस्त्राच्या प्राप्तीसाठीं इंद्रकिल पर्वतावर तपश्चर्येला गेला व त्यानें श्री शंकराची आराधना चालविली. तेव्हां त्याच्या शौर्याची परीक्षा पाहण्यासाठीं शंकरानें मूळ नांवाच्या दैत्याला वराह रूप देऊन आपण किराताचा म्हणजे भिल्लाचा वेष घेतला व धनुष्य बाण घेऊन त्या वराहाचा पाठलाग करीत अर्जुन जेथें तपश्चर्येला बसला होता त्या स्थानीं आले. तो वराह अर्जुनाजवळ आला व त्यानें त्याला धक्का दिला. तपश्चर्या करीत बसलेल्या अर्जुनाला त्या वराहानें निष्कारण केलेला प्रमाद सहन न होऊन त्यानें त्यावर बाण सोडिला. त्यावेळीं वराहाचा पाठलाग करीत असलेल्या किरातरूपी शंकरानेंहि त्यावर बाण सोडिला. त्या दोघांच्या बाणांनीं वराह मरण पावला. तेव्हां भिल्लरूपी शंकर पुढें झाले व ही शिकार माझी आहे म्हणूं लागले. अर्जुनाच्या बाणानें वराह पडल्यामुळें तो आपला हक्क सोडीना. शेवटीं त्या दोघांच्या कलहाचे पर्यवसान युद्धांत झालें. शंकराच्या मुष्टिप्रहारानें अर्जुनाला मूर्छा आली. अर्जुनानें बिल्वपत्रें शंकरास म्हणून वाहिलीं तीं किराताच्या मस्तकावर पडूं लागलीं. नंतर हा किरात नसून श्रीशंकर आहेत, असें जेव्हां अर्जुनानें ओळखलें, तेव्हां तो त्यास शरण गेला. अर्जुनाचा पराक्रम व आपल्या ठिकाणची भक्ति पाहून शंकर प्रसन्न

झाले. त्यांनीं त्यास पाशुपत अस्त्र अर्पण केलें. त्यानंतर इंद्रानें अर्जुनास बोलावून नेलें व सांगितलें कीं, पृथ्वीवर समुद्रांत निवात–कवच या नांवाचे राक्षस राहतात. ते माझे शत्रु आहेत. तरी त्यांचा नाश कर. असें म्हणून इंद्रानें आपला दिव्यरथ, अश्व व सारथी अर्जुनाला अर्पण केलें. ही युद्धाची सामुग्री घेऊन अर्जुन परत आला व त्यानें मायावी अशा निवात–कवचांबरोबर भीषण युद्ध केलें. निवात–कवच मायावी कलेंत प्रवीण होते. त्यांनी या मायेच्या बलावर अर्जुनाला मोहित करण्याचा प्रयत्न केला, पण त्या बलाढ्य व मायावी असुरांचाहि आपल्या पराक्रमानें वध करू अर्जुनानें इंद्रास निर्भय केलें. या गोष्टीची आठवण करून देऊन भगवान् अर्जुनाला त्याच्या सामर्थ्याचें स्मरण करून देऊन सांगत आहेत कीं, ज्याअर्थी तूं असें पराक्रम केले आहेस, त्याअर्थी आतां कर्तव्य प्राप्त युद्धांत माघार घेणें योग्य नव्हे.

* * *

## अध्याय दुसरा

**७. जेथोंचिया कृपा लाहिजे वरु । तेथेंचि मनें व्यभिचारु । तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ॥** अ. २, ओ. ३८.

सर्व दैवतांमध्यें महादेव सत्वर प्रसन्न होणारे आहेत, म्हणून त्यास आशुतोष म्हणतात. अशा महादेवाची भस्मासुर नांवाच्या एका दैत्यानें अराधना करून त्यास प्रसन्न करून घेतलें आणि ‘ मी ज्याच्या मस्तकावर हात ठेवीन त्याचें भस्म व्हावें ’ असा वर मागितला. शंकरांनी ‘ तथास्तु ’ म्हणून त्याची इच्छा पूर्ण केली. त्या वरानें उन्मत्त झालेला तो दैत्य त्रिभुवनांत संचार करून सर्व प्राण्यांच्या मस्तकावर हात ठेवून त्यांचे भस्म करूं लागला. त्याचें निवारण कोणीच करूं शकला नाहीं. अशा स्थितींत एकदां नारदानें त्याची गांठ घेतली. तेव्हां तो नारदाच्या मस्तकावर हात ठेवण्यास धांवला. नारदानें त्याचें क्षणभर निवारण करून म्हटलें, माझें ‘ तूं खुशाल भस्म कर, माझी कांहीं हरकत नाहीं,पण त्या पूर्वीं माझी एक सूचना ऐक; आमच्यासारख्या क्षुद्र जीवांना मारून तुला कसला लाभ होणार ? त्यापेक्षां बलाढ्य अशा शंकराचा नाश करशील तर सौंदर्यमूर्ति जगन्माता पार्वती अनायासें तुला प्राप्त होईल. ’ नारदाच्या या उपदेशानें तो मूर्ख दैत्य संतुष्ट झाला. त्यानें नारदाला जीवन्त सोडलें व ज्याच्या वरानें तो इतका सामर्थ्यवान् झाला त्याच शंकराच्या मस्तकावर हात ठेवून त्यांचे भस्म करावे आणि पार्वतीचें हरण करावे, अशा पापबुद्धीनें तो कृतघ्न दैत्य कैलास पर्वतावर जाऊन महादेवाच्या मस्तकावर हात ठेवण्यास धांवला. त्यावेळीं आपल्या वराचें अमोघ सामर्थ्य जाणून महादेव भयभीत झाले व भीतीनें पळूं लागले. भस्मासुर त्यांचा पाठलाग करीत त्यांच्या मागें लागला. अशा प्रकारें पळतां पळतां महादेव वैकुंठाला गेले व त्यांनीं श्रीविष्णूला सर्व प्रकार निवेदन केला. तेव्हां भगवान् विष्णूंनीं मोहीनीचें रूप धारण केलें व भस्मासुराला भुलविलें. तसा तो दैत्य मोहित झाला व मोहिनी सांगेल तसें वागण्यास तयार झाला. मोहिनीनें त्याला आपल्याप्रमाणें नृत्य करावयास सांगितलें व नृत्य आरंभिलें. भस्मासुरहि मोहिनीरूपी भगवानांसारखेंच नृत्य करूं लागला. तो आपलें अनुकरण करण्यास चुकत नाहीं, असें पाहून मोहीनीनें नाचतां नाचतां आपलें दोन्हीं हात मस्तकावर ठेवले. भस्मासुरानेंहि वराचे भान न राहून आपले हात स्वतःच्या मस्तकावर ठेवले. तेव्हा तत्क्षणींच तो भस्म झाला. याप्रमाणें भगवानांनीं शंकरासह सर्व प्राण्यांचा वैरी नाहींसा केला. या कथेचा दृष्टान्त देऊन अर्जुन म्हणतो कीं, भस्मासुर जसा वरदात्या शंकराच्या जीवावरच भस्म करण्यास उठला, तसा मी भीष्म द्रोणदिक ज्या पूज्य गुरूंनी आम्हाला शस्त्रास्त्रांचें शिक्षण देऊन अत्यंत उपकार केले आहेत त्यांच्याच जीवावर उठून उलट्न भस्मासुरासारखा पापी–कृतघ्न होऊं काय ? अशाप्रकारें प्रत्यक्ष गुरूंचा वध करणारे हे युद्ध करणें मला योग्य वाटत नाहीं.

* * *

## अध्याय तिसरा

**८. देख पां जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥** अ. ३, ओ. १५२.

जनक राजा ज्ञानी होता तरी तो प्रारब्धप्राप्त प्रपंच करीतच होता. तो आपल्या मिथिला नगरींत राहून राज्यशासन, प्रजापालन करीत असे. त्याचे स्त्री–पुत्रादिकांशीं उचित व्यवहारहि चालूं होते. परंतु तो ब्रह्मात्मैक्यज्ञान संपन्न असून त्या कर्मांत आसक्त नसल्यामुळें अखेरपर्यन्त कर्म करूनहि मुक्त अवस्था भोगीत होता. जनकाप्रमाणें, इतर निष्काम मुनींचीहि अशी अनेक उदाहरणें आहेत. सारांश, स्वभाव प्राप्त निष्काम कर्मानुष्ठान करणें अंतःकरणशुद्धिद्वारां मोक्षास कारणीभूत आहे, असें सांगितलें आहे.

**९. मूल गुरुपत्र आणिला । तो तुवां पवाडा देखिला । तोही मी उगला । कर्मी वर्ते ॥** अ. ३, ओ.१६३.

बंधु बळीभद्र व भगवान् श्रीकृष्ण "सांदिपनी" संज्ञक गुरूगृहीं सर्व वेदाचें सांगोपांग अध्ययनासाठीं व धनुर्वेद शिकण्यासाठीं राहिले होते. त्यांचें अध्ययन संपल्यावर गुरुदक्षिणा देऊन स्वगृहीं जाण्याची वेळ आली. तेव्हां गुरूंनीं "माझा मृतपुत्र आणून दे" अशी गुरुदक्षिणा मागितली तेव्हां श्रीकृष्णांनीं यमलोकीं जाऊन यमधर्मांचा पराभव करून श्रीगुरूंचा तो मृतपुत्र परत आणला व त्याला सजीव करून गुरूचरणीं अर्पण केला. ही कथा सांगून भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले कीं, अशा पराक्रमी आणि नित्यतृप्त असूनहि मी ज्याप्रमाणें आश्रम विहित कर्मे केलीं, त्याप्रमाणें तुलाहि तुझ्या वर्णाश्रमाला उचित असलेलें कर्तव्य कर्म करणें अवश्य आहे. तूं अद्यापि कृतार्थ झालेला नाहींस, त्याअर्थी तुला प्राप्त कर्तव्य सुटत नाहीं.

* * *

## अध्याय चवथा

**१०. मग देव म्हणे पंडुसुता। हाचि योगु आम्हीं विवस्वता। कथिला परी ते वार्ता। बहुतां दिवसांची ॥** अ. ४, ओ. १६.

विवस्वान्–बारा आदित्यांतील एक होय. याला त्याच्या संज्ञा नामक पत्नीपासून श्राद्ध देव [ वैवस्वत मनु ] यम आणि यमुना हीं तीन अपत्यें झालीं. स्वायंभूव मन्वादि सर्वसाधारण अभिप्रायानेंच हा भगवंताचा उपदेश आहे. तरीपण सांप्रतिक वैवस्वत मन्वंतर अभिप्रायानें विवस्वानापासूनचा हा संप्रदाय सांगितला आहे. मन्वंतराच्या आरंभीं हा ज्ञानयोग व बुद्धीयोग, मी विवस्वानास, आणि विवस्वानानें आपला पुत्र चालू मन्वंतराचा अधिपति स्वायंभूवमनु, यांस आणि मनुनें इक्ष्वाकुला सांगितला अशी ही ज्ञान परंपरा माझ्यापासून चालू झाली आहे म्हणजे आजच तुला हा उपाय नव्यानें सांगतों असें नव्हे. सारांशः–तिसऱ्या अध्यायांत सांगितलेला निष्काम कर्मयोग प्रामाणिक स्वरूपानेंच सिद्ध आहे; तथापि अर्जुनाची प्रामाण्यबुद्धि निर्माण होऊन अधिक रुचि निर्माण व्हावी. म्हणून भगवान् सिद्ध परिगृहीत परंपरा सांगत आहेत.

* * *

## अध्याय पांचवा

**११. पाहे पां श्रीशंभूची प्रसन्नता। तया उपमन्यूचिया आर्ता। काय क्षीराब्धि दूध भाता। देउजेचि ना? ॥** अ. ५, ओ. ११.

उपमन्यु हा वसिष्ठ कुलांतील व्याघ्रपादाचा वडील मुलगा. धाकट्याचें नांव धौम्य. घरची अत्यन्त गरिबी; तेव्हां साहजिकच आई या दोघांना दूध म्हणून पाण्यांत पीठ कालवून देत असे. एकदां ते दोघे पुत्र दुसऱ्याच्या घरीं खेळावयास गेले असतां तेथील मुलांबरोबर यांनाहि ताजे काढलेलें दूध देण्यात आले. हा वेळ पावेतों उपमन्यूनें खऱ्या दुधाची चव घेतलीच नव्हती. तेव्हां घरीं आल्यावर हा दुधासाठीं हट्ट धरून बसला. नेहमींचे पीठपाणी तो घेईना. आईनें वैतागून म्हटलें कीं, 'खरें दूध मिळण्याजोगे तुमचे पूर्वजन्मींचें ईश्वराराधन नाहीं,' तेव्हां तें तुम्हाला कोठून मिळणार? हे ऐकून उपमन्यूनें कडक भक्तिपूर्वक तपाचरण सुरू केले व श्रीशंकर त्याची उत्कट भक्ति पाहून प्रसन्न झाले. शंकरांनी याला सदैव दुधाची प्राप्ति व्हावी म्हणून क्षीरसमुद्र [ दुधाचा सागरच ] त्याला बहाल केला परमात्म्याच्या कृपेला वय, जाति, वर्ण या कशाचीहि अपेक्षा नसून तो केवळ शुद्ध भावनेनें प्रसन्न होतो व ज्याची जशी भावना असेल तसे त्यास फल देतो. इतकेच नव्हे तर श्रीकृष्णाचे औदार्य अगाध असल्यामुळें त्यांनीं अर्जुनाला सुखाचा वसौटाच केला.

* * *

## अध्याय सहावा

**१२. तो गीतेमाजीं षष्ठीचा। प्रसंगु असे आयणीचा। जैसा क्षीरार्णवीं अमृताचा। निवाडु जाहला ॥** अ. ६, ओ. १०.

समुद्रमंथन झाल्यावर भगवानांनीं मोहिनीचें रूप धारण करून उन्मत्त असुरांना मोहित करून सुरा पाजली व अमृत देवांना दिले. यालाच 'अमृताचा निवाडा' म्हणतात. या दृष्टांताप्रमाणेंच भगवान् श्रीकृष्णांनीं गीतारूपी क्षीरसागराचें मंथन करून हे अमृततत्त्वरूपी अमृत मुमुक्षूंना दिले आहे.

* * *

## अध्याय सातवा

**१३. गरुडासारखीं वाहनें। मज सुरतरूंचीं उद्यानें। कामधेनूंचीं गोधनें। अर्पिलीं तेणें ॥** अ. ९, ओ. ३९२.

अत्यन्त गतिमान् असे विष्णूचे वाहन म्हणजेच गरुड होय. कश्यप नांवाचा एक ऋषि होता. त्याला कद्रु व विनता नांवाच्या दोन भार्या होत्या. गरुड हा विनतेचा पुत्र होय. त्याला मातेच्या नांवावरून "वैनतेय" हि म्हणतात. त्यानें आपल्या मातेला सवतीच्या दास्यांतून मुक्त केले व देवाबरोबर युद्ध करून स्वर्गातील अमृत हरण केलें. तेव्हां त्याच्या साम–

र्थांची सर्वांनीं प्रशंसा केली. एकदां भगवान् विष्णूनें गरुडाला संपूर्ण गरुडपुराण सांगितलें व अमृताविना अमृतत्व दिले. ते ऐकून प्रसन्न झालेला गरुड भगवंताच्या इच्छेप्रमाणें त्यांचे सदैव वाहन होऊन राहिला. तेव्हांपासून भगवानांस गरुड-वाहन, गरुडध्वज हीं नांवें प्राप्त झालीं.

**१४. मी सुदामयाचिया सोडीं गांठीं । पव्हयां लागीं ।।** अ. ९.ओ. ३९४.

सुदामा नांवाचा एक दरिद्री ब्राह्मण कृष्णाचा बालपणचा मित्र होता. कृष्ण द्वारकेत वैभवाच्या शिखरीं पोंचलें तरी हा दारीद्र्यांतच दिवस काढीत होता. पण कृष्णाजवळ कांहीं याचना करावी असें त्याच्या मनांतसुद्धां येईना! बायकोनें अनेकवार आग्रह केल्यावर हा कृष्णाकडे जाण्यास तयार झाला. बरोबर कांहीं भेट घेणें अवश्य; पण जवळ तर कांहीं नाहीं; तेव्हां काय करावे हा विचार पडला. तेव्हां बायकोनें थोडें पोहे उसने आणून त्याच्या फाटक्या धोतरांत बांधले. द्वारकेला पोंचल्यावर कृष्णानें यांचें चांगले आतिथ्य केले व वहिनीनें मला काय दिले आहे ते दाखव पाहूं. सुदामास षड्गुणैश्वर्य-संपन्न भगवंतास पत्नीनें उपरण्याच्या पुरचुंडींत बांधून दिलेलें मूठभर पोहे देण्याविषयीं संकोच वाटूं लागला होता. म्हणून सुदाम्याच्या धोतराची गांठ देवांनीं आपल्या स्वतःच्या हातानें सोडून त्यांतील पोहे आवडीनें खाले. नंतर सुदामा कांहीं न मागतां परतला व घराजवळ येतो तों त्याला सोन्याची सुदाम-नगरी दिसली. कृष्णानें पोह्याच्या मोबदल्यांत ती नगरी त्याला न कळत दिली होती.

**१५ पाहे पां सावजे हातिरूं धरिलें । तेणें तया काकुलती मातें स्मरिलें ।।** अ. ९, ओ. ४४२.

एकदां इंद्रद्युम्न राजाला, ‘ तूं गज योनी पावशील ’ असा अगस्तिऋषीनें शाप दिला होता. तसाच शाप देवऋषीनें हू हू गंधर्वास दिल्याकारणानें तो नक्र झाला होता. एकदां गजेंद्र पुष्करतीर्थांत जलप्राशनार्थ उतरला असतां त्याचा पाय नक्रानें धरला. आतां आपण वांचत नाहीं, हे पाहून व गजेंद्राचा सर्व परिवार तो संकटांत पडला असें पाहून त्यास सोडून गेला. आतां या प्राणांतिक संकटांतून सोडविणारा भगवानाशिवाय दुसरा कोणी नाहीं, असें जाणून गजेंद्रानें विष्णूचा अनन्य भक्तीनें धांवा मांडला व त्याला अर्पण कर-ण्याकरितां अखेरचे म्हणून त्याच सरोवरांतील एक कमलपुष्प सोंडेनें तोडून वाहिलें. तेंव्हां विष्णु प्रसन्न होऊन त्याला सोडविण्यासाठीं गरुडावर बसून आले व नक्राला मारून गजेंद्राला मुक्त केले व त्या बरोबरच नक्रहि विष्णु स्पर्शानें शापमुक्त झाला.

**१६. पाहे पां भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यीं देवां आणिले उणें । माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिये महिमे ।।** अ. ९, ओ. ४५०.

महान् पराक्रमी हिरण्यकश्यपु दैत्याला कयाधु राणीपासून प्रल्हाद मुलगा झाला. हा गर्भामध्यें असल्यापासूच भगवन्निष्ठ होता. हा जन्मल्यानंतर त्याला हरि नामाखेरीज कांहींच प्रिय नव्हते. त्यानें विष्णुभक्ति सोडावी म्हणून बापानें त्याला छळले, विष दिलें, कड्यावरून खालीं लोटलें. अशा नाना प्रकारांनीं त्याला त्रास दिला; परंतु प्रल्हाद भक्ति करण्याचें सोडीना. त्याच्या बापानें त्याला विष दिलें; पण तें त्यास बाधा करूं शकले नाहीं; कारण, भगवानच विष होत राहिलें, शेवटीं, ‘ तुझा देव कोठें आहे तो दाखव म्हणजे त्याला ठार करतो ’ असें बापानें विचारतांच, ‘ देव जगांत सर्वत्र भरला आहे ’ असे प्रल्हादानें उत्तर दिले. सर्वत्र भरला आहे तर या खांबांत आहे कां ! ’ असें म्हणून खांबावर लाथ मारतांच त्यांतून विष्णूचा ‘ नृसिंहावतार ’ प्रगट झाला.

या हिरण्यकश्यपूनें ब्रह्मदेवापासून असा वर मिळविला होता कीं, घराच्या आंत–बाहेर, दिवसा–रात्रीं, नर किंवा पशू, शस्त्र आणि अस्त्र, सजीव आणि निर्जीव पदार्थ इत्यादि-कांपासून मला मृत्यु नसावा. या वरामुळें आपण मृत्युपासून निर्भय आहों, असें तो समजत होता. संध्याकाळी उंबऱ्यावर बसून नखांनी नृसिंहरूपी विष्णूनें त्याला ठार मारलें व प्रल्हादाचें रक्षण केलें. प्रल्हाद चरित्र इतकें पावन आहे कीं, ते वर्णिल्यानें ईश्वर भक्तीपासून मिळणारें फळ मिळते. तात्पर्य मत्स्य, कूर्म, हयग्रीव, वराह, नृसिंह, श्रीराम, श्रीकृष्ण इत्यादि अवतार हें “ लेणें ” म्हणजे अलंकार ज्या मूळ स्वरूपात्मक संदुकेंत सांठविलेलें असतात ते मूळ विराट्रूप असून सर्व अवतार साक्षात् मायाकार्य, स्वेच्छामय विग्रहस्वरूप म्हणजे “ अलंकार ” स्वरूप असल्याचे सांगून सुचविलें आहे.

**१७. नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसे ? ।।** अ. ९, ओ. ४६६.

‘ कोणत्याहि बुद्धीनें माझी भक्ति केली असतां मी पावतो’ असे सांगतांना भगवान् अनेक भक्तांचीं उदाहरणें देत आहेत. एकदां सनत्कुमार वैकुंठीं गेले असतां जय-विजय या द्वारपालांनी त्यांस राजमंदिरांत जाण्यास अडथळा केला. तेंव्हां त्यांनीं त्या दोघांस शाप दिला कीं, तुम्ही तीन जन्म मृत्युलोकीं भगवद्द्वेष्टे व्हाल. तेंव्हां त्यांनी सनत्कुमारांची प्रार्थना करून विरोध भक्तीनें तरी आम्हांला ‘ भगवत्स्मरण घडावे व अखेर भगवानाच्या हातून मृत्यु येऊन सायुज्य प्राप्ति व्हावी ’ असा उःशाप मागून घेतला. त्या शापानुसार, हिरण्याक्ष-

हिरण्यकशिपु, रावण–कुंभकर्ण, दंतवक्र–शिशुपाल, असें तीन जन्म त्यांना प्राप्त झाले व प्रत्येक जन्मांत त्यांनीं परमात्म्याशीं वैर केले. हिरण्यकश्यपु नृसिंहरूपी भगवानाच्या हातून प्राणास मुकला. रावणाला श्रीरामचंद्राच्या हातून मरण आलें व शिशुपाल श्रीकृष्णाच्या चक्रानें मरण पावला.

यदुकुलांत उग्रसेन राजाचा पुत्र कंस याला देववाणीनें बजाविले कीं, 'तुझी [ चुलत ] बहिण देवकी हिचा आठवा मुलगा तुला मारील' तेव्हा कंसानें देवकीला बंदींत ठेवून तिची सात मुलें मारलीं; पण आठव्याच्या वेळीं देवकीचा पति वसुदेव यानें मुलगा जन्मतांच तो गोकुळांत पोंचविला. पुढें कंसाला हे कळून त्यानें गोकुळांत वाढणाऱ्या कृष्णाला मारण्यासाठीं अनेक राक्षस पाठविलें. शेवटीं अक्रूराला पाठवून कृष्णाला मथुरेंत आणिलें व त्याच्या अंगावर बलवान् मल्ल सोडले, कृष्णानें त्यांना मारून कंसाचाहि शिरच्छेद केला. या कंसाला जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं आपला वैरी कृष्ण दिसत असें त्याची ही विरोधी, भय–भक्ति होती व तो कृष्ण भक्तिनेंच शेवटीं मुक्त झाला.

**१८. अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां ॥**

अ. ९, ओ. ४६७

वसुदेव–देवकी श्रीकृष्णाला लौकिक पुत्राप्रमाणें समजून वात्सल्यप्रेमानें त्याचे लालन पालन करीत होते. त्यांनीं तो परमात्मा आहे, हे न जाणतां जरी त्याच्यावर प्रेम केले तरीहि त्यांचा उद्धार झाला.

**१९. नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इयां भक्तीं धनुर्धरा । प्राप्यु जैसा ॥**

अ. ९, ओ. ४६८

**नारद :–** स्वायंभूव मन्वंतरांतील ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांतील एक. हा पूर्वजन्मीं दासी पुत्र होता; पण भगवंताच्या उत्कट भक्ति ध्यानानें हा जन्म त्यास प्राप्त होऊन तो देवर्षि म्हणून गणला गेला. हा क्षणभरहि भगवद्भजनावांचून काळ घालवीत नाहीं. हा थोडासा कलह प्रिय आहे. यानेंच शंकर पार्वतींत भांडण लावून शंकरास रानांत पाठविलें. हा देव व दैत्य दोघांनाहि पूज्य आहे. यानें प्राचीन बर्हीराजा, चित्रकेतु राजा वसुदेव इत्यादिकांना उपदेश केला. व्यासांना भागवत रचण्यास प्रवृत्त यानेंच केलें. अशा रीतीनें अनेक प्रसंगीं याचा संबंध आलेला आहे. हा महान् भगवद्भक्त आहे.

**ध्रुव :–** स्वायंभूव मनूचा पुत्र जो उत्तानपाद व त्याची स्त्री सुनीति यांचा हा मुलगा. एकदां हा आपल्या बापाच्या मांडीवर बसूं लागला असतां त्याच्या सापत्न मातेनें त्याचा धिःकार केला. त्यामुळें त्यास वाईट वाटून पांच वर्षाचा असतांनाच तो मधुवनांत गेला आणि नारदाच्या उपदेशानें त्यानें उग्र तप केलें. भगवान् प्रसन्न झाले व त्यास ध्रुवपदीं बसविलें. यानें अनेक यज्ञ केले व शेवटीं वैकुंठलोकीं गमन केलें.

**अक्रूर :–** सोमवंशीय श्वफल्काला गांदिनीपासून झालेला मुलगा. कंसाच्या आज्ञेवरून गोकुळास जाऊन हा कृष्णास घेऊन मथुरेस आला. सत्यभामेच्या बापाजवळ असलेल्या स्यमंतक मणि प्रसंगांत याचा फार संबंध आलेला होता. तो. असाः–सत्यभामेचा बाप सत्राजित, त्याचा भाऊ प्रसेन हा तो मणि अंगावर घालून युद्धास गेला असतां, त्याचा जांब राजानें वध केला व मणि नेला. कृष्णानेंच मण्याच्या आशेनें प्रसेनाचा वध केला असा आळ त्याच्यावर आला. कृष्णानें शोध करून जांब राजाशीं युद्ध करून मणि सत्राजितास दिला. सत्राजित लज्जित झाला. त्यानें दोषशमनार्थ आपली मुलगी सत्यभामा व मणि त्यास दिला; पण कृष्णानें आपणास मणि नको, असे सांगून तो त्यास परत दिला. अक्रूरानें तो मणि सत्राजिताचा वध करून पळविला व काशीस जाऊन राहिला. कृष्णानें त्यास परत बोलाविलें व त्याच्या अपराधाची क्षमा केली. हा एक कृष्णाच्या भक्तांपैकीं होता. यादव संहार प्रसंगीं हा भोजासी लढत असतां मेला.

**शुक :–** शिवप्रसादानें व्यासांना प्राप्त झालेला हा पुत्र, जन्मतःच महान्योगी व वैराग्यसंपन्न होता. याला आपल्या वैराग्याचा एकदां गर्व झाला; पण व्यासाच्या सांगण्यानें हा बहुलाश्वनामक जनकराजास भेटावयास गेला. त्याच्या उपदेशानें शुकाचा गर्व परिहार झाला. व्यासांनीं ह्यास भागवत पढविलें. शुकानें त्याच भागवताचा उपदेश परीक्षितीस करून त्याला मृत्यु भयापासून सोडविलें. हा मोठा भगवद्भक्त होता. नारदानें उपदेश दिल्यावर कैलासावरून उडी मारून पंचमहाभूतांत विलीन झाला.

**सनत्कुमार :–**सर्व महर्षींच्या उत्पत्तीपूर्वी ब्रह्मदेवानें, सनक, सनंदन, सनत्सुजात व सनत्कुमार असें चार मानसपुत्र उत्पन्न केले. हे चौघेहि मोठे ब्रह्मनिष्ठ आणि महान् भगवद्भक्त आहेत. यांपैकीं सनत्कुमारानें नारदास ब्रह्मविद्येचा उपदेश केला.

**२०. तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भय संभ्रमें । येरां घातकां मनोधर्में । शिशुपालादिकां ॥**

अ. ९, ओ. ४६९

गोपींचे श्रीकृष्णावर बाह्यतः वैषयिक प्रेम होते. त्या त्यावर अत्यन्त लुब्ध होत्या. तरीहि त्यांची अनन्य भक्ति जाणून भगवंतांनीं त्यांचे मनोरथ पुरविले व त्यांच्या कृपेनें त्याहि उद्धरून

गेल्या. यावरून परमात्म्याची अनन्यभक्ति कोणत्याहि रूपानें केली तरी ती निष्फळ होत नाहीं, हे कंस, शिशुपाल यांच्या विरोधी भक्तीच्या उदाहरणावरूनहिं स्पष्ट दिसत आहे.

**२१. जयाचेनि गा बोलें । अग्नीसी आयुष्य जाहलें । म्हणौनि समुद्रें पाणी आपुलें । दिधलें याचिया प्रीती ॥** अ. ९, ओ. ४७९.

श्वेतकी नांवाचा एक राजा होता; त्यानें बारा वर्षे सारखे यज्ञ चालविले होते. त्या यज्ञांत अग्नीमध्यें हत्तीच्या सोंडे-इतकी जाड तुपाची धार सतत पडत होती. त्यामुळें अग्नीला अपचन झालें व त्याचा वर्ण पांढुरका दिसूं लागला. तेव्हां ऋत्विजांनीं त्याला सर्व खांडववन भक्षण केलें असतां रोग-निवृत्ति होईल असा उपाय सांगितला. परंतु तें वन इंद्राचें होतें. त्याचा नाश करणारास इंद्र प्रतिबंध करील, हें जाणून अग्नि भगवन्तापाशीं गेला व त्यानें 'तें वन धर्मराजाकडून आपल्याला देववावें आणि अर्जुनाकडून आपलें रक्षण करावें' अशी प्रार्थना केली तेव्हां भगवन्तांनीं त्याची विनंति मान्य करून त्याला खांडववन देवविलें. तो तें भक्षण करीत असतां अर्जुनानें इंद्राबरोबर युद्ध करून अग्नीचें रक्षण केले. याप्रमाणें वनस्पतीसह तें वन भक्षण केल्यावर अग्नि रोगमुक्त झाला व त्याचें आयुष्य वाढलें.

आपण ऋत्विजांच्या सांगण्यावरून रोगमुक्त झालों म्हणून त्यास फार आनंद झाला व प्रसन्न होऊन तो वाडव ऋषीस म्हणाला मी आपणास प्रसन्न आहे. आपल्या उपकारांतून उतराई होण्यासाठीं मी आपल्या पोटीं जन्म घेत आहे. अशा रीतीनें तो त्या ऋषींच्या उरुमधून प्रगट झाला. म्हणून त्याचे नांव "**और्वानल**" असें पडलें. त्या और्वानलास पाणी फार लागत असे. म्हणून ऋषींनी समुद्रास विनंती केली अर्थात् ऋषि समुद्राला [ वरुणाला ] अर्घ्यादि देत असल्याकारणें त्याची परस्परांवरील आदरभाव–प्रीती वाढली होती. म्हणून समुद्रानें ऋषीचें म्हणणे मान्य केलें व ऋषींच्या सांगण्यावरून त्या वडवानलास समुद्रानें आपल्या पोटांत राहण्यास जागा दिली.

पृथ्वीवर पर्जन्यरूपानें पडत असलेलें जल भूमीमध्यें जातें व बाकी राहिलेले समुद्रांत सांचतें. असंख्य नद्या जरी समुद्राला येऊन मिळाल्या तरी समुद्राला कधीं पूर येत नाहीं. किंवा तो आपल्या मर्यादेचेहि उल्लंघन करीत नाहीं. याचे कारण समुद्राच्या पोटांत वडवानल नांवाचा अग्नि आहे.तो त्यांतील जल शोषून घेत असतो व समुद्रहि प्रेमानें त्याला सतत जल देत असतो. या सृष्टिनियमास उद्देशून हा दृष्टान्त दिला आहे.

**२२. मियां लक्ष्मी डावलोनि केली परौती । फेडोनि कौस्तुभ घेतला हातीं । मग वोडविली वक्षस्थळाची वाखती । चरणरजां ॥** अ. ९, ओ. ४८०

एकदां सर्व देवांत श्रेष्ठ कोण अशी एक चर्चा ऋषि समुदायांत सुरू झाली. त्यांत भृगुऋषींनीं अन्तिम निर्वाळा द्यावा, असें ठरविण्यांत आले. भृगुऋषि सत्यलोकीं गेले तेथें ब्रह्मदेव आपल्या आसनावर विराजमान झालेले होते. भृगु-ऋषि हे ब्रह्मदेवाचे पुत्र; पण ब्रह्मदेवाला हात जोडून नमस्का-रादि न करतां तसेंच उभे राहिले. हे पाहून त्याचा ब्रह्मदेवास अतिशय राग आला; पण तो त्यांनीं व्यक्त न करतां मनांत शमविला.

तेथून भृगुऋषि निघाले तों थेट कैलासांत गेलें. तेथें श्रीशंकर त्यांचे स्वागतार्थ उठून उभे राहिले. शंकर प्रेमपूर्वक भृगुऋषींस आलिंगन देण्यास निघाले तों इतक्यांत भृगुऋषि म्हणाले शंकरा मला स्पर्शहि करूं नका. कारण, तुम्ही स्मशानांत राहून चिताभस्म लावणारे असल्यामुळें तुमचे वागणें अमंगल आहे. हे ऐकल्यामुळें शंकरांनाहि अतीव राग आला. म्हणून ते तर त्रिशुळ उगारून भृगुऋषींना मारण्यासच धांवले !! इतक्यांत पार्वतीनें श्रीशंकराचें पाय धरून सुमधुर शब्दांत त्यांचे सांत्वन केलें.

तेथूनहि भृगुऋषि निघाले. तों थेट वैकुंठांत श्रीविष्णूंच्या मंदीरांत आले. तेथें श्रीविष्णु विसांवा घेत होते. भृगुऋषि आले आहेत, हे पाहतांच श्रीविष्णु एकदम उठले. लक्ष्मीला सारून बाजूस केले. गळ्यांतील कौस्तुभहि काढून हातांत घेतला व मग त्याच्या परमपावन अशा पायधुळीकरितां, चरण स्पर्शार्थ छातीचा खळगा पुढें केला. भृगुऋषींनीं त्यांच्या वक्षः स्थळावर लाथ मारली, तरीहि न रागावतां श्रीविष्णूनें श्रीभृगु ऋषीचें पाय धरले व प्रार्थना केली 'महाराज ! मला क्षमा करा !! आपल्या सारखी थोर विभूति आल्यावर मी अंथ-रुणांतच होतो हा माझा अपराधच आहे. शिवाय आपण माझ्या वक्षःस्थळावर लाथ मारली, आपलें चरण कमळ अत्यंत कोमल आहेत व माझें वक्षःस्थळ मात्र कठोर आहे. त्यामुळें त्याचाच आघात आपल्या या सुकोमल चरणांस झाला व आपणास त्रास झाला. याची क्षमा असावी. मी आपल्या चरणकमल कृपेनेंच जगत्पालन करतो. आपल्या आशिर्वादें करूनच मी लक्ष्मीवान् झालों. मी आपल्या चरणकमलाचें चिन्ह सदाचेच धारण करीन, असें म्हणून श्रीविष्णूनें तेव्हांपासून भृगुऋषींच्या "पाऊलाची मुद्रा अद्यूनि हृदयीं वाहिली आहे" या चिन्हास "भृगुपद" किंवा 'श्रीवत्स' असें म्हणतात. व त्यामुळेंच श्रीविष्णूस "श्रीवत्सलांछन" किंवा "भृगुलांछन" म्हणतात. किती ही सहिष्णुता व शांति !! ही गोष्ट अथपासून

इतिपर्यंत भृगुऋषींनीं ऋषि समाजांत येऊन प्रतिपादिली. त्यामुळें सर्व देवांत श्रेष्ठ कोण ? यांचा भृगुऋषींचा निर्णय सर्वांच्या सहजींच लक्षांत आला.

**२३. जेथ निववील ऐशिया आशा । हरें चंद्रमा आधा ऐसा । वाहिजत असे शिरसा । निरंतर ।।**
अ. ९, ओ. ४८६.

समुद्र मंथनांतून चौदा रत्नें निघालीं. त्यांतच हलाहल हे अत्यंत दाहक विष निघालें. तें जग जाळीत सुटलें असतां, शंकरावांचून कोणी स्वीकारणार नाहीं, असें जाणून देव शंकराकडे गेले शंकरानें जगाच्या कल्याणासाठीं तें प्राशन केलें; पण त्याचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. अंगाची सारखी आग होऊं लागली, कंठ निळा पडला; तेव्हां शीतलतेचा एक उपाय म्हणून शंकरानें मस्तकावर चंद्राची कोर धारण केली.

**२४ जिये लोकींचा चंद्रु क्षयरोगी ।।** अ.९, ओ.५०२

सोम [ चंद्र ] हा अत्रि ऋषीचा पुत्र, यानें रोहिणीसह प्राचेतस दक्षाच्या साठ कन्यांशीं लग्न केले होते. पण त्याला रोहिणीच सर्वांत अधिक आवडे. तिला बुध नांवाचा पुत्र झाला. तेव्हां इतर पत्न्यांनी आपला पिता जो दक्ष त्याच्याकडे चंद्राच्या सापत्न भावाविषयीं तक्रार नेली. तेव्हां दक्षानें जांव-याला शाप दिला कीं, तूं क्षयी होशील. तेव्हांपासून चंद्राच्या कला कमी अधिक होत असतात. गुरुपत्नी तारा हिचे हरण केल्यामुळें बृहस्पतीनें याला क्षयाचा शाप दिला, अशीहि एक कथा आहे. या दृष्टांतानें मृत्युलोकाचे अनित्यत्व व असुखत्व सूचित केलें आहे. शिवाय लोक प्रसिद्ध चंद्रहि जर क्षयानें ग्रासला आहे, तर मग तेथें मानव सुखदुःख युक्त आहेत हे काय सांगावें ? हे व्यक्त केलें आहे.

* * *

## अध्याय दहावा

**२५. नातरी वैकुंठपीठ नायकें । रुसला ध्रुव कव-तिकें । बुझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ।।**
अ. १०, ओ. १८.

**ऐशिया अपराधिया शिशुपाळा । आपणपें ठावो दिधला गोपाळा । आणि उत्तान चरणाचिया बाळा । काय ध्रुवपदीं चाड ? ।।** अ. ११, ओ. १०२.

ध्रुव हा उत्तानपाद राजाचा मुलगा असून तो वनांत तपश्चर्येस निघून गेला. ते पाहून नारदानें त्याचे कौतुक करून 'ॐनमो भगवते वासुदेवाय ' हा मंत्र दिला. त्यानें मधुवनांत जाऊन घोर तपश्चर्या केली. त्याची तपश्चर्या पाहून देव पुढें येऊन उभे राहिले. तो बोलेना म्हणून त्याचे गालास शंखानें स्पर्श केला. [ ११-१८४ ] नंतर भगवंतांनीं त्यास कायमचे अढळपद दिले. ते पद अद्यापि नक्षत्ररूपानें आकाशांत अढळ आहे. यांत देवाचे अगाध दातृत्व सांगितलें आहे. [अ. ९।४६८, १३।४८९, १३।६२२, इत्यादि अध्यायांत याविषयींचे उल्लेख आहेत. ]

**२६. अहो एकाची शाटी तपिन्नली ।।**
अ. १०, ओ. ३६.

विश्वामित्राला ब्रह्मर्षि ठरविण्याच्या वादप्रसंगीं ब्रह्मदेवानें सूर्य, समुद्र [ वरूण ] व शेष यास साक्षीला घेऊन येण्यास सांगितलें. परंतु ते तिवे साक्षीला आले असतां त्यांची कामें पाहण्यास कोणास नेमावे, हे विश्वामित्राला कळेना. तेव्हां त्या तिघांना साक्षीसाठीं आणण्यास तो असमर्थ झाला असतां महर्षि वसिष्ठांनीं हा प्रश्न स्वतःच्या सामर्थ्यानें सोडविला. त्यांनीं सूर्याच्या जागीं आपली छाटी पसरली. समुद्राच्या जागीं आपला कमंडलु ठेविला आणि शेषाच्या जागीं आपला दंड उभा करून त्या तिघांस साक्षीसाठीं ब्रह्मदेवापुढें आणून उभे केले. त्यावेळीं वसिष्ठ मुनीच्या आज्ञेनें ती छाटी सूर्यमंडळा प्रमाणें प्रकाश देऊं लागली आणि सूर्य परत येईपर्यंत तिनें त्याचें काम सांभाळिलें.

**२७. एकीं सृष्टीवरी सृष्टी केली ।।**
अ. १०, ओ. ३६.

पूर्वी इक्ष्वाकु वंशांत त्रिशंकु नांवाचा राजा होता. त्याला एकदां वशिष्ठ मुनींनीं 'तूं चांडाळ होशील' असा शाप दिला. त्यावेळीं विश्वामित्रानें वसिष्ठाशीं असलेलें वैर साधण्यासाठीं आपलें तपःसामर्थ्य खर्च करून त्या त्रिशंकु राजाला स्वर्गी पाठविलें; परंतु इंद्रानें वसिष्ठच्या शापावरून त्याला स्वर्गांत येऊं न देतां पुनः खाली ढकलून दिलें. त्यामुळें बिचारा त्रिशंकु राजा पृथ्वी व स्वर्ग या दोहोंच्यामध्यें अधांतरी लोंबकळत राहिला. तेव्हां विश्वामित्रानें आपल्या तपश्चर्येच्या बळावर नवीन प्रतिसृष्टि करण्यास आरंभ केला. तें पाहून देवांना भीति वाटली व त्यांनी त्रिशंकुला दक्षिण दिशेंत दिव्यस्थान देण्याचें कबूल करून विश्वामित्राची सृष्टि थांबविली. तो त्रिशंकु दक्षिणेंत नक्षत्ररूपानें अद्यापि प्रकाशमान् होत आहे.

**२८. एकीं पाषाणीं वाऊनि उतरलीं । समुद्रीं कटकें ।।** अ. १०, ओ. ३६.

श्रीरामचंद्रास लंकेंत जाण्यासाठीं सेतु बांधावयाचा होता. तेव्हां तें कार्य कोण करणार ? असा प्रश्न उपस्थित झाला. तेव्हां

समुद्र म्हणाला, रामचंद्रा ! तुमच्या सैन्यांतील नळ नांवाच्या वानरानें पूर्वी माझ्यांत ऋषि स्नानसंध्या करीत असतां त्यांचे शाळिग्राम समुद्रांत फेकून दिले तेव्हां ऋषींना राग आला व त्यांनीं त्यास असा शाप दिला कीं, " तुझेनि हातें सागरीं-शिळा । न बुडति कदा काळा " अर्थात् तुझ्या हातानें सागरांत शिळा कदापिहि बुडणार नाहींत, तर त्याच्या हातानें समुद्रावर सेतु बांधावा. पण हे समुद्राचें भाषण ऐकून नळास गर्व उत्पन्न झाला. तो समुद्रांत सेतुबंधार्थ दगड टाकूं लागला. पण एकहि दगड तरेना. हे पाहून नळासह सर्व वानरांस दुःख झालें. हे वर्तमान हनुमंतास कळतांच तो हंसून म्हणाला कीं, नळास आशिर्वादाचा वृथा अभिमान झाला आहे. तर प्रभु रामचंद्राचें चरण स्पर्शें ज्या पर्वतास होतील ते पर्वत समुद्रांत तरतील. तेव्हां तसें करून सेतु पूर्ण करावा. आणि खरोखर प्रभु रामचंद्रांनीं आपल्या सामर्थ्यानें नळवानरा कडून समुद्रांतशिळा तारविल्या सारार्थः—नवव्या अध्यायांचे तात्पर्य शब्दांकित करून सांगणें माझ्या सामर्थ्याबाहेरचे आहे; पण मी तो गीतेचा नववा अध्याय विस्तारपूर्वक प्रतिपादिला. हे गुरुवर्या ! हे आपलेंच सामर्थ्य आहे, असें सांगण्याकरितां श्रीज्ञानेशांनीं हीं पौराणिक उदाहरणें दिलीं आहेत.

## २९. एकीं आकाशीं सूर्यातें धरिलें ।

अ. १०, ओ. ३७

अंजनीच्या पोटीं मारुतीचा जन्म झाला तेव्हां आकाशांस लाल सूर्यबिंब तळपत होतें. तें फल आहे. अशा समजुतीनें बाल मारुति तीनशे योजनें आकाशांत उडाला व सूर्यमंडलाकडे चालला. हा सूर्याला ग्रासणार, हे पाहून इंद्रानें त्याच्यावर वज्र-प्रहार केला; तेव्हां मारुति मूर्च्छित होऊन खालीं पडला; पण मारुतीचा पिता मरुत् [ वायु ] याच्या कोपाला भिऊन इंद्रादि-देवांनीं मारुतीची स्तुति करून त्यास सावध केलें व वज्रा-पासून कांहीं पीडा होणार नाहीं असा वर दिला. इंद्राचे वज्र हनुवटीला लागून ती तुटली. म्हणून याला " हनुमान " नांव पडलें.

पूर्वी काशीराजा नांवाचा एक राजा होऊन गेला त्यास सुमती नावाची एक मुलगी होती. तिनें आपल्या बहीणीच्या सांगण्यावरून मंदिरांतील अतिथीस पती समजून पतिव्रता धर्मानें सेवा केली. पुढें एकदां रात्रीं ती पतीस पेटाऱ्यांत घालून रस्त्यानें जात होती. तेव्हां मार्गांत एका उंच सुळावर मांडव्य ऋषि लोंबकळत होता. त्याच्या सुळाला सुमतीच्या पतीचा सौम्यसा धक्का लागला. तेव्हां तो ऋषि रागावून म्हणाला कीं, ज्याचा धक्का या सूळाला लागला असेल तो दुष्ट सूर्योदय होण्याबरोबर मृत्यु पावेल. ही शापवाणी ऐकतांच सुमती अत्यंत चिंताग्रस्त झाली. तीनें आपल्या पतीस खालीं ठेवलें व म्हणाली " भगवान् भास्करा ! मी जर खरी पतीव्रता असेन तर तूं माझी आज्ञा होईपर्यंत उदयास येऊं नकोस " त्यामुळें सूर्याला तिची आज्ञा पाळणें भाग पडलें. दुसरें दिवशीं सूर्य उदयास आलाच नाहीं. असें सुमतीनें सूर्यास उदयाला येऊं न देतां थोपवून धरून ठेवल्यामुळें पृथ्वीवर हाहाःकार झाला. तेव्हां सर्व देवांनीं अनसूयेची प्रार्थना करून तीस सुमतीला सुर्योदया-विषयीं विनंती करावयास सांगितलें. अनसूयेनें, देवांच्या विनंतीस मान देऊन सुमतीची समजूत घालून तीस पति-रक्षणाचें अभयवचन दिलें. तेव्हां सुमतीच्या आज्ञेवरून पुनः सूर्योदय झाला.

## ३० एकीं चुळींचि सागरातें भरिलें । अ. १०,ओ. ३७.

अगस्ती ऋषि हे मोठें थोर ऋषि झाले. दंडकारण्यांत त्यांची व रामचंद्रांची भेट झाली होती. इंद्रानें वृत्रासुराला मारल्यानंतर देवाचे शत्रु कालकेय दैत्यादि समुद्रांत लपून बसले व ते रात्रीं बाहेर निघून ऋषींना अतिशय त्रास देत होते. व त्यांचे तपांत विघ्न करीत होते. त्यांच्या भीतीनें ऋषिजन घरांत लपून बसूं लागलें. त्यांची यज्ञादि कर्में होईनाशी झालीं. त्या दैत्यांना शोधून काढण्यासाठीं समुद्र शोषून टाकण्याची आज्ञा इंद्रानें अग्नि व वायु यांना केली.परंतु प्राणीनाश होईल म्हणून त्यांनी ते करण्याचें नाकारले. मग इंद्राच्या शापानें मैत्र वरुण यांच्यापासून अग्नि व वायू यांना मनुष्यरूपानें जन्म घ्यावा लागला. त्यांपैकीं अग्नीचें प्रतिरूप म्हणजे अगस्त्य ऋषि हे होत. ऋषींनी विनविल्यावरून ब्रह्मदेवानें त्यांना अगस्त्य ऋषीं-च्याकडे जाण्यासाठीं सांगितलें. अगस्त्य ऋषीनें यांच्यावरील हे संकट लक्षांत घेऊन आपल्या तपोबलानें संपूर्ण समुद्र एका आचमनांत ठणठणीत कोरडा केला व त्यामुळें समुद्रांत लपून बसलेले कालकेयादि दैत्य नाश पावले व ऋषींचे संकट दूर झालें. अगस्त्य ऋषीनें जलाविना तळमळणाऱ्या जलचरांसाठीं प्राशन केलेलें सर्व पाणी सोडून समुद्र पूर्ववत् जलयुक्त केला.

## ३१ परि हें असो एथ ऐसें । रामरावण झुंजिन्नले कैसें । रामरावण जैसें । मिनले समरीं ॥

अ. १०, ओ ३८.

आकाशाला जशी आकाशाचीच उपमा, समुद्राला जशी समुद्राचीच उपमा, तशीच रामरावणाच्या युद्धाला दुसरी उपमा नाहीं. त्यांचे युद्ध रामरावणासारखेच होय. हे अनन्वया-लंकाराचें उदाहरण आहे. हीच उपमा श्रीज्ञानेशांनी हरिकथेला दिली आहे. हरिकथेसारखी शाश्वत सुख देणारी कोणतीच वस्तु नसल्यामुळें हरिकथेला हरिकथेचीच उपमा शोभते. इतर कसलीहि उपमा देताच येत नाहीं.

**३२. जे मंदराचळु न ढाळितां । क्षीरसागरु न डहुळतां । अनादि स्वभावता । आइतें आहे ॥**
अ. १०, ओ. १९५.

एकदां देव आणि दानव यांचे युद्ध होऊन देवांचा पराभव झाला व विजयी झालेले दानव देवांना फार पीडा देऊं लागले. त्यावेळीं सर्व देव भगवान् विष्णूला शरण गेले. भगवानांनी त्यांना समुद्रमंथन करून अमृत प्राप्त करून घेण्याचा उपदेश केला. त्यांतून निघणारीं रत्नें सर्वांनी वाटून घ्यावी व शेवटीं देवांनीं अमृत घेऊन अमर व्हावे असें सांगितलें. अमृताच्या लाभासाठीं देव आणि दानव दोघेहि मंथनास तयार झाले. त्यांनी मंदर पर्वताची रवी केली, वासुकीची दोरी बनविली. त्याचा पर्वताला वेढा देऊन त्याचें तोंड देवांनीं आणि शेपटी दानवांनी धरून क्षीरसागराचें मंथन आरंभिलें. सुरूवातीलाच हलाहल विष निघालें. त्याच्या उष्णतेनें सगळे त्रिभुवन संतप्त झाले. तेव्हां ते शंकरांनी प्राशन करून त्रैलोक्याचा ताप हरण केला. तेव्हांपासून श्रीशंकर नीलकंठ या नांवानें प्रसिद्ध झाले. त्यानंतर कौस्तुभ, ऐरावत, उच्चैःश्रवा, सुरा इत्यादि चौदा रत्नें क्रमानें निघालीं. तीं सर्वांनी वाटून घेतली. शेवटीं राहिलेल्या अमृतासाठीं पुनः भांडण जुंपले. तेव्हां भगवान् श्रीविष्णूनें मोहिनीचें रूप धारण केलें, व देवदानवांची पंगत बसवून त्यांना अमृत वाढण्याचे काम पत्करले आणि दानवांना सुरा देऊन देवांना अमृत वाढलें व त्यांना अमरत्व दिलें. देवांना दिलेले हे अमृत इतकें कष्ट करून संपादन करावे लागले; पण तेंहि देवांना नित्य अमर करूं शकले नाहीं. परंतु या गीतारूप कथेपासून प्राप्त होणारे अमृत स्वभावतः नित्य सिद्ध आहे व ते मिळविण्यास वरील मंथनासारखे कष्ट करावे लागत नाहींत.

**३३. त्रिभुवनींचिया सेनापतीं । आंत स्कंदु तो मी महामती । जो हरवीर्यें अग्नि संगती । कृत्तिकाआंतु जाहला ॥**
अ. १०, ओ. २२९.

तारकासुराचा मृत्यु श्रीमहादेवाचें मुलाचें हातानें होणार होता. म्हणून त्रिभुवनांत सर्वांना त्रस्त करून सोडणाऱ्या तारकासुराच्या नाशार्थ सगळे देव श्रीशंकरास पुत्रप्राप्तीची इच्छा करूं लागले. कारण,तारकासुराचा वध करणारा शंकरपुत्र आपणास सेनापती लाभावा या हेतूनें अग्नीनें ब्राह्मणाचें रूप धारण केलें व भिक्षेसाठीं म्हणून शंकराकडे गेला असतां, पार्वतीनें त्यास 'हरवीर्या'ची भिक्षा घातली ते 'हरवीर्य' जाणून अग्नीनें प्राशन केलें. त्यामुळें त्यास गर्भ संभव झाला. तेव्हां त्यानें तो गर्भ गंगेंत सोडला व तेथें त्याचें सहा विभाग झाले. तेथें सहा ऋषिपत्न्या स्नान करीत होत्या. त्यांच्या उदरांत ते सहा भाग गेले. त्या गरोदर झाल्या. त्यांनी भयभीत होऊन ते सहा भाग गवतावर टाकून दिले. तेथें सहा कृत्तिकांनीं सहा भागांचें म्हणजे सहा स्कंदांचें धारण केले व त्या शिवपुत्रास सहा तोंडें व बारा हात दिलें. पुढें तो स्कंद म्हणजे षडानन होऊन पराक्रमी झाला. कृत्तिकेपासून षण्मुख व द्वादश हस्त असलेल्या अशा शिवपुत्रासच गांगेय, अग्निभू व कार्तिकेय, अशी नांवें पडलीं. पुढें देवांचा सेनापती होऊन त्यानें तारकासुराचा वध केला.

**३४. पैं समस्तांही ओघां- । मध्यें जे भगीरथें आणितां गंगा । जन्हूनें गिळिली मग जंघा । फाडूनि दिधली ॥**
अ. १०, ओ. २५६.

**नाना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीच नवी । निर्विण्ण सगरांची दैवी । गंगाचि आली ॥**
अ. १६, ओ. २०८.

इक्ष्वाकु वंशांतील महापराक्रमी सगर राजानें अनेक अश्वमेध यज्ञ केलें होते. एका यज्ञांत त्याचा शाम कर्ण घोडा इंद्रानें हरण करून कपिलाश्रमांत नेला. सगराचे साठसहस्र पुत्र त्याच्या शोधार्थ निघाले असतां, त्यांना कपिलमुनि सन्निध हा अश्व-वारु दिसला. तेव्हां याच गोसावड्यानें हा चोरून आणिला असें समजून त्यांनीं कपिलमुनीस बरेंच मारलें. तेव्हां समाधीचा भंग होतांच मुनीनें नेत्र उघडून त्यांची [ सगरपुत्रांची ] रक्षा केली. पुढें सगराचा नातू अंशुमान यानें मुनीची स्तुति करून घोडा परत आणिला. पण गंगोदकाच्या स्पर्शाशिवाय साठ सहस्र सगर पुत्रांचा उद्धार होणें नाहीं, असें समजल्यावर अंशुमान व त्याचा पुत्र दिलीप यानें गंगेस खालीं आणण्यासाठीं मोठें तपाचरण केलें; पण त्यांत त्यांना यश आले नाहीं.

नंतर दिलीपचा पुत्र भगीरथ यानें हिमालयावर गोकर्ण क्षेत्रीं सहस्र वर्षें तप केलें. तेव्हां गंगा प्रसन्न होऊन स्वर्गातून खालीं येण्याचें तिनें मान्य केलें. तिला खालीं झेलण्यास भगीरथाच्या प्रार्थनेवरून शंकर तयार झाले. पुढें भगीरथ व मागें गंगा अशा रीतीनें ते येत असतां मध्येंच महापराक्रमी जन्हूचा यज्ञ मंडप लागला. तो गंगेच्या प्रवाहानें बुडाल्यामुळें जन्हूनें रागावून तिला आपल्या मांडीमध्यें साठवून घेतलें. पुढें भगीरथानें प्रार्थना केल्यावर जन्हूनें मांडी फाडून तिला सोडून दिले. या कारणानें गंगेला 'जान्हवी' असें नांव पडलें. नंतर भगीरथानें जेथें सगर पुत्रांची रक्षा पडली होती तेथें नेऊन आपल्या साठ सहस्र पूर्वजांचा उद्धार केला.

**३५. जो देवकी वसुदेवास्तव जाहला । कुमारी-साठीं गोकुळीं गेला ॥**
अ. १०, ओ. २८८.

स्वयंभू मनूनें सुतपा ब्राह्मणाचें रूप धारण करून आपल्या प्राणी नांवाच्या पत्नीसह एक सहस्त्र वर्षेपर्यंत धुम्रपान व पंचाग्नि साधनरूप तपश्चर्या केली होती. त्या उभयतांची भक्ति पाहून देवाधिदेव लक्ष्मीनारायण प्रसन्न झाले आणि तुमच्या इच्छेप्रमाणें मी आपल्या पोटीं तीन जन्म घेईन असें सांगितले. तोच सुतपा ब्राह्मण वसुदेव व त्याची स्त्री प्रस्तुत देवकी आहे. म्हणून वसुदेव देवकी यांच्या भक्तींतून उतराई होण्यासाठीं भगवान् श्रीकृष्ण गोकुळांत अवतीर्ण झाले.

कंस आपल्या मुलांना जन्मल्याबरोबर ठार मारतो, तेव्हां आठवा पुत्र जन्मल्याबरोबर त्याला बाहेर नेऊन ठेवावें या विचारानें देवकी बंदीशाळेंत प्रसूत झाल्याबरोबर वसुदेवानें रातोरात यमुना ओलांडून त्यास गोकुळांत नेले. दैवी सामर्थ्यानें अडचणींतून तो पार पडला. गोकुळांत त्याचवेळीं नंदपत्नी यशोदाहि प्रसूत होऊन तिला कन्या झाली होती. ती वसुदेवानें उचलून तिच्या जागीं आपल्या मुलाला—कृष्णाला ठेविलें व त्या मुलीला बंदीशाळेंत ठेवले. याप्रमाणें कुमारीच्या मोबदल्यांत स्वत: श्रीकृष्ण परमात्मा गोकुळांत आले.

**३६. तो मी प्राणांसकट पियाला । पूतनेतें ॥**

अ. १०, ओ. २८८.

**तुवां सनकादिकांचेनि मानें । सायुज्यीं सौरसु दिधला पूतने । जें विषाचेनि स्तनपानें । मारूं आली ॥**

अ. ११, ओ. १००.

गोकुळांत नंद यशोदांचा पुत्र म्हणून कृष्ण वाढत असतां कंसानें त्याला मारण्यासाठीं अनेक उपाय केले. पूतना नांवाचीं एक राक्षसी गोकुळांतील सर्व सुंदर मुलाना मारण्यासाठीं कंसानें पाठविली होती. ती लहान तरुणीचें रूप घेऊन यशोदेकडे आली; तिनें लडिवाळपणा दाखवून कृष्णाला पाजण्यास घेतलें. तिनें आपल्या स्तनांत मुद्दाम विष भरलें होतें, हे जाणून कृष्णानें तिचे इतक्या जोरानें नुसतें स्तनपान केलें असें नव्हे तर विष, दूध व तेहि प्राणासह आकर्षून घेतलें त्यामुळें तिचा देह मृत होऊन पडला; तरीपण देवांनी तिला "सायुज्यीं सौरसु" म्ह. सद्गतिच दिली.

**३७. नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मियां अदानवीं सृष्टि केली । करीं गिरि धरूनि उमाणिली । महेंद्र महिमा ॥** अ. १०, ओ. २८९.

श्रीकृष्णावताराच्या पूर्वी गोकुळांत 'अन्नकोट' नांवाचा उत्सव होत असे. चातुर्मास संपल्यावर आग्रहायन इष्टीसाठीं शेतांतून नवें धान्य आलें म्हणजे नाना प्रकारचे पदार्थ करून इंद्राला त्याचा नैवेद्य दाखवीत असत. इंद्र पर्जन्याची देवता असल्यामुळें शेतकरी, गवळी इत्यादि व्रजवासी लोक इंद्राला संतुष्ट ठेवण्यासाठीं त्याला बली अर्पण करीत असत. पुढें कृष्णजन्म झाल्यावर भगवानांनीं त्या लोकांना उपदेश केला कीं, इंद्राला बली न देतां तृण धान्य देणाऱ्या त्या गोवर्धन पर्वतालाच नैवेद्य अर्पण करीत जा. त्याप्रमाणें इंद्राचा बली बंद होतांच त्याला क्रोध आला व त्यानें सतत सात दिवस गोकुळांत जोराची पर्जन्यवृष्टि केली. त्यामुळें गोकुळ पाण्यांत बुडून गेले. लोकांच्या प्राणावर बेतलें तेव्हां श्रीकृष्णानें आपल्या अतर्क्य सामर्थ्यानें गोवर्धन पर्वत आपल्या करांगुळीवर सतत सात दिवस उचलून धरला आणि सर्व व्रजगोप व गायी यांसह गोकुळवासी जनांचे रक्षण केलें. तें पाहून इंद्राचा गर्व उतरला. तो भगवान् श्रीकृष्णास शरण आला व त्यास 'उपेंद्र' हे नांव देऊन तो हरिचरणीं लीन झाला.

**३८. कालिंदीचें हृदय शल्य फेडिलें ।** अ. १०, ओ. २९०.

काद्रवेय कुलोत्पन्न कालिया नांवाचा एक नाग गरुडाच्या भयानें यमुनेच्या डोहांत येऊन राहिला होता. त्याच्या विषानें पाणीच नव्हे तर सर्व आसमंत भाग विषमय झाला होता. एकदां कृष्णाचे मित्र गोपाल गायींसह तेथें चुकून गेले असतां एकदम मरण पावले. हे ऐकून कृष्णानें डोहांत उडी मारून कालियाला जर्जर केलें व तो त्याला मारणार होता, पण त्याच्या स्त्रियांच्या प्रार्थनेवरून त्याला जीवदान दिलें; पण तेथून हांकलून त्याला त्याच्या मूळच्या जागीं [रमणक द्विपास] पाठविलें व गायी गोपाल जीवंत केले. याप्रमाणें यमुनेच्या पाण्यांतील कालियारूपी उपद्रव नाहींसा केला.

**३९. वासरुंवासाठीं लाविलें । विरंचीस पिसें ॥**

अ. १०, ओ. २९०.

भगवंतांनीं काला दिला नाहीं म्हणून ब्रह्मदेवानें एकदां कृष्णाच्या सामर्थ्याची परीक्षा पाहण्यासाठीं गायी गोपाळ यांना सत्यलोकांत घेऊन गेला. हे पाहून त्यांची नवीन रूपें स्वतः भगवंतांनीं धारण केलीं व वर्षभर कोणासही कांहीं समजूं दिलें नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवालाच आपला वेडेपणा पटला व लाज वाटून त्यानें गाई गोपाळ परत केले इतकेंच नव्हे; तर मी चोरून नेलेले गाईगोपाळ खरे कीं, गोकुळांत स्वतः देवच आपल्या अभिन्न माया शक्तिद्वारां बनले, ते गाई गोपाळ खरे ? याचा निवाडा न झाल्यानें ब्रह्मदेवहि गोंधळून गेला.

**४०. संन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनि नेली माझी भगिनी** ॥ अ. १०, ओ. २९४.

कृष्ण—बलरामाची बहिण सुभद्रा ही उपवर झाली असतां बलरामानें तिला आपला शिष्य दुर्योधन याला देण्याचे योजिलें. कृष्णाच्या मनांत तिचें अर्जुनाशीं लग्न व्हावें असे होते. अर्जुन

तीर्थयात्रेहून द्वारकेस आला तेव्हां कृष्णानें त्याला संन्यासी होऊन बलरामाची मर्जी संपादण्यास सांगितलें. हा संन्यासी फार--तपोनिष्ठ व विरक्त आहे, असें पाहून बलरामानें त्यास घरीं आणून ठेविलें व सुभद्रेस त्याची सेवा करण्यास सांगितलें. एकदां रैवतक पर्वतावर सर्वांनीं जावयाचें असें ठरून अर्जुन संन्यासी व सुभद्रा यांना एका रथांत बसविण्यांत आलें. कृष्णानें सुचवितांच अर्जुनानें रथ इंद्रप्रस्थाकडे चालविला व पाठलाग करणाऱ्यांना पराभूत केलें व पुढें संन्यासी हा अर्जुन आहे, हें कळल्यावर सर्वांना आनंद झाला.

**४१. कविश्वरामाजीं धैर्या ठावो । उशनाचार्य तो मी ॥** अ. १०, ओ. २९५.

यालाच शुक्राचार्य, कवि इत्यादि नांवें आहेत. हा भृगु ऋषीच्या कवि नामक पुत्राचा पुत्र. प्रियव्रताची कन्या ऊर्जस्वती याची पत्नी व देवयानी याची मुलगी, यांचे देवगुरु बृहस्पतीशीं हाडवैर होते आणि एवढ्याच करितां यानें दैत्याचें गुरुत्व पत्करिलें. याला संजीवनी विद्या अवगत होती. हा पर्जन्याधिपति असून नवग्रहांत याचें नांव आहे.

**४२. जो प्रल्हादाचिया बोला । विषाहिसकट आपणचि जाहला । तो सद्गुरु असे जोडला । किरीटीसी ॥** अ. १०, ओ. ३३४.

हिरण्यकशिपु नांवाचा एक बलाढ्य राक्षस होता. तो अतिशय भगवद्द्वेष्टा होता. त्याची पत्नी कयाधु अत्यंत धार्मिक व महासाध्वी होती. त्या उभयतांस प्रल्हाद नांवाचा एक पुत्र होता. त्याची वृत्ति बालपणापासून आपल्या मातेप्रमाणें धार्मिक होती. त्याची भगवद्भजनाची आवड हिरण्यकशिपूच्या दृष्टीस पडतांच त्यानें प्रथम त्याला त्यापासून परावृत्त होण्याचा पुष्कळ उपदेश केला; पण प्रल्हाद आपला हरिनामाचा छंद सोडीना. तेव्हां हिरण्यकशिपुला अतिशय संताप आला व अशा अवज्ञा करणाऱ्या पुत्राचा जीव घेण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें त्याचा कडेलोट केला. त्याला विष पाजलें व इतरहि अनेक उपाय योजिले; परंतु परमेश्वर त्या त्या रूपानें त्याचा रक्षक झाल्यामुळें मृत्यु प्रल्हादास स्पर्शहि करूं शकला नाहीं. याप्रमाणें तो व्यापक परमात्मा आपल्या भक्तास प्रत्यक्ष काळाच्या हातूनहि सोडवितो हें दृष्टान्तानें दर्शविलें आहे.

* * *

# अध्याय अकरावा

**४३ अहो रानींचिया पालेखाइरां । नेवाणें करविलें लंकेश्वरा । एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा । न जिणेचि काई ? ॥** अ. ११, ओ. २३.

रावणानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून " सर्व बलाढ्य देवतांच्या हातून आपल्याला मृत्यु येऊं नये " असा वर मागून घेतला होता; पण तो मनुष्याला क्षुद्र प्राणी समजत असल्यामुळें त्यानें मनुष्याला तिरस्कृत करून त्याचें नांवहि घेतलें नाहीं. त्यामुळें तो मनुष्यांना वध्य होता. रावणाचा नाश करण्यासाठीं भगवानांनीं रामचंद्राचा अवतार घेतला व इतर देवता वानर, अस्वलें इत्यादि वनचरांच्या रूपानें आणल्या. ती रानांत झाडाचा पाला खाणारी वानरें जमवून रामचंद्रानें त्यांच्या सहाय्यानें रावणादि बलाढ्य राक्षसांचा नाश केला. तात्पर्य—समर्थांच्या मनांत आलें असतां काय एक होत नाहीं ? तर सर्व कांहीं होतें. हें या दृष्टान्तानें सांगून हे गुरुवर्या ! आपण संत समर्थांनीं मनांत आणलें तर माझ्याकडून गीतार्थ बोलवालच ! असें सांगितलें आहे.

**४४. तयातेंहि लेंकुरपणें झकविलें । एकाचें गर्भवासहि साहिले । परी विश्वरूप हें राहविलें । न दावीच कवणा ॥** अ. ११, ओ. ३९.

अंबरीष नांवाचा एक राजा होता. तो अतिशय पराक्रमी दानशूर व नियमानें त्रिदिनात्मक एकादशीचें व्रत करणार, भगवद्भक्त होता. एकादशीला केवळ वायु भक्षण करून तो रात्रभर जागरण करीत असे व द्वादशीला नक्त भोजन करून पारणें करीत असे. त्याचा हा नेम अव्याहत चालला असतां एकदां द्वादशीला दुर्वास ऋषि त्याची सत्वपरीक्षा करण्यासाठीं त्याच्याकडे अतिथी आले. ते नदीवर स्नानास गेले. पारणें सोडण्याची वेळ झाली; तरीहि ऋषि परत येईनात, तेव्हां द्वादशी अतिक्रांत होऊन व्रतभंग होऊं नये, म्हणून देवास नैवेद्य अर्पण करून राजानें फक्त तीर्थप्राशन करून पारणें केलें. इतक्यांत दुर्वास स्नान करून आले. आपण येण्याच्या आधीं राजानें द्वादशी सोडली; हे ऐकून त्यास अतिशय क्रोध आला व त्यांनीं ' तूं दहा योनींत जन्म घेशील ' असा राजाला शापहि दिला, आणि आपल्या जटेंतून एक कृत्या निर्माण करून ती राजाच्या अंगावर सोडली; परंतु भगवन्ताचें सुदर्शन चक्र राजाचें संरक्षण करीत असल्यामुळें ती कृत्या राजाला कोणत्याहि प्रकारें अपाय करूं शकली नाहीं. उलट कृत्येचा नाश केल्यावर तें चक्र दुर्वासाच्याच पाठीस लागलें. तेव्हां दुर्वासांनीं पळतां पळतां त्रिभुवन पालथें घातलें; पण ते चक्र त्यांची पाठ सोडीना व त्यांचे कोणीहि देव संरक्षण करीना. शेवटीं ऋषि वैकुंठांत जाऊन भगवानास शरण गेले. तेव्हां भगवंतांनीं त्यास सांगितलें कीं, ' मी भक्ताधीन आहें. यास्तव तूं अंबरीष राजाला शरण जा. ' त्यावेळीं दुर्वासानें राजाकडे येऊन त्याची क्षमा मागितली व चक्राचें निवारण

करण्याची विनंती केली. तेव्हां राजानें सुदर्शनाची स्तुति करून त्याला शांत केलें व ऋषींस निर्भय केलें व राजानें दुर्वासाला पंक्तीला घेऊन आनंदानें भोजन केलें. भगवंतानीं दुर्वासाचा हा शाप राजाला बाधूं दिला नाहीं. तें अंबरीष राजाचें दहा जन्म सोसण्यासाठीं त्यांनीं स्वतः आपणच मत्स्य, कच्छ, वराहादि दहा योनींत जन्म घेतलें व भक्ताचें रक्षण केलें. तेंच देवाचें दहा अवतार होत.

**४५. मागां जळत काढिलें जोहरीं ॥** अ. ११, ओ. ६०

धृतराष्ट्र पुत्र आणि पंडुपुत्र हे मोठें झाले तेव्हां त्यांचे एकमेकांशीं पटेना. युधिष्ठिराला युवराज पद दिलेलें दुर्योधनाला सहन झालें नाहीं, तेव्हां धृतराष्ट्रानें दूरवर विचार करून पांडवांना, आपल्या मुलापासून दूर ठेवण्याचें योजून, वारणावत नगरास जाऊन राहण्याची आज्ञा केली. वारणावतास पांडव ज्या घरीं राहत होतें, तें घर दुर्योधनानें मोठ्या कपट विधेनें एकदम जळेल असें लाखेचें करविलें होतें. हीं गोष्ट विदुरास कळली असल्यानें त्यांनीं बर्बर भाषेंत युधिष्ठिरास तेथें जाण्याचें वेळीं ती कळविली व बाहेर सुखरूप पडण्याचा विवरमार्ग जो विदुरानें घर बांधीत असतांनाच गुप्तपणें विश्वकर्म्याकरवीं बारा योजनें लांब तयार करवून घेतला होता. तोहि धर्मराजाला कळावा, अशी व्यवस्था केली होती.

पांडव लाक्षागृहांत असतांना मोठा दानधर्म चाले. जो येईल त्याला भोजन मिळे. एकदां सायंकाळीं भिल्लीण आपल्या पांच मुलांसह तेथें येऊन राहिली. त्याच रात्रीं विवरद्वारें लाक्षागृह सोडून बाहेर येण्याची विदुराची सूचना युधिष्ठिरास आल्यावरून आपणच लाक्षागृहास आग लावून पांडव बाहेर पडले. आगींत भिल्लीण तिच्या मुलासह दग्ध झाल्यानें पुढें लोकांना वाटले कीं कुंतीसह पांडवच जळून मेले. याप्रमाणें परमेश्वरानेंच पांडवाचे लाक्षागृहांत जळून मरण्याच्या संकटापासून रक्षण केलें.

**४६. दुराग्रहें हिरण्याक्षें । माझी बुद्धि वसुंधरा सूदली काखे । मग मोहार्णव गवाक्षें । रिघोनि ठेला ॥** अ. ११, ओ. ६१.

**नातरी काखे सूनि वसुंधरी । जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं । तैं उघडलें हटकेश्वरीं । जेवीं पाताळ कुहर ॥** अ. ११, ओ. ३६०.

वैकुंठीचें द्वारपाळ जे जय–विजय, त्यास सनत्कुमारांच्या शापानें तीन जन्म घ्यावे लागले [ ही कथा पूर्वीं अ. ९ ओ. ४६६ च्या संदर्भात दिली आहे. ] त्यांतील पहिला जन्म हिरण्याक्षाचा होता. हिरण्याक्ष राक्षस पृथ्वीला काखेंत मारून रसातळीं घेऊन गेला. तेव्हां सगळी सृष्टि जलमय झाली. तेथें महादेव हाटकेश्वर रूपानें राहत होते. त्यांनीं त्याला पाताळास येण्यास पाताळरूपी कुहराचें द्वार उघडून दिलें. त्या–वेळीं पृथ्वीच्या संरक्षणासाठीं भगवन्तानीं वराह अवतार घेऊन पृथ्वीला आपल्या दाढेवर उचलून धरिलें आणि रसातळांतून वर आणिलें. ते वर येत असतां वाटेंत त्यास हिरण्याक्ष भेटला तेव्हां त्याच्याशीं द्वंद्व युद्ध करून भगवानांनी त्याचा वध केला.

**४७ ऐसा वनवासिया सकळां । देतां एकचि तूं धसाळां । पुत्रा आळवितां अजामिळां । आपणप देसी ॥** अ. ११, ओ. १०४.

कान्यकुब्ज देशांत अजामिळ नांवाचा एक दुराचरणी ब्राह्मण होता. तो वृद्ध झाला तरी हीन स्त्री संगादि दुष्कर्मांत रत होता. त्याला एक ' नारायण ' नांवाचा पुत्र होता त्यावर त्याचे अतिशय प्रेम होतें. पुढें त्याचा मरणकाळ समीप आला. तेव्हां अंतकालाच्या यातना सहन न होऊन तो आपल्या पुत्राला मोठमोठ्यानें ओरडून हांका मारूं लागला व " नारायण नारायण " म्हणत असतांच त्याला मृत्यू आला. त्यानें जरी परमेश्वराला उद्देशून नारायण स्मरण केलें नव्हते, तरी त्या नांवाच्या प्रभावानें त्याच्या सर्व पातकांचा क्षय होऊन तो स्वर्गलोकीं गेला. मग परमात्म्याची भक्ति करणारे जन सर्व पापांपासून मुक्त होऊन मोक्षाला जातील यांत आश्चर्य कसलें ?

**४८. अझुनी वैरियांचिया कलेवरा । विसंबसीना ॥** अ. ११, ओ. १०५.

पूर्वीं हयग्रिव नांवाच्या राक्षसानें शंखाचे रूप धारण करून ब्रह्मदेवापासून वेद चोरून नेलें होते. तो देवांच्या भीतीनें समुद्रांत लपून बसला होता. ब्रह्मदेव सावध होऊन पाहतो तों वेद नाहींत. वेद नाहींसे झाल्यामुळें होम हवनादि कृत्यें बंद पडलीं व देंव हविर्भागावांचून तळमळूं लागलें. सर्वत्र हाहाः-कार उडाला. देव निःसत्त्व होऊन राक्षसांचा प्रादुर्भाव फार झाला. ते लोकांना वाटेल तसा त्रास देऊं लागले. तेव्हां सर्वांनी मिळून श्रीविष्णूची प्रार्थना केली. तेव्हां देवानें मत्स्यरूप धारण करून समुद्रांत प्रवेश केला. तेथें शंखरूपानें हयग्रिव लपून बसला होता. त्याचा शोध केला आणि त्याचेबरोबर तुंबळ युद्ध केलें. देवानें आपल्या वज्रप्राय दातानें त्या शंखाचे उदर विदीर्ण केलें. तेव्हां त्या असुराच्या पोटांतून वेद बाहेर पडले. तेव्हां मत्स्य म्हणाला ! तूं या वेदाच्या सहवासानें पवित्र झाला आहेस. तुला कांहीं मागावयाचे असेल तर माग. देवाचें स्वरूप ओळखून शंख म्हणाला, देवाधिदेवा ! श्रीहरि ! ! तूं प्रसन्न झाला आहेस तर मजकडून प्रत्यहि-रोज तुला स्नान घालण्याचा अधिकार मला मिळेल असा वर दे. हे

ऐकून मी तुला भूषण समजून नेहमीं हातांत वागवीन; लोक तुझी पूजा करतील, असा देवानें त्यास आशिर्वाद दिला.

**४९. दे दान म्हणौनि दारवंठेकरु। जाहलासी बळीचा ॥** अ. ११, ओ. १०६.

**जो धर्मकीर्ति धवळु। अगाध दातृत्वें सरळु। अतुळ बळें प्रबळु। बळीबंधनु ॥** अ. १२, ओ. २४१.

प्रल्हादाचा नातू बळी हा महाबलिष्ठ तसाच उदार आणि धार्मिक होता. देवाशीं त्याचे वारंवार युद्ध होई व तो संजीवनीमुळें जिवंत राही. त्यानें इंद्र होण्यासाठीं शंभर यज्ञांचा संकल्प करून नव्याण्णव यज्ञ पूर्ण केले. शेवटचा यज्ञ करीत असतां देवांना धाक पडून त्यांनीं विष्णूस वामनावतार घेण्यास विनविलें. त्याप्रमाणें विष्णूनें बटुरूप वामनाचा अवतार धारण केला व वामनानें यज्ञांत बळीजवळ त्रिपाद भूमि मागितली. व त्या बळीनें शुक्राचार्य नको म्हणत असतां ती दिली, म्हणून उदक सोडिलें. व्यापारी वृत्तिप्रमाणें दाखविण्याचें पाऊलरूपी लहान माप टाकून वामनानें विश्वरूप धारण करून एका पावलांत पृथ्वी व दुसऱ्या पावलांत आकाश आक्रमिलें; असें घेण्याचें धवधवीत माप निराळेंच व्यक्त केले व तिसरे पाऊल कोठें ठेवूं म्हणून विचारलें असतां बळीराजानें आपलें मस्तक पुढें केले, तेव्हां वामनानें आपल्या तिसऱ्या पावलानें त्याला पाताळांत दडपले; पण प्रसन्न होऊन वर दिला कीं "तूं वैवस्वत मन्वंतर असेपर्यंत उपेंद्र व नंतर इंद्र होशील. तूं पाताळांत, सुतलांत सुखानें राज्य कर. मी अक्षयी द्वारपाळ होऊन सुदर्शन चक्रानें तुझें संरक्षण करीन."

कृतयुगापूर्वी कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बळीनें वामनास दान दिले. तो दिवस अद्यापि 'बलिप्रतिपदा' म्हणून ओळखला जाऊन या दिवशीं बळीचें पूजन होतें. याप्रमाणें बळीकडे त्याचे सर्वस्व दान मागावयास जाऊन भगवान् उलट आपण स्वतःच सर्वस्व भक्ताधीन होऊन, त्याचा द्वारपाळ होऊन राहिला. यांत भगवंताचा भक्त परवशतेचा स्वभाव सांगितला आहे.

**५०. तूंतें आराधीना आयकें। होती पुंसा बोलावित कौतुकें। तिये वैकुंठीं तुवां गणिके। सुरवाडु केला ॥** अ. ११, ओ. १०७.

पूर्वी मिथिला नगरींत पिंगला नांवाची एक वेश्या राहत होती. ती अनेक धनिकांबरोबर विलास करून चैनींत आयुष्य घालवीत होती. एकदां ती अशाच एखाद्या विषयासक्ताची वाट पहात रात्रभर जागत बसली; पण त्या रात्रीं तिकडे कोणीहि आलें नाहीं. तेव्हां तिच्या मनांत एकदम विरक्ति उत्पन्न झाली. विषयसुखांतील दोष तिला दिसूं लागले. त्यामुळें तिला आपल्या गतचरित्राचा तिटकारा वाटला. तिला अतिशय पश्चाताप झाला व ती भगवत्परायण झाली. तिनें पोपट बाळगला होता. त्यास तिनें 'विठ्ठल, विठ्ठल राम राम' असें बोलावयास शिकविलें. मरणसमयीं ती पोपटास "बोल विठ्ठल विठ्ठल" म्हणून बोलावीत होती. तिला सद्गति प्राप्त झाली व अंतकाळीं पोपटाच्या निमित्तेंकरून रामनाम मुखांत आल्यामुळें वैकुंठ लोक प्राप्त झाला. तिच्या अनन्य भक्तीनें तिच्या कृतपातकाचा नाश झाला व अखेर ती परमात्मपदीं लीन झाली व वैकुंठास गेली.

**५१. मागां बाळपणीं येणें श्रीपती। जें एकवेळ खादली होती माती। तें कोपोनियां हातीं यशोदा धरिला ॥** अ. ११, ओ. १८२.

श्रीकृष्ण बाळपणीं नंदयशोदेजवळ राहत होते. त्यामुळें एकदां त्यांनीं माती खाल्ली म्हणून यशोदेनें त्यास शिक्षा करण्यासाठीं म्हणून तोंड उघडण्यास सांगितलें. त्यांनी भीत भीत तोंड उघडून दाखविलें. त्यांत तिला चवदा भुवनें फिरतात असें दिसलें. ते पाहून यशोदा आश्चर्यानें व भीतीनें गांगरून गेली, तेव्हां भगवानांनी पुनः आपलें मायेचे पटल तिजवर टाकले व जणुं काय माती खाल्लेली दाखविण्यासाठींच तोंड उघडले आहे, असें तिला भासविले. त्या प्रसंगाचा येथें निर्देश केला आहे.

**५२. नातरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें। आणि वेदांचियेहि मति ठेलें। तें लागला बोलों ॥** अ. ११, ओ. १८४.

श्रीहरीच्या हातांतील शंख समस्त अज्ञान निरसनपूर्वक पूर्ण ज्ञानप्राप्ति करून देणारा आहे. ध्रुवाची परमेश्वराराधनेची घोर प्रतिज्ञा ऐकून नारदानें त्यास भगवन्नाम जपयज्ञ करण्यास सांगितलें त्याच्या कडक, अनन्यभावपूर्वक तपश्चर्येनें श्रीहरीनें 'मधुवनांत' येऊन दर्शन दिलें. असें ध्रुवबाळाला श्रीहरीनें दर्शन दिल्याबरोबर श्रीहरीशीं बोलावें, त्यांना हितगुज सांगावें, श्रीहरीची स्तुति करावी. अशी इच्छा झाली. पण ती कशी करावी हे त्यास सुचेचना. म्हणून करसंपुट बरवें जोडून निवांत बसला. तेव्हां :—

श्रीहरीनें आपल्या हातांतील पांचजन्य संज्ञक शंखानें ध्रुवबाळाच्या गालाला स्पर्श केला. श्रीहरीच्या हातांतील शंखाचा गालाला स्पर्श होताचक्षणीं ध्रुवाचे सारें अज्ञान मावळून गेलें. व त्याच्या बुद्धींत ज्ञानाचा संपूर्णतया प्रकाश पडला. त्याबरोबर तो वेदासही जें सांगतां आलें नाहीं तें भगवत् गुणवर्णन "ध्रुव स्तुती" मध्यें त्यानें केलें. असा आहे त्या श्रीहरीच्या हातांतील शंखाचा अपूर्व महिमा.

**५३. जैसा आब्रह्म पूर्णोदकीं । पव्हे मार्कंडेय एकाकीं ॥** अ. ११, ओ. १८७.

मार्कंडेय हे महान् ब्रह्मर्षि असून, त्यांनीं परमेश्वराजवळ त्याची माया पाहण्याची इच्छा दर्शविली. भगवंतानें 'तथास्तु' म्हटलें. पुढें एकदां हे आश्रमांत बसले असतां, जोराचा वारा सुटून पृथ्वी जलमय झाल्याचे त्यांना दिसले. हे त्या जलप्रलयांत एकाकी पोहत असतां, त्यास एका वटपत्रावर एक सुंदर बालक निजलेलें दिसलें. या बालकाच्या श्वासानें ते पोटांत ओढले गेले व तेथें बाहेरच्या सृष्टिप्रमाणेंच सर्व सृष्टि पुनः त्यांना दिसली. बालकाच्या श्वासाबरोबर ते बाहेर पडले तेव्हां आपण आपल्या आश्रमांतच आहों, असें त्यांना दिसलें. पाहिलें तें सर्व खोटें, मायारूप असें त्यांनी ओळखलें. त्यांच्या आश्चर्ययुक्त मनःस्थितींत भगवंतांनीं त्यांना पुनः दर्शन दिले व इच्छा पुरी केली, असें पटवून दिले. ब्रह्मलोकापर्यंत पाणीच पाणी होऊन जलप्रलय झाला त्यावेळीं मोठ्या झालेल्या मत्स्यानें त्यांना वाचविलें. माशाच्या शिंगाना धरून एकटाच कित्येक वर्षें पोहत राहिला. तसा अर्जुन विश्वरूपरूपी समुद्रांत एकटाच फिरत राहिला.

**५४. तुवां गोग्रहणाचेनि अवसरें । घातलें मोहनास्त्र एकसरें । मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें । आसडूनि नागविलें ॥** अ. ११, ओ. ४६३.

**उत्तरु वैराटींचा राजा । पळतां तूं कां निघालासि झुंजा ? । हा क्षात्रस्वभावो तुझा । झुंजवील तुज ॥** अ. १८, ओ. १२९५.

पांडवांनी बारा वर्षें वनवासांत काढल्यावर एक वर्ष ते विराटाच्या घरीं अज्ञातवासांत राहिले होते. विराट राजाजवळ गायींची असंख्य खिल्लारें होती, हें वृत्त कौरवांना कळलें तेव्हां त्यांच्या गायी जिंकून आणाव्या असें त्यांनीं ठरविले आणि विराटाच्या राज्यावर चाल करून गेले. त्याप्रमाणें शत्रु आलेला पाहून विराट राजा युद्धास निघाला. त्याच्याबरोबर कंक, बल्लव, इत्यादि नांवें धारण करून वेष पालटून राहिलेले चारी पांडवहि गेले. अर्जुन बृहन्नडा वेषांत असल्यामुळें तो तेवढा मागें राहिला. इतक्यांत कौरव सैन्य उत्तरेकडून गायी पळवून नेत आहे, अशी बातमी आली; त्यावेळीं विराटाचा पुत्र उत्तर युद्धाला जाण्यास तयार झाला. पण त्याला कोणी योग्य सारथी दिसेना. तेव्हां सैरंध्रीच्या वेषांत असलेल्या द्रौपदीनें त्याला बृहन्नडा उत्तम सारथ्य करील असें सुचविलें. त्याप्रमाणें तो अर्जुनाला सारथि करून युद्धाला गेला. परंतु ते अफाट कौरव सैन्य पाहतांच तो भीतीनें पळूं लागला. तेव्हां अर्जुनानें त्याला रथाला बांधून ठेविलें व मोहनास्त्राचा प्रयोग करून सर्व कौरवांना सैन्यासह मूर्छित पाडिलें व त्यानें भीष्म द्रोणादि पूज्य गुरूंना वगळून त्या सर्व कौरवांचीं वस्त्रें उत्तराकरवीं काढून घेवविलीं. याप्रमाणें कौरवांचा पूर्ण पराभव करून गायी परत नगराकडे वळविल्या. अर्जुनाला प्रगट व्हावयास तीन दिवस अवकाश होता. म्हणून ' हा सर्व पराक्रम विराट पुत्र उत्तरानेंच केला, ' अशी त्यानें सर्वांची समजूत करून दिली. यावरून या युद्धाला ' उत्तर गोग्रहण ' असें नांव प्राप्त झाले.

तसा या युद्धाचे वेळीं निमित्तमात्र हो. अठराव्या अध्यायांत हाच पौराणिक दाखला; पण अर्जुनाला तुझा क्षात्रस्वभाव तुला आतां अवशतेनें लढावयास लावीलच, हे सांगण्याकरितां दिला आहे.

**५५. प्रियाचिया ठायीं सन्मान । प्रिय न पाहें सर्वथा जाण । तेवीं उच्छिष्ट काढिलें आपण । ते क्षमा कीजो जी ॥** अ. ११, ओ. ५७५.

युधिष्ठीरानें राजसूय यज्ञ केला होता. त्या प्रसंगीं ब्राह्मणांच्या पंक्ति जेऊन उठतांच श्रीकृष्ण स्वतः त्यांची उष्टि काढीत असें त्या भक्तपरवशतेच्या प्रसंगाला उद्देशून हा उल्लेख आहे.

* * *

## अध्याय तेरावा

**५६. ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकरु म्हणौनि कोळसा । कामु केला ॥** अ. १३, ओ. २५.

कैलासाचे राज्य सोडून शंकरांनीं स्मशानांत वास केला तेव्हां तेथें तपश्चर्येंत विघ्न उत्पन्न करणारा व योग्यांचें [illegible] विचलित करणारा जो मदन [काम] त्याचे त्यांनीं आपल्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें भस्म केले. ब्रह्मदेवाच्या हृदयापासून कामाची उत्पत्ति असून त्याच्या स्त्रीचे नांव रति आहे. त्या रतीनें प्रार्थना केल्यावर विषयलोभरूपी लांच घेऊन साधकास साधनेपासून भ्रष्ट करणाऱ्या कामास अर्धवट कोळशाप्रमाणें जाळलेल्या अवस्थेंत जीवंत ठेविलें.

**५७. जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी । जयाचिये भाटिवे लागीं । मी कपिल जाहलों ॥** अ. १३, ओ. ९५८.

कर्दम ऋषि हा एक प्रजापति होता. हा ऋषि आणि त्याची बायको, मनु नांवाची कन्या, देवहुती यांच्या पोटीं विष्णूनें जो अवतार घेतला तो म्हणजे कपिल महामुनींचा. या कपिलाचा जन्म सिद्धपुरांत झाला. तेथे बिंदु सरोवरावर

त्यांचा आश्रम अद्यापि दाखविला जातो. मातेस संपूर्ण सांख्य शास्त्र विस्तारपूर्वक शिकवून कपिल स्वत: पाताळांत जाऊन राहिले ही एक भगवत् विभूति आहे.

* * *

# अध्याय पंधरावा

**५८. वायसा एकें बुबुळें दोहींकडे । डोळा चाळितां अपाडें । दोन्ही आर्थी ऐसा पडे । भ्रमु जेवीं जगा ॥** अ. १५, ओ. १३५.

रामचंद्र वनवासांत असतां एकदां ते सीतेच्या मांडीवर मस्तक ठेवून निजले होते. इतक्यांत इंद्राचा पुत्र जयंत कावळ्याचें रूप घेऊन तेथें आला व आपल्या चोचीनें व नखांनीं सीतेच्या हृदयावर प्रहार करूं लागला. त्यामुळें सीतेचे अंग रक्तबंबाळ झालें. त्यावेळीं रामाला झोंप लागली होती. यास्तव तिनें सर्व वेदना मुकाट्यानें सहन केल्या. पतीचा निद्राभंग होऊं नये म्हणून तिनें नुसती हालचालहि केली नाहीं. रामचंद्रांनीं जागे झाल्यावर हा प्रकार पाहिला व त्यांनीं दर्भाची एक काडी उचलून ती ईशिकास्त्रानें मंत्रून त्या कावळ्यावर सोडली. तसा तो कावळा उडाला व तें अस्त्र त्याच्यामागें लागलें, तो त्रिभुवन हिंडला, पण तें अस्त्र त्याची पाठ सोडीना. शेवटीं त्यानें रामचंद्रापाशीं परत येऊन क्षमा मागितली व अस्त्राचें निवारण करण्याची विनंती केली. तेव्हां रामचंद्रानें सांगितलें कीं, तुझ्या एका नेत्राचा भेद केल्यावांचून हें अस्त्र शांत होणार नाहीं. यास्तव त्याला एक नेत्र दे, यापुढें तुझा एकच नेत्र दोन्हीं नेत्रगोलांत फिरत राहील. त्याप्रमाणें कावळ्यानें एक नेत्र दिला. तेव्हांपासून कावळ्याच्या नेत्रांतील एकच बुबुळ दोन्ही बाजूला फिरत असते. तो इतक्या चलाखीनें व वेगानें फिरवीत असतो कीं त्याच्या दोन्ही डोळ्यांत बुबुळे आहेत असा सर्व लोकांना भ्रम होतो.

हा दृष्टान्त देऊन दरएक क्षणांत वृत्तिज्ञानाबरोबर विषयाची उत्पत्ति व वृत्तिज्ञानाच्या लयाबरोबर दृश्यरूप सृष्टीचाहि लय होतो, पण त्याचा वेगातिशय मुळीस कारण होऊन संसारवृक्ष अव्यय आहे, असा लोकास भ्रम होतो असें सुचविलें आहे.

**५९. तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया ॥** अ. १५ ओ. ५२६.

देवालयांत विशेषतः शिवमंदिरांत गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर एक सिंहासारखें अक्राळविक्राळ राक्षसाचे तोंड काढलेले असते. त्याला कीर्तिमुख म्हणतात. याविषयीं स्कंद पुराणांत अशी कथा आहे कीं :—

शंकरांनीं जालंदराला मारण्यासाठीं क्रोधावस्थेंत सिंहाच्या मुखाची आकृति असलेला एक पुरुष निर्माण केला होता. जालंदरादिकांना मारूनहि त्याची भूक शमेना. तेव्हां शंकरांनी त्याला त्याचेंच शरीर खाण्यास सांगितलें व उरलेल्या तोंडाच्या आकृतीला 'कीर्तिमुख' असें नांव दिलें आणि प्रत्येक शिवालयांत दाराच्या उंबऱ्यावर ते काढण्याविषयींची आज्ञा केली. [ कीर्तिमुखाचें दर्शन घेऊन मग शिवाचें दर्शन घेण्याची पद्धत आहे. ] ज्ञान उलंघून गेल्यावर ज्ञेयदर्शन होतें.

कीर्तिमुखानें ज्याप्रमाणें इतर राक्षसांना खाऊन शेवटीं आपलें शरीरहि खाल्लें, त्याप्रमाणें ज्ञान अज्ञानाला नाहींसें करून अन्यसाधननिरपेक्षतेनें निवर्त्य असें कांहींच शिल्लक नसल्यामुळें स्वतःहि नाहींसें होतें व अत्यंत निर्विशेष ज्ञानाज्ञानाहून अतीत अशी दृङ्मात्र स्वरूपभूत ब्रह्मस्थिति उर्वरित राहते, असें या ओवींत दाखविलें आहे.

**६०. मज चैतन्य शंभूच्या माथां । जो निक्षेपु होता पार्था । तया गौतम जालासि आस्था- । निधि तूं गा ॥** अ. १५, ओ. ५७९.

**बहुत काय बोलों पैं गा । एका गौतमासीचि गंगा । येरां समस्तां काय जगा । वोहोळ जाली ? ॥**
अ. १७, ओ. ९२.

**कां गौतमाचेनि मिषें । कळीकाळ ज्वरितोद्देशें । पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ॥**
अ. १८, ओ. १६८९.

'गंगा गौरी' दोघी सतत भांडण करीत असत. त्यामुळें पार्वतीस असें वाटलें कीं गंगेला कोणत्यातरी युक्तीनें महादेवापासून दूर घालवावें. तेव्हां पार्वती व गणपती यांनी परस्परांत एक युक्ति शोधली कीं, आपल्या दासीला गाईचें रूप धारण करून पृथ्वीवर जाण्यास सांगावें. तेथें गौतम ऋषी दंडकारण्यांत नित्य साळी पेरतात. त्यावेळीं गाईचें रूप धारण करून खाव्यात व ऋषीनें हाकलून दिल्यास तात्काळ प्राण सोडावा. असें ठरल्यानंतर गणपती गणेशभट्टाचें रूप धारण करून गौतमऋषीचें आश्रमांत राहूं लागले. एके दिवशीं गाय गौतम ऋषींच्या शेतांत साळी खावूं लागली, तेव्हां ऋषीनें एक दर्भ अभिमंत्रून त्या गाईस मारले. तेव्हां गाईनें तात्काळ प्राण सोडला. हा प्रकार पाहून गणेशभट्ट म्हणाले, गौतमा ! शंकराच्या मस्तकावरील गंगा जर तूं मिळविशील तर तुझ्या गोहत्या पातकाचें क्षालन होईल. गणेशभट्टाच्या सांगण्याप्रमाणें गौतमानें घोर तपश्चर्या केली व शंकर त्यास प्रसन्न झाले व आपली एक जटा गौतमास दिली. त्यानें ती जटा ब्रह्म

गिरीपर्वतावर औदुंबराचे ढोलींत ठेवली. त्याबरोबर गंगेचा प्रवाह सुरू झाला व तो गोहत्येच्या पातकांतून मुक्त झाला. ही गंगा गौतमानें आणली म्हणून तीस 'गौतमी' असें म्हणतात. गौतमास ती गंगा व इतरास ती ओढा झाली आहे काय ! असे सांगून तत्त्वज्ञ संताच्या आचरणाचा कित्ता गिरविणारा सात्त्विक श्रद्धावानहि शास्त्रज्ञान असलें तरी तो तरतो.

**६१. तो धृतराष्ट्ररायां । सूतसे पान करावया । म्हणौनि जीवितान्तु तया । नोहेचि भारी ॥**
अ. १५, ओ. ५९०.

**तैसीं श्रीहरि वक्त्रींचीं अक्षरें । संजयें सांगितलीं आदरें । तिहीं अंधु तोहि अवसरें । सुखिया जाला ॥**
अ. १५, ओ. ५९३.

भारतीय महायुद्ध संपल्यावर धृतराष्ट्र तपश्चर्या करण्याकरितां वनांत गेला होता. तेथें वायु भक्षण करून तपश्चर्या करूं लागला. एके दिवशीं त्या अरण्यास वणवा लागला. सर्व पशुपक्षी पळून गेलें. धृतराष्ट्र अंध व शक्तिहीन असल्यामुळें पळूं शकला नाहीं. कुंति त्याचेबरोबर होती. ती म्हणाली "भावोजी, मी तुम्हास या वणव्यांतून बाहेर काढतें चला." त्यावर धृतराष्ट्र बोलला आगा कुंती आजवर खूप भोगलें व सोसलें आतां हा प्रसंग चांगला आला आहे. कोल्ह्या कुत्र्याच्या तोंडीं पडण्यापेक्षां अग्निदहन आपोआप होत आहे, तर मी आतां येथेंच बसून निश्चळ चित्तानें भगवत् चिंतन करितो. आतां मरण आटळ आहे असें त्यांस कळलें आणि संजयानें आपणास सांगितलेला आत्मज्ञानाविषयक उपदेश त्यास आठवला. ज्ञानी पुरुषाचें प्राण उत्क्रमण होत नाहींत हे त्यास ठाऊक होते. म्हणून त्यानें हटयोगानें प्राणाचा विरोध करून आपलें प्राण स्वस्वरूपीं लीन केलें आणि त्याचें शरीर अग्निनारायणानें जाळून टाकलें. गीता ऐकण्याचे वेळीं धृतराष्ट्र अनधिकारी होता. तरी शेवटीं अंतसमयीं त्याच बोधाचा प्रकाश त्याला चांगला फळास आला म्हणजे संजयानें श्रीहरीच्या मुखांतलीं सांगितलेलीं अक्षरें आंधळ्या धृतराष्ट्रासहि "कांहीं अवसरानें" म्हणजे मरणकालीं उपयोगी होऊन तो सुखी झाला.

* * *

## अध्याय सोळावा

**६२. तेवीं सत्त्वरूप उचलेपणें । बुद्धि जें ऐसें अनन्य होणें । ते सत्त्वशुद्धि म्हणे । केशीहंता ॥**
अ. १६, ओ. ८०

श्रीकृष्ण आपल्या हांतून निसटून गोकुळांत वाढत आहे, हे वृत्त कंसाला कळल्यावर त्यानें त्याचा नाश करण्याचें अनेक उपाय योजिलें, त्यांतच केशी नांवाच्या एका दैत्याला पाठविलें. तो घोड्याचे रूप धारण करून गोकुळांत गेला व श्रीकृष्णाच्या अंगावर चावण्यासाठीं धांवला. तेव्हां श्रीकृष्णानें आपला हात त्याच्या मुखांत घातला. दैत्य हात चावू लागला; पण त्यायोगें श्रीकृष्णाला कांहीं दुःख न होतां तो हात सारखा वाढत वाढत चालला व शेवटीं तो दैत्याच्या हृदयापर्यंत पोंचला. तेव्हां ती वेदना सहन न होऊन केशी दैत्य मरण पावला, त्याला श्रीकृष्णाच्या हातून मरण आल्यामुळें तो सायुज्य मुक्तीला प्राप्त झाला.

**६३. नाना रंभेचेनि रूपें । शुकीं नुठिजेचि कंदर्पें ॥**
अ. १६, ओ. १२७

व्यासपुत्र शुक हे जन्मतःच परमज्ञानी होते. व्यासांनीं त्यास व्यास भागवत पढविलें. व तेच त्यांनी पुढे परीक्षित राजास सांगितले. त्याच्या तपाचरणांत व्यत्यय आणण्यासाठीं इंद्रानें रंभेला त्याच्याकडे पाठविलें; पण ते मुळींच मोहित झाले नाहींत. रंभा ही सर्व अप्सरांत अत्यंत रूपवती, लावण्यखाणी होती. ती शुकास बोलली "अरे शुका माझ्या देहांत सामान्य स्त्रियांसारखी दुर्गंधी नाहीं; तर केशरकस्तुरीसारखी सुगंधी द्रव्यें आहेत पाहा." म्हणून तिनें पोट फाडून दाखवलें. त्यावर शुक म्हणालें, रंभे ! हें मला आधीं माहीत असतें तर मी तुझ्याच पोटीं जन्म घेतला असता. शुकाचार्य म्हणजे मूर्तिमन्त वैराग्याचे प्रतीकच होते.

* * *

## अध्याय सतरावा

**६४. त्रिगुण त्रिपुरीं वेढिला । जीवत्व दुर्गीं आडिला । तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृति ॥** अ. १७, ओ. २.

त्रिपुरासुर नांवाचें तिघे दैत्य होते. त्यांनी तपश्चर्या करून शंकराकडून तीन नगरें मागून घेतली. त्यांतील एक नगर सोन्याचे, एक रुप्याचे व एक लोखंडाचें होते. तीं तिही नगरें स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकांत फिरत असत. परंतु तीं तिन्ही नगरें एका रेषेंत जमताच त्यांचा नाश होईल असा त्यांना शाप होता. ते तिघे दैत्य आपापल्या नगरींत बसून सगळ्या त्रिभुवनांत संचार करीत व प्राण्यांना पीडा देत असत, तेव्हां सर्व देवांनीं महादेवाकडे जाऊन असुर निर्दलनार्थ महादेवाची प्रार्थना केली. सर्व देवांनीं या युद्धांत शंकरास साह्य कल होतें; पण गणपतीची प्रारंभीं

मंगलरूप आराधना केली नसल्यानें देवांना त्यांत यश लाभेना. तसे मंगल केल्यावरच शंकरांना त्रिपुरासुराचा नाश करता आला. म्हणून श्रीज्ञानदेव म्हणतात त्रिगुणरूपी त्रिपुरांनीं वेढलेल्या जीवात्म्याची सोडवण आत्मज्ञानरूपी शंकर करतील; पण त्यासाठीं सद्‌गुरुरूपी गणेशाची आराधना अवश्य आहे. याप्रमाणें पुष्कळ काळ निघून गेल्यावर एकदां ते तिघेहि फिरतां फिरतां एका ठिकाणीं जमले. ती नगरें एकत्र दिसतांच शंकरानें बाण मारून ती दग्ध केलीं. त्याबरोबर ते दैत्यहि मरण पावले. या रूपकानें सत्त्व–रज–तम यांनाच त्रिपुरासुर कल्पिले आहे.

* * *

# अध्याय अठरावा

**६५. पहिलिया वैराग्य गरळा। धैर्यशंभु वोडवी गळा।** अ. १८, ओ. ७८९.

**परि ते एकबगीं थोडें। केलिया प्रतिकारा माजिवडें। आणि तिये अवसरींचें तें सांकडें। निस्तरविलें शंभू॥** अ. ११, ओ. ४०४.

समुद्र मंथनाच्यावेळीं प्रथम जग जाळणारें हालाहल विष बाहेर पडलें. तेव्हां तें कोणी उचलावे याची देवांना विवंचना पडली. शंकर जगत् कल्याणासाठीं पुढें आले व त्यांनी विष प्राशन केलें. म्हणून तर पुढें अमृताची प्राप्ती झाली.

तसें परमार्थात प्रारंभीं कठीण वैराग्यरूपी हालाहल धैर्यरूपी शंकरानें आत्मसात् केल्यावर ज्ञानामृताचा लाभ होतो.

**६६. सटवीचिये राती। न विसंबिजे जेवीं वाती॥** अ. १८, ओ. ८३७.

प्रसूतीनंतर सहाव्या दिवशीं सटवीची पूजा करतात. "विघ्नेशस्य जन्मदात्रीं जीवन्त्य परनाम्न्याः षष्ठीदेव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्च पूजनं करिष्ये।" असा पूजेचा संकल्प असतो. पाटावर तांदूळ व त्यावर चार सुपाऱ्या ठेवून जीवंती, षष्ठी आणि शस्त्रगर्भा भगवती या तीन देवींचें आवाहन करतात. एक कोयता सोवळ्याच्या फडक्यांत गुंडाळून सुपलींत ठेवतात. गौरीपुत्रो यथा स्कंदः शिशुत्वे रक्षितः पुरा। तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नमः॥" अशी शेवटीं प्रार्थना करतात. म्हणजे स्कंद [ कार्तिकेय ] याचें रक्षण सटवीनेंच केलें अशी कथा दिसते. रात्रीं काळोखांत येऊन सटवीनें मुलाला अपाय करूं नये म्हणून त्या रात्रीं समई सारखी तेवत ठेवितात. त्याप्रमाणें ईश्वराविषयीं चित्तांत विचार जागृति, ठेवावी असा तपासाठीं हा दृष्टान्त दिला आहे.

**६७. तेथ अमरत्वा वोगरिलें। तें मरणाचि लागीं जालें॥** अ. १८, ओ. १४७८.

समुद्र मंथनांतून जेव्हां अमृत निघालें तेव्हां तें देव आणि दानव या दोघांच्या हक्काचे झालें; पण दानवांना अमृत देऊन अमर करणें हे हानिकर म्हणून श्रीविष्णूनें मोहिनीचें रूप घेऊन अमृत कलश पळविला. नंतर देव व दानव यांच्या पंक्ति समोरासमोर बसवून देवांच्या पंक्तींत मात्र विष्णु मोहनीच्या रूपानें अमृत वाढूं लागले; त्यावेळीं राहु, देवाच्या पंक्तींत नकळत येऊन बसला व त्याने इतरांबरोबर अमृत पान केलें. अमृत त्याच्या गळ्याखालीं उतरण्यापूर्वीच चंद्र–सूर्यांनीं त्याला दैत्य म्हणून ओळखलें. तेव्हां विष्णूनें त्याचा शिरच्छेद केला. तेच राहु व केतु संज्ञक ग्रह म्हणून प्रसिद्ध आहेत. विनियोगाच्या वर्माचें ज्ञान नसल्यास वस्तुलाभ झाला तरी योग्य तें फळ पदरीं पडत नसते. असें या दृष्टान्तानें सांगितलें आहे.

**६८. नहुष स्वर्गाधिपति जाहला। परी राहटी भांबावला। तो भुजंगत्व पावला। नेणसी काई?॥** अ. १८, ओ. १४७९.

इंद्राचा विश्वरूप नांवाचा एक उपाध्याय होता. तो दैत्यांना साह्य करतो असें कळल्यावरून इंद्रानें त्याचा शिरच्छेद केला. त्यामुळें त्याला ब्रम्हहत्या घडली. इंद्रानें याप्रमाणें त्याचा वध केल्यामुळे विश्वरूपाच्या पित्याला अतिशय क्रोध आला व इंद्राचा वध करणारा पुत्र व्हावा म्हणून त्यानें यज्ञ आरंभिला. त्या यज्ञांत अपस्वर उच्चारल्यामुळें मंत्राचा अर्थ 'इंद्राचा वध करणारा' असा न होता 'इंद्राच्या हातून मरणारा' असा झाला. पुढें त्याला पुत्र झाला त्याचें नांव वृत्रासुर ठेविलें. त्या वृत्रासुरानें इंद्राबरोबर युद्ध केलें. त्याचा मृत्यु इंद्राच्या हातून असल्यामुळें तो दधीचि ऋषीच्या अस्थीपासून बनविलेल्या वज्राने मरण पावला. इंद्राला ही दुसरी ब्रह्महत्या घडली. तेव्हां इंद्रसरोवरांत जाऊन कमल नालांत लपून बसला. त्यामुळें इंद्रपदावर कोणी अधिकारी राहिला नाहीं. कारण, इंद्रपद प्राप्त होण्यासाठीं शंभर अश्वमेध यज्ञ करावे लागतात. त्याच वेळेस पृथ्वीवर पुरुरव्याचा नातू नहुष नांवाच्या पराक्रमी व सद्‌गुणी राजानें शंभर अश्वमेध पूर्ण केले होते. त्याला तें अनायासें रिकाम पडलेलें इंद्रपद प्राप्त झालें. परंतु त्याला इंद्राणी मात्र मिळाली नाहीं. कायमच्या द्रावांचून इंद्रपदावर येणाऱ्या इतरास इंद्राणी मिळत नाहीं. त्यामुळें नहुषाची नुसत्या इंद्रपदानें तृप्ति होईना. त्यानें इंद्राणी मिळविण्याचे अनेक प्रयत्न चालविलें. तेव्हां तिने त्याचा नाश करण्याची एक युक्ति योजिली. तिने त्यास निरोप पाठविला कीं, तूं जर अपूर्व वाहनांत बसून मजकडे येशील तर मी तुला वश होईन. हा निरोप ऐकून नहुष आनंदातिशयानें पालखींत बसून

तिच्याकडे निघाला. वाहनाच्या वैलक्षण्यासाठीं त्यानें सप्तर्षींना पालखी खांद्यावर वाहून नेण्यास लावले. याप्रमाणें ते जात असतां मार्गांत अगस्ति ऋषि त्वरेनें चालेनात, म्हणून त्यास नहुषानें ' सर्प, सर्प ' म्हणजे लवकर चल, लवकर चल, असा हुकूम करून लत्ताप्रहार केला. तेव्हां ऋषीनें संतप्त होऊन नहुषाला ' तूं सर्प होशील ' असा शाप दिला. लगेच तो इंद्रपदावरून च्युत होऊन सर्प होऊन पालखींतून लोंबकळूं लागला व पृथ्वीवर पडला. या स्थितींत पुष्कळ काळ गेल्यावर पांडवांच्या हातून नहुषाचा उद्धार झाला व तो सर्प योनींतून मुक्त झाला.

**६९. कीं गीता हे सप्तशती । मंत्र प्रतिपाद्य भगवती । मोहमहिषा मुक्ती । आनंदली असे ।।**

अ. १८, ओ. १६६६

महिषासुर नांवाचा एक दैत्य होता. त्यानें उग्र तपश्चर्या करून ' सृष्टींतील कोणत्याहि पुरुषदेह धारण करणाऱ्या प्राण्याच्या हातून मरणार नाहीं. ' असा वर मिळविला होता. या वराच्या बलावर त्यानें सर्व त्रैलोक्य पादाक्रान्त केले. सर्व देव त्रस्त होऊन भगवान् विष्णूला शरण गेले. त्यावेळीं भगवानांनीं स्त्री देह धारण करून त्या दैत्याचा नाश करण्याचे ठरविलें. त्यांनीं सर्व देवतांतील अंश घेऊन एक सुंदर आदिशक्तिद्वारां अष्टभुजा स्त्रीशरीर निर्माण केलें व त्यांत स्वतः अंशरूपानें प्रवेश केला व पृथ्वीवर येऊन त्या दैत्या-बरोबर युद्ध आरंभिलें. तो दैत्य महिषरूप घेऊन युद्धाला आला होता. त्याच्या सर्व परिवाराचा स्त्रीरूपधारी देवतेनें समूळ संहार करून अखेर त्या दैत्याचाहि वध केला. महिषा-सुराचा वध करणारी म्हणून त्या देवतेला महिषासुरमर्दिनी हे नांव प्राप्त झाले. त्याप्रमाणें गीता ही महिषासुरमर्दिनी देवी आहे. देवी सप्तशतीप्रमाणें गीतेचेहि श्लोक सातशेच आहेत. तिनें " मोह " रूपी महिषाचा वध केला आहे. [ पाहा " नष्टो मोहः " ] व आनंद पावली आहे.

**७०. श्रीगुरुंचेनि नांवें माती । डोंगरीं जयापाशीं होती । तेणें कोळीयें त्रिजगतीं । येकवद केली ।।**

अ. १८, ओ. १७३०

द्रोणाचार्य कौरव–पांडवांना धनुर्विद्या शिकवीत असत. त्यांचा पुत्र अश्वत्थामा व शिष्य अर्जुन हे दोघेच या विद्येंत प्रविण झाले. एकदां द्रोणाचार्यांची कीर्ति ऐकून एकलव्य नांवाचा एक भिल्ल त्यांजपाशीं आला व त्यानें ' मला धनुर्विद्या शिकवा' अशी विनंति केली. तेव्हां द्रोणाचार्य म्हणाले कीं, मी क्षत्रिय कुमारांनाच धनुर्विद्येचें शिक्षण देत असतो, ही विद्या मी भिल्लांना शिकवीत नसतो. हे उत्तर ऐकून तो भिल्ल खिन्न झाला; परंतु तो निरुत्साही मात्र झाला नाहीं. त्याची गुरूंवरील निष्ठा प्रबल होती. तो आपल्या झोपडींत परत गेला. तेथें त्यानें मातीची द्रोणाचार्यांची प्रतिमा तयार केली. त्या मूर्तीचें पूजन करून त्यानें तिला गुरुंच्या जागीं कल्पिलें. व तिच्या अनुज्ञेनें विद्याभ्यास आरंभिला. अशा रीतीनें तो अश्वत्थामा व अर्जुन यांच्या पेक्षांहि धनुर्विद्येंत निष्णात झाला. एके दिवशीं एक श्वान येऊन त्या भिल्लाच्या झोपडीजवळ भुंकूं लागलें. त्या गडबडीनें त्याच्या पूजेस व्यत्यय आला. तेव्हां त्यानें आपल्या विद्येच्या सामर्थ्यानें त्या श्वानाचें मुख बाणानें अशा रीतीनें विद्ध केले कीं; त्यास भुंकण्यासाठीं उघडलेला जबडा मिटतांच येईना. याप्रमाणें वेदनेनें व्याकुळ झालेला तो श्वान वनांतून येत असलेला पाहून धनुर्विद्येंत इतका प्रवीण कोण असावा. याचे पांडवांना आश्चर्य वाटून ते शोध करण्यासाठीं द्रोणाचार्यांसह त्या श्वानाच्या मुखांतून गळालेल्या रक्ताच्या अनुरोधानें वनांत शिरले. तेथें मातीच्या मूर्तीचें एकाग्र चित्तानें ध्यान करीत असलेला एकलव्य त्यांच्या दृष्टीस पडला गुरु द्रोण आलेले पाहून त्याला अतिशय संतोष वाटला. व त्याची गुरुभक्ति पाहून द्रोणाचार्यहि प्रसन्न झाले; परंतु आपला पुत्र किंवा अर्जुन यापेक्षां धनुर्विद्येंत कोणीहि निष्णात नसावें, म्हणून त्यांनी एकलव्यापाशीं त्याच्या उजव्या हाताचा अंगठा गुरुदक्षिणा म्हणून मागितला. अंगठ्याच्या सहाय्यावांचून शरसंधान करतां येत नाहीं; म्हणून द्रोणाचार्यांनी ही युक्ति योजली होती; पण एकलव्यानें तात्काळ तो कापून त्यांच्या पुढें ठेविला. अद्यापहि भिल्ल धनुष्यावर बाण जोडते वेळीं उजव्या हाताच्या आंगठ्याचा उपयोग करीत नाहींत. या दृष्टांतानें गुरुवर निष्ठा ठेवून गुरु संप्रदायानेंच शास्त्राभ्यास केला असतां ती विद्या फलद्रूप होते, हे दाखविलें आहे. श्रीगुरूंच्या मातीच्या पुतळ्यावर श्रद्धा ठेवून दृढाभ्या-सानें जर इतकें फळ मिळतें, तर माझे श्रीगुरु प्रत्यक्ष श्रीनिवृत्ति नाथांची माझेवर इतकी कृपा असतां माझेकडून गीतेचें व्याख्यान उत्तम पार पडलें यांत आश्चर्य ते काय ?

* * *



# सार्थ श्रीज्ञानेश्वरीतील नकाशे







अध्याय तिसरा
मोक्ष
साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ अ. १८-१४३७.
ज्ञान मार्ग
[ तीव्र अधिकाऱ्यांसाठीं ]
कर्म मार्ग यांपैकीं निश्चित मार्ग कोणता ? अर्जुनाचा प्रश्न.
[ मंद अधिकाऱ्यांसाठीं ]
[ श्लोक १, २ ]
कर्मयोगाचे हेतु, स्वरूप, सामान्य महत्त्व
[ श्लोक ३ ते ९ ]
विशेष महत्त्व
अनुष्ठान
फल
ब्रह्मदेवानें प्रजेला केलेला उपदेश म्हणजे कर्म महत्त्वाबद्दल पुराणांचा आधार.
[ श्लोक १० ते १२ ]
ज्ञानी मनुष्यानेंही लोकसंग्रहार्थ कर्में करावीं, हे जनकादिकांच्या व स्वतः पूर्णकाम असणाऱ्याच्या उदाहरणानें सांगितलें.
[ श्लोक २० ते २६ ]
सामान्य
पापनिवृत्ति व पर्जन्य, अन्नोत्पत्ति या कार्यकारण परंपरेनें भूतांचे पाळण, उलटपक्षीं दोष.
[ श्लोक १३ ते १६ ]
विशेष
ज्ञानद्वारां तात्त्विक श्रेष्ठ अशी "मोक्षप्राप्ति"
[ श्लोक १७ ते १९ ]
कसें करावें ?
प्रकृतिगत धर्माधर्मसंस्कारानुरूप कर्में होत असली तरी त्याला शास्त्रीय वळण देऊन निष्काम, निरहंकारबुद्धीनें स्वधर्मानुष्ठान करावें.
[श्लोक २७ ते ३५]
कळत असून वळत कां नाहीं ?
असा अर्जुनाचा प्रश्न. [ श्लोक ३६ ]
स्वधर्मानुष्ठानास प्रतिबंधक अशा कामक्रोधांचा इंद्रियनिग्रहादिद्वारां नाश करून ब्रह्मात्मैक्य-ज्ञानानें चिरसौख्य मिळवावें.
[ श्लोक ३७ ते ४३ ]

 नकाशा क्रमांक ३

# अध्याय तिसरा

[ अध्याय ३, श्लोक ३७ वरील ओव्यांच्या आधारें ]

ब्रह्म
|
अविद्या
|
तरी हें कामक्रोधु पाहीं । जयांते कृपेची सांठवण नाहीं ॥ [ अध्याय ३, ओवी २४० ]

**सत्त्वगुण**
|
**दैवी संपत्ति**

साध्वी शान्ति—नागविली
विवेक—आश्रय नाहींसा केला
वैराग्य—कातडी काढली
उपशम—मान मोडली
संतोष—वन तोडलें
धैर्य—किल्ले पाडले
आनंदरोप—उपटून टाकले
बोध रोपें—खुडून टाकली
सुखाचे—नांवहि पुसून टाकले

**रजोगुण**
|
**कामक्रोध**

**तमोगुण**
|
**आसुरी संपत्ति**

माया मांगी शृंगारिली व साधुवृंदें विटाळविली
[ १ ] दंभ
[ २ ] दर्प
[ ३ ] अभिमान
[ ४ ] क्रोध
[ ५ ] पारुष्य
[ ६ ] अज्ञान

**यांचा मान**
मोहाच्या घरीं
मृत्यूच्या नगरीं

**यांच्याशीं देवघेव**
अहंकार

**यांना गादी**
तमोगुणानें
प्रेमामुळें
दिली.

**ज्ञाननाशक व्यापार देखरेख करणारे**
[ १ ] आशा
[ २ ] तिची धाकटी बहीण भ्रांती
[ ३ ] तिची दासी तृष्णा

**दंभ रूढविला**
सत्याचा कोथळा
काढून त्यांत अकृत्य
पेंढा भरलेल्या
दंभास जगांत
पुढें आणला.

**राहण्याचें ठिकाण**
जीवचैतन्याशेजारीं,
वृत्तिज्ञानाच्या
पंक्तीला.

**हे सर्व जण मिळून " जळेंवीण बुडविती ।...........पाशकेवीण गोंविती । हें कवणाजोगे न होती । आंतौटेपणें " ॥**


सार्थ श्रीज्ञानेश्वरी
नकाशा क्रमांक ४
अध्याय चवथा
देवें ब्रम्हार्पणत्वें " क्रिया " सांगितली
" निष्काम कर्मयोग "
या " संप्रदाया " चा
"प्रवर्तक" व तुझा उपदेशक मीच आहें.
विवस्वत
मनु
इक्ष्वाकु
राजर्षि
[ श्लोक १ ते ३ ]
त्यावर शंका
[ श्लोक ४ ]
" रक्षक " अवतारद्वारां " मीच " आहें.
अवतार निमित्त
[ १ ] धर्मग्लानि
[ २ ] धर्म-नीतीचा संबंध तुटतो.
[ ३ ] अधर्म—उद्भव होतो.
तेव्हां कल्पित मायेचा स्वीकार करून स्वेच्छामय विग्रह धारण करणें.
अवतार कार्य
[ १ ] साधूंचें रक्षण
[ २ ] धर्माचें रक्षण
[ ३ ] दुष्टांचा नाश
[ ४ ] अविवेक काजळी झाडून विवेकदीप उजळणें.
अवतार
अवतार रहस्यवेत्ताच, मायाविशिष्ट ईश्वर स्वरूप व रामकृष्ण, मत्स्य कूर्मादि अवतार ही उपाधि संबंधी असून तत्त्वतः मी जीवेश्वर-भाव व अवताररहित, विशुद्धरूप आहे असें जाणतो. तोच विवेकी कृतकृत्य होय.
[ श्लोक ५ ते ९ पर्यन्त ]
कर्मयोगाच्या धर्माचें आचरण कसें करावे ?
परमात्म्याचें स्वरूप जाणून
कर्तृत्वाचा मद टाकून
फलास्वादरहित " ब्रह्मार्पण बुद्धीनें " करावें.
[ श्लोक १० ते २४ ]
सर्वत्र ब्रह्मवृष्टि होणें
[ हाच ज्ञानयज्ञ ]
यज्ञस्तुति
यज्ञाचें दैवयज्ञ, द्रव्ययज्ञ, योगयज्ञ, व्रतयज्ञ, स्वाध्याय-यज्ञ इत्यादि बारा प्रकार सांगून त्यांत ज्ञानयज्ञ सर्व-श्रेष्ठ आहे व त्यांतच सर्व यज्ञ, कर्मांचा अंतर्भाव होतो.
[ श्लोक २५ ते ३३ ]
त्या ज्ञानप्राप्तीचा उपाय
श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ श्रीगुरुचरणाची शरणागति पत्करावी व त्यांचेकडून महावाक्योपदेश.
[ श्लोक ३४ ]
ज्ञानयज्ञानें
अज्ञान व तत्कार्य संशय निवृत्तिपूर्वक आत्मवंत कर्मबद्ध होत नाहीं.
[श्लोक ३९ ते ४२]

# अध्याय चवथा

नकाशा क्रमांक ५

## ' ब्रम्हार्पणत्वें क्रिया '



नकाशा क्रमांक ६

# अध्याय पांचवा

## मोक्ष

### पंचमी गव्हरिलें । ' योगतत्त्व ' ॥ [ अ. १०–२९ ]

**सांख्ययोग**

**निष्काम कर्मयोग** यांत श्रेयस्कर मार्ग कोणता ? [ श्लोक १ ]

दोन्ही मोक्षकर असल्यामुळें फलदृष्टया एकच ' तरी जाणां नेणां सकळां । हा " **कर्मयोग** "कीर **प्रांजळा** = सुरक्षित [ श्लोक २ ते ६ ]

**अनुष्ठान रीति** [ श्लोक ७, १०, ११, १२ ]

कर्तृत्वाभिमान टाकून व फलास्वाद टाकून

**फल**

कामक्रोधरहित होऊन चित्तशुद्धि–शमदमादि साधन संपन्न होऊन, जसा ईश्वर अकर्ता, अभोक्ता आहे तसा मीहि अकर्ता, अभोक्ता आहें, असें ब्रह्मात्मैक्य जाणून मोक्ष प्राप्ति होते.
" तात्पर्यार्थ "

**सांख्य योग्याचें लक्षण**

शरीरव्यवहार करीत असतांहि देह-तादात्म्यरहित सहज, अशा ब्रह्मस्थितीस पोचलेला ज्ञानी तत्त्वतः अकर्ता, अभोक्ता अशाच बोधांत असतो.
[ श्लोक ८, ९ ].
[ १ ] पंचमी गव्हरिले । योगतत्त्व ॥
[सहाव्या अध्यायाचें बीज व अवतरण]
[ श्लोक २६, २७, २८, ]
(२) साक्षात्काररूप ब्रह्मात्मैक्यज्ञाननेंच परमशांतिरूप मोक्षास प्राप्त होतो.
" फल श्रुति " [ श्लोक २९]

**स्वरूपदृष्टचा स्थिति**

[ १ ] आत्म्याला कर्तृत्व व कारयितृत्व नाहीं. [ २ ] पुण्यपाप विवर्जित स्वयंभू ज्ञानस्वरूप [ पण अज्ञानानें आवृत जीव मोहीत होतात ]
[ श्लोक १३, १४, १५ ]

**साधन**

**अन्तरंग**

[१] तद्बुद्धय: निदिध्यासनादि [ श्लोक १७ ]
[२] शुद्धांत:करणपूर्वक संशयरहित व सर्वभूतहिंतरत [ श्लोक २५ ]

**बहिरंग**

[ १ ] विषय वैमुख्य [ श्लोक २२ ]
[ २ ] कामक्रोध वेग जिंकणें [श्लोक २३]
[ ३ ] कामक्रोध विमुक्त [ श्लोक २६ ]

**फल**

**अवांतर**

अज्ञान निवृत्तिपूर्वक ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा अंत:करणांत उदय होतो. [ श्लोक १६]

**मुख्य**

त्याची परिणति सर्वत्र ब्रह्मभावरूप व्यापकानुभूतींत होऊन तो जीवन्मुक्त होतो व बाधितानुवृत्तीनें, कर्तव्य बुद्धिरहित व्यवहार करतो.
[ श्लोक १८, १९, २०, २१, २४ ]


नकाशा क्रमांक ७
अध्याय सहावा
" योग " विभव भांडार । उघडल कां ? ॥ [ अ. ६, ओ. ११ ]
साधारण साधन मन
शंका
स्वभावतः चंचल, बलिष्ठ त्याचा निग्रह व तद्वारा 'योग' कसा साध्य होणार ? [ श्लोक ३३ ते ३४ ]
समाधान
अभ्यास व वैराग्य या जोड साधनानें त्याचा निग्रह होऊन योगसाध्य होतो. [ श्लोक ३५ ते ३६ ]
योगाचे
स्वातंत्र्य
[ स्वतःचें बंधन स्वतःच निर्माण करतो तसा स्वतःचा मोक्षहि स्वतःच करतो असें स्वातंत्र्य आहे. ] [ श्लोक ५ ते ६ ]
महात्म्य
प्रशांतचित्त ब्रह्मभूत योग्याला ब्रह्मैकत्व-दर्शन व निरतिशय सुख लाभते, [श्लोक २२ ते २९]
योग्याचें लक्षण
[ अ ] परोक्ष व अपरोक्ष ज्ञानपूर्वक सर्वत्र समबुद्धि लाभलेला [ श्लो. ७ ते ९ ]
[ ब ] ब्रह्मात्मैक्य ज्ञान-संपन्न, सर्वत्र आत्मौपम्य बुद्धिसंपन्न तत्त्वज्ञान, मनोनाश व वासनाक्षय झाल्यामुळें परम योगी. [ श्लोक ३० ते ३२ ]
योगाचे
साधन
फल
मत्स्वरूप बंधमोक्षातीत ब्रह्म स्थिति लाभते [ श्लोक १० ते १५ ]
योगानुष्ठानाचा
बहिरंग
एकान्तवास, एकाकी राहणें, अपरिग्रह, पवित्र निसर्गरमणीय स्थान, स्थिर सुख—आसन, भिक्षाशनच करणें इत्यादि.
याच पांच श्लोकावर श्रीज्ञानेशांनी कुंडलिनीचें अर्थात् वज्रासनानें कुंडलिनी जागृत करण्याचें खुलासेवार वर्णन लिहिले आहे. वास्तविक हे श्लोक मनोजयाचेच प्रतिपादन करतात; तरीपण प्राणजयानें मनोजय होतो म्हणून श्रीगुरुकृपालब्ध स्वानुभूतींचा व नाथपंथीय विशेष असा आवडता म्हणून हा ' कुंडलिनी योग ' लिहिला आहे.
[ १ ] सर्वकर्म संन्यास व निष्कामकर्मयोग ही दोन्ही एकफलपर्यवसायीच आहेत. [ श्लोक १ ते ४ ]
[ २ ] सर्वत्र ब्रह्मभाव लाभलेला ज्ञानीयोगी सर्वांत श्रेष्ठ. [श्लोक ४६, ४७]
अन्तरंग
मनोनिग्रहपूर्वक ध्यान, विगतभय प्रशान्तात्मा, समाहित चित्तवान्
अधिकारी
युक्ताहार, विहार करणारा देह-पारत्रिक विषयेच्छाशून्य योगाभ्यास पाटवानें शुद्धचित्तानें ब्रह्मतत्त्वापासून च्युत न होणारा तो. [श्लोक १६ ते २१]
त्याविषयीं शंका
साधकाचा आयुष्यभानु योगाभ्यास करतेवेळीं मध्यंतरींच अस्तास गेला तर त्याला कोणती गति प्राप्त होते ! [श्लो. ३७ ते ३९]
त्याचें साधन
केलेला योगाभ्यास वायां जात नाहीं पण तो योगभ्रष्ट कालांतरानें प्रकृष्ट अशा मुक्तीला पावतो हे मात्र खास [श्लोक ४० ते ४५]

सार्थ श्रीज्ञानेश्वरी

# अध्याय सहावा

नकाशा क्रमांक ८



# अध्याय सातवा



**‘ अधिष्ठान ’ ब्रह्मचैतन्य [ विशुद्ध स्वरूपभूत ज्ञान ]**

तुज ‘ ज्ञान ’ सांगेन तैसें । “ विज्ञानें ”सीं ।। प्रतिज्ञा श्लोक १ ते ३

**उपक्रमीं ‘ प्रकृति ’ [ कारणाध्यास ]**

- **परा** — जीवभूत अपराप्रकृतीस उपजीव्यभूत सत्तास्फूर्ति देणारी.
- **अपरा**
  - **प्रकार** — पंच महाभूतें, मन, बुद्धि, अहंकार.
  - **स्वरूप** — त्रिगुणात्मक, जीवाला बंधास कारण, असत्, जड, दुःखरूप, स्वाश्रया, स्वविषया. [ श्लोक १३ ते १५ ]
  - **उल्लंघनाचा उपाय** — “एक मीचि । विश्वीं आहे ” असें विश्वव्यापक स्वरूपास जाणून दृढव्रतानें भगवत्-भक्ति करणें

परा—अपरा—प्रकृतिविशिष्ट चैतन्य म्हणजेच ईश्वर कीं ज्याच्यापासून नामरूपात्मक, चराचरात्मक “ प्रपंच ” [ कार्याध्यास ] उत्पत्ति—स्थिति—लयास प्राप्त होतो म्हणून तो सर्व व्यापक आहे.

- येर नामरूपात्मक विश्वप्रपंच म्हणजे ‘ **विज्ञान** ’ त्याविषयीं तेथ सत्यबुद्धि । म्हणजे ‘ **तें अज्ञान** ’ हेंही जाण ।।
- मी सर्व व्यापक आहे, पण भक्त्यर्थ स्पष्ट बोध व्हावा म्हणून ‘ **विभूति** ’ [ श्लोक ८ ते १२ ]

**परिहार करूनि**

[ १ ] विश्व प्रपंचास सत्य मानणारे अज्ञान पार नष्ट होईल.
[ २ ] विश्व प्रपंचरूप विज्ञान निःशेष करपून—बाधित होऊन जाईल.
[ ३ ] विश्वासह आपण चिन्मय ब्रह्मरूप होऊन जाऊं. अर्जुना तया नांव ‘ **ज्ञान** ’
[ श्लोक ४ ते ७ ]

**‘ भजती ’ जे पुरुषोत्तमीं**

- **ते बोलिले ‘चाऱ्ही ’ भक्त**
  - **ज्ञानी सर्वश्रेष्ठ** — सर्वत्र वासुदेव प्रतीतीरूप व्यापकानुभूती संपन्न अद्वैत भूमिकेंतून भक्ति करणारा ‘ज्ञानी’
  - **उदार**
    - **आर्त** — उपद्रव ग्रस्त उपद्रव निवृत्त्यर्थं भजतो.
    - **अर्थार्थि** — इह—परत्र भोगैश्वर्य कामी
    - **जिज्ञासु** — ब्रह्मात्मैक्य ज्ञानार्थि
    - [ श्लोक १६ ते १९ ]
- भगवत् तत्त्वज्ञानाच्या अभावीं देवतांतरांची भक्ति करतात. [ श्लोक २० ते २५ ]
  - भगवत् ज्ञानप्रतिबंधक माया व तत्कार्य द्वंद्वमोह [ श्लोक २६ ते २७ ]
  - मग द्वंद्वमोह निर्मुक्त असे होऊन व एक मीचि विश्वीं आहे ।। अशा माझ्या अज, अव्यय, अकर्ता, स्वरूपाचें ज्ञान होऊन त्या माझी ते दृढव्रतानें भक्ति करतात व परब्रह्मरूप होतात. [ श्लोक २८ ते २९ ]

आठव्या अध्यायाचें सूत्ररूप बीज [ श्लोक ३० ]

सार्थ श्रीज्ञानेश्वरी

नकाशा क्रमांक १०

# अध्याय आठवा

## भगवत् तत्त्वप्राप्ति

### एवं सकळ वाक्यावधि । अष्टमाध्यायीं ।। अ. १०–२९

- **पाठीं "सप्तप्रश्नविधि"।** [ श्लोक १, २ ]
- **साधन विचार**
- **स्वरूपविचार** [ श्लोक २०, २१, २२ ]
- **बोलोनि प्रयाण 'समय' सिद्धि।**

**साधन विचार / स्वरूपविचार :**

- **सतत चिंतन** व आवर्तन विधि [ श्लोक ८ ते १० ]
- **ध्यानयोग** विधिपूर्वक ओंकार उच्चारण, भगवत् ध्यानानें भगवत् प्रप्ति सुलभ आहे. [ श्लोक ११ ते १४ ]
- **अनन्य भक्तीनें** [ श्लोक २२ ] परम पुरुष परमेश्वराची प्रप्ति, परमेश्वराव्यतिरिक्त सर्वांस पुनरावृत्ति आहे. [ श्लोक १५ ते १९ ]

**बोलोनि प्रयाण 'समय' सिद्धि — कालाधीन गति व फल :**

- **अर्चिरा मार्ग** शुक्ल गति अनावृत्ति [ सायुज्यसिद्धि ]
- **धूम्र मार्ग** कृष्णगति पुनरावृत्ति

[ श्लोक २३ ते २८ ]

**पाठीं "सप्तप्रश्नविधि" :**

- **ब्रह्म म्हणजे काय ?** दिक्कालातीत सर्वव्यापक, निरुपाधिक संवित् स्वरूप वस्तु [ओवी १६]
- **अध्यात्म म्हणजे काय ?** "आत्मा" ब्रह्माची विश्वसापेक्ष सहज स्थिति [ओवी १८, १९]
- **कर्म म्हणजे काय ?** कर्त्याविना मायेनें होणारी विश्वरचना ज्या व्यापारानें होते तो व्यापार [ओवी २१, २७, २९]

[ श्लोक ३ ते ४ ]

- **अधिभूत म्हणजे काय ?** पांच भौतिक, जड, मायिक नामरूपात्मक नाशवंत देह [ओवी ३१, ३२]
- **अधिदैव म्हणजे काय ?** जीवचैतन्य तत्त्वतः ब्रह्मरूपच, अविद्या व तत्कार्य देहतादात्म्य भ्रांतीमुळें जीव. [ओवी ३३ ते ३६]
- **अधियज्ञ म्हणजे काय ?** साक्षात्कारात्मक अनुभूतीस येणारें ब्रह्म [ ओवी ३७, ४५, ५१ ते ५३ ]

[ श्लोक ५, ६, ७ ]

- **प्रयाण कालींहि** समाहित चित्त पुरुषाकडून तूं कसा ज्ञातव्य आहेस ?

**सद्योमुक्ति**

- **जीवन्मुक्ति** माझ्या भक्तांस देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थिति प्राप्त होते.
- **विदेहमुक्ति** देहान्ती विदेह मोक्षास प्राप्त होतो. [ ओवी ५३ ते ६८ ]

**क्रममुक्ति**

अंतकाळीं निर्वासन होऊन भगवत् स्मरण केलें तर सगुणोपासक वैकुंठांतील सलोकतादि चार मुक्तीस प्राप्त होतात.

# अध्याय नववा

**मोक्ष**

- तुज "ज्ञान"
  - **अव्यवहार्य यथार्थ ब्रह्मस्वरूप**
  - [ अजातवाद श्लोक ४, ५, ६, ]
- "विज्ञान" तैसें । वांटूनि देऊं ॥ अ. ९–४४
  - [ प्रतिज्ञा व फल श्लोक १ ते ३ ]
  - **व्यवहार्य असें ब्रह्मस्वरूप**
  - [ विवर्तवाद श्लोक ७, ८, ९, १० ]

---

- [ या दोन्ही ज्ञानामुळें होणारी सात्त्विक-भक्ति ]
  अर्थात्
  **अव्यभिचारी भक्ति** [ श्लोक १३, १४, १५ ]
  - या यथार्थ बोधानें होणारें अन्वयज्ञान किंवा उपासनेसाठीं विभूति [ श्लोक १६, १७, १८, १९ ]
  - या भक्तीची सुलभता [ श्लोक २६, २७ ]
  - अव्यभिचारी भक्तीचें फल 'सायुज्य मोक्ष' [ श्लोक २२, २८, २९, ३०, ३१, ३२ व ३३ ]
- [ या दोन्ही ज्ञानाचे अभावामुळें होणारी तामसी भक्ति ]
  अर्थात्
  **व्यभिचारी भक्ति** [ श्लोक ११, १२ ]
  - यथार्थ बोधाभावीं होणाऱ्या व्यभिचारी भक्तीचें साधन यज्ञादि करणारांची फजिती [श्लोक २०, २१]
  - व्यभिचारी भक्तीचें फल [ श्लोक २३ ते २५ ]

---

**उपसंहार व अध्याय तात्पर्य "अव्यभिचारी भक्ति"** [ श्लोक ३४ ]

सार्थ श्रीज्ञानेश्वरी

# अध्याय नववा

नकाशा क्रमांक १२



# अध्याय दहावा

**ब्रह्म** [ निरुपाधिक अव्यवहार्य स्वरूप ]

**मायाविशिष्ट चैतन्य** [ अभिन्न निमित्तोपादान कारण म्हणून त्याची सर्वत्र व्याप्ति आहे. ]

अन्वय ज्ञानार्थ – मक्ष्यार्थ—

## येथ विभूति प्रतिविभूति। प्रस्तुत अर्जुना सांगिजेती ॥

ओवी ४१, प्रतिज्ञा [ श्लोक १ ला ]

**माझें स्वरूप**

**मुख्य मुख्य विभूति**

विष्णु, सामवेद, शंकर, बृहस्पति, भृगु, वज्र, अनंत, प्रल्हाद, पवन, योगशक्ति विभूति, अध्यात्मविद्यादि विभूति, मृत्यु, द्यूत, दंड इत्यादि पंचाहत्तर विभूति

[ श्लोक २१ ते ४० ]

**विभूति ज्ञानाचें फल**

माझा विस्तार, प्रभाव व योग जाणून जो भक्ति-उपासना करतो त्यास अन्वयज्ञानानें अज्ञान निवृत्तिपूर्वक माझ्या यथार्थ स्वरूपाची प्राप्ति होते.

[ श्लोक ६ ते ११ ]

**माझ्या विभूतीचें अवच्छेदक**

म्हणजे जें जें ऐश्वर्ययुक्त व ओजानें, तेजानें, पौरुषेयानें ऊर्जित–महत्तर असल्याचें दिसून येतें तें तें होय. माझ्या [ सद्गुणांच्या प्रभावास प्रकाशित करणाऱ्या ] तेजाच्या एकाच अंशापासून उत्पन्न झालेल्या संपूर्ण जगास माझ्या एका अंशानें, मी व्यापून राहिलों आहे.

[ श्लोक ४१ ते ४२ ]

**ज्ञान होणें दुर्लभ कां ?**

सर्वांचा आदि म्हणून माझें यथार्थ ज्ञान होणें दुर्लभ

[ श्लोक २ ते ३ ]

आदि कसा ? या प्रश्नाचे बुद्धि आदि करून सर्वांची माझ्यापासूनच उत्पत्ति झाली म्हणून मी अभिन्न निमित्तोपादान कारण आहे, असें उत्तर.

[ श्लोक ४ ते ५ ]

**अर्जुनाची प्रार्थना**

भगवत् चिंतनार्थ, सर्वांचे आदि म्हणून आपणच आपल्या विभूति सांगण्यास योग्य आहांत असें अर्जुनद्वारा वर्णन आणि योग शक्ति व विभूतींचें स्वरूप सांगावें अशी प्रार्थना.

[ श्लोक १२ ते १८ ]

**सर्व कारण व अनंत**

मीच सर्व भूतांचा आदि, मध्य व अंत असून विभूति सांगण्याची प्रतिज्ञा, आणि माझ्या स्वरूपास व विभूति विस्तारासहि अंत नाहीं.

[ श्लोक १९ ते २० ]

नकाशा क्रमांक १४

# अध्याय अकरावा



# अध्याय बारावा

## " भक्ति योग " समस्त योगरूप ।

**ब्रह्म चैतन्य**

**' व्यक्त '**

सगुण साकार चतुर्भुज मूर्ति

देवाचें हें देहधारी संकुचित, परिच्छिन्न रूपच खरें आहे, असें समजणें म्हणजे तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत एक भ्रमच आहे. तसें देवास परिच्छिन्न समजणाऱ्या लोकांना धसाळ, हेकड गांवढळ, आंधळे इत्यादि विशेषणें देऊन श्रीज्ञानेशांनीं या स्वरूपाचा निरास केला आहे. उर्वरित पुढील दोन रूपाविषयींच अर्जुनाची शंका आहे.

[ १ ] व्यक्त सापेक्ष अव्यक्त अशा सगुणाची भक्ति करणारे भक्त व निरपेक्ष अव्यक्त निर्गुणाची भक्ति करणारे भक्त यांत योग तत्त्वतः कोणास समजला ? अशी अर्जुनाची शंका [ श्लोक १ ]

[ २ ] फलश्रुतिः— अद्वेष्टृत्वादि साधनानुष्ठानानें भवबंधांतून मुक्त झालेले ज्ञानी भक्त मला अतीव प्रिय आहेत. [ श्लोक २० ]

**व्यक्त सापेक्ष ' अव्यक्त '** आणि

सगुण विश्वरूप

मजकरितां कर्म करून मीच परम जाणून भक्ति करतात ते मला अत्यन्त प्रिय आहेत.

[ श्लोक २ ]

मी ज्यांच्यावर अनुग्रह करतो अशा व मला अत्यन्त प्रिय असणाऱ्या ज्ञानी भक्तांची सर्वभूतानां अद्वेष्टा, निर्ममः, निरहंकारः इत्यादि छत्तीस लक्षणें [ श्लोक १३ ते १९ ]

**निरपेक्ष ' अव्यक्त '**

[ व्यक्त - अव्यक्त - अतीत ]

निर्गुण निरुपाधिक विशुद्ध चैतन्य. हे अव्यक्तोपासक शेवटीं मलाच प्राप्त होतात; पण हा मार्ग फार क्लेशकारक आहे. [ श्लोक ३ ते ५ ]

माझ्या प्राप्तीचें उत्तरोत्तर सुलभ असें चार उपाय

[ श्लोक ६ ते १२ ]

सगुण ब्रह्मस्वरूपाचें ठिकाणीं मन व बुद्धि सर्वतोपरि स्थापन करून ध्यान कर.

एकाच भगवंताच्या प्रतिमादिक आलंबनाचें ठिकाणीं, विषयापासून परावृत्त करून पुनः पुनः चित्तवृत्ति स्थापन करणें, हाच अभ्यास योग. त्यामुळें विषयाविषयीं अरुचि व देवाविषयीं रुचि उत्पन्न होऊन भगवत् स्वरूपता लाभेल.

भगवदर्थ कर्मानुष्ठान अर्थात् भगवत् कथा श्रवण कीर्तन आदिकरून करावे, चित्त शुद्धिद्वारां मोक्ष प्राप्त होईल.

सर्व कर्मफल त्याग करावा.

# अध्याय तेरावा

[श्लोक १९ ते २१] { पुरुष [ क्षेत्रज्ञ ] / प्रकृति [ क्षेत्र ] } [ श्लोक १ ]

## क्षेत्र आणि

### अध्यात्म मुद्दे

[ १ ] क्षेत्र कोणतें ?
[ २ ] कोणत्या प्रकारचें ?
[ ३ ] कोणत्या विकारांनी युक्त ?
[ ४ ] कोणतें कार्य उत्पन्न करते ?
[ ५ ] क्षेत्रज्ञ कोण ?
[ ६ ] क्षेत्रज्ञाचा प्रभाव कोणता ?
[ श्लोक ३ ]

### क्षेत्राबद्दल कोणी विचार केला

[ श्लोक ४ ]
यावर श्रीज्ञानेशां
[ १ ] जीववादी
[ २ ] प्रकृतिवादी
[ ३ ] संकल्पवादी
[ ४ ] स्वभाववादी
[ ५ ] कालवादी
या मतांचा विशेष "ऊहापोह" केला आहे.

### क्षेत्राचें स्वरूप

[ १ ] पंचमहाभूतें [ २ ] अहंकार [ ३ ] बुद्धि [ ४ ] अव्यक्त [ ५ ] श्रोत्रादि पंच ज्ञानेन्द्रियें [ ६ ] हस्त-पादादि पंच कर्मेन्द्रियें [ ७ ] मन [८] शब्द स्पर्शादि पंच विषय, [९] घेणें, देणे, चालणे, इत्यादि पंच विषय [१०] इच्छा [ ११ ] द्वेष [१२] सुख [ १३ ] दुःख [ १४ ] संघात [ १५ ] चेतना [ १६ ] धृति
[ श्लोक ५ ते ६ ]

## क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें । ज्ञान ऐसें तयातें मानूं आम्ही ।।

### क्षेत्रज्ञाच्या ज्ञानाचीं साधनें

[१] अमानित्व [२] अदंभित्व [३] अहिंसा [४] शांती [५] आर्जव [६] गुरुभक्ति [७] शुचित्व [८] स्थैर्य [९] अंतःकरणनिग्रह [१०] वैराग्य [११] अनहंकार [१२] जन्म–मृत्यु–जरा, व्याधि, दुःख दोष यांचे अनुदर्शन [१३] अनासक्ति, स्त्रीपुत्रादिकांविषयीं अलोलुपता [१४] समचित्त [१५] अव्यभिचारी भक्ति [१६] एकान्त प्रियता, जन समुदाया–विषयीं अरुचि [१७] अध्यात्मज्ञान नित्यत्व [ १८ ] तत्त्वज्ञानार्थ दर्शन. [श्लोक ७ ते ११]

### क्षेत्रज्ञाचें स्वरूप लक्षणे

(१) ज्योतिषामपि तज्ज्योतिः तटस्थ लक्षण
(२) जगदुत्पत्ति स्थिति लयकरण व फल, मत्स्वरूपाप्रत पावतो.
[ श्लोक ११ ते १८ ]

सिद्धस्यलक्षणानि साधकस्य साधनानि भवंति [ जीं जीं सिद्धाचीं लक्षणें असतात तीं तीं साधकाचीं साधनें असतात. असा न्याय येथें लक्षांत असावा. ]

- जीवब्रह्मैक्य ज्ञानाकरितां महावाक्योपदेश "क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि" [ श्लोक २ ]
- उत्तम पुरुषाचें अभेदज्ञान व त्याचें फल पुनः जन्म पावत नाहीं [ श्लोक २२, २३ ]
- अधिकार तारतम्यानें ध्यानादि भिन्न साधनांचा उपदेश [ श्लोक २४, २५ ]
- क्षेत्रज्ञाचें स्वरूप व तटस्थ लक्षणपूर्वक ज्ञान [ श्लोक २६ ते ३३ ]
- ज्ञानाचें फल परब्रह्मरूप होतो [ श्लोक. ३४ ]

# अध्याय चौदावा

" गुण ते कैसे किती। बांधती कवणे रीती। नातरी गुणातीतीं। चिन्हें काई ? "

अ. १४–२६



सार्थ श्रीज्ञानेश्वरी

नकाशा क्रमांक १८



सार्थ श्रीज्ञानेश्वरी

नकाशा क्रमांक १९

# अध्याय सोळावा

सहज इष्टानिष्ट करणी । दोघींचि इया कवतुकिणी !! अ. १६-६१



सार्थ श्रीज्ञानेश्वरी | नकाशा क्रमांक २०

# अध्याय सतरावा

ते कीर अनाम अजाती । " ब्रह्म " परी अविद्या वर्गाचिये राती । माजीं ओळखावया श्रुति ' खूण ' केली ।
" तो संकेतु हा " ॥

- **मायेंतील त्रिगुणामुळें झालेलें त्रैविध्य**
  - **अन्न**
    - सात्विक–श्लोक ८
    - राजस–श्लोक ९
    - तामस–श्लोक १०
    - आहार त्रैविध्य सांगण्याची प्रतिज्ञा. [ श्लोक ७ ]
  - **श्रद्धा**
    - सात्विक–श्लोक ४
    - राजस–श्लोक ५
    - तामस–श्लोक ६
    - श्रद्धा त्रैविध्य सांगण्याची प्रतिज्ञा. [ श्लोक २,३ ]
  - **यज्ञ**
    - सात्विक–श्लोक ११
    - राजस–श्लोक १२
    - तामस–श्लोक १३
  - **दान**
    - सात्विक– श्लोक २०
    - राजस – श्लोक २१
    - तामस – श्लोक २२
  - **तप**
    - **तपाचे साधन प्राधान्यानें प्रकार**
      - कायिक [ श्लोक १४ ]
      - वाचिक [ श्लोक १५ ]
      - मानसिक [ श्लोक १६ ]
      - [ १ ] अर्जुनाचा प्रश्नः–शास्त्रज्ञान विहीनानें श्रद्धापूर्वक केलेलें यजन, पूजन, मोक्ष साधन आहे काय ? [ श्लोक १ ]
    - **गुण भेदानें प्रकार**
      - सात्विक [ श्लोक १७ ]
      - राजस [ श्लोक १८ ]
      - तामस [ श्लोक १९ ]
      - [२] अश्रद्धापूर्वक केलेल्या कर्मांची निंदा म्हणजेच व्यातिरेकपूर्वक उपसंहार [ श्लोक २८ ]
- **ब्रह्मनाम विनियोग**
  - **ओऽम्** – कर्मारंभीं ॐकार ध्यानपूर्वक वाणीनें उच्चारण.
  - **तत्** – फलद्रूपतेच्यावेळीं तत्पर राहून कर्मे ब्रह्मार्पण करावे [ श्लोक २७ ]
  - **सत्** – कर्म समाप्तिनंतर
    - १ कर्मांत चुकीनें दोष अलल्यास.
    - २ असत्त्व असल्यास
    - ३ चुकीनें शास्त्रमर्यादा उल्लंघिल्यास.
  - प्रशस्त कर्म [ श्लोक २३ ते २६ ]

# अध्याय अठरावा

एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । हें क्रमाचें प्रवृत्तित्रय । तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्म संचयो ।। अ.१८ ओ.५१२.




नकाशा क्रमांक २२
अध्याय अठरावा
तेणें " मोक्षो –" पादान हें फळ ।
[ १ ] गीताशास्त्राचा संप्रदाय विधि व फलश्रुति [ श्लोक ६७ ते ७१ ]
[ २ ] अज्ञान व अज्ञानकार्य संमोह नष्ट झाला का ? असा अर्जुनास प्रश्न [ श्लोक ७२ ]
[ ३ ] गीता शास्त्र श्रवणानें संजयास धन्यता वाटली. विजय पांडवासच मिळणार असे भविष्य निश्चयानें वर्तविलें [ श्लोक ७४ ते ७८ ]
साधन विचार
परंपरेनें
साक्षात्
कर्म
ध्यानादि योगाभ्यासानें चित्त शुद्धिद्वारां मोक्ष [ निर्गुणोपासक ] [ श्लोक ५० ते ५४ ]
उपासना [ भक्तियोग ] भक्तीनें ज्ञान द्वारां मोक्ष [ श्लोक ५५ ते ६० ]
येथ 'अविद्यानाशु' हें स्थळ । या दोहीं केवळ साधन 'ज्ञान'
शोक करू नकोस
[१] नष्टो मोहः– शोकराहित्य
" आतां मोह असें कीं नाहीं । हे ऐसें जी पुससी-काई । कृतकृत्य झालों पाहीं । तुझेपणें ॥ "
[ ४ ] गतसंदेहः–पाशविमोचन
"गुंतलों होतो अर्जुनपणें । तो मुक्त झालो तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं "
भेदरहित ब्रह्मात्मैक्यज्ञानरूप शरणागति.
[ २ ] स्मृतिर्लब्धा:– आत्मविज्ञान मी तुझेनि प्रसादें । लाधलेंनि ' आत्मबोधें '
[ ३ ] स्थितोऽस्मिः–"तुझेनि" मज मी पावोनि। कर्तव्य गेलें निपटूनि । ××× तेवीं भक्तां सेल दिधली "निजपदाची ।"
[ श्लोक ६१ ते ६६ व श्लोक ७३ ]
कर्मस्वरूप
परमकर्म फल
निष्काम कर्मयोगरूप बुद्धीयोगानें चित्त शुद्धिद्वारां मोक्ष [सगुणोपासक] [श्लोक ४५ ते ४९]
त्याग
वेदविहित नित्य नैमित्तिककर्म करून कर्तृत्वमद व फलास्वाद टाकणें.
संन्यास
काम्य व निषिद्ध कर्म निपटून टाकणें.
कर्म बंध न होतां अंत:करण शुद्धीद्वारां मोक्षास साधन
अर्जुनाची शंका व समाधान. [ श्लोक १ ते ११ ]
कर्म कारण पंचक
अधिष्ठान
कर्ता
पृथग्विध करणें
निरनिराळ्या क्रिया
दैव
[ श्लोक १३ ते १७ ]
गुण भेदानें कर्म प्रवृत्तित्रय
ज्ञाता ज्ञान ज्ञेय
[ श्लोक १८ ते २८ ]
कर्म संचय
कर्ता करण कार्य
सात्त्विक राजस तामस
[श्लोक २९ ते ३२]
कर्म हेतु
बुद्धि
धैर्य
सात्त्विक राजस तामस
[ श्लोक ३३ ते ३५ ]
अवांतरकर्म फल सुखाचें तीन प्रकार
सात्त्विक राजस तामस
[ श्लोक ३६ ते ३९ ]
[ जीवाचें त्रैविध्य श्लोक ४० ते ४४ ]
चार वर्णांची कर्में
ब्राह्मण शमो दमो तपः
क्षत्रिय शौर्य
वैश्य कृषि
शुद्र परिचर्या
[ श्लोक ४० ते ४४ ]

नकाशा क्रमांक २३

# अध्याय अठरावा

[ अ. ४ श्लोक १३ व अ. १८ श्लोक ४१ ते ४४ ]

## चातुर्वर्ण्य व गुणकर्म विभाग

[ अ. १८ ओ. ८२८,८२९ व ८३४ ते ८८४

आतां याचिपरी त्राण । चाऱ्ही हे वर्ण । सृजिलें म्यां गुण – । कर्मविभागें ।। अ. ४–७७




सार्थ श्रीज्ञानेश्वरी
[ अध्याय तेरावा ओवी ७१ ते १२१ पर्यन्त
सूक्ष्म सृष्टीच्या उत्पत्तीचा प्रकार
नकाशा क्रमांक २४
व अध्याय पंधरा ओवी ९९ ते १०४ च्या आधारे ]
ब्रह्म
ते सूक्ष्म प्रकृति कोडे । जै स्थूळाचिया अंगा घडे । तै भूत सृष्टीची पडे । टांकसाळ ॥
अ. ७–२२
सत्त्व प्रधान
तम:प्रधान
शुद्ध सत्त्व प्रधान माया माया, विशिष्ट ईश्वर
अक्षर [ १५-५०१ व ५२५ ]
मलीन सत्त्व प्रधान अविद्या प्राज्ञ जीव, आनंदमय कोश
क्षय [ १५-४८९ ते ५०१ ]
ब्रह्मा
विष्णु
महेश
[ अ. १३ ओवी ९२४ ते ९२५ ]
पंचतन्मात्रा
[ १५-९९ व ७ श्लोक ४ था ]
अपंचीकृत पंचमहाभूते
[ श्लोक १५-९८; १३-७३
शब्द
स्पर्श
रूप
रस
गंध
आकाश
वायु
अग्नि
जल
पृथ्वी
पंच महाभूतांच्या मिलित रजांशा पासून
रजोगुण
वाणी
वर्णोच्चारण
रज
हात
स्वीकार–त्याग
रज
पाय
संक्रमण
रज
उपस्थ
मूत्रत्याग
रज
गुद
मलत्याग
कर्मेन्द्रिय [ १३–१०० ]
कर्मेन्द्रियांचें विषय १३–११९ ]
मिलित सत्त्वांशापासून
सत्त्वगुण
श्रोत्र
सत्त्व
त्वचा
सत्त्व
नेत्र
सत्त्व
रसना
सत्त्व
घ्राण
ज्ञानेंद्रिये
[ १३–९८ ]
ज्ञानेंद्रियाचें विषय
शब्द
स्पर्श
रूप
रस
गंध
[ १३–११५; १५–१०० ते १०४ व १५–३५५ ते ३ ५९ ]
मन + ज्ञानेंद्रियें = मनोमय कोश,
इच्छा शक्तिमान, करणरूप
[ १३–१०४ ते ११६ ]
बुद्धि + ज्ञानेंद्रियें = विज्ञानमय कोश
ज्ञान शक्तिरूप, कर्तृरूप
[ १३ – ८३ ते ८९ ]
चित्त
[ अ. १५–९७ ]
अहंकार
[ १३–७७ ते ८२ ]
प्राण
अपान
व्यान
समान
उदान
पंचप्राण + कर्मेंद्रिये = प्राणमय कोश
[ अ. १८– ३३६ ते ३४१ ]

# उपसंहार

'**अपौरुषेय**' वाङ्मयासच '**वेद:**' अशी संज्ञा आहे. '**वेदयतीति वेद:**' अर्थात् धर्म आणि ब्रह्म या अतीन्द्रिय वस्तूंचें ज्ञान करून देतो तो 'वेद' होय. सर्वतोपरी श्रुत्यर्थासच अनुसरणाऱ्या '**पौरुषेय**' वाङ्मयास '**स्मृति**' म्हणतात. निरपेक्षरव म्हणजेच वेद. निरपेक्ष, निस्पृह, निरंकुश प्रामाण्य असें एकमेव वेदाचेंच आहे. त्या वेदाशीं व वैदिक महासिद्धान्ताशीं अविरोधी असणाऱ्या स्मृतिग्रंथासहि प्रामाण्य आहे.

'**प्रस्थान**' शब्दाचें व्युत्पत्तिदृष्टया असें विवेचन करता येईल कीं :-- "आत्मसाक्षात्काराय प्रस्स्थीयते अनेन इति प्रस्थानम्", "प्रकृष्टस्थिति साधनम्, उपदेशोपाय:". 'स्थिति' म्हणजे प्राण्यांच्या चित्ताची एक विशिष्ट अवस्था. त्या अवस्थेचा प्रकर्ष वा उत्कर्ष 'प्र' उपसर्गानें दर्शविला आहे. सर्वांत उत्कृष्ट अवस्था कीं जिच्यापेक्षां विशेष, उत्कृष्ट अशी अवस्थाच नाहीं, अशीं सर्वांहून उत्कृष्ट, रम्यसमाधान स्वरूप अवस्था म्हणजे "ब्रह्मस्थिति" हीच होय. ब्रह्मात्मैक्यरूप अद्वय ब्रह्मस्थितीचें निःसंदेह, यथार्थ ज्ञान करून देणारी, तत् प्रतिपादक अशीं उपनिषदें, भगवद्गीता आणि ब्रह्मसूत्रें हींच तीं तीन, निश्चित फलपर्यवसायी, उपदेशोपायस्वरूप 'साधनें' होत. त्यांत उपनिषदांनीं जो अंतिम साध्यरूप मोक्ष व तत् प्राप्त्यर्थ विवेक, वैराग्य, विविदिषा, श्रीगुरुशरणागती, महावाक्योपदेश इत्यादि जीं साधनें सांगितलीं; तेंच अंतिम साध्य व तींच साधनें श्रीमद् भगवद्गीतेंत व ब्रह्मसूत्रांत सांगितलेलीं आहेत, हे संप्रदाययुक्त, समन्वयपूर्वक श्रवण केल्यास सहज लक्षांत येण्याजोगें आहे. इतकें लिहिण्याचे कारण, वैचारिक क्षेत्रांत '**द्वैत**' आणि '**अद्वैत**' असें दोनच 'पक्ष' वा 'मतप्रवाह' आहेत. त्यांत कोणता पक्ष मुमुक्षूंस अपेक्षित, आदरणीय आहे. अर्थात् कोणता पक्ष खरा हितावह आहे व कोणता अहितकर आहे, याचा अचूक निर्णय वा निवाडा होऊन विवेकसिद्ध, चिरशांतिमय जीवनाचा लाभ व्हावा, हाच प्रधान उद्देश आहे. रम्यसमाधान प्राप्त्यर्थ व्यावहारिक उपायांचा तर काडीमात्र उपयोग नाहीं; हे सर्वानुभवसिद्ध आहे. तो रम्यसमाधानाविष्कार होण्यासाठीं मुमुक्षूंस किंबहुना ! ! यच्ययावत् मानवास आध्यात्मिक क्षेत्रांतच पदार्पण करणें नितान्त आवश्यक आहे. कारण, त्याविना निश्चित फलपर्यवसायी, निरुपद्रवी, असा दुसरा उपायच नाहीं, तेव्हां त्या वैचारिक क्षेत्रांतील द्वैत व अद्वैत या दोन पक्षांपैकीं श्रुतीला अभिप्रेत पक्ष कोणता ! सर्व वेदाचा समन्वय कशांत आहे ! अर्थात् सर्व वेद भागांचें महातात्पर्य काय द्वैत प्रतिपादनांत आहे ! कां अद्वैत–अद्वय ब्रह्म प्रतिपादनांत आहे ? याचाच विचार प्रथम करूं. श्रुतितात्पर्यविषयीभूत जो पक्ष सिद्ध होईल तोच पक्ष 'योगेश्वर' श्रीभगवंताच्या मनांत असला पाहिजे व तोच अभिप्राय, परमवैदिक 'व्यास महर्षी'चाही असला पाहिजे ही गोष्ट निर्विवाद असून कोणाहि विचारवन्तास नाकबूल करता यावयाची नाहीं. श्रीभगवन्ताच्या व श्रीव्यासांच्या मनांतून जो सिद्धान्त पक्ष आविष्कृत झाला असेल तोच सिद्धान्त पक्ष "ज्ञानेशो भगवान् विष्णु:" अशा स्वेच्छामय विग्रह धारण करणाऱ्या संत सम्राट् 'श्रीज्ञानेश्वर' महाराजांच्या मनांत असणार हेहि खासच. तोच सिद्धान्तपक्ष श्रीज्ञानेशांच्या वाङ्मयमूर्तींत अवतरला आहे. हेहि सिद्ध होते. म्हणून तात्पर्य निर्णायक सहा लिंगावरून श्रुतीचें व गीतेचेंच काय तात्पर्य निघते ते प्रथम पाहूं :- वैदिक वाङ्मयांतील तात्पर्य निर्णायक सहा लिंगें आहेत ती अशी :-

> "**उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वता फलम् ।**
> **अर्थवादोपपत्तीच लिङ्गं तात्पर्य निर्णये ॥**"

अशी हीं "**तात्पर्यबोधक सहा लिंगें**" आहेत. लिंग म्हणजे "लीनं अर्थं गमयति इति" लीन म्हणजे गूढ, गुह्यतम असलेला जो अर्थ त्याचा बोध करून देते त्यास '**लिंग**' ही संज्ञा आहे.

**१. उपक्रमोपसंहाराची एकरूपता :** एकाद्या ग्रंथाच्या वा प्रकरणाच्या 'उपक्रमांत' म्हणजे आरंभीं जो अर्थ असतो, प्रतिपाद्य विषय असतो तोच अर्थ उपसंहारांत म्ह. समाप्तीमध्यें; असतो तेव्हां त्यास उपक्रमोपसंहाराची एकरूपता म्हणतात. छांदोग्य उपनिषदाच्या आरंभीं '**सदेव सौम्येदमग्र आसित् एकमेवाद्वितीयम्**' असा अद्वय ब्रह्मप्रतिपादनानें उपक्रम केला आहे. आणि "**एतदात्म्यमिदं सर्वं**" असा अद्वय ब्रह्मप्रतिपादनानेंच उपसंहार केला आहे.

**२. अभ्यास :-** ग्रंथांतील वा प्रकरणांतील प्रतिपाद्य विषयाचें, त्याच त्या अर्थाचें वारंवार प्रतिपादन करणें यांस "अभ्यास" म्हणतात. छांदोग्य उपनिषदांत '**तत्त्वमसि**' या महावाक्याचा नऊ वेळा उपदेश केला आहे. म्हणून त्याचा अभ्यासहि अद्वय ब्रह्मांतच आहे.

**३. अपूर्वता .-** प्रमाणांतरानें जें अज्ञात असते अर्थात्

ग्रंथांतील प्रतिपाद्य विषय इतर दुसऱ्या कोणत्याहि लौकिक प्रमाणाला विषय न होणारा असणें, यासच 'अपूर्वता' म्हणतात. अद्वय ब्रह्म व धर्म इत्यादि अतीन्द्रियार्थ, श्रुति-प्रमाणाव्यतिरिक्त दुसऱ्या प्रत्यक्षादि कोणत्याहि प्रमाणाचा विषय होत नाहींत. अतएव अद्वय ब्रह्म प्रतिपादनाचें बाबतींत एकमेव श्रुति प्रामाण्यच असणें, म्हणजे 'अपूर्वताच' होय.

**४ फलः**–ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयाच्या, वस्तूच्या ज्ञाना-मुळें त्या वस्तूची प्राप्ति होणें, हें जें श्रुतीनें प्रयोजन म्हणून सांगितलें आहे, तेंच 'फल' होय छांदोग्यांतील सहाव्या प्रपाठकांत "**आचार्यवान् पुरुषो वेद । तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्ये**" ज्यानें श्रोत्रिय ब्रह्म-निष्ठ अशा श्रीगुरूंपासून '**तत्त्वमस्या**'**दि** महावाक्याचा उपदेश घेतला आहे, त्यासच श्रीगुरूंनी महावाक्य उच्चारल्या-बरोबर कानावचनाची भेट होऊन त्याचक्षणीं '**अहं ब्रह्मास्मि**' अशी साक्षात्कारात्मक अनुभूति लाभते. त्या दृढापरोक्ष ब्रह्मा-त्मैक्यज्ञानानें मूलाज्ञानासहवर्तमान शोक–मोहाची निवृत्ति होते व प्रारब्धावशेष असेपर्यंत तो देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितींत असतो व देहांतीं देहरहित ब्रह्मस्थितींत असतो, असें जें प्रयोजन सांगितलें आहे. तेंच 'फल' संज्ञक एक लिंग आहे.

**५ अर्थवाद** :– ग्रंथांतील जो प्रतिपाद्य विषय असेल त्याची स्तुति करणें, त्या स्तुतिबोधक वचनास "अर्थवाद" म्हणतात. छांदोग्याच्या सहाव्या अध्यायांतच "**येनाश्रुतं श्रुतं भवति । अमतम्–मतम् अविज्ञातम्–विज्ञातम् इति**" इत्यादि वाक्यांत अद्वय ब्रह्मवस्तूची स्तुति व महती सांगितली असल्याचें स्पष्ट आहे.

**६ उपपत्तिः**–ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयाचें अर्थास अनुकूल दृष्टांत, युक्ति देऊन प्रतिपादन करणें, यासच "उपपत्ति" असें नांव आहे. सर्व पदार्थांचा अधिष्ठान ब्रह्माशीं अभेद सांगण्याकरितां "कार्य कारणाहून भिन्न नसून अभिन्न असते." असें सुवर्ण–अलंकारादिक अनेक दृष्टान्तद्वारां प्रतिपादिलें आहे. सारांश, श्रुतीचें अद्वयब्रह्मप्रतिपादनांतच तात्पर्य अस-ल्याचें उपरिनिर्दिष्ट रीतीनें "षडलिंग" विचारानें सिद्ध होते.

"**द्वा सुपर्णा सयुजा सखाया**" इत्यादि कांहीं श्रुतींमध्यें जीव आणि परमात्मा यांच्यांत नियम्य–नियामक भाव सांगून भेद–द्वैत सुचविल्याचे दिसून येतें. त्यावरून कांहीं द्वैती लोक भेदसूचक श्रुति प्रधान समजून अभेद प्रतिपादक '**तत्त्वमसि**' इत्यादि श्रुति गौण मानतात; परंतु उपरि-निर्दिष्ट रीतीनें भेद [ द्वैत ] सांगण्यांत श्रुतीचें 'मुख्य तात्पर्य' नाहीं हे उपक्रमोपसंहारादिकांवरून निश्चितपणें सि होतें. "**एकमेवाद्वितीयम्, तत्त्वमसि**" इत्यादि श्रुतीनें साक्षात् "**अद्वैत अभेद**" सांगितलेली वाक्यें प्रधान असून भेदप्रतिपादक वाक्यें गौण आहेत.

शिवाय श्रुतीनें भेद सांगितला आहे, असें म्हटले तर– **प्रत्यक्षाद्यनवगतं श्रुत्या प्रतिपादनीयमद्वैतम् । द्वैतं न प्रतिपाद्यं तस्य स्वयमेव सिद्धत्वात्**" या श्रीशंकरा-चार्यांच्या उक्तिप्रमाणें प्रत्यक्षादिप्रमाणेंकरून जें कळत नाहीं, असें जें अद्वैत तत्त्व आहे, तेंच श्रुतीस 'प्रतिपाद्य विषय' आहे. भेद [ द्वैत ] हा प्रत्यक्ष प्रमाणानेंच सिद्ध आहे. त्याला श्रुतीनें प्रतिपादन करण्याची मुळींच गरज नाहीं. म्हणून द्वैत हे श्रुतिप्रतिपादनास योग्य विषयच नाहीं, असें असूनहि श्रुति पुनश्च द्वैतच प्रतिपादन करील तर प्रत्यक्षादि प्रमाणानें सिद्ध असलेल्या पदार्थाची पुनः सिद्धि करण्यांत हंशील काय ? उलट द्वैताचे अनुवादकत्व येऊन श्रुतीचें अज्ञातज्ञाप-कत्व वा अपूर्वता सिद्ध होणार नाहीं. सामान्य बुद्धीस अज्ञात, असें कांहीं नवीन सांगणें, यांतच शास्त्राचें शास्त्रत्व असतें. म्हणूनहि श्रुति जीवास प्रमाणांतरांनी अज्ञात असलेलें जें "अद्वैत तत्त्व" तेंच प्रतिपादन करीत आहे व त्यांतच खरें श्रुतितात्पर्य आहे. भेद सांगण्यांत श्रुतीचें तात्पर्य नाहीं किंबहुना !! नियम्य–नियामक भाव, दूरान्वयानें भेद–द्वैत सुचविणाऱ्या श्रुतीपेक्षां अर्थातच प्रत्यक्ष–साक्षात् अभेद-अद्वैत सांगणाऱ्या श्रुति बलवान् आहेत. म्हणून द्वैतास मिथ्यात्व सिद्ध होतें. जीव आणि ईश्वर यांचे स्वतंत्ररीत्या स्वरूप कथन करणाऱ्या ज्या अवान्तर वाक्यरूप श्रुति आहेत. त्यांचेहि "**तत्त्वमसि**" या महावाक्यांत सांगितलेल्या अभेदांतच, अद्वैतांत परंपरेनें तात्पर्य आहे. हे सूक्ष्म चिंतनानें लक्षांत येण्याजोगें आहे. या एकंदर विवेचनावरून "**तत्त्वमसि**" महावाक्यांतील 'अभेद'–'अद्वैत पक्ष' सयुक्तिक अबाधित श्रुति तात्पर्यविषयीभूत आहे. अद्वैतांतच श्रुतीचें मनोगत आहे, हे सिद्ध झाले. आतां श्रुतिसिद्धांत संमत अद्वैतच भगवदभिमत आहे, हे ओघानेंच सिद्ध होते. व भगवदभिमत "**अद्वैतच**" भगवद्गीतेंत आविष्कृत झाले आहे, हेंहि सिद्ध होतें; तरीपण "षड्लिंगांवरून" गीताशास्त्राचें काय तात्पर्य निश्चित होते ते आतां पाहूं:–प्रवृत्ति–निवृत्ति लक्षण धर्मांची व मोक्षशास्त्राची चर्चा करणारा हा एक "भगवत्गीता" ग्रंथ आहे. या ग्रंथाची रचना भगवान् व्यास महर्षींनी केली आहे. जगज्ज्येष्ठ–श्रेष्ठ भगवान् श्रीकृष्णासारखा वक्ता श्रीगुरु व अर्जुनासारखा शिष्य, भक्तराज श्रोता यांचा योग आणून, अर्जुनास निमित्त करून यच्चयावत् लोकांस उपदेश करण्याकरितां द्वैपायन कृष्ण-व्यास महर्षींसारख्या प्रतिभासंपन्न महाकवीनें, विवेकसिद्ध जीवनविषयक तत्त्वज्ञानाचें महत्त्व जाणून तें अनुष्टुभ छंदांत गुंफून "**श्रीमद्भगवत्गीता**" म्हणून अर्थात् श्रीकृष्णार्जुन

संवादात्मक औपनिषदिक तत्त्वज्ञानाला अनुसरून सातशें श्लोकात्मक रचना करून, तें महाभारतासारख्या सर्वोत्कृष्ट महाकाव्यांत समाविष्ट केलें. आणि संतसम्राट्, धर्मनिष्ठ, ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारी, योगभूमिकासंपन्न योगीराज, वैराग्य संपन्न, एकनिष्ठ पंढरीचे वारकरी भक्तराज, प्रतिभासपन्न अशा कवीराजानें अर्थात् षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीज्ञानेशांनीं आपल्या नवनवोन्मेषशालिनी अशा प्रतिभेनें, अभिनव वाग्विलासानें रसवृत्तींच्या स्फुरणानें, नित्यनूतन अललेलें गीतातत्त्व सरळ साध्या मराठी भाषेंत, ओवीछंदांत लिहून ठेवलें. साऱ्या विश्वाला विवेक प्रकाशानें धवळून काढले. हे आपलें परमभाग्यच होय ! ! जो ज्या अधिकाराचा असेल, ज्या स्थितींत असेल, त्याला त्या अधिकारांतून त्या अवस्थेंतून मुक्त होण्याकरितां, चित्तांतील आत्मस्वरूपविषयक मोह निवृत्त करण्याकरीतां श्रीभगवंतांनीं गीतेंत कर्म, उपासना–भक्ति, ज्ञान, अशा मुख्यत्वेंकरून तीन साधनांचा उपदेश केला आहे. गीतेंतील पहिला अध्याय व दुसऱ्या अध्यायांतील दहा श्लोक यामध्यें अर्जुनाला समरांगणांत, दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं, अगदीं भीष्म द्रोणादिकांच्या समोरून, त्यांस पहिले तेव्हां अज्ञानामुळें, हे माझे शत्रु, आहेत असें न वाटतां 'हे माझे स्वजन आहेत व मीहि यांचा आहे, असें वाटले 'मी मारणारा शूरवीर अर्जुन आहे व हे सर्व मरणारे आहेत. या युद्धापासून मला घोर पाप लागेल. असा अध्यास, भ्रम, मोह झाला. शिवाय आतां हे युद्ध करणेचें सोडून निघून जावे, राज्यवैभवादिक नकोत, निर्वाहासाठीं " वर भिक्षा मागतां भली " असा तो क्षत्रियांस अनुचित कर्मांत प्रवृत्त झाला होता. त्याला मोहनिवृत्त्यर्थ गीतेचा उपदेश आहे. गीतेचा उपदेश सर्वांना उपयुक्त व आदरणीय आहे. सर्वांसच अर्जुना सारखा युद्ध प्रसंग येतो असेंहि नाहीं व सर्वच क्षत्रिय असतात असेंहि नाहीं; तरीपण आत्मस्वरूप विषयक सर्वसामान्य मोह – अज्ञान व निषिद्ध, अनुचित कर्मांकडे प्रवृत्ति या उभय गोष्टी मानवमात्रांत असणें स्वाभाविक आहेत. किंबहुना ! ! अज्ञानकृत " अहम् – अध्यास " व "ममाध्यास " सर्वांस असणें अस्वाभाविक नाहीं. त्यामुळेंच कर्तृत्वभ्रांति व भोक्तृत्व भ्रांति सर्वांस असणें' संभवनीय असल्यामुळें सर्वांचा मोहनिवृत्त व्हावा कर्तृत्व–भोक्तृत्व भ्रांति निवृत्त व्हावी, म्हणून यच्चयावत् मानवांकरितां गीतेचा उपदेश उपयोगी आहे. अहम्–मम–अध्यास दृढस्वरूपाचा होऊन अज्ञानी अर्जुनाला शोक व मोह झाला होता. म्हणून गीतेचा हा पहिला अध्याय व दुसऱ्या अध्यायांतील दहा श्लोक एवढा भाग "शास्त्रप्रवृत्ति प्रस्तावो" आहे. कारण, आत्मस्वरूपविषयक अज्ञानामुळें होणाऱ्या शोक-मोहाच्या प्रदर्शनार्थच हा भाग आहे. तो अर्जुन ब्रह्मात्मैक्य ज्ञानोपदेशासाठीं योग्य अधिकारसंपन्न मुमुक्षु होऊन श्रीभगवान् श्रीकृष्णाविषयीं गुरुत्वबुद्धि ठेवून, आपल्या स्वतः-विषयीं शिष्यत्वबुद्धि स्वीकारून शरण आला त्यावेळीं श्रीगुरु, देवांनीं गीताशास्त्रद्वारां "**क्षेत्रज्ञं चापि माम् विद्धि**" इत्यादि महावाक्याचा उपदेश केला अर्थात् कर्म, उपासना–भक्ति आणि ज्ञान समन्वित " कांडत्रय निरूपिणी । श्रुतिच ही कोंडीसवाणी " अशा गोजिरवाण्या गीतेचा उपदेश केला. हा सर्व प्रसंग तंतोतंत औपनिषदिक पद्धतीनुसार श्रीगुरुदेव ब्रह्मात्मैक्यज्ञान सांगण्यास प्रवृत्त झाल्याचें दाखविले आहे.

**१. उपक्रमोपसंहारौ :––अशोच्यानन्व** शोचस्त्वम् **नानुशोचन्ति पंडिता :** [ अ. २ श्लोक ११ ] असा हा गीताशास्त्राचा उपक्रम आहे आणि सर्व धर्मान् परित्यज्य... मोक्षयिष्यामि **माशुचः** [ अ. १८ श्लोक ६६ ] असा हा गीता शास्त्राचा उपसंहार आहे. त्यावरून "**अशोच्यान्–अतएव माशुचः** ", "**नानुशोचन्ति पण्डितः अतएव माशुच**: " अर्थात् हे शोचनीय नाहीं, शोक करण्यास अयोग्य आहे. किंवा तत्त्वज्ञ पंडित शोक करीत नाहींत. म्हणून अर्जुना ! तूं शोक करूं नकोस " असें उपक्रमोपसंहाराची एकरूपता या " तात्पर्य निर्णायक पहिल्या लिंगावरून सिद्ध होते. तसेंच " एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिः " असा उपक्रम केला आहे व ' इति ते ज्ञानमाख्यातम् गुह्याद्गुह्य–तरम् मया ' यांत इति पदानें उपसहार केला आहे. यारूनहि अज्ञान व तत्कार्य शोक–मोह निरासपूर्वक अद्वयब्रह्मात्मैक्य ज्ञानोपदेश करण्यांत गीतेचें मुख्य तात्पर्य असल्याचें सिद्ध होते.

**२ अभ्यासः**–" न त्वं शोचितुमर्हसि " असा पुनः पुनः " अभ्यास " केला असल्याचें दिसून येते. ' यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ' ' यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो' अशी अकराव्या अध्यायांत तोंडीं कबूली, "**कच्ची पावती** " दिली आहे; तरीपण हा आपण केलेला तत्त्व–ज्ञानाचा उपदेश अर्जुनाला खरोखरी कितपत अनुभवास आला ! हे पाहण्यासाठीं ' कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा, कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ।। ' अर्जुना ! तूं हा सर्व तत्त्वज्ञानोपदेश एकाग्रचित्तानें ऐकलास कां ? तुझें अज्ञान व अज्ञानजन्य संमोह नष्ट झाला ना ? त्यास अर्जुनानें उत्तरादाखल दिलेली "**पक्की पावती** " पुढील प्रमाणें आहेः–

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान् मयाच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ।।**

देवा ! तुझ्या प्रसादानें माझा " मोह नष्ट झाला " आतां मोह असें कीं नाहीं । हे ऐसें जें पुससी कांहीं । कृतकृत्य झालों पाहीं । तुझेपणें ।। असा मी "**शोकराहित्यास** " प्राप्त झालों. "**स्मृति म्ह. ज्ञान प्राप्त झालें** " मी तुझेनि

प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें " ' आत्मविज्ञान ' लाभलें. " मी स्वस्वरूपीं स्थित झालों " " तुझेनि मज मी पावोलि कर्तव्य गेलें निपटूनि " अशी "आत्मस्वरूप संपत्ति" रूप स्थिति लाभली आणि माझा संदेह नाहींसा झाला. ' गुंतलों होतों अर्जुनपणें । तो मुक्त झालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्हीं नाहीं ॥ " अर्थात् " पाशविमुक्त " झालों आतां मी तुझेंच वचन-आज्ञा पालन करीन. यावरून अर्जुनाला मोह झाला होता, त्या मोहास मुख्य कारण आत्मस्वरूपाचें अज्ञान आहे, त्याच्या निवृत्त्यर्थ ब्रह्मात्मैक्यज्ञानच समर्थ आहे, हे गीतेसहि मान्य असल्याचें सिद्ध होते.

३ अपूर्वता :– उपर्युक्त लिंगांमध्यें श्रुति सिद्धांताचेच पूर्णतया अनुसरण केलें आहे. " तत्र को मोहः कः शोकः एकत्त्वमनुपश्यतः ", ' तरतिशोकमात्मवित् ' ' सोऽहम् भगवः शोचामि " यांत केलेल्या " शुच् " धातूचाच प्रयोग गीतेंतहि केला आहे अर्थात् वेदोपनिषदानुसारीच ही भगवत्‌गीता असल्यामुळें अद्वैतामृतवर्षिणी गीतेनें सांगितलेल्या ब्रह्मात्मैक्यज्ञानाची अपूर्वता अर्थात् " अपूर्वता " हे लिंग सिद्ध होते.

४. फलः–ब्रह्मात्मैक्यज्ञानानें मोक्ष, परमशांति, परमसिद्धि अपुनरावृत्ति, अमृतत्त्व, आत्यंतिक सुख प्राप्त होतें, असें गीतेंत अनेक वेळां सांगितलें आहे. " ज्ञानं लब्ध्वा परां शांति मचिरेणाधिगच्छति ' 'ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ', ' गच्छन्त्य पुनरावृत्तिं ज्ञान निर्धूत कल्मषाः " " यज्ज्ञात्वामृमश्नुते " सुखमक्षयमश्नुते " परांसिद्धिमितो गताः " इत्यादि वाक्यांत गीतेनें जें मोक्षरूप परम प्रयोजन सांगितलें आहे, तेंच मुख्य " फल " होय. त्याच्या प्राप्तीसाठींच गीतेनें प्रश्न प्रतिवचनात्मक रीतीनें वेगवेगळे " योग " म्हणजे ' उपाय ' सांगितलें आहेत. त्यांत ब्रह्मात्मैक्यज्ञान साक्षात् साधन आहे व बाकीचीं सर्व साधनें परंपरेनें मोक्षास कारणीभूत आहेत.

५ अर्थवादः– भगवंतांनी गीतेंत जागजागीं ज्ञानाची महती, स्तुति गायली आहे " सर्वे कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते', ' नहि ज्ञानेनसदृशं पवित्र मिह विद्यते ' "ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात् कुरुते " सर्वज्ञान प्लवे नैव वृजिनं संतरिष्यसि", "ज्ञानीत्वात्मैव मे मतम्" इत्यादि वाक्य द्वारां मोक्षसाधनीभूत ज्ञानाची दृष्टांतपूर्वक, सोपपत्तिक स्तुति गायिली आहे. त्यावरून "अर्थवाद" संज्ञक तात्पर्य निर्णायक लिंग सिद्ध होते.

६ उपपत्ति :–' अज्ञानेनावृतं ज्ञानं तेनमुह्यन्ति जन्तवः ' ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशित मात्मनः तेषामादित्य वज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् " यांत एकमेव ब्रह्मात्मैक्य ज्ञानानेंच मोहास कारणीभूत असणाऱ्या अज्ञानाची अर्थात् शोक–मोहाची आत्यंतिक निवृत्ति होते. अशी "उपपत्ति"च सांगितली आहे.यारीतीनें "तात्पर्य निर्णायक सहा लिंगांवरून पूर्वापार विचार केला असतां श्रुतिसिद्धांताप्रमाणेंच " गीता शास्त्रांतहि कार्य–काणात्मक अध्यास निरास पूर्वक साक्षात् वा परंपरेनें एकमेवाद्वितीय परमात्माच गायिलेला आहे व तेंच गीतेचें तात्पर्य होय, असें सिद्ध होते. सर्ववेद कर्मपर आहेत, कां उपसनापर आहेत, कां सगुण परत्मपर आहेत, कां निर्गुण परत्मपर आहेत, असा प्रमाणसंशय येतो. त्यामुळें वेदाचा पूर्वापार षड्लिंगपूर्वक विचार करण्यास समर्थ बुद्धि नसलेल्या मंदप्रज्ञ मुमुक्षूंस वेदतात्पर्याविषयीं संशय येणें संभवनीय आहे. त्यानें उपर्युक्त रीतीनें तात्पर्य निर्णय जाणावा. सर्वप्रमाण अगोचर निर्गुण परब्रह्मतत्त्व मंदप्रज्ञ अधिकाऱ्यास कळावे. अर्थात् त्या निर्गुणाच्या ज्ञानाचें साधन म्हणूनच ' सगुणाचें ' प्रतिपादन केलें आहे. निष्काम कर्मानें वा सगुणाच्या नामोच्चारणानें 'मल' दोष जातो. निष्काम उपासनेनें, प्रेमलक्षणात्मक भक्तीनें, सगुणध्यानानें 'विक्षेप' दोष जातो आणि देवाच्या अपरोक्ष ज्ञानानें " आवरण " दोष जातो ब्रह्मस्थिति प्राप्तीचें ' ज्ञान ' हें साक्षात् साधन आहे व कर्म उपासनादि परंपरेनें साधनें आहेत. सगुणोपासकांसहि उपासनाबलानें सगुण साक्षात्कार होतो व त्यास ब्रह्मात्मैक्य साक्षात्काराची तीव्र इच्छा असेल तर त्यास सगुण साक्षात्कारद्वारां किंवा त्याविना श्रीहरि–स्वतःच पण त्याचे गुरुत्व स्वीकारून त्यास ज्ञानोपदेशानें ज्ञान देतो. मग मी ब्रह्म आहे, असें ज्ञान होऊन त्याची परिणति मात्र सर्वत्र ' भरला घनदाट हरि दिसें ' या व्यापक बोधांत होते. याच अंतिम ब्रह्मस्थितीवर सर्वांनीं आरूढ व्हावे. म्हणून अधिकारानुरूप उचित, शक्य व आणि निश्चितफलदायी साधनाचेंच श्रुतीनें, गीतेनें संतसम्राट् श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं " या ज्ञानेश्वरींत " प्रतिपादन केलें आहे.

**यदत्र सौष्ठवं किंचित् तद्गुरोरेव मे नहि ।**
**यदत्राऽसौष्ठवं किंचित् तन्ममेव गुरोर्नहि ॥**

या ग्रंथलेखनांत जे कांहीं सौष्ठव असेल ते सारेकांहीं श्रीगुरूंचेच आहे. माझें नव्हे आणि जर कांहीं असौष्ठव असेल तर तें सारे माझेंच आहे; श्रीगुरूंचे नव्हे.

**॥ श्रीगुरुचरणारविन्दार्पणमस्तु ॥**

**॥ पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ॥**

**॥ श्रीज्ञानदेव तुकाराम ॥**

**" सार्थ श्रीज्ञानेश्वरी समाप्त "**